*Gujarati Sahityacha Itihas* (गुजराती साहित्याचा इतिहास) : Marathi translation by Jayant Joshi of Mansukhlal Jhaveri's *History of Gujarati Literature*, Sahitya Akademi, New Delhi (1984) Price Rs. : 35–00



प्रथमावृत्ती : १९८४

प्रकाशक :
साहित्य अकादेमी,
रवीन्द्र भवन, फिरोजशाह रोड,
नवी दिल्ली ११० ००१

प्रादेशिक कार्यालये :
रवीन्द्र सरोवर स्टेडियम, ब्लॉक ५ बी,
कलकत्ता ७०० ०२९

२९, एलडाम्स रोड, तेनाम पेठ,
मद्रास ६०० ०१८

१७२, मुं. म. ग्रं. सं. मार्ग, दादर,
मुंबई ४०० ०१४

मुद्रक :
प्रदीप मुनोत
प्रभात प्रिंटिंग वर्क्स,
४२७ गुलटेकडी, पुणे ४११ ०३७

**किंमत : ३५ रुपये**

# प्रस्तावना

साहित्य अकादमीने ठरविल्याप्रमाणे ह्या इतिहास गुजराती साहित्य प्रत्यक्ष न जाणणाऱ्या वाचकांसाठी लिहिलेला आहे. म्हणून मी असा प्रयत्न केला आहे की, ह्या इतिहास गुजराती लेखकांच्या नावाची केवळ जंत्री होऊ नये व त्या बरोबरच अनावश्यक तपशील अथवा दीर्घ साहित्यसमीक्षा ह्यांनाही येथे वाव असू नये. गुजराती साहित्यातील सर्वसामान्य अशा गोष्टीच मी येथे नमूद केल्या आहेत. वादग्रस्त मुद्दे आवर्जून टाळले आहेत. गुजराती साहित्याशी खूप परिचित अशा बहुश्रुत पंडितांनाच केवळ आवडेल अशा गोष्टीही येथे समाविष्ट केल्या नाहीत. म्हणूनच वल्लभाने लिहिलेल्या आख्यानावर आधारित अशा प्रेमानंदांच्या जीवनावरील गोष्टी येथे वाचकांना आढळणार नाहीत. कारण त्याचे अस्तित्वच वादग्रस्त आहे. तसेच मध्ययुगीन कवींच्या निश्चित समयाबद्दलचा वादही वाचकांना ह्यात आढळणार नाही. तसेच नरसिंह मेहताच्या मनात भक्तीची ज्वाला कशी एकदम प्रकट झाली अशा विषयांचीही ह्यात चर्चा केलेली नाही.

येथे सर्व गुजराती लेखकांचे साहित्याच्या दृष्टीनेच मूल्यमापन केले आहे. त्यात इतर बाबी उदाहरणार्थ– जात, धर्म, संप्रदाय, स्त्री अथवा पुरुष ह्यांना जराही महत्त्व दिलेले नाही.

हे लेखन करीत असताना माझ्या दृष्टीपुढे असा वाचक आहे की, जो गुजराती भाषा न जाणणारा पण ज्याला उच्च प्रकारच्या साहित्याची व सांस्कृतिक बाबींची अभिरुची आहे. तो भारतीय असो किंवा परदेशस्थ असो; पण ज्याला गुजराती साहित्याची प्रगती व विकास पहिल्यापासून ते आजपर्यंत कसा होत गेला याची सर्वसाधारणपणे माहिती करून घेण्याची इच्छा आहे अशा वाचकांसाठीच ह्या इतिहास लिहिला आहे. १९५५ नंतरच्या साहित्यातील मात्र मुख्य प्रवाह व लक्षणे देण्याचा मी प्रयत्न केला आहे कारण ते साहित्य अद्याप नवीन आहे व विकसित होत आहे म्हणून त्याबद्दल सध्या फार खोलवर जाऊन ठाम विधाने करणे अनुचित होईल.

हे पुस्तक लिहिताना माझ्या आधी प्रसिद्ध झालेले लेखक, पुस्तके, साहित्याचे स्वरूप व प्रवाह ह्या विषयांवरील लेखांचा मी खूप उपयोग केला आहे व मी

डॉ. रमणलाल सी. शाह ह्यांच्या सहयोगाने लिहिलेल्या गुजराती भाषेतील माझ्या An outline of the History of Gujarati Literature (गुजराती साहित्याच्या इतिहासाची रूपरेखा) ह्या पुस्तकाचाही उपयोग केला आहे.

त्याशिवाय मुख्यत्वे के. एम. झव्हेरी, के. एम. मुनशी, अनंतराय रावळ, धीरुभाई ठाकर, सुंदरम्, जयंत पाठक, रघुवीर चौधरी, अनिरुद्ध ब्रह्मभट्ट, उशनस् आणि चंद्रकांत टोपीवाला व इतर लेखकांच्या पुस्तकांचा मी फार मोठा आधार घेतलेला आहे व त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे.

ह्याशिवाय प्रो. अनंतराय रावळ, डॉ. चिमणलाल त्रिवेदी, श्री. मुकुंद पाराशर्य, डॉ. भोगीलाल सांडेसरा आणि डॉ. सुरेश दलाल ह्यांनी काही विशिष्ट मुद्द्यावर मला महत्त्वाची जी माहिती पुरवली त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे.

तसेच प्रोफेसर विष्णुप्रसाद त्रिवेदी आणि श्री गुलाबदास ब्रोकर ह्यांनी पुस्तक वाचून मला ज्या बहुमोलाच्या सूचना दिल्या त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

तसेच साहित्य अकादेमीने हे पुस्तक लिहिण्याचे काम माझ्यावर विश्वास-पूर्वक सोपविले–ज्याला मी माझा बहुमान समजतो–त्याबद्दल व पुस्तकाची हस्त-लिखित प्रत सोपवण्यास मला विलंब लागला तरी तो चालवून घेतल्याबद्दल मी साहित्य अकादेमीचा फार आभारी आहे.

ज्या ठिकाणी खास निर्देश केलेला नसेल अशा सर्व गुजराती अवतरणांचा अनुवाद (English मध्ये) मीच केलेला आहे.

४ ऑगस्ट १९७६ —मनसुखलाल झव्हेरी

# अनुक्रमणिका

प्रकरण पहिले

# सामान्य पार्श्वभूमि

[ १ ]

गुजरात हा प्राचीन देश आहे. गुजरातच्या चतु:सीमा मात्र काल व परिस्थितीच्या प्रभावाने अनेकदा बदलत गेल्या आहेत. अखेरीस १ मे १९६० ह्या दिवशी स्वतंत्र संयुक्त भारतातील एक घटक प्रदेश म्हणून सध्याचा गुजरात स्वायत्त व स्थिर प्रदेश झाला. त्याच्या सीमा अशा आहेत– उत्तरेस मारवाड, मेवाड, सिरोही, कच्छचे रण, आणि आबू आरासुर, तारंगा ह्या टेकड्या व साबरकाठ. दक्षिणेस ठाणे जिल्हा, पश्चिमेस अरबी समुद्र, खंबायत व कच्छचे आखात आणि पूर्वेस सातपुडा पर्वत व पश्चिम घाट. त्याचे काही भाग समुद्रापासून शंभर मैलापेक्षा अधिक दूर आहेत.

सध्याच्या गुजरातचे मुख्य तीन विभाग पडतात. १) कच्छ २) सौराष्ट्र व ३) गुजरात या नावाने प्रसिद्ध असलेला विभाग. या विभागात कच्छ हे नाव फार प्राचीन काळापासून मशहूर आहे. सौराष्ट्र हे नावही प्राचीनच आहे. मध्यंतरी थोडा काळ ते काठेवाड ह्या नावाने ओळखले जात होते. संपूर्ण गुजरातला दुसरे कोणतेही नाव दिलेले नव्हते. गुजरातच्या काही छोटया-मोठया विभागांना आनर्त, लाट, शूर्पारक, अनूप आणि अपरान्त अशा संज्ञा मिळालेल्या होत्या. इसवी सनाच्या पाचव्या शतकात गुर्जरांच्या शासनकालात शक नावाच्या टोळीने भारतात प्रवेश करून सहाव्या शतकाच्या शेवटी पश्चिम राजस्थान व सध्या ज्यास उत्तर गुजरात म्हणतात तो प्रदेश जिंकून घेतला. त्यावेळेपासून हा प्रदेश गुर्जरात्र, गुज्जरट्ट किंवा गुर्जर देश ह्या नावाने ओळखला जाऊ लागला. ८ व्या शतकात आलेल्या अरब प्रवाशांनी त्याचा उच्चार 'झर', 'गुझरा' असा केला व त्यातूनच 'गुझरात' व नंतर 'गुजरात' असा उच्चार दहाव्या शतकात रूढ झाला.

'गुजराती' हे ह्या प्रदेशाच्या भाषेचे नाव पक्के होण्यासाठी जवळ जवळ ५०० वर्षे लागली. नरसिंह मेहता आपल्या भाषेस 'अपभ्रंश गिरा' असे संबोधतो.

पद्मनाथ 'प्राकृत' म्हणतो. भालण अपभ्रंश अथवा गुर्जर भाषा असे उल्लेखितो. 'गुजराती' असे नामाभिधान प्रथम येते ते प्रेमानंद (१६३६–१७३४) ह्या मध्ययुगीन महान कवीच्या लेखनातून आणि १७३१ मध्ये आलेल्या ला क्रॉस (La Crose) नावाच्या जर्मन प्रवाशाच्या लेखनातून गुजराती ही सध्या दोन कोटी लोकांची बोलीभाषा आहे व त्यामध्ये हिंदु, मुसलमान, पारसी आणि ख्रिश्चन धर्माचे लोक आहेत. गुजराती भाषेच्या उच्चारात मात्र निरनिराळ्या विभागात, प्रांतात, जिल्ह्यात कमी अधिक तफावत आढळते. तसेच मेर, दुबळा, चोधरा, वारैया, भिल्ल इ. निरनिराळ्या जाती-जमातीमध्येही उच्चारणभेद आढळतो एवढेच. व्यवसायाच्या लोकातही वाक्यरचना व शब्दावली ह्यात खूप भेद असल्याचे स्पष्ट होते. त्यामुळे गुजरातीस विविध उपभाषा आहेत हे ही स्पष्ट होते. अहमदाबाद व आसपासच्या मोठ्या शहरातील उच्चवर्णीय व शिक्षित लोक जी भाषा बोलतात व लिहितात ती शुद्ध गुजराती भाषा समजली जाते, पण प्रादेशिक व सामाजिक परिस्थिती-प्रमाणे तिची निरनिराळी रूपे दिसतात.

[ २ ]

सोळाव्या शतकापर्यंत गुजरात व पश्चिम राजस्थानात एकच भाषा होती. अर्थात दोन्ही विभागातील बोलीभाषेत काही फरक होते. त्या भाषेला डॉ. टेरी टोरी 'जुनी पश्चिम राजस्थानी' असे नाव देतो. नरसिंहराव दिवेटिया तिला 'अन्तिम अपभ्रंश' असे म्हणतात तर डॉ. उमाशंकर जोशी गुजरात व मारवाड (मारु) मध्ये एकच भाषा होती हे भारपूर्वक दर्शविण्यासाठी तिचे 'मारुगुर्जर' हे नामकरणच उपयोगात आणतात.

प्राकृत व्याकरणकार मार्कंडेय ह्याने आपल्या 'प्राकृत सर्वस्व' नामक ग्रंथात वर्णिलेल्या अपभ्रंशाच्या २७ प्रकारातील गौर्जरी ह्या उपभाषेतून ही भाषा विकास पावलेली असावी असे वाटते. गुजरात व लाट ह्या प्रदेशातील लोकांच्या भाषेचा जुन्यातील जुना उल्लेख इ. स. ७७८ मध्ये उद्योतनसूरीने लिहीलेल्या 'कुवलयमाला' ह्या ग्रंथात आढळतो. त्यानंतरचा उल्लेख म्हणजे भोजाच्या 'सरस्वती कंठाभरण' या (इ. स. १०००) च्या सुमाराच्या ग्रंथातील आहे. पण ह्या दोन्ही ग्रंथामुळे त्या काळच्या भाषेच्या प्रत्यक्ष स्वरूपावर मात्र जवळजवळ काहीच प्रकाश पडलेला नाही.

उत्तर व मध्य भारतातील मुख्य मुख्य भाषांप्रमाणे गुजराती भाषा इंडो-आर्यन भाषावंशातीलच आहे. तिचा उगम संस्कृत भाषेतून झाला आणि मग प्राकृत व अपभ्रंश ह्यांच्या प्रवाहातून तिची उत्क्रांती होत आलेली दिसते. तिचा सर्वात जवळचा पूर्वज म्हणजे गौर्जर अपभ्रंश आहे आणि व्रज व राजस्थानी भाषांचाही पूर्वज गौर्जर अपभ्रंशच आहे.

हेमचंद्राने (१०८८–११७२) आपल्या प्राकृत व्याकरणात उद्धृत केलेल्या काही अपभ्रंश दुह्याची भाषा म्हणजे अपभ्रंश भाषेची शेवट शेवटची अवस्था किंवा गुजराती भाषेची गर्भावस्था असे म्हणावयास हरकत नाही. नरसिंहराव दिवेटिया तिला अंतिम अपभ्रंश अथवा गुर्जर अपभ्रंश म्हणतात. हेमचंद्राने ह्या भाषेचे बारकाईने सविस्तर व्याकरण वर्णिलेले आहे. त्याने आपल्या प्रत्येक विधानाचे लोकांच्या बोलीभाषेतून व त्याकाळी लिहिलेल्या काव्यग्रंथातून अनेक उदाहरणे देऊन समर्थन केले आहे. हेमचंद्राची अवतरणे म्हणजे जुन्यातले जुने प्राचीन गुजरातीचे नमूने म्हणण्यास जराही प्रत्यवाय नाही.

अनेक पंडितांनी गुजराती भाषेची उत्क्रान्ति हेमचंद्रापासून थेट आधुनिक काळापर्यंत होत असलेली दाखविली आहे. तथापि गुजराती भाषेच्या विकासाचे मुख्य-मुख्य टप्पे समजण्यासाठी केशवलाल ध्रुव ह्यांनी सुचविलेले तीन कालखंड ध्यानात घेणे उचित होईल. ते कालखंड पुढीलप्रमाणे आहेत.

१) अपभ्रंश अथवा जुनी गुजराती १० व्या अथवा ११ व्या शतकापासून ते १४ व्या शतकापर्यंत.

२) मध्यकालीन गुजराती–१५ ते १७ वे शतक.

३) अर्वाचीन गुजराती–१८ व्या शतकापासूनची.[१]

[ ३ ]

गुजराथी बोलींचे (dialects) मुख्य दोन भाग पडतात :

१) गिरिप्रदेशातील भाषा

२) मैदानी प्रदेशातील भाषा

(१) गिरिप्रदेशातील बोली अनेक आहेत. त्यांना भिल्ली बोली असे म्हणतात. ह्या बोलीमध्ये प्रदेशांप्रमाणे व समूहाप्रमाणे खूप फरक आहेत. सर जॉर्ज ग्रिअर्सनने अशा बोलीचे २२ प्रकार सोदाहरण वर्णिले आहेत.

(२) मैदानी प्रदेशातील बोलींचे मुख्य आठ वर्ग आहेत. सुरती, चरोतरी, पाटणी, (उत्तर गुजराती), झालावाडी, गोहिलवाडी, सोरठी, हालारी व कच्छी. ह्या शिवाय–

अ) अनुसूचित जातीजमाती– उदा : मेर, चोंधरा, वारैया, नायक वगैरे.

ब) पारसी, बोहरा, खोजा, भरिया वगैरे जाती व धर्माचे लोक.

क) सोनार :– वगैरे धंदेवाईक लोक ह्यांच्या बोलीत एक विशिष्ट शब्दसमूह आहेत. ह्या जातीजमाती, जनसमूह व धंदेवाईक लोक त्यांच्या विशिष्ट शब्दभांडारामुळे एकच प्रादेशिक बोली असणाऱ्या इतर लोकांपेक्षा वेगळे ओळखू येतात.

[ ४ ]

गुजराती लिपी देवनागरी लिपीसारखीच असली तरी काही अक्षरात फरक आहे. उदाहरणार्थ पुढील स्वर – अ, आ, इ, ई, उ, ऊ, व पुढील व्यंजने– क्, ख्, च्, ज्, झ्, ण्, द्, फ्, ल् आणि ळ् शिवाय देवनागरीतील अक्षरांच्या शिरोरेखेलाही त्यांस वाव नाही. अनेक शतकापासून गुजरातीतून लृ, ऋ आणि ष् ध्वनीही लोप पावले आहेत. संस्कृत तत्सम शब्दात मात्र ही अक्षरे येतात. निरनिराळ्या वेळी दुसऱ्या भाषांशी झालेल्या संपर्कामुळे गुजरातीत काही नवीन ध्वनी समाविष्ट झाले आहेत. उदा.– अर्धतालव्य च्, छ्, ज्, झ् (मूर्धन्यतर) ड्, ढ्.

तीन प्रकारची अनुनासिके (तीव्र)[२], .(कोमल)[३], (कोमलतर)[४] व (वितृत) ९–अे आणि ० (ओ)[५].

देवनागरी लिपीतील काही उच्चार निःसंदिग्धपणे दाखविण्यास मार्ग नाही म्हणून ते ध्वनी विशद करण्यासाठी त्यावर (भेददर्शक) चिन्ह करण्यात येतात.

[ ५ ]

संस्कृत भाषेशी प्राणभूत व ऐतिहासिक दृष्ट्या सतत संबंध राहिल्याने गुजरातीत संस्कृतमधून कमी-जास्त परिवर्तन होऊन आलेले शब्द यांचा खूप भरणा आहे. तसेच देश्य शब्दांचे प्रमाणही बरेच आहे. देश्य शब्द म्हणजे ह्या प्रांतात गुर्जर लोक व त्यांची गुर्जर भाषा येण्यापूर्वी तेथे राहणाऱ्या लोकांच्या भाषेतील शब्द. भारतातील इतर भाषांतील शब्दांशी या देश्य शब्दांचे जराही साम्य नाही.

तसेच गुजरातला १००० मैल लांब अशी समुद्रपट्टी लाभली असल्याने आणि तेथील लोकांचा इतर लोकांशी सांस्कृतिक, आर्थिक, व्यापारविषयक आणि राजकीय संबंध आल्याने गुजरातीने एका बाजूने हिंदी, बंगाली, मराठी, उर्दू, सिंधी व द्रविड भाषा ह्या भाषांतून शब्द घेतले आहेत, तर दुसऱ्या बाजूने पर्शियन, अरबी, पोर्तुगीज, डच, फ्रेंच व इंग्रजी ह्या परदेशी भाषांतूनही शब्दांना भरणा तीत झालेला आहे. मुसलमानांचे राजकीय वर्चस्व असतानाच गुजराती भाषेची सुरुवात (व विकास) झाल्याने गुजराती भाषेत पारसी, अरबी शब्द प्रथमपासून समाविष्ट झालेले आहेत.

इंग्रजी भाषेने तर आपल्या प्रभावाने ह्या भाषेत मूलभूत फरक करून तिचे स्वरूपच बदलून टाकले आहे. संप्रदाय, म्हणी, विरामचिन्हे व विशिष्ट वाक्यरचना हे सर्व तर आलेच पण इंग्रजीमुळे गुजरातीत (Indirect Construction) अपरोक्ष रचनाही आली.

[ ६ ]

जुनागडला गिरनारच्या पायथ्याशी मोठ्या शिलाखंडावर तीन शिलालेख कोरलेले आहेत. प्राचीन भारतातील तीन श्रेष्ठ राजवंशानी (त्यातील महान राजांनी) केलेल्या उत्तम कार्याची त्यामध्ये महत्त्वाची माहिती मिळते. एका शिलाखंडावर मौर्य सम्राट् अशोक ह्याने प्रसारित केलेले १४ आज्ञालेख (edicts) आहेत. दुसऱ्यावर क्षत्रप राजा रुद्रदामन् ह्याचा जाहीरनामा आहे. व तिसऱ्यावर गुप्तसम्राट स्कंदगुप्त ह्याचे आदेश आहेत.

गुप्त राजवंशाचे वर्चस्व गुजरातेत ७० वर्षे होते. पण त्याच्या मागून आलेल्या मैत्रकांचाही प्रभाव ह्या भूमीवर खूप वर्षे चालला. सौराष्ट्रात मैत्रककालाच्या ३० मंदिरांचा शोध लागलेला आहे. त्यावरून भारतीय वास्तुकलेबद्दल बरीच ऐतिहासिक सामुग्री मिळते. मैत्रकाच्या कारकीर्दीत सूर्योपासनेचा फार प्रसार झाला. त्या काळची बरीच महत्त्वाची सूर्यमंदिरे गुजरातेत आहेत. रन्नादे—रांदेल ह्या सूर्यपत्नीची पूजा गुजरातेत अनेक ठिकाणी अजूनही प्रचलित आहे.

मैत्रकानंतर चापोकट, नंतर राष्ट्रकूट व त्यानंतर प्रतिहार असे राजवंश गुजरातेत आले. ते गुजरात आपलाच देश आहे असे मानून येथील प्रजेशी एकरूप होऊन गेले. त्यानंतर चालुक्य अथवा सोलंकी ह्या नावाने प्रसिद्ध असलेल्या लोकांनी व्यापार उद्योग खूप वाढवून, समुद्रवाहतूक व राजकीय व्यवहार ह्यांचा अतुलनीय विकास करून गुजरातला वैभवाच्या शिखरावर नेऊन बसविले. त्यांच्याच काळात जैनधर्म व अहिंसा गुजरातेत दृढमूल झाली.

सोलंकीनंतर आलेल्या वाघेला सत्ताधीशांनी गुजरातच्या शिल्पकलेत महत्त्वाची भर घातली. देलवाडा, आबू येथील सौंदर्यसंपन्न भव्य संगमरवरी मंदिरे ह्याच काळातील आहेत.

ह्या सर्वांप्रमाणे बाहेरून आलेल्या मुसलमान व पारशी लोकांनीही गुजरातला आपला देश मानून येथे वास्तव्य केले.

ह्या विविध धर्मांच्या व विविध प्रकृतीच्या जाती-जमाती येथे कायम रहिवाशी झाल्याने व त्यांच्याशी घनिष्ट संपर्क आल्याने गुजराती प्रजा अत्यंत सहनशील व मनमिळाऊ झाली आहे. सूर्य, विष्णू, शिव, महावीर आणि त्याच बरोबर पीर (मुसलमानी संत) हे सर्व व इतर अनेक देवदेवतांची पूजा गुजरातेत चालू आहे. येथे अनेक संप्रदाय, धर्मपीठे आपापल्या पद्धतीने सुखाने आपला धर्म पाळीत आहेत. आंध्र प्रदेशातील वल्लभाचार्यांनी स्थापलेला पुष्टि संप्रदाय गुजरातेत फारच महत्त्व पावला आहे. आणि अयोध्येच्या सहजानंद स्वामींनी स्थापन केलेल्या स्वामिनारायण संप्रदायाने आपले मुख्य स्थान गुजरातेतच स्थापिले आहे.

ह्युएनसांगने असे लिहून ठेवले आहे की मैत्रकांचे वल्लभी विद्यापीठ हे वैदिक, जैन आणि बौद्ध पंडितांचे धर्माचे व ज्ञानाचे मोठे केंद्र होते.

अर्थातच गुजरातचीच अशी खास वैशिष्टयपूर्ण शिल्पकला अथवा स्थापत्यकला नसली तरी इ. स. ५ व्या शतकापासून ते १३ व्या शतकापर्यंत श्रेष्ठ असे ठरलेले वास्तूकलेचे नमुने गुजरातमध्ये आहेत. उदा :– मोढेराचे सूर्यमंदिर, सिद्धपूरचे रुद्रमाळ आणि धुमली व सेजकपूर येथली नवलखीची मंदिरे इत्यादि गुजरातेतील उत्कृष्ट वास्तुकलेचे नमुने म्हणून प्रसिद्ध आहेत.

तेराव्या शतकात व त्यानंतर आलेल्या गुजरातमधील मुसलमान सुलतानांनी कलावन्तांची खूप कदर करून त्यांना उदार आश्रय दिला. त्यांनी शिल्पशास्त्रात नवीनता आणली. मशिदी व इतर मुसलमानी वास्तुशिल्पे ह्यामध्ये मनुष्य आणि प्राणी ह्यांच्याऐवजी सुंदर वृक्ष, लता, फुले व भूमितीच्या आकर्षक आकृती ह्याना स्थान मिळाले. अहमदाबाद येथील सिद्दी सय्यद मशिदीतील एक कोरीव काम असलेली खिडकी शिल्पशास्त्राची एक अप्रतिम कृती म्हणून साऱ्या जगभर प्रसिद्धी पावली आहे' दिल्ली व आग्रा येथील मोगल कालातील कोरीव कामापेक्षाही अहमदाबाद येथील कोरीव कामे व सुशोभन कला श्रेष्ठ आहेत असे मानले जाते.

भारतीय चित्रकलेच्या उत्तमोत्तम परंपराचे रक्षण गुजरातने केले आहे. ११ व्या शतकापासून विशिष्ट गुजराती चित्रकलेचे उत्कृष्ट नमुने व तसेच मोगल व रजपूत चित्रकलेचे नमुने जैन हस्तलिखितांतून आणि सिहोर, पांडरशिंगा व जामनगर येथील भित्तिचित्रांतून रक्षण करून ठेवलेले आहेत.

गुजरातचे असे विशिष्ट संगीत नाही हे खरे पण भारतीय संगीताचा बृहत्‌कोशच अशा 'संगीतरत्नाकर' ह्या ग्रंथात नमूद केलेल्या काही रागांची नावे उदा. :– गुर्जरी; वेलावली (बिलावल), श्रावण, सौविरी, वंशावती, आहिरी, लाटी, सोरठी ही गुजरातमधील विशिष्ट भागावरून आलेली नावे आहेत ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. विचित्रवीणा हे वाद्य–जे आजही वाजविले जाते ते– अहमदाबादच्या जेसिंगभाई नावाच्या संगीतकाराने शोधून काढले आहे. नायक, भोजक, तरगाळे, गंधर्व, मीर, लांघा इ. जातीचे लोक हे असे आहेत की ज्यांनी आपले सर्व जीवन संगीत व नाटक ह्यांच्या विकासासाठी अर्पण केले आहे आणि ते त्यावरच आपला उदरनिर्वाह करतात.

रास, गरबी व लोकनृत्ये हा तर गुजरातचा परंपरागत वारसाच आहे. अर्थात रास हा एकट्या गुजरातचा सांस्कृतिक ठेवा नाही. तो प्रकार थोड्या फार फरकाने भारतात इतर प्रांतातही चालू आहे. पण सगळीकडून छिद्रे पाडलेला व आंत मातीची पणती तेवत असलेला घडा डोक्यावर ठेऊन स्त्रियांनी केलेला 'गरबो हा नाच मात्र फक्त गुजरातचाच विशेष प्रकारचा नाच आहे.

## तळटिपा

१. (अ) नरसिंहराव दिवेटियांच्या गुजराती भाषेच्या विकासाचा आलेख असा आहे.

१) अपभ्रंश– विक्रम संवत् ९५० पर्यंत.

२) मध्य अपभ्रंश– विक्रम संवत् १३०० पर्यंत.

३) अंतिम अथवा गुर्जर अपभ्रंश (ज्याला डॉ. टेसीटोरी 'Old Western Rajasthani' म्हणतो) विक्रम संवत् १३०० पासून १५५० पर्यंत.

४) जुनी गुजराती, विक्रम संवत् १५५० ते १६५०.

५) मध्ययुगीन गुजराती १६५० ते १७५० विक्रम संवत्.

६) अर्वाचीन गुजराती विक्रम संवत् १७५० पासून पुढे.

(ब) श्री. केशवराम शास्त्रींनी दिलेला विकासाचा आलेख–

१) गौर्जर अपभ्रंश अथवा जुनी गुजराती–
पहिला टप्पा : इ. स. ६ व्या शतकापासून ११ व्या शतकापर्यंत.
दुसरा टप्पा : इ. स. १४ व्या शतकाचा पूर्वार्ध.

२) गुर्जर भाषा अथवा मध्यकालीन गुजराती इ. स. १४ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून १७ व्या शतकाचा पूर्वार्ध.

३) अर्वाचीन गुजराती–
पहिला टप्पा : १७ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून इ. स. १८२५ पर्यंत.
दुसरा टप्पा : सध्याची चालू भाषा.

२. पंकज, खंडेर, पंजो, गंध, डुंगर वगैरे प्रमाणे.

३. पांच, आंगळी, खांचो, खांड, आंधण वगैरे.

४. कंई, दहीं, अहीं, सुंवाळुं वगैरे.

५. अ) बसे, पॅसे, वॅर, पॅठो, बैठो वगैरे.
ब) गॉळ, मॉर, पॉंक, कॉडी, कॉण वगैरे.

प्रकरण दुसरे

# जुने साहित्य

[ १ ]

इ. स. ७४६ ते १२९८ च्या दरम्यान गुजरातेत रजपूत राजे राज्य करीत असताना अनेक ब्राह्मणेतर कवींनी संस्कृत भाषेत ग्रंथ रचले, पण १० व्या शतकापासून अपभ्रंश भाषा प्रचलित झाली व तेव्हापासून दरबारी कवि लोकभाषेतून 'रास' लिहू लागले. ही भाषा म्हणजे मारवाडी, व्रज व इतर देशी भाषा ह्यांचे मिश्रणच होते हे ' रास ' मुख्यत: आपापल्या आश्रयदात्यांची स्तुतिस्तोत्रेच असत. तत्कालीन जैन साधूही ' रास '[1] व फागु '[2] ह्या काव्यप्रकारात आपल्या श्रीमंत निष्ठावंतांची स्तुति करीत आणि आपल्या अनुयायांना धार्मिक व नैतिक शिक्षण देण्याचे कार्य करीत. हेमचंद्र-युगानंतरच्या व नरसिंह-युग सुरू होण्यापर्यंतच्या काळात असे ३०० किंवा थोडे अधिकच रास लिहिलेले होते असे जैन पंडितांनी नमूद केले आहेत. साहित्यगुणाच्या दृष्टिने पाहता ह्या रचना जरा कनिष्ठ प्रकारच्याच होत्या पण त्यांच्या प्रयत्नानी भाषेची संपन्नता व वाढ यांची दिशा मात्र बऱ्याच प्रमाणात दिसून येते.

आत्मज्ञानप्राप्तीसाठी दीक्षा घेऊन प्रपंचाचा संन्यास घेतलेल्या जैन साधूंचे वर्चस्व ह्या काळात स्पष्टपणे दिसून येते. धर्म व नीतिचा उपदेश करण्यासाठीच त्यांनी आपले जीवन समर्पित केले होते आणि त्यासाठी त्यांनी ह्या परंपरागत काव्य-प्रकारांचा आधार घेतला व जनमानसावर प्रभाव पाडला.

त्या काळच्या सर्वसाधारण कवींवर अशा प्रकारची बंधने नव्हती म्हणून त्यांनी आपल्या काव्यात प्रेम व शौर्य ह्या, मनुष्याच्या–हृदयावर प्रभाव गाजविणाऱ्या दोन भावनांचे आपल्याकडून होईल तितके प्रभावीपणे वर्णन केले आहे.

संख्येच्या दृष्टीने ह्या काळातील साहित्य-निर्मिती खूपच मोठी होती पण तिचे साहित्यिक मूल्य मात्र साधारणत: कमी प्रतीचेच होते.

इ. स. १२९७ ते १४२० हा काळ गुजरातेत मुसलमानी राजकीय वर्चस्वाचा होता. सर्वत्र राजकीय आणि सामाजिक अस्थिरता व अस्वस्थता होती. म्हणून

लेखकांना आपल्या कृतींचे रक्षण करण्यासाठी पाटण, जेसलमीर, खंबायत वगैरे ठिकाणच्या जैन भांडारांचा आधार घ्यावा लागला व तेथे त्यांची हस्तलिखिते बंदोबस्तात व सुरक्षित रहात असत.

मुनि जिनविजयजी हे मोठे विद्वान प्राच्यविद्यानिष्णांत व संशोधक पंडित होते. ते म्हणतात, " जुन्या जैन भांडारांमध्ये सुरक्षितपणे सापडलेल्या गुजराती हस्तलिखितांची संख्या फार मोठी आहे. तत्कालीन मराठी अथवा बंगाली हस्तलिखितांची संख्या त्या मानाने थोडी आहे. हेमचंद्रापासून प्रेमानंदापर्यंतच्या कालातील गुजराती हस्तलिखितांची यादी केल्यास एक फार मोठा ग्रंथ होईल. त्यामानाने आपल्या दुसऱ्या भाषाभगिनींच्या १४ व्या, १५ व्या, व १६ व्या शतकातील चांगल्या साहित्यिक मूल्यांच्या ग्रंथांची संख्या फारच तुटपुंजी आहे. ही हस्तलिखिते पद्य व गद्य दोन्हीत आहेत. जुन्या गुजरातीत गद्यरचना नाही हे म्हणणे असत्य आहे. " मी माझ्या वाचकांना शिफारस करतो की त्यांनी माझा गुजरात विद्यापीठाने प्रसिद्ध केलेला ' प्राचीन गुजराती गद्य संदर्भ' हा ग्रंथ पाहावा. त्या ग्रंथात संवत् १४११ मध्ये लिहिलेल्या ग्रंथातील काही कथा मी समाविष्ट केल्या आहेत. त्यांचा लेखक तरुणप्रभा होता. मी त्यातील काही नमुने, उध्दृत केले आहेत. हे कथा वाङमय इतके मोठे आहे की ते समग्र छापावयाचे म्हटल्यास त्याचे गुजराती प्रिंटींग प्रेसच्या ' काव्यदोहन '[३] ह्या आकाराचे २०–२५ ग्रंथ होतील."

" भाषा आणि साहित्य या दृष्टीने पाहता जुनी गुजराती साहित्य-संपत्ती विपुल व वाखाणण्याजोगी आहे. गुजरात ही अशी एकच भूमि आहे की जीत मौर्य अशोकापासून मोंगल अकबरा[४] पर्यंतच्या आर्यावर्ताच्या भाषांची–प्रादेशिक बोलीची– वाढ व विकास कसा होत गेला ह्याचा अभ्यास करण्याची फार मूल्यवान सामग्री आपणास उपलब्ध होते."

[ २ ]

## हेमचंद्र १०८८-११७२

हेमचंद्र हा जैन साधु फार प्रतिभाशाली होता. त्याचे बहुश्रुतत्त्व व विद्वत्ता आजही अतुलनीय वाटतात. त्याचा वैभवाचा काळ म्हणजे सिद्धराज व कुमारपाल ह्या दोन श्रेष्ठ सोलंकी राजांची कारकीर्द. ह्या दोन्ही राजर्षिनी हेमचंद्राच्या सुविचारी व बुद्धिशाली मार्गदर्शनाखाली गुजरातची सांस्कृतिक प्रगति उच्च कोटीला पोहोचविली. हेमचंद्र हा स्वतः सर्जक लेखक नव्हता. पण आपल्या तीव्र बुद्धीने त्याने व्याकरण, भाषाशास्त्र व काव्यशास्त्र इ. विद्याशाखात विपुल निर्मिती केली. त्याने 'अनेकार्थसंग्रह', 'अभिधान चिंतामणि' 'देशी नाममाला,' हे सर्व कोशग्रंथ आणि 'छन्दोनुशासन,' व 'काव्यानुशासन,' हे काव्यग्रंथ लिहिले. त्याची

साहित्यविषयक दृष्टी मर्यादित नसून ती फार विशाल होती. त्याने 'निघंटु शेष' हा वैद्यकशास्त्रावरील ग्रंथ, 'योगशास्त्र' हा योगावरील ग्रंथ व 'त्रिषष्टिशलाकापुरुष' हा जैन तीर्थंकरांच्या गोष्टींचा संग्रह, असे ग्रंथ रचले. पण त्याचा सर्वश्रेष्ठ ग्रंथ म्हणजे 'सिद्ध-हेम-शब्दानुशासन' हा आहे. हा ग्रंथ म्हणजे संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश भाषांचे व्याकरण आहे. पाणिनीने संस्कृत भाषेसाठी जे कार्य केले तेच कार्य हेमचंद्राने प्रथम अपभ्रंश भाषेच्या (नियमांची) व्याकरणाची संहिता बनवून केले. हे व्याकरण त्याने सिद्धराजाच्या विनंतीवरून बनविले असे म्हणतात. असे सांगतात की, हा ग्रंथ पूर्ण झाल्यानंतर सिद्धराज इतका प्रसन्न व आनंदित झाला की त्या ग्रंथाचा गौरव करण्यासाठी त्याने आपल्या सर्वात श्रेष्ठ अलंकृत गजराजा-वरून शहरातून त्याची मिरवणूक काढली व दरबारात आल्यावर स्वतः त्या ग्रंथाची विद्यादेवी सरस्वतीचे प्रतीक म्हणून महापूजा केली.

हेमचंद्राने व्याकरणाच्या नियमांच्या उदाहरणांसाठी निवडलेले दुहे त्यातील साहित्यिक गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत.

"तो लाखो मैल दूर असेना का ? त्याचे प्रेमपुष्प कोमेजलेले नसले म्हणजे झाले. त्याला परत येण्याला शंभर वर्षे का लागेनात तरी हे सखी, तोच माझ्या सुखाचे निधान[5] आहे."

"माझ्या अंगाशी त्याच्या अंगाचा स्पर्श झाला नाही, माझे ओठ त्याच्या ओठाला भिडले नाहीत पण सखी मी त्याचे मुखकमल[6] पाहिले मात्र आणि आमची क्रीडा पूर्ण झाली."

"खऱ्या सद्‌गुणांनी संपत्ती मिळतेच असे नाही, पण कीर्ती तरी मिळतेच; नशिबात लिहून ठेवलेल्या फळाचाच लोक उपभोग घेऊ शकतात. सिंहापासून एका कपर्दिकेचीही प्राप्ती होत नाही, पण हत्ती मिळवायला मात्र लाखो रुपये खर्चावे लागतात[7]."

"सखि, ईश्वराने चांगले केले, माझा कंथ रणांगणात मृत्यु पावला, जर तो लढाईतून पळून घरी येता तर मला आपल्या मैत्रिणींपुढे लज्जेने खाली मान घालावी लागली असती[8]."

"'आम्ही थोडे आहोत, शत्रू संख्येने कितीतरी आहेत' असे फक्त भित्रेच म्हणतील. 'बाबा, आकाशाकडे जरा पहा. किती चांदण्या प्रकाशाबाबत चंद्राची बरोबरी करू शकतील ?'[9]"

"सखि, खोटं बोलू नकोस. माझा कंथ दोन गोष्टींनी अपूर्ण आहे. तो सर्वांना उदारपणे खैरात करीत असताना मला मात्र त्याने वगळले आणि तो लढत असताना फक्त त्याची तलवारच मागे राहिली[10]."

"सखि, ही माझी ताठर व मोठाली वक्षस्थळे म्हणजे एक अडचणच आहे.

त्यामुळे माझा प्रियकर (मला आलिंगन देताना) माझ्या अधरापर्यंत मुश्किलीने पोहोचू शकतो[११]."

"प्रियकर जवळ असताना झोप कशी येऊ शकेल ? आणि तो जवळ नसताना झोप येणे कसे शक्य आहे ? एकंदरीत ह्या दोन्ही गोष्टींनी माझी झोप उडून गेली हे खरे[१२]."

हेमचंद्राने 'द्वयाश्रय काव्य' दोन भागात लिहिले आहे. पहिले 'द्वयाश्रय' महाकाव्य संस्कृतामध्ये लिहिले आहे. त्यामध्ये २० अध्यायात चालुक्य राजवंशाचा इतिहास आहे. मूळ राजापासून सिद्धराज जयसिंहाच्या दिग्विजयापर्यंतचे वर्णन त्यात आहे. त्याचबरोबर त्यात त्याने आपल्या 'सिद्ध-हेम-शब्दानुशासना'च्या पहिल्या सात अध्यायात विस्ताराने लिहिलेल्या संस्कृत व्याकरणाच्या सूत्रांची उदाहरणे दिली आहेत.

'द्वयाश्रय' काव्याचा दुसरा भाग प्राकृतमध्ये आहे व त्यात आठ अध्याय आहेत. त्याला 'कुमारपाल चरित' असे दुसरे नाव आहे, कारण त्यात कुमारपाल राजाचे चरित्रही आहे. त्याबरोबरच त्यात प्राकृत, सौरसेनी, मागधी, पैशाची, चूलिका पैशाची व अपभ्रंश भाषांच्या सूत्रांची उदाहरणे आहेत. सिद्ध-हेम-शब्दानु-शासनाच्या आठव्या अध्यायातील प्राकृत व्याकरणात त्याने ह्या भाषांचे विवरण केले आहे.

ह्याप्रमाणे संस्कृत 'द्वयाश्रय' काव्यात संस्कृत व्याकरणाचे नियम व प्राकृत 'द्वयाश्रय' काव्यात प्राकृत व्याकरणाचे नियम आहेत. त्याचप्रमाणे त्यात चालुक्य राजवंशाचा मूळराज ते कुमारपालपर्यंतचा इतिहासही वर्णिलेला आहे.

'द्वयाश्रय' ह्याचा अर्थ 'दोन अर्थ असलेले' असा आहे. हे नाव यथार्थ आहे, कारण ह्यात सोलंकी राजवंशाचा इतिहास आहे व त्याचबरोबर हेमचंद्राने केलेल्या व्याकरणाच्या नियमांची उदाहरणेही आहेत.

'भरतेश्वर बाहुबली' (सन ११८५) हा शालिभद्रसूरीने लिहिलेला त्या काळचा सर्वात जुना रासग्रंथ आहे. ह्यामध्ये भरत व बाहुबली ह्यांच्यात सत्तेसाठी झालेल्या लढ्याचे वर्णन आहे. जैनांचा आद्य तीर्थंकर ऋषभदेव ह्याचे हे दोन पुत्र. ऋषभदेवाला १०० पुत्र होते. अंतर्गत लढाईमुळे कुटुंबाला कष्ट व त्रास भोगावा लागू नये म्हणून असे ठरविण्यात आले की ज्येष्ठ पुत्र भरताने राजगादीवर यावे व इतर सर्वांनी संन्यास ('दीक्षा') घ्यावा. बाहुबली शिवाय इतर सर्व भावांनी ह्याचा स्वीकार केला व त्यांनी संसाराचा त्याग करून दीक्षा घेतली. पण बाहुबलीला आपल्यात शारीरिक व बौद्धिक सामर्थ्य फार आहे ह्याचा गर्व असल्यामुळे त्याने ह्या निर्णयाला विरोध केला. भरत हा अर्थात ज्येष्ठ पुत्र होता. पण आपण सर्व दृष्टींनी सर्वात उत्तम आहोत असे म्हणून आपणाला राजा करावे असे बाहुबली म्हणू लागला. निरनिराळ्या कसोट्या करून बाहुबलीचा हक्क मान्य करण्यात

आला. तेव्हा भरताने दारूण निराशा व असूयेच्या भरात बाहुबलीला जोरात एक थप्पड मारली. त्यासरशी क्रोधाने संतप्त होऊन बाहुबलीने आपला राक्षसी पंजा उगारला. सर्व लोक स्तब्ध व क्षुब्ध होऊन पाहू लागले. त्यांना वाटले की हा बाहुबलीचा हात वज्राप्रमाणे भरताच्या डोक्यावर पडणार. पण काय चमत्कार झाला. बाहुबलीची उगारलेली मूठ त्याच्या स्वत:च्याच मस्तकावर पडली. त्याने त्वेषाने आपलेच केस उपटले.[१३]

बाहुबलीचे दुसरे ९८ भाऊ वयाने लहान असले तरी त्यांनी त्याच्या आधी दीक्षा घेतलेली असल्यामुळे ते त्या दृष्टीने श्रेष्ठ होते. म्हणून त्यांच्यापुढे नतमस्तक होणे आवश्यक होते, पण तसे करणे बाहुबलीला अवघड वाटल्यामुळे त्याने आपल्या तपस्येच्या जोरावर केवलज्ञानप्राप्ति करण्याचा निश्चय केला. ह्या कामी आपली शक्ति, उत्साह व दुर्दम्य इच्छाशक्ति त्याने पणाला लावली. आपला हेतू साध्य करण्यासाठी तो अधिकाधिक शारीरिक कष्ट करून तपश्चर्या करू लागला. पण त्याचा काही उपयोग होईना. त्याच्या ज्या दोन बहिणींनी दीक्षा घेतली होती त्या प्रसंगवशात् त्याचेकडे आल्या. त्यांनी त्याची भयंकर आर्त अशी व्यथा पाहिली आणि त्या त्याला म्हणाल्या, "लाडक्या भावा, हत्तीवरून खाली उतर[१४]." "वीरा मोरा गजथी हेठा उतरो" बाहुबलीला तत्क्षणी त्यांच्या सांगण्याचा बोध झाला. तो स्वत:ची दुर्बलता व अहंभाव रूपी हत्तीवरून खाली उतरला. (त्याने दुर्बलता व अहंभाव ह्याचा त्याग केला) व त्याने आपल्या भावांकडे जाऊन त्यांना मान देऊन व त्यांचा आदर करून नम्र होण्याचे ठरविले. त्याने ज्याक्षणी असा निश्चय केला त्याचक्षणी त्याला केवल ज्ञानाची प्राप्ति झाली-

विनयचंद्राने लिहिलेली 'नेमिनाथ चतुष्पदिका' (१२४४) ही सर्वात जुनी 'बारमासी[१५]' आहे. ह्या काव्याचा नायक नेमिनाथ हा एक उदारचरित व कनवाळू पुरुष आहे. द्वारकेच्या उग्रसेन राजाच्या राजुल नावाच्या कन्येशी विवाह करण्यासाठी तो निघतो. मिरवणूक वधूच्या घराजवळ येते. रस्त्याने येताना नेमिनाथला एका अंगणात असंख्य पशु एकत्र आलेले दिसतात. तपास करता त्याला असे कळते की ते पशु लग्नाच्या जेवणावळीसाठी मारले जाणार आहेत. त्याचे हृदय दयेने द्रवते व तो एकदम लग्नाचा मंडप सोडून निघून जातो. तरुण राजुल मंडपात तो परत येईल म्हणून आशेने त्याची वाट पहात असते. ती वाट पहातच राहते. महिन्यांमागून महिने जातात, ऋतु बदलतात. त्याबरोबर निसर्गाचे रूपही बदलत जाते. पण बदलत नाही राजुलचे मन. जसजसा समय जातो तसतसे तिचे दु:ख व शंका वाढतच जातात. अधिक महिना[१६] सुरू होतो. नेमिनाथ परत येतो पण तो नवरदेव म्हणून नव्हे तर साधू म्हणून येतो. त्याचे मन ऐहिक गोष्टीतून उठून गेलेले असते. त्याने तर संसाराचा त्याग केलेलाच असतो. पण तो राजुललाही प्रपंचाचा त्याग करण्यास सांगतो व राजुल तसे करण्याला कबूल होते.

ह्या काव्याचा बराचसा भाग राजुल व तिची सखी ह्यांच्या संवादानी भरलेला आहे. सखी राजुलला सांगत असते की, ' तू नेमिनाथला विसरून जा.'

'नेमि गेला म्हणून काय बिघडले ? तुला दुसरे अनेक योग्य वर मिळतील[१७]' राजुल म्हणते, ' सूर्याचा उदय होईपर्यंतच सगळे तारे तेजाने तळपत असतात[१८].'

आश्विनाच्या महिन्यात राजुलचे कष्ट पाहून व्याकुळ होऊन तिची सखी म्हणते.

" अग राजुल, आता नेमीचा नाद सोड. त्याने पहिल्यापासूनच तुझा विश्वासघात केला आहे. इतकेच नाही तर गेले आठ जन्म त्याने तुझ्या प्रेमाचा अव्हेरच केला आहे.'[१९] राजुल, एकच उत्तर देते, 'सखी, त्या दयाळु नेमीचा काय दोष आहे ? ज्याने अंगणात एवढे पशु गोळा केले आणि माझी व माझ्या प्रियकराची ताटातूट केली त्या माझ्या पित्याला, उग्रसेनाला दोष दे.'[२०]

अशा रीतीने ह्या काव्यात राजुलच्या नेमीनाथावरील अढळ प्रेमाचे वर्णन कवीने समर्थपणे केले आहे.

हे काव्य शेवटी सुखपर्यवसायी झालेले आहे. कवि म्हणतो,– ' अधिक मास' क्रमाने सर्व महिन्यात येऊ लागतो आणि सहा ऋतूंच्या[२१] गुणधर्मांचे दर्शन घडविते राजुल आपले दोन्ही बाहू उभारून आपल्या प्रियकराला भेटू पहाते. उग्रसेनाची ती कन्या आपल्या प्रियकराला संदेश पाठविते. तिचे हृदय प्रियकराविषयीच्या प्रेमाने व आदराने भरून गेलेले असते व राजुल आपल्या पाच सख्यांना बरोबर घेऊन गिरनार पर्वतावर जाते. तेथे सद्‌गुणसंपन्न अशी राजुल आपल्या सख्यांसह प्रभु नेमीनाथाकडून दीक्षा घेते. संन्यास ग्रहण केल्यावर तिला केवल ज्ञानाची प्राप्ति होते व तिला सर्व सिद्धींवर[२२] प्रभुत्व[२३] प्राप्त होते.

'श्री थूलिभद्द फागु' (अदमासे १३३४) हे जिनपद्मसुरीने रचलेले गुजराती मधील पहिले 'फागु' काव्य ह्या काव्याचा नायक थूलिभद्द (स्थूलिभद्र) हा एक रूपसंपन्न तरुण जैन साधु असतो. त्याची सत्वपरीक्षा घेण्यासाठी त्याचा गुरु त्याला वर्षाऋतुचे चार मास (चातुर्मास) कोशा नावाच्या एका तरूण आणि रूपवती वेश्येच्या घरी राहण्याची आज्ञा करतो. पूर्वी गुरु स्वत: तिच्यावर आसक्त झालेला असतो आणि संन्यास घेऊन दीक्षा घेण्यापूर्वी तो १२ वर्षे कोशाबरोबर राहिलेला असतो. मादक तारुण्य, अनावर आकर्षण व अनुकूल ऋतुही सर्वच एकत्र होऊन स्थूलिभद्राला मोहात पाडण्याचा प्रयत्न करतात. पण सर्व व्यर्थ–तो अढळ व निश्चल राहतो. त्याची पवित्रता, गंभीरता व संयम पाहून कोशाच्या चंचल मनावर परिणाम होतो आणि ती शांत व गंभीर बनते. त्या तरुण साधूच्या चारित्र्यबळाने स्वर्गातील देव प्रसन्न होऊन त्याच्यावर पुष्पवृष्टी करतात.

'फागु' ह्या काव्य प्रकाराचा मुख्य विषय वसंतऋतूतील विलासांचे वर्णन

करणे हा असतो. पण ह्या 'फागु' मध्ये कवीने वर्षाऋतुची (चातुर्मासाची) पार्श्वभूमि घेतली आहे. कारण त्यामुळे ह्या काव्याच्या नायकाला चार महिने सतत एका जागी वास्तव्य करावे लागले आहे. (मोहाशी टक्कर देत रहावे लागले आहे) शिवाय गुजरातेत वर्षाऋतुचे निसर्गसौंदर्य वसंतऋतुतील निसर्गसौंदर्यापेक्षा कोणत्याही दृष्टीने तिळमात्र कमी दिसत नाही.

पण आजपर्यंत उपलब्ध झालेल्या सर्व 'फागु' काव्यामध्ये 'वसंत विलास' हा फागु सर्वश्रेष्ठ आहे. त्याचा लेखक अज्ञात आहे. पण तो जैन नव्हता हे मात्र निश्चित आहे. त्याचा निश्चित रचनाकालही अज्ञातच आहे. काही विद्वानांच्या मते त्याचा लेखनकाल पंधराव्या शतकाचा पहिला चरण (१/४ भाग) आहे तर काहींच्या मते तो १४ व्या शतकाचा मध्यभाग आहे व काहींच्या मते त्याहूनही आधीचा आहे. ह्या काव्यात फक्त ८४ द्विपद्या (Couplets) म्हणजे दोन दोन ओळींच्या पद्यावली आहेत. पण साहित्यगुणात ह्याच्यापेक्षा उत्तम अथवा ह्याची बरोबरी करणारे असे दुसरे त्यावेळचे काव्य क्वचितच सापडेल. हे काव्य जीवनातील उत्साह व आनंदाचे एक गीत आहे. जिचा मोठ्यात मोठा दुर्गुण 'गर्विष्ठपणा' हा आहे अशा एका मानिनी नायिकेस तिची सखि म्हणते :

'अग मूर्खे—तुझे पयोधर अनंत कालपर्यंत कठीण का राहणार आहेत ? मूर्खासारखी वागू नकोस. रागावतेस कशाला ? तारुण्य एक दोन दिवसापुरतेच टिकते.[२५]'

दुसरी एक स्त्री विरहवेदनांनी व्याकुळ झाल्यामुळे भ्रमराकडे किंवा चंद्राकडे पाहू शकत नाही व असह्य व्यथेने ती उद्‌गारते, 'भ्रमरा, चालता हो इथून. कृपा करून मला एकटीला राहू दे. माझं शरीर आधीच अगदी कृश आहे. त्यात तू आणखी त्रास कशाला देतोस, बा चंद्रा ? सूड उगवायला आपले काही पूर्वीचे वैर नाही[२६].'

वसंत ऋतूचे आगमन, त्याचे सौंदर्य, वैशव, उन्मादक यौवन, उत्साह व अभिलाषा, गावाबाहेरील उद्यानात युवयुवतींच्या समूहाच्या चेष्टा व क्रीडा, प्रेमिकांचे कलह व प्रेम, विरहवेदना व पुनर्मीलनाचा आनंद ह्या सर्व गोष्टींचे वर्णन ह्या काव्यात कवीने फार प्रभावीपणे केले आहे.

'त्रिभुवन–दीपक प्रबंध[२७]' (अदमासे १४०६) हे जयशेखर सूरीने आपल्याच 'प्रबोधचिन्तामणी' या संस्कृत ग्रंथाचे केलेले भाषांतर आहे. हा कवि संस्कृत, प्राकृत व गुजराती भाषावर प्रभुत्व असलेला पंडित कवि होता.

'त्रिभुवन–दीपक प्रबंध' हे एक रूपक काव्य आहे. मायेच्या कचाट्यात सापडलेल्या जीवात्म्याची काय दुर्दशा होते हे त्यात वर्णिले आहे.

परमहंस (आत्मा) नावाचा एक राजा होता. तो आपली राणी चेतना (विवेकशक्ति) हिच्यावर फार आसक्त होता. एक दिवस राजाने माया नावाच्या

रूपवतीस पाहिले व तो तिच्यावर मोहित झाला. राजाची मायेविषयीची आसक्ति पाहून चेतना दु:खित होते. व त्याला सोडून निघून जाते.

राजा आपले राज्य ' विश्व ' सोडून देतो आणि ' कायानगरी ' ची स्थापना करतो. आपला कारभार ' मन ' ह्या मंत्र्यावर सोपवून तो मायेबरोबर सुखोपभोगात मग्न होऊन जातो. पण 'माया' 'मना'शी संगनमत करून 'परमहंसा'ला कैदेत टाकते व ' मन ' आपल्या लहरीप्रमाणे राज्यावर सर्वसामर्थ्यानिशी सत्ता गाजवू लागतो.

' मनाला दोन भार्या असतात '–'प्रवृत्ति' व 'निवृत्ति'. आपली लाडकी राणी 'प्रवृत्ति' हिच्या पासून झालेल्या 'मोह' नावाच्या पुत्राला तो राज्यपद देतो व आपली नावडती राणी 'निवृत्ति' व तिचा मुलगा 'विवेक' ह्यांना हद्दपार करतो.

'विवेक' दोघी जणींशी लग्न करतो–'सुमति' व 'संयमश्री' ही त्यांची नावे. विवेक 'पुण्यरंग-पट्टण' नगरीचा राजा होता. तो 'मोहा'शी लढाई करून त्यांचा पराभव करतो व त्याला मारून टाकतो.

पुत्रशोकाने हताश झालेली 'प्रवृत्ति' झिजून-झिजून मृत्यु पावते आणि विवेकाच्या उपदेशाने ' मन ' आपले स्वत:चे सांत्वन करण्याचा खूप. प्रयत्न करत पण तो 'मोहा'ला विसरु शकत नाही व शेवटी तो 'शुक्लध्यान' ह्या चितेत आत्मार्पण करतो.

'चेतना' आता योग्य वेळ आली आहे असे पाहून प्रगट होते. ती आपला पति 'परमहंस' ह्याच्याकडे जाते व त्याला स्वस्थानावर येण्यास विनंति करते. कारण आता 'माये'चा प्रभाव नाहीसा झाला होता. मनाने चितेत प्रवेश केला होता व मोह लढाईत मरण पावला होता.

आता परमहंस कायानगरीच्या बंधनातून मुक्त होऊन पुन्हा 'विश्वा'चा राजा होतो.

ह्या काव्यातील सखोल आध्यत्मिक उपदेशामुळे ह्या काव्याला 'परमहंस–प्रबंध' किंवा काही हस्तलिखितात दिलेले 'हंस–विचार–प्रबंध' हे नाव सार्थच ठरते.

ह्या काव्याचे संपादक केशवलाल ध्रुव म्हणतात "ह्या एकाच गुर्जर काव्यामुळे ह्या जैन कवीला सर्व लेखकांमध्ये पहिल्या प्रतीचे स्थान प्राप्त झाले आहे. 'प्रबोधन–चिंतामणि' (गुजराती काव्य) 'प्रबोध प्रकाश' ह्या काव्यापेक्षा नक्कीच अधिक ख्यातनाम होईल. संविधानकाच्या रचनेत, पात्रांच्या चित्रणात, आणि रूपकाच्या सुसंवादित विकासात कवीची प्रतिभा एकसारखीच यशस्वी झाली आहे. वर्ण्य विषयात विविधता असल्याने सर्व रस एकत्र आले आहेत. त्यात कथेचा धावता प्रवाह आहे. कथानकातील घटनांची मांडणी कुशलतेने केली आहे व त्यामुळे वाचकांची उत्सुकता शेवटपर्यंत टिकून राहते. जैनेतर लेखकांच्या साहित्याइतकी प्रसिद्धी जर जैन लेखकांना मिळत गेली असती तर जयशेखरसूरि हा सुद्धा गुजराती जनतेत भालण आणि प्रेमानंद यांच्या इतकाच लोकप्रिय झाला असता[२८]."

अशा रीतीने ह्या काळी जैन साधु कवींचे फार वर्चस्व होते. त्यांचा मुख्य उद्देश जैन धर्माचा प्रसार करणे हा होता. तथापि त्याकाळी असैत ठाकूर, श्रीधर व्यास, भीम व अबदुर रहेमान हे चार कवि झाले की ज्यांची भूमिका सामान्य सांसारिक निधर्मी मनुष्याची होती.

ह्यांच्यापैकी 'हंसौली' (१३६१) ह्या काव्याचा लेखक असैत ठाकोर हा लोकप्रिय गुजराती 'भवाई' चा जनक समजला जातो. 'भवाई' ही बहुतेक लोककथांवर आधारित असते. 'हंसौली' ही भवाई चार भागात विभागलेली आहे. पहिल्या भागात हंसौली व नरवाहन ह्यांच्या विवाहाचे वर्णन आहे. नंतरच्या तीन भागात त्यांच्या हंसराज व वच्छराज ह्या दोन जुळ्या मुलांच्या तीन जन्मांची[३०] कथा आहे. त्यांचे संगोपन निरनिराळ्या ठिकाणी होते. ही ताटातूट न आवडून ते एकमेकांच्या भेटीसाठी झुरू लागतात. त्यांना पुष्कळ संकटांना तोंड द्यावे लागते. अनेक दुर्दैवाच्या फेऱ्यांतून जावे लागते. सरते शेवटी ते कांतिनगरीत एकमेकांना भेटतात. दैवाच्या विविध घटनाचक्रातून निघता-निघता हंसराज सुदैवाने व कर्मधर्म संयोगाने, कांति नगरीचा राजा झालेला असतो. मग ते दोघे भाऊ पैठणला जातात. आपल्या माता-पित्यांना व इतर कुटुंबियांना भेटतात व नंतर सर्व सुखाने एकत्र राहतात.

'रणमल्ल छंद' (१३९९) हे काव्य श्रीधर व्यास ह्याने लिहिले. ह्या काव्यात ईडरचा राणा रणमल्ल हा हिंदु रजपुत राजा व पाटणचा सुलतान ह्यांच्यामधील लढाईचे वर्णन आहे. ह्या युद्धात रणमल्ल विजयी होतो. ह्यात सिंहाप्रमाणे गर्जना करून शत्रूवर चालून जाणारे रजपूत, थकून-भागून मागे हटणारे शत्रू, आपल्या जबरदस्त हल्ल्याने शत्रूंना 'त्राहि भगवान्' करून सोडणारा आणि स्वतःचे स्वामित्व गाजविणारा राणा ह्याचे वर्णन फारच बहारीचे व प्रभावी आहे. हे ७० श्लोकांचे लहानसे काव्य आहे. त्यातील पहिले ११ श्लोक संस्कृतमध्ये आहेत पण त्यातही फारसी व अरबी शब्दांचा भरणा आहे.

'सदय वत्स चरित' (१४१०) ह्याचा लेखक भीम आहे. हे काव्य एका लोककथेवर आधारित आहे. ही लोककथा शेकडो वर्षे गुजरातमध्ये व भारताच्या दुसऱ्या बऱ्याच प्रांतात अतिशय प्रसिद्ध होती. नायक सदेवंत व नायिका सवलिंगा ह्यांच्या अढळ, तीव्र प्रेमाची ही कहाणी आहे. एकामागून एक झालेल्या आठ जन्मापावेतो चाललेल्या त्यांच्या प्रेमाची ही कथा आहे. त्यांच्या प्रेमामध्ये अनेक विघ्ने आलेली आहेत.

'संदेशक रास' (१४२०) हे एकच काव्य मीर अब्दुर रहेमान ह्या त्या वेळच्या एका मुसलमान कवीने लिहिलेले काव्य आहे. हे एक दूतकाव्य आहे. विजयनगरमधील एक युवती एका सत्प्रवृत्त प्रवाशयाच्या मार्फत खंबायत मध्ये राहणाऱ्या आपल्या प्रिय पतिला संदेश पाठवते.

"विरहाग्नीने जे जळून भस्मसात झाले नाही त्या माझ्या ह्या कठोर हृदयाने मी त्याला संदेश[31] तरी कसा पाठवू ?" असे विचारून ती पुढे म्हणते, "मृण्मय हृदय पाण्याशिवाय छिन्नभिन्न होऊन जाते.[32] मानवाचीही जेव्हा अशी स्थिती होईल तेव्हाच त्याला खरे प्रेम म्हणता येईल."

ह्या काव्यात खंबायतचे सुंदर शब्दचित्र रेखाटले आहे. याचे पहिले १७ श्लोक प्राकृतमध्ये आहेत.

बरेच दिवस असा एक समज होता की त्या काळचे बरेचसे साहित्य पद्यातच लिहिलेले होते, पण मुनि जिनविजयजींनी दाखविल्याप्रमाणे त्या काळी लिहिलेल्या गद्यग्रंथांची संख्याही काही अगदी कमी नव्हती. तरुण प्रभासूरिने लिहिलेल्या 'प्रतिक्रमणबालावबोध' (१३५५) हा गद्यग्रंथ सर्वांत आधी प्राप्त झालेला गद्यग्रंथ आहेच. पण त्याशिवाय ' मुग्धावबोध औक्तिक ' हा कुलमंडल गणी याने लिहिलेला गद्यग्रंथही उल्लेखनीय आहे. ह्या ग्रंथामध्ये कवीने संस्कृत व्याकरणाचे नियम उदाहरणे देऊन गुजरातीत विशद केले आहेत. ह्या ग्रंथावरून तत्कालीन भाषेच्या स्थितीचे उत्तम ज्ञान प्राप्त होते. त्या काळचा दुसरा उल्लेखनीय गद्यग्रंथ म्हणजे माणिक्य सूरिचा ' पृथ्वीचंद्र चरित ' (१४२२) हा होय. ग्रंथकर्त्याने स्वतः त्या काव्याला ' वाग्विलास ' असे म्हटले आहे. त्याचे कथानक अगदी साधे आहे. पैठणचा राजा पृथ्वीचंद्र अयोध्येचा राजा सोमदेव ह्याच्या रत्नमंजरी ह्या नावाच्या कन्येशी विवाह करतो. शौर्याची व धैर्याची अनेक कृत्ये करून दाखवून तो स्वतःचे सामर्थ्य सिद्ध करतो. लग्नानंतर थोड्याच दिवसांनी त्याला संसार कसा निःसार आहे हे पटल्याने तो आपल्या पुत्राला गादी देऊन संसाराचा त्याग करतो. अशी ही सोपी व सरळ कहाणी काव्यात्मक वर्णनांनी नटविलेली आहे. त्याचा एक नमुना—

" वन त्यालाच म्हणावे ज्यात अनेक वृक्ष आहेत, ज्यात दया आहे तेच मन, पाण्याने संपूर्ण भरलेली तीच नदी, तोच पाऊस जो वेळेवर येतो, जेथे लोकांची समृद्धी होते त्यालाच देश म्हणतात, जिला पुत्र होतो तीच स्त्री, पुष्कळ वस्तूंनी भरलेले असेल तेच दुकान, खरा भाट तोच जो शब्दप्रभु आहे व जिथे सोबतीला भार्या आहे तीच खरी शय्या, जेथे मुनि राहतात तोच मठ, जो सत्य आहे तोच शब्द, जो अत्यंत प्रेमळ आहे त्यालाच भाऊ म्हणावे, जे स्वच्छ धुतलेले आहे त्यालाच वस्त्र म्हणावे, जिचा पूर्ण उपभोग घेता येतो तिलाच संपत्ती म्हणावे[33]."

## तळटिपा

१. परिशिष्ट 'अ' पहा.

२. परिशिष्ट 'ब' पहा

३. जवळ-जवळ ८०० पृष्ठांचा ग्रंथ

४. १२ व्या गुजराती-साहित्य-परिषदेचे विभागीय अध्यक्ष म्हणून मुनिजींनी गुजराती भाषेत दिलेल्या–'गुजरातेत ऐतिहासिक संशोधनाच्या क्षेत्रात झालेल्या कार्य प्रवृत्तीवर केलेला एक दृष्टिक्षेप' ह्या विषयावरील व्याख्यानातील एका उताऱ्याचा मी केलेला अनुवाद.

५. अगलिअ–णेहमिवट्टाहं जोअण–लक्खंनिजाउ
वरिस–सएण वि जो मिलइ सहि सोक्खहं सो ठाउ ।।

६. अंगहिं अंगु ण मिलिउ हलि अहरे अहरुण पत्तु
पिअ जोअंतिहे मुहकमलु एवंइ सुरउ समत्तु ।।

७. गुणिहिं ण संपइ कित्ति पर फललिहिआ भुंजति ।
केसरि ण लहइ बोड्डिअ वि गय लक्खेहिं घेप्पं ।।

८. भल्ला हुआ जु मारिआ बहिणी महारा कंतु ।
लज्जेज्जं तु वयंसिअहु जइ भग्गा घरु एंतु ।।

९. अम्हे थोवा रिउ बहुअ कायर एवं भणन्ति ।
मुद्धि णिहालहि गयणअलु कइजण जोण्ह करन्ति ।।

१०. महु कन्तहो बे दोसडा हेल्लि म झङ्खहि आलु ।
देन्तहो हउं पर उव्वरिअ जुज्झन्तहो करवालु ।।

११. अइतुंगत्तणु जं थणहं सो छेअउ ण हु लाहु ।
सहि जइ केवइ तुडि वसिण अहरि पहुच्चइ णाहु ।।

१२. पियसंगमि कउ णिद्दडी पिअहो परोक्खहो केवें ।
मइ बिण्णि वि विण्णासिआ णिद्दण एवं ण तेवें ।।

१३. ह्याला 'केशलुंचन' म्हणतात. दीक्षा घेण्यापूर्वी हे करावेच लागते.

१४. वीरा मोरा गजथी हेठा ऊतरो.

१५. कृपा करून परिशिष्ट 'क' पहा.

१६. हिंदु पंचांगाप्रमाणे दर तीन वर्षांनी एक अधिक महिना येतो. त्याला 'अधिक मास' म्हणजे जास्तीचा महिना म्हणतात.

१७. गयउ नेमि तउ विणठइ काइ, अछई अनेरा रह सयाई ।

१८. धरइ तेजु गहगण सविताव, गयणि न उग्गई दिणयरू जाव ।

१९. सखि नवि खीना नेमीहिरेसि, मन आपणपउं तउं खय नेसि ।
जिणि दिक्खाडिउ पहिलउ छेहु, न गमिउ अठ्ठभवंतर नेहु ।।

२०. नेमि दयालु सखि निरदोसू, कीजइ उग्रसिण उपरि रोषु ।।
पसुय भराविउ मूकउ वाडु, मुझु प्रियसरिसउ कियउ बिहाडु ।।

२१. एका वर्षात, दोन महिन्यांचा एक ह्याप्रमाणे शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद व हेमंत असे सहा ऋतु येतात.

२२ सिद्धि–अतिमानवीय शक्ति–एकंदर आठ सिद्धि आहेत.

२३. अधिक मासु सवि मासहिफिरइ,
छह रितुकेरा गुण अहरइ,
मिलिवा प्रिय ऊबोहिलि हुय,
सउ मुकलाविउ उग्रसेणधूय,
पंच सखी सइ जसु परिवारि,
प्रिय ऊरमाहि गइ गिरनारि
सखी सहित राजल गुणरासि,
लेइ दिक्खु परमेसर पासि,
निम्मल केवल नाणु लहेवि,
सिद्धि सामिणि राजलदेवि.

२४. जैन साधूना सबंध वर्षभर एका जागेहून दुसऱ्या जागी फिरत रहावे लागते. फक्त पावसाळ्याचे चार महिने ते एकाच जागी 'उपाश्रयात' वास्तव्य करतात.

२५. थभण थिर न पयोहर मोह रचउ म गमारि ।
मान रचउ किस्या कारण तारुण दीह बिच्यारि ।।

२६. भमरला छांडि न पाषल बोणलध्या अम्ह सइर ।
चांदुला सइरसंतापण आपण तां नहि वइर ।।

२७. कृपया परिशिष्ट 'ड' पहा.

२८. "आ एक ज गुर्जर काव्यथी जैन कवि प्रथम पंक्तिनो साहित्यकार बने छे. 'प्रबोधचिंतामणि', 'प्रबोधप्रकाश'ना करता अधिक यशस्वी थवा निर्मित छे. कविनी प्रतिभा वस्तुनी गूंथणीमां, पात्रनी योजनामां अने रूपकनी खीलवणीमां एकसरखी विजयशाली नीवडे छे. प्रस्तावोनुं वैचित्र्य अनेक रसनी मिळावटने पोसे छे. अने कार्यनो वेग तथा संविधाननुं चातुर्य वांचनारनुं कौतुक छेवट सुधी टकावी राखे छे. जैनेतर साहित्यनी पेठे जैन साहित्य चकले ने चौटे गवायुं होत, तो जयशेखरसूरिए पण भालण अने प्रेमानंदना जेवी प्रसिद्धि लोकमां मेळवी होत."

(पंदरमा शतकनां प्राचीन गुर्जर काव्य, आवृत्ति १ ली, प्रस्तावना पृ. ३२-३३).

२९. कृपया परिशिष्ट 'इ' पहा.

३०. आत्म्याचे अमरत्व आणि जन्माची पुनरावृत्ति हे हिंदु लोकांच्या श्रद्धेचे विषय आहेत.

३१. जसु णिग्गामि रेणुक्करडि कइअ विरहद्दवेण ।
किम दिज्जई संदेसडउ तसु णिट्ठुरह मणेण ।।

३२. पाणी तणइ विओइ कादमि ही फाटइ हियउ ।
जइ इम माणसु होय नेहु ते साचउ जाणियई ।

३३. वन ते वर्णविइ जे बहु वृक्षवंत, मति ते जे दयावंत, नदी ते जे नीरवंत, मेघ ते जे समयवंत, देस ते जे प्रजावंत, स्त्री ते जे पुत्रवंत, हाट ते जे वस्तुवंत, भाट ते जे वचनवंत, खाट ते जे धरणिवंत, मठ ते जे मुनिवंत,...... वचन ते जे सत्यवंत,......वस्त्र ते पखालसार, द्रव्य ते जे भोगसार...

## प्रकरण तिसरे

# मध्ययुगीन गुजराती साहित्य - १५ वे शतक

[ १ ]

इ. स. १२९७ साली उलघखान ह्या अल्लाउद्दीन खिलजीच्या धाकटया भावाने करण वाघेलाचा पराभव केला. ह्या घटनेने गुजरातच्या इतिहासात एक नवे प्रकरण सुरू झाले.

ह्यामुळे गुजरात दिल्लीच्या सुलतानांनी नेमलेल्या नाझीमांच्या वर्चस्वाखाली आले.

१३९८ पर्यंत असेच चालू राहिले. त्यावेळी तैमूरलंगाने दिल्लीवर स्वारी केली, दिल्लीच्या सुलतानशाहीचे तुकडे-तुकडे केले. मग त्याने दिल्ली लुटली आणि तो निघून गेला. अशा रीतीने केन्द्रसत्ता भग्न झाल्याने सर्व देशात अराजकता व अव्यवस्था बोकाळली. प्रादेशिक प्रशासक (गव्हर्नर) स्वतंत्र राजे बनले. गुजरातचा नाझीम (गव्हर्नर) जाफरखान ह्याने पाटण येथे आपली स्वतंत्र सल्तनत स्थापिली.

बहादुरशहाच्या कारकीर्दीपासून (१५२५ ते १५३६) गुजरातची सुलतान-शाही विस्कळीत होत चालली. १५६० पासून तर गुजरातचे सुलतान हे केवळ नामधारी सुलतान राहिले आणि खरी सत्ता अमीरांच्या हाती आली.

सुलतान मुजफ्फरशहाच्या कारकीर्दीच्या शेवटी-शेवटी तर अमीरांनी त्याची नामधारी सत्ताही झुगारून दिली व त्यांनी गुजरातचा जो भाग आपल्या हाती यईल तो बळकावून त्या-त्या भागांचे ते स्वतंत्र सत्ताधीश बनले. नंतर ते आपाप-सातही भांडू लागले. अशा राजकीय अस्थिरतेच्या आणि सार्वत्रिक अंदाधुंदी व असंतोषाच्या वातावरणात दिल्लीचा मोगल बादशहा अकबर हा इतिमदखान गुजराती याच्या आमंत्रणावरून १५७२ मध्ये गुजरातेत आला व त्याने सर्व गुजरात प्रांत आपल्या मोगल साम्राज्यांत समाविष्ट केला.

ह्याच सुमारास पोर्तुगीज लोकही गुजरातमध्ये आले व त्यांनी १५३८ मध्ये दीव येथे व १५५९ मध्ये दमण येथे आपली बसाहत स्थापिली.

१४१२ मध्ये अहमदाबादची स्थापना झाली. तेव्हापासून ते १५३६ मध्ये बहादुरशहा मरण पावण्यापर्यंतचा गुजरातच्या सुल्तानशाहीचा काळ हा गुजरातच्या इतिहासातील 'सुवर्णयुग' म्हणता येईल असा मोठ्या वैभवाचा काळ होता. सिद्धराज जयसिंह ह्याने मध्यंतरी गुजरातची सत्ता व मत्ता खूप उच्च कोटीला पोहोचविली होती हे खरे; पण सुल्तानांच्या कारकीर्दीत कला, स्थापत्य, नगर रचना, व्यापार, उद्योगधंदे वगैरे क्षेत्रात गुजरातने जी उच्चकोटीची प्रगति केली तिला तोड नाही.

ह्या काळात साहित्याची प्रगति मात्र म्हणण्यासारखी झाली नाही. १२९७ साली हिंदु राजांची व त्यांच्या हिंदु मंत्र्यांची राजकीय सत्ता नष्ट झाल्यामुळे व राजकीय अस्थिरता व अंदाधुंदी असल्यामुळे कवि व विद्वान् यांना कोणी आश्रयदाता राहिला नाही. संस्कृत व प्राकृत या भाषांना महत्त्व राहिले नाही. गुजरात प्रांत एकटा पडला. मारवाड, माळवा व दुसरे प्रांत ह्यांच्याशी गुजरातचा सांस्कृतिक संबंध मुळीच राहिला नाही. सर्व गुजरात सांस्कृतिक क्षेत्रात हलबल झाला. जुनी पश्चिम राजस्थानी अथवा 'मारु गुर्जर' ही भाषा गुजरात वगैरे प्रांतात चालत होती. ती जाऊन तिला प्रादेशिक उपभाषेचे (dialect) स्वरूप आले आणि काही काळाने अशी परिस्थिती आली की जी भाषा फक्त गुजरातेत बोलली जाऊ लागली तिलाच गुजराती 'भाषा' असे मानण्यात येऊ लागले.

मुसलमानपूर्व काळातही लोकसाहित्य आपआपल्या प्रांतातील प्रादेशिक भाषेतच रचले जात असे. पण उच्च वर्गातील लेखकांचे साहित्य मात्र संस्कृत व प्राकृत भाषेतच रचण्यात येत असे. पण आता अशी परिस्थिती उद्भवली की उच्च वर्गीय लेखकही प्रादेशिक भाषेतच लेखन करू लागले.

मात्र १५ व्या शतकातील एक प्रवाह उल्लेखनीय आहे. उत्तर हिंदुस्तानात सांस्कृतिक व सामाजिक हताशा उद्भवल्यामुळे तेथे भक्तिधर्माचा उद्रेक झाला व त्याचा परिणाम गुजराती प्रजेवर व विशेषतः हिंदु कवींवर चांगला लोकपर्यंत झाला व ते श्रीमत् भागवताच्या दशम स्कंधात वर्णिलेल्या प्रेमलक्षणा भक्तीकडे वळले.

प्रेमलक्षणा भक्तीचे मुख्य व्यवच्छेदक लक्षण म्हणजे 'प्रेम', जीवात्मा हा गोपी व परमात्मा म्हणजे श्रीकृष्ण अशी भावना होणे ह्याचेच नाव प्रेमलक्षणा भक्ती.

खरा भक्त श्रीकृष्णावर प्रेम करतो ते एखादी मुग्ध युवती आपल्या प्रियकरावर जितक्या आसक्तीने व प्रखरतेने करते, तितक्या आसक्तीचे व प्रखरतेचे असते. खाता, पिता, बसता, उठता आपापले व्यावसायिक अथवा नित्य नैमित्तिक गृहकृत्य करीत असता भक्ताचे मन सतत परमेश्वराकडे लागलेले असते. त्याच्या_

पासून दूर राहण्याचा एक क्षण म्हणजे सुद्धा वेळेचा अपव्यय होय. परमेश्वराचे सान्निध्य म्हणजेच जीवनानंद. ह्यात मिळणाऱ्या परमोच्च आनंदापुढे त्याला मोक्ष-सुद्धा तुच्छ वाटू लागतो.

ही गोष्ट मुख्यत: कृष्णभक्तीच्या साहित्याबद्दल आहे. राम किंवा शिव व शक्ति ह्या देवतांची आणि इतर देवदेवतांची पूजा आराधना, प्रार्थना इ. प्रणालीगत पद्धतीने चालू होती. त्यामध्ये भक्त व उपास्यदेवतेचे नाते बालक व माता किंवा पिता असे असते.

भक्तिधर्म किंवा भागवतधर्म ह्याचा उदय अथवा प्रचार इ. स. पूर्व ६ व्या शतकातील वृष्णिकुलात जन्मलेल्या वासुदेवापासून झाला. कालाच्या वाहत्या प्रवाहाबरोबर त्यामध्ये इतर प्रवाह—उदाहरणार्थ वैदिक धर्माचे व महाभारतातील नारायणधर्माचे प्रवाह मिसळू लागले. एवढेच नव्हे तर कालांतराने अहिर कुळातील गोपालकृष्णाच्या खोड्या व क्रीडाही त्यात समाविष्ट झाल्या. ह्या विविध प्रवाहांच्या मिश्रणामुळे मूळच्या भागवतधर्माच्या स्वरूपात संपूर्ण परिवर्तन झाले. मध्ययुगीन कालात श्री रामानुजाचार्यांनी त्या काळच्या सामाजिक व आर्थिक स्थितीचा विचार करून त्यात थोडे बदल करून, त्यामध्ये एकसूत्रता आणली. निंबार्काचार्यांनी त्यात राधेचा समावेश करून त्यामध्ये एक नवे परिमाण आणले. रामानन्दानी जुन्या प्रस्थापित झालेल्या परंपरेच्या विरुद्ध जाऊन आपली धार्मिक प्रवचने प्राकृत (सामान्य लोक जी भाषा बोलत असत व समजत असत) भाषेतून करू लागले. संस्कृत भाषेत धर्मग्रंथ लिहिले गेले पण ती सामान्य लोकांच्या व्यवहारातून लुप्त झाली होती म्हणून त्या संस्कृत भाषेचा त्यांनी अव्हेर केला. काही विशिष्ट उच्च वर्णाच्या लोकांनाच धर्मकृत्ये करण्याचा अधिकार असावा ह्या प्रथेचा त्यांनी निषेध केला. धर्माच्या बाबतीत सर्व सारखे आहेत. धर्माचरण करण्यास जात-पात, स्त्री-पुरुष, वय, शिक्षण अथवा समाजातील स्थान ह्यातील भेद आड येता कामा नयेत असे प्रतिपादन करून धर्माची दारे त्यांनी सर्वांना खुली करून दिली व अशा रीतीने भक्तिधर्म सर्वांना सुलभ रीतीने आचरता येईल अशी व्यवस्था केली.

भक्तीचे असे व्यापक स्वरूप बनत चालले त्यामुळे ती केवळ 'प्रेमलक्षणा' भक्ती राहिली नाही तर ज्ञान आणि वैराग्य ह्यांनी युक्त अशी आपल्याला देवा-वरील दृढ भक्ती ही भक्तीची कल्पना मध्ययुगीन गुजराती साहित्याची प्राणशक्ति बनली.

## भालण [ १४०५ ते १४८९ ]

भालण हा एक ख्यातनाम कवि व अनुवादकार होऊन गेला.

हिंदूंचे धार्मिक ग्रंथ, महाकाव्ये व पुराणे सर्व संस्कृतमध्ये लिहिलेली होती

आणि त्यावेळच्या परिस्थितीप्रमाणे सामान्य माणसाला त्याचे आकलन होणे शक्य नव्हते. सर्वसामान्य जनतेला ते ग्रंथ कळावेत म्हणून त्यांचा गुजरातील अनुवाद करणे आवश्यकच होते.

मध्ययुगातील लेखकांची अनुवाद करण्याची पद्धत मात्र, केवळ गुजराती भाषेत तो ग्रंथ अचूक अर्थासह तसाच उतरावयाचा अशी नव्हती. धर्मग्रंथातून एखादी कथा, आख्यायिका, विचार अथवा बोधप्रद प्रसंग शोधून तो लोकांना समजण्यास सुलभ होईल व आवडेल अशा रीतीने तो लोकांपर्यंत पोहोचवीत असत. त्यासाठी मूळ प्रसंग किंवा गोष्ट ह्यातील काही भाग वगळून किंवा बदल करून अथवा पदरचे त्यात काही अधिक घालून ते-ते काव्य पुन्हा रचीत.

प्रेमानंदासारखा कवि म्हणतो–"एका बाजूला व्यास संस्कृतमध्ये प्रवचन करीत आहे. दुसऱ्या बाजूला मी प्राकृतमधून बोलत आहे. एकही प्रसंग मी गाळत नाही. मी सहज व सोप्या भाषेत लोकांपर्यंत माझे सुविचार पोहोचवितो."

पण स्वत: प्रेमानंदाने केलेले अनुवाद मूळ ग्रंथाशी ताडून पाहता मात्र आपणास आश्चर्य वाटेल. कारण त्याने त्यात कितीतरी बदल केलेले असतात. त्यातील कित्येक गोष्टी वगळलेल्या असतात. कित्येक नवे प्रसंग घुसडलेले असतात व ह्यामुळे तो 'अनुवाद' असे न वाटता 'स्वतंत्र ग्रंथ'च आहे असे वाटते.

मध्ययुगीन अनुवादकाच्या समोरच त्यांचा श्रोतृवर्ग असे व ते श्रोते साधे, परिश्रम करणारे स्त्री-पुरुष असत. त्यांना संस्कृतचे ज्ञान नसे. पण त्यांना मनोविनोदाची व शक्य तेवढ्या बऱ्याच गोष्टी जाणून घेण्याची इच्छा असे. अभ्यासू विद्यार्थ्यांना योग्य अशी मीमांसा करणे अथवा मूळचा अर्थ अगदी तंतोतंत यावा असे अनुवादकारांचे धोरण नसे. श्रोत्यांची आकलनशक्ति व रुचि ह्याकडे ते मुख्यत्वे पाहात असत. ह्या परिस्थितीमुळे अनुवादकांवर अनेक मर्यादा व बंधने पडत असत.

भालण कवीचे मोठे कार्य म्हणजे त्याने केलेला बाणभट्टाच्या 'कादंबरी' चा अनुवाद. 'कादंबरी' हा संस्कृतातील महान गद्यग्रंथ. ह्या ग्रंथाचा अनुवाद आणि तो सुद्धा पद्यरूपाने 'गुजराती'त म्हणजे देशी भाषेत करणारा भालण पहिलाच भारतीय कवि असावा. भालणला माहीत होते की, बाणभट्टाची संस्कृत भाषा विलक्षण क्लिष्ट व कठीण आहे. पण भालणने त्याचे सुलभ आख्यान[१] बनविले. 'कादंबरी' फक्त मोठे संस्कृत विद्वानच समजू शकतील अशी आहे. पण भालणने ती सामान्य माणसाला समजावी अशा रीतीने रूपांतरित केली आहे व ती (लौकिक) भाषेत (गुजरातीत) अनुवादित केली आहे.

हा अनुवाद करताना भालणने खूप संक्षेप केला आहे. त्याने काही गोष्टी पूर्णपणे वगळल्या आहेत तर काही आपल्या पदरच्या त्यात गोवल्या आहेत. साधारण माणसाच्या बुद्धीला सुगम होईल अशी रचना त्याने केली आहे. तत्कालीन भाषेच्या

दृष्टीने व श्रोत्यांच्या बुद्धिमत्तेच्या व सांस्कृतिक पातळीच्या दृष्टीने जितका उत्तम अनुवाद करता येईल तितका कादंबरीचा उत्तम व सुंदर अनुवाद भालणने केला आहे.

भालणने केलेले विंध्याटवी, पंपा व अच्छोद सरोवरांचे वर्णन अत्युत्कृष्ट आहे. कथेतील पात्रांचे भावविश्वही त्याने फार सुंदर रीतीने व बारकाईने वर्णिले आहे. व त्यात काही प्रसंगी तर त्याच्या प्रतिभेने उच्च भरारी मारली आहे. उदाहरणार्थ पोपटाच्या रूपात असलेला वैशंपायन, विंध्याटवीत पारध्यांनी पोपटाच्या वस्तीवर कसा हल्ला केला व त्यात दुसऱ्या अनेक पोपटांबरोबर आपल्या आईबापांनाही कसे मारून टाकले, त्याचे दु:खमय वर्णन करतो ते सर्व वर्णन अप्रतिम आहे.

पोपट म्हणतो, "हे राजा, मी जास्त विस्तार कशाला करू ? कोणालाही आपल्या जीवनाइतकी प्रिय वस्तू दुसरी कोणती असू शकेल ? नाहीतर एका क्षणापूर्वीच माझा पिता मरण पावला ही गोष्ट मी कशी विसरू शकलो असतो ? आणि एवढ्या ह्या दु:खानंतर जिवंत कसा राहू शकलो असतो ? खरोखर माझ्यासारखा निर्दय दुसरा कोणी नसेल. माझ्या आई-बापांनी माझ्यासाठी काय काय केले, ते मी सर्व विसरून गेलो. माझ्या आई-बापांच्या वधाचे दु:ख मी पचविले आणि मी स्वत: मात्र जिवंत राहिलो. खरोखर माझ्यासारखा दुष्ट दुसरा कोणीही नसेल[३]."

भालण ह्या कवि म्हणूनही सुप्रसिद्ध होता. वात्सल्यभावाचे त्याने केलेले वर्णन अतुलनीय आहे. मध्ययुगीन गुजराती कवींपैकी ह्या बाबत काही थोडेच कवि त्याची बरोबरी करू शकतील. ह्या बाबतीत त्याच्यापेक्षा श्रेष्ठ कवि तर दुसरा कोणीही नाही. त्याने आपल्या पदात[४] राम व कृष्ण यांच्या बाललीलांचे वर्णन केले आहे. त्यांनी केलेल्या निरनिराळ्या बालसुलभ खोड्या, चेष्टा व माता-पित्यांचे त्यांच्यावरचे प्रेम ह्यांचे फार रोचक वर्णन त्याने एका कवितेत केले आहे. कौसल्या आपल्या रामाला शोधीत आहे. तो नजरेआड झाला आहे.

ती म्हणते, "बायानो, कृपा करून माझ्या रामाला शोधून आणा, तो म्हणजे माझा प्राणच आहे. मी त्याला शहरभर कानाकोपऱ्यातही धुंडून आले. काहीतरी महत्त्वाचे काम करण्यासाठी मी त्याला कडेवरून खाली उतरविला आणि तेवढ्यात, अरे देवा, माझं रत्न कुठेतरी नाहीसं झालं. सेवकांनो, आत्ताच्या आत्ता जा. पाणी प्यायलासुद्धा थांबू नका. जा, सगळी पृथ्वी पालथी घाला आणि त्याला शोधून आणा.'[५] राजा दशरथ सुद्धा अतिशय अस्वस्थ होतो व म्हणतो, 'जा, शरयूच्या पाण्यात रामाचा शोध करा.' मग शेवटी कवि म्हणतो 'आणि भालणांचा परमेश्वर तर कौसल्येच्या मागेच लपला होता.'

श्रीकृष्ण गोकुळ सोडून कायमचा मथुरेला जातो. त्याची पालक माता यशोदा तो परत येण्याची आतुरतेने वाट पहात झुरत असते.

" माझ्या गोड गोड 'गावजी', घरी परत ये. तू आता मथुरेत फार श्रीमंत व शक्तिमान झाला आहेस. पण हे विसरू नकोस की तेथे तुझ्यावर माझ्याइतकं प्रेम कोणीही करणार नाही. जर तू मला आपली आई मानायला तयार नसलास तर मला निदान आपली दाई तरी मान. माझ्यावर तू एकवेळ जे प्रेम केलेस ते कोणीही इतक्या लवकर विसरून जाणार नाही. भालणच्या प्रभु रघुनाथा, एक क्षणभर तरी त्या प्रेमाची आठवण कर.[६] "

' आख्यान ' ह्या गुजराती काव्य प्रकाराचा भालण हा जनक होय. नरसिंह मेहताच्या 'सुदामा चरित्रा'मध्ये आपल्याला आख्यानाच्या पूर्वावस्थेचे बीज आढळते आणि त्यानंतरच्या कवींमध्ये वीरसिंह, कर्मन, जनार्दन व मंडन इत्यादींच्या काव्यात–आख्यानाचे निश्चित स्वरूप आपणास दिसते. पण भालणच्या ' नलाख्यान ', ' मृगी आख्यान ' आणि ' दुर्वासा आख्यान ' वगैरे काव्यात, ज्याला आख्यान असे म्हणता येईल असे आख्यानाचे पूर्ण स्वरूप सिद्ध झालेले आपणास दिसून येते. भालणने केलेले ' कादंबरी ', 'दशमस्कंध' आणि ' दुर्गा सप्तशती ' (ज्याला तो 'चंडी आख्यान' म्हणतो) यांचे अनुवाद हे सुद्धा आख्यानाच्या रूपातच आहेत.

एवंच अनुवादक, कवि व आख्यानाचा जनक म्हणून भालणची मध्ययुगीन श्रेष्ठ गुजराती कवींमध्ये गणना होते.

## नरसिंह मेहता १४१४–१४८०

नरसिंह मेहताच्या पूर्वी अनेक उल्लेखनीय गुजराती काव्यरचना झाल्या असल्या तरीही नरसिंह मेहता ह्यालाच गुजराती काव्याचा 'जनक' मानले जाते. ह्याचे कारण असे असावे की नरसिंह मेहताच्या अनेक कविता (विशेषकरून ' प्रभातियां ' म्हणजे भूपाळ्या ह्या पिढ्यानपिढ्या चालत आल्या आहेत आणि भक्त वा कवी म्हणून नरसिंह मेहताला शतकानुशतके गुजरातमधील प्रत्येक हिंदूच्या हृदयात फार मानाचे स्थान प्राप्त झाले आहे.

आणखी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे. ती म्हणजे नरसिंहपूर्व कवींची काव्ये नरसिंह मेहताच्या कालानंतर कितीतरी वर्षांनी गुजरातला परिचित झाली. व त्या काव्यांची भाषा क्लिष्ट असल्यामुळे त्यांनी फक्त मध्ययुगीन गुजराती भाषा व साहित्याच्या काही अभ्यासू व विद्वानांनाच प्रभावित केले.

नरसिंह मेहताने आपल्या आयुष्यातील कित्येक महत्त्वाच्या प्रसंगांवर काव्य-रचना केली आहे. तसेच त्याच्या मागून झालेल्या विष्णुदास, विश्वनाथ आणि प्रेमानंद ह्यांनी सुद्धा त्याच्या आयुष्यातील इतर प्रसंगांवर आपली काव्ये लिहिली आहेत. नरसिंह मेहताचे जीवन, त्यात घडलेले काही चमत्कार, नरसिंह मेहताच्या

नावाने लिहिलेली कित्येक काव्ये, त्याच्या हृदयात एकाएकी प्रज्वलित झालेली भक्तीची ज्वाला, आणि त्याच्या काही अती लोकप्रिय कवितांची भाषा आणि ज्या कविता फार लोकप्रिय झाल्या नाहीत त्यांची भाषा–ह्या दोन्ही भाषातील फरक हे सर्व गुजरातमध्ये कितीतरी वर्षे खूप वादाचे विषय झालेले आहेत.

भारतातील अनेक संत व भक्त कवींच्या जीवनाप्रमाणे नरसिंह मेहतांचे जीवनही चमत्कारानी भरलेले आहे व त्यावर अनेक दंतकथा रचल्या गेल्या आहेत. त्याचे विवेचन येथे करणे अप्रस्तुत आहे. फक्त येथे काही निर्विवाद अशा त्याच्या जीवनातील सत्य घटनांचाच विचार करणे योग्य होईल.

नरसिंह मेहताचा जन्म सुमारे इ. स. १४१४ मध्ये 'तलाजा' येथे झाला. नंतर त्याने जुनागडला वास्तव्य केले. लहानपणीच आई-बाप मरण पावल्यामुळे नरसिंह मेहतांचे भरण-पोषण त्यांच्या चुलत भावाच्या घरी झाले. गिरनार पर्वताच्या दर्शनाला जाताना जुनागडला आलेले साधु-संत व संन्यासी ह्यांना भेटणे त्याला लहानपणापासूनच आवडत असे आणि त्यांनी म्हटलेली भजने व त्यांची धर्मचर्चा ऐकणे त्याला फार आवडत असे. ह्यामुळे, व सांसारिक गोष्टीमध्ये त्याचे मन जराही लागत नसल्यानेही, त्याचे आप्त-मित्र त्याच्यावर नाराज झाले. त्यांच्याकडून मिळालेल्या वाईट वागणुकीमुळे व त्याच्या भावजयीने मारलेल्या टोमण्यामुळे त्याचे मन विषण्ण झाले आणि मग कंटाळून तरुणपणीच नरसिंहने गृहत्याग केला. तो एका अरण्यात गेला. फिरता-फिरता त्याला एक शिवलिंग सापडले. त्या शिवलिंगाकडे कित्येक वर्षेपर्यंत कोणाचे लक्षही गेले नव्हते. त्याने काही दिवस भक्तिभावाने त्या शिवलिंगाची पूजा केली. नंतर तो द्वारकेला गेला. तेथे त्याने 'रासलीला'[७] पाहिली.

ह्या 'रासलीले'चा त्या तरुण कवीच्या मनावर फार खोल असा परिणाम झाला. त्याची कल्पनाशक्ति उद्दीपित झाली व तो खरा कवि बनला. द्वारकेहून तो जुनागडला परत आला तेव्हा तो अगदी बदलून गेलेला होता. त्याने लग्न केले;[८] पण सांसारिक गोष्टीकडे त्याच्या मनाचा कल मुळीच नव्हता. त्याचा संसार दारिद्र्यात कष्टमय रीतीने चालला होता. पण त्याच्या अडचणीच्या वेळी त्याला अचानक कोठून तरी मदत मिळत असे व तो संकटातून पार पडत असे. त्याचा मुलगा शामळ ह्याच्या विवाहाच्या वेळी व त्याची मुलगी कुंवरबाई हिच्या 'सीमंत' प्रसंगी[९] त्याला अशीच ईश्वर कृपेने मदत मिळाली. त्याचे सर्व जीवन श्रीकृष्णाला संपूर्णपणे समर्पित झालेले होते. तो इ. स. १४८० मध्ये ईश्वरचरणी विलीन झाला.

नरसिंह मेहताची ग्रंथसंपत्ती खूप मोठी आहे. ग्रंथांची नावे 'हारमाळा', 'शामळशानो विवाह', 'गोविंद गमन', 'सुरत–संग्राम', 'सुदामा–चरित्र', 'रास-

सहस्रपदी' व 'बाल–लीला', 'दान–लीला', 'वसंत', 'हिंडोळा' ही पदे व भक्ती, ज्ञान व वैराग्यविषयक पदे. नरसिंह मेहताच्या नावावर असलेली काही पदे त्याचीच आहेत की काय ह्याबद्दल विवाद आहे. 'हारमाळा' ह्या काव्याची रचनाही नरसिंह मेहताची आहे की नाही ह्याबद्दल शंका आहे.

'हारमाळा' ह्या काव्यात नरसिंहाच्या द्वेष्ट्यांनी केलेले त्याच्या विषयीचे आव्हान श्रीकृष्णाने स्वीकारले व आपल्या विषयीची त्याची भक्ती अभंग व अचल आहे हे सिद्ध करून दाखविले अशी हकीकत आली आहे. त्याच्या शत्रूंनी त्याला एकांतवासात एका खोलीत बंदिस्त करून ठेवले होते. तेथे श्रीकृष्णाने स्वत: त्याच्या गळयात फुलांची माळ घातली. 'हारमाळे'तील ह्या प्रसंगावरची तेवढी पदे निश्चित नरसिंह मेहताचीच आहेत. इतर मात्र त्यात नंतर घुसडण्यात आली असावीत.

'गोविंद गमन', 'सुरत–संग्राम' व 'सुदामा–चरित्र' ही नरसिंह मेहतांनी रचलेली तीन आख्याने आहेत. आख्यानाचे पूर्णावस्थेरा पोहोचलेले स्वरूप जरी ह्यात पाहावयास मिळत नाही तरी भागवतातील वर्ण्य विषय निवडून त्याला सुंदर आख्यानाचे रूप दिलेले येथे दिसून येते.

'गोविंद–गमन' : अक्रूर गोविंदाला (श्रीकृष्णाला) गोकुळातून मथुरेला घेऊन जातो ह्याचे वर्णन ह्या काव्यात आहे. श्रीकृष्ण दूर जाणार ह्या कल्पनेनेच गोपींची जी विकल भावावस्था होते त्याचे सुंदर करुण चित्रण ह्यात केले आहे.

'सुरत-संग्राम' ह्यात युद्धाच्या स्वरूपात एका बाजूला श्रीकृष्ण व त्याचे गोपबन्धु व दुसऱ्या बाजूला राधा व गोपी ह्यांनी परस्परांशी केलेल्या प्रेमचेष्टांचे वर्णन आहे.

'सुदामा-चरित्र' सुदामा : हा एक गरीब ब्राह्मण व श्रीकृष्णाचा गुरुबंधु दारिद्र्याने पीडलेला असतो. श्रीकृष्ण द्वारकेचा राजा झालेला असतो. सुदामाची पत्नी त्याला आग्रह करून श्रीकृष्णाकडे जाऊन त्याच्याकडून काही मागून घ्या म्हणून सांगत असते. तो तिकडे जाण्यास नाराज असतो. पण शेवटी त्याच्या पत्नीच्या अत्याग्रहाने तो जाण्यास तयार होतो. श्रीकृष्णाला भेटतो वगैरे गोष्टींचे वर्णन या काव्यात फार प्रभावीपणे केलेले आहे. वरील तिन्ही आख्यानात 'सुदामा चरित्र' हे आख्यान सर्वात उत्तम आहे.

नरसिंह मेहताने 'रास सहस्रपदी' व 'शृंगार-माला' ह्या पुस्तकात शेकडो पदे लिहिली आहेत. तसेच श्रीकृष्णाचा जन्म, व त्याच्या बाळपणातील खोड्या व विविध लीला ह्यावर अनेक पदे त्याने आपल्या 'दान–लीला'[१०] व 'रास–लीला' ह्या काव्यात लिहिली आहेत. त्याशिवाय भक्ती, ज्ञान व वैराग्य ह्यावरही त्याने पदे लिहिली आहेत.

गुजरातमध्ये असे एकही घर नसेल की जे प्रत्येक दिवशी पहाटे नरसिंह

मेहताच्या 'प्रभातियां'नी दुमदुमले नसेल. आणि हा क्रम दशकानुदशके चालत आला आहे. त्याची बाल-लीलांची पदे–त्याच्या काही ओळी अशा आहेत, "बाळा या पाण्यातून निघून जा कसा. कारण माझा नाथ आत्ता जागा होईल"[११] (कालिया नागाच्या बायकोने कृष्णाला उद्देशून म्हटलेले बोल).

यशोदा कृष्णाला म्हणते–"यादवा, ऊठ, गोपालकृष्णा, जागा हो, तुझ्या शिवाय गाईंना रानात चरायला कोण बरं नेईल ?"[१२]

तसेच ज्ञान, भक्ती व वैराग्यपर पदांच्या काही पहिल्या ओळी, "आकाशा-कडे बघ. तो आकाशात फिरणारा कोण आहे ? तो सारखा कोणता मंत्र म्हणत आहे ? सोऽहं, सोऽहं हाच तो ध्वनि."[१३]

"ज्या क्षणी मी जागा होतो त्या क्षणीच मला जग दिसेनासे होते. झोपेत मात्र मला नाना प्रकारचे भोग स्पष्ट दिसतात."[१४]

"खरा वैष्णव त्यालाच म्हणावे ज्याचे हृदय दुसऱ्याचे दुःख पाहून द्रवते"[१५]

"सच्चिदानंद आनंदाने क्रीडा करीत आहे व सोन्याच्या पाळण्यात बसून झोके घेत आहे."[१६]

नरसिंह हा खरा भक्त व खरा आत्मनिष्ठ कवि होता. त्याच्या मुखातून निघालेला प्रत्येक उद्‌गार त्याच्या सन्निष्ठेचा द्योतक आहे. त्याने आपल्या जादूच्या कांडीने तत्त्वज्ञानाला काव्याचे रूप दिले आहे व ह्याच किमयेने त्याची ज्ञान व वैराग्यपर पदे त्याच्या श्रेष्ठत्वाची प्रचीति आणून देतात. पण त्याची भक्ती विषयक पदे अतुलनीय आहेत आणि त्यातच त्याचे समग्र जीवन व तत्त्वज्ञान समाविष्ट झालेले आहे. त्याच्या दृष्टीने "भक्ति म्हणजे ह्या जगातील अलौकिक व एकमेव अशी वस्तू आहे की, जी ब्रह्मलोकात सुद्धा मिळणार नाही."[१७]

**पद्मनाभकृत 'कान्हड दे प्रबंध' (१४५६) :** हे पद्मनाभाने लिहिलेले ऐतिहासिक काव्य आहे. 'रणमल्ल छंदा'तील नायकाप्रमाणे ह्या काव्याच्या नायकाने एका रजपूत राजाने–मुसलमानांविरुद्ध दाखविलेल्या शौर्याचे व धैर्याचे वर्णन ह्यात बहारीने केलेले आहे. ही चार भागांची एक दीर्घ कथा आहे. करण वाघेला हा गुजरातचा शेवटचा रजपूत राजा होय. माधव हा त्याचा प्रधान. काही व्यक्तिगत भांडणामुळे आपल्या धन्याचा सूड घेण्याच्या इच्छेने तो दिल्लीला जातो व तो अल्लाउद्दीन खिलजीला गुजरातवर हल्ला करून गुजरात जिंकून घेण्यासाठी आमंत्रण देतो. झालोरचा राजा कहनाड दे हा अल्लाउद्दीनचा सेनापति अलफखान ह्यास आपल्या सैन्यासह झालोर मधून पुढे जाण्यास मनाई करतो.

अलफखान रस्ता बदलून दुसऱ्या मार्गाने गुजरातेत येऊन हल्ला करतो व करण वाघेलाचा संपूर्ण पराभव करतो. परत जाताना तो झालोरवर चाल करून जातो. पण कान्हड दे त्याची डाळ शिजू देत नाही व अलफखानाच्या सैन्याची तो

दाणादाण उडवितो. काही दिवसांनी अल्लाउद्दीन स्वतः झालोरवर चालून येतो. झालोरच्या बालेकिल्ल्यातील साभियाना तलावाच्या पाण्यात, कत्तल केलेल्या[१८] गाईचे रक्त मिसळून, ते पाणी तो अपवित्र करतो व अशा रीतीने झालोरच्या पाण्याचा पुरवठा बंद करून झालोरला वेढा घालतो. रजपूत शरणागती स्वीकारीत नाहीत. १२ वर्षेपर्यंत घनघोर लढाई चालते. १२ वर्षांनंतर स्वतःच्या बहादुरीने नाही पण एका नीच नोकराच्या फितुरीमुळे अल्लाउद्दीन एका गुप्त मार्गाने किल्ल्यात प्रवेश करतो. तेथेही घनघोर लढाई होते पण त्यात दुर्दैवाने कान्हड दे हा मारला जातो.

अल्लाउद्दीनाची मुलगी 'पिरोजा' हिचे कान्हड देचा पुत्र 'वीरम दे' ह्याच्यावर प्रेम जडते. पण तो तिच्यावर प्रेम करणे तर राहोच पण तिचे तोंडही पाहण्यास तयार नसतो. कवीने वर्णन केले आहे त्याप्रमाणे त्याला मुसलमानांचा इतका तिरस्कार वाटतो की लढाईत मरण पावल्यावर त्याचे शिर कापून ते जेव्हा एका थाळीत घालून पिरोजाच्या पुढे नेले जाते तेव्हा तिचे तोंडही पहावे लागू नये म्हणून ते शिरच विरुद्ध दिशेला वळते ! हे पाहून पिरोजाचे हृदय भग्न होते व ती यमुनेत उडी टाकून जीव देते.

कवीने पराभूत झालेल्या मुसलमानांची दाणादाण, रजपूत स्त्रियांचा जोहार,[१९] 'कन्हानड दे', त्याचा भाऊ 'माल दे', पुत्र 'वीरम दे' व इतर रजपूत ह्यांची बहादुरी व धैर्याची कृत्ये ह्यांचे तपशीलवार हुबेहूब वर्णन केले आहे.

माधवने– एका हिंदूने आपल्या व्यक्तिगत स्वार्थासाठी हिंदु धर्माचे दुष्मन असलेल्या मुसलमानांना आमंत्रण देऊन आपल्या देशाचा नाश करून त्याला उध्वस्त केल्याबद्दल कवीने भावनांनी हेलावून जाऊन त्याचा तीव्र शब्दात निषेध केला आहे. तसेच त्याने सोमनाथ शंकरालाही दोष दिला आहे, कारण मुसलमानांनी शिवलिंग[२०] हरण करून नेले तरी सोमनाथाने ते शांतपणे सहन केले. तो म्हणतो, "हे सोमैया, पद्मनाथ तुला विचारतो आहे– तू आपला त्रिशूळ कोठे ठेवला आहेस ?"[२१]

**'हरिलीला षोडश कला'** (१४८५)– ह्याचा कर्ता भीम कवि. ते बोपदेवाच्या संस्कृत 'हरि-लीला-विवेक' ह्यावर आधारित आहे. ह्यात भागवताची कथा १६ अध्यायात विस्तारपूर्वक वर्णिली आहे व अशा रीतीने भागवत ह्या ग्रंथाचा सार-भागच ह्यात आणला आहे. भीमाने 'प्रबोध–प्रकाश' कविता रूपाने लिहिला आहे. कृष्ण मिश्राच्या संस्कृतमध्ये लिहिलेल्या 'प्रबोध-चंद्रोदय' ह्या रूपकात्मक नाटकाचे ते रूपांतरच आहे.

**कर्मन मंत्रीचे 'सीताहरण'** (१४७०)– ह्यात रामायणाची कथा थोडक्यात सांगितलेली आहे. लक्ष्मण व सीता यांच्यासह राम वनवासात जातो येथपासून तो वनवासातून राम विजयी होऊन अयोध्येला परत येईपर्यंतचा कथाभाग त्यात

वर्णिलेला आहे. ललित काव्यरचनेचे विशेष काव्यगुण ह्यात आणण्याचा कवीने फारसा प्रयत्न केलेला नाही. कर्माची गति कशी गहन आहे हे वाचकांच्या मनावर बिंबविण्याचा विशेष प्रयत्न कवीने ह्यात केलेला दिसतो. ह्यात २–३ प्रसंग सोडल्यास कवित्वाची चमक फारशी दिसून येत नाही. ते प्रसंग असे– रावणाने सीतेचे हरण केल्यावर रामाने केलेला शोक, तसेच रावणाची पत्नी मंदोदरी रावणाला रामाशी वैर करण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करते व म्हणते, "तुम्हाला २० डोळ्यांनी दिसले नाही ते मी एक स्त्री फक्त दोन डोळ्यांनी पाहू शकते;"[२] हा प्रसंग बहारीने वर्णिला आहे. तसेच राम-रावणाच्या युद्धाचे वर्णनही फार सुंदर रीतीने केले आहे.

त्या वेळच्या रिवाजाप्रमाणे हा लेखकही आपल्या श्रोत्यांना समोर ठेऊनच आपल्या विषयाचे प्रतिपादन करतो. आपल्या श्रोत्यांच्या–वाचकांच्या कल्पनाशक्तिला पेलता येतील आणि त्यांना आवडतील असे प्रसंग तो रामायणातून निवडतो, पण स्वतःच्या पदरच्या काही गोष्टी अथवा दुसऱ्याकडून उचललेल्या गोष्टीही तो त्यात मिसळतो.

१५ व्या शतकात श्रीकृष्णाप्रमाणे श्रीरामाची गौरव गाथा गाण्यातच कवि रमत असत, हे ह्या उदाहरणावरून स्पष्ट दिसून येते. ललित साहित्याची रचना करणे हा त्यांचा तेथे मुख्य उद्देश नसतो.

## तळटिपा

१. आ पासा व्यास वांचे संस्कृत,
   आ पासा माहारुं प्राकृत,
   कथाप्रसंग एकु नव पडे,
   चाल्यो जाउं सूधे शेरडे.

२. कृपया परिशिष्ट 'फ' पहा.

३. राय ! घणूं सूं कहीए कथी ?
   प्राण समुं काई वाहालुं नथी.
   नहितरि ततक्षण मूओ तात,
   ते सवि वीशारि मि वात.
   तेह वेदना दारुण सही, मुझ सम को निष्ठुर नहि.
   ..................... मुझ वीशारिओ उपकार

जननी जनक गयां परलोक, ते गि वीशारिओ सवि शोक
देह राखवा कर्यु उपाय; कोए दुष्ट मुझ शरव्यु, राय ?

४. कृपया परिशिष्ट 'ग' पहा.

५. बाई, कोई बतावो. मने राग लाला,
हुं तो शोधी वळी सघळा बाळा
में तो केडेथी उतार्यो कशुं काम पड्युं,
मारी नजर चूकी ने रूडुं रतन रड्युं.
ओहो ऊठो अनुचर, पाणी पीजो पछी.

० ० ० ०

जुओ ऊठो अनुचर, जुओ चारे देश.

० ० ० ०

राजा रातालाता थाय, करो सरज्युमां शोध,
भालण प्रभु रघुनाथ भराणा कौशल्यानी गोद.

६. मीठडा मावजीरे, मारे मंदिर आवो
मथुरा रिद्धि पाम्या घणी, वाध्युं छे अतितेज रे,
सही जाणजो मारा सरखुं को नहि आणे हे जरे.
माता नहि थाउं तमारी, धात्र कहीने जाणो रे.
ते दीधो तेम कोय दे नहि प्रीत करीने छेह रे.
भालण प्रभु रघुनाथ ! संभारो एक घडी तो नेहरे ॥

७. अनेक स्त्री-पुरुषांच्या जोडयांनी केलेले नृत्य. हे नृत्य लालित्यपूर्ण व तालबद्ध असून त्यात गोल-गोल फिरावयाचे असते. आश्विन महिन्याच्या पौर्णिमेला यमुना नदीच्या तीरावर गोकुळात श्रीकृष्णाने गोपींसमवेत केलेल्या 'रास' नृत्याची आठवण अथवा स्मरण म्हणून हे नृत्य ('रास') केले जाते.

८. काही विद्वानांचे असे मत आहे की त्यांचे लग्न आधी झालेले होते.

९. 'सीमन्त'–स्त्री पहिल्याने गरोदर असताना तिच्या सातव्या महिन्यात हा सामाजिक–धार्मिक समारंभ केला जातो.

१०. मथुरेला गोपी दही दूध विकायला घेऊन जात असता त्यांच्याकडून घेतलेला कर म्हणजे 'दान'.

११. जळकमळदळ छांडा बाळा, स्वामी आमरो जागशे.

१२. जागने जादवा कृष्ण गोवाळिया,
तुज विना धेनुमां कोण जाशे ?

१३. नीरखने गगनमां कोण घूमी रह्यो
ते ज हुं ते ज हुं शब्द बोले ?

१४. जागीने जोऊं तो जगत दीसे नहि,
ऊंघमां अटपटा भोग भासे.

१५. वैष्णवजन तो तेने रे कहिए जे पीड पराई जाणे रे.

१६. सच्चिदानंद आनंदक्रीडा करे,
सोनानां पारणामांहि झूले.

१७. भूतळ भक्ति पदारथ मोटुं, ब्रह्मलोकमां नाही रे

१८. हिंदूंच्या मते गाय ही माता व देवांचे निवासस्थान आहे.

१९. रजपूत योद्धे 'मरू किंवा शत्रूला मारू' असा दृढ निश्चय करून जेव्हा अंतिम युद्धासाठी बाहेर पडत तेव्हा रजपूत स्त्रिया जळत्या चितेत उडी टाकून आत्मघात करून घेत असत. तोच 'जोहार'.

२०. शिवलिंग—विश्वाच्या आदि पुरुष तत्त्वाचे आणि भगवान शिवाच्या जननेंद्रियाचे प्रतीक.

२१. पद्मनाभ पूछई सोमैया ! केथऊँ करुं त्रिशूल ?

२२. लोचन बेहूइ हूं देखूँ, तुझ फूटां वीस !

प्रकरण चवथे

# सोळावे शतक

[ १ ]

## मीराबाई [ १४९९–१५४७ ]

मीराबाईचा जन्म राजस्थानात झाला, गुजरातेत नाही. तरी पण तिला गुजराती कवयित्रीच मानण्यात येते. ह्याचे कारण असे की मीराबाईने ज्या भाषेत कविता केल्या, तिला डॉ. टेसी टोरी जुनी पश्चिमी राजस्थानी भाषा म्हणतो आणि ती राजस्थान व गुजरात ह्या दोन्ही प्रांताची भाषा होती. मीराबाई नरसिंह मेहता इतकीच लोकप्रिय असल्यामुळे तिची पदे हिंदू लोकांच्या जिभेवर नाचत होती व पिढ्यान्‌पिढ्या चालत येत होती. दशकानुदशके असे चालल्यावर ती भाषा प्रदेशानुसार बदलत गेली. शब्दांच्या उच्चारात व शब्दांच्या रूपात फरक पडत गेला व काही काळानंतर मीराबाईच्या कवितांची भाषा गुजरातेत 'गुजराती' व राजस्थानात 'राजस्थानी' म्हणून गणली जाऊ लागली. शिवाय आपल्या आयुष्यातील शेवटची १५ वर्षे मीराबाईने गुजरातेतच द्वारकेमध्ये आपले वास्तव्य केले होते.

इतर अनेक भारतीय साधु-संतांप्रमाणे मीराबाईच्या जीवनाशीही अनेक चमत्कारांच्या दन्तकथा निगडीत झाल्या आहेत. तिच्याविषयी जी काही माहिती उपलब्ध झाली आहे ती अशी आहे. राजस्थानातील 'मेडता' ह्या गावी अदमासे इ. १४९९ मध्ये तिचा जन्म झाला. बाल्यावस्थेपासूनच तिचे आजोबा राव दुदाजी ह्यांनी तिच्या हृदयात श्रीकृष्ण भक्तीची भावना उद्दीपित केली. श्रीकृष्ण हे त्यांचे कुलदैवत होते. ती १८ वर्षांची झाली तेव्हा तिचा विवाह चितोडचा राणा कुंभाजी ह्याचा नातू भोजराज ह्याच्याशी झाला. विवाहानंतर थोड्याच वर्षात भोजराजाचे अवसान झाले व मग विधवा झालेली मीरा अधिक तीव्रतेने कृष्णभक्तीत लीन झाली. ती जसजशी संन्यासी व साधु-संताच्या निकट संपर्कात येऊ लागली तसतसे तिच्याबद्दल अनेक अपप्रवाद पसरू लागले. तिचा दीर विक्रमसिंह ह्याने

मीराबाईने साधु-संतांची संगत सोडून रजपुतांच्या परंपरेला शोभेल असे गृहजीवन पाळावे म्हणून खूप प्रयत्न केले; पण तिची नातलग मंडळी तिला कृष्णभक्तीपासून जसजशी परावृत्त करू लागली तसतसे तिचे कृष्णभक्तीचे वेड अधिकच वाढत गेले. जेव्हा ह्या सर्वांनी केलेला जाच सहन होईना तेव्हा तिने चितोडचा त्याग केला. ती मेवाड सोडून प्रथम मेडता येथे व तेथून वृन्दावनला गेली, आणि शेवटी द्वारकेत जाऊन राहिली. द्वारका हे 'चार धामां'पैकी एक आहे. 'धाम' म्हणजे हिंदूंनी मानलेली सर्वात पवित्र स्थाने.[१] तेथे तिने आपल्या प्रियतम कृष्णाची भक्ती काही अडथळा न येता अगदी तन्मय होऊन केली, व इ. १५४७ मध्ये तेथेच तिने आपला देह ठेवला.

कृष्णाबद्दल मीरेच्या हृदयात अढळ अन् अपार प्रेम होते. तिची कृष्णाबद्दलची तीव्र प्रेमाने भरलेली पदे पाहता तिला गुजरातची नुसती पहिली कवयित्री न म्हणता सर्वश्रेष्ठ कवयित्री म्हटले पाहिजे. गुजरातमध्ये नरसिंह मेहताप्रमाणेच तिचे नाव घराघरातून सर्वांच्या जिभेवर नाचत आहे. ती गुजरातप्रमाणेच उत्तरप्रदेश व राजस्थानचीही फार लोकप्रिय कवयित्री आहे. ज्यातील शेवटची ओळ 'बाई मीरां के प्रभु गिरिधर नागर'[२] अशी आहे, अशी शेकडो पदे आहेत; पण त्यापैकी २५० पदे खास तिचीच आहेत. बाकीची पदे दुसऱ्या कोणीतरी रचून विनयाने किंवा लोकप्रियता मिळविण्यासाठी मीराबाईच्या नावावर खपविली आहेत. मध्य-युगीन भारतात आपण कविता लिहून त्या कोणा तरी लोकप्रिय लेखकाच्या नावा-वर खपविणे ही काही नाविन्याची गोष्ट नव्हती. नरसिंह मेहताच्या व कबीराच्या नावावर अशी शेकडो पदे आहेत.

मीराबाईची भक्तिपर पदे कृष्णाविषयीच्या तीव्र प्रेमासक्तीने ओथंबलेली आहेत. मीरेचा उपास्य देव श्रीकृष्ण हा भगवद्गीतेतील योगेश्वर कृष्ण नसून गोकुळात गोप-गोपींबरोबर क्रीडा करणारा गोपाळ आहे. तो आपल्या मुरलीने सर्वांना मोहविणारा आहे. त्याच्या डोक्यावर मोरपिसांचा मुकुट आहे. मीराबाईच्या दृष्टीने तो प्रत्यक्ष तिच्याजवळ आहे. तो तिच्या प्रेमाचे एकमेव स्थान आहे. तो तिचा जीवता–जागता हृदयेश्वर आहे. तिचे सर्वस्व आहे. तिचे सर्व जीवन कृष्णभक्तीने व्यापून गेले आहे. तिचे त्याच्यावरचे प्रेम फक्त ह्या जन्मातीलच नाही; पण ते पूर्वीच्या अनेक जन्मापासून चालत आलेले आहे. तो तिचा चिरसखा आहे. मीराबाईने ह्या प्रेमाच्या वेलीला आपल्या प्रेमाश्रूंचे पाणी घालून सतत वाढविले आहे. अनेकदा तिला असा भास होत असे की, आपल्याला श्रीकृष्ण प्रत्यक्ष भेटला आहे. अशा वेळी उद्भवणाऱ्या आनंदोर्मी तिला भारावून टाकतात व तो अत्यानंद पदाच्या किंवा नृत्याच्या रूपाने प्रगट होतो; पण एकीकडे ती कृष्ण विरहाने वेडी झालेली प्रेमिका आहे. विरहाने ती दुर्बळ झाली आहे व ती इतकी कृश झाली आहे की, तिच्या बोटातील अंगठी तिच्या हाताचे कंकण म्हणून बरोबर बसेल,

इतकी तिची विरहव्यथा तीव्र आहे. विरहिणीच्या तीव्र वेदनांचे व व्यथेचे वर्णनही तिच्या पदांतून मूर्तिमंत झाले आहे. कृष्णामध्ये विलीन होण्यासाठी ती किती आतुर झाली आहे तेही तिच्या पदातून स्पष्ट होते.

तिची पदे फार उच्च कोटीची आहेत. तिच्या पदातील प्रेमभक्ती व काव्य-गुणही इतकी प्रभावी आहेत की, ऐकणाऱ्याच्या हृदयावर त्याचा खोल ठसा उमटल्याशिवाय राहणार नाही व गुजरात त्या पदांना कायम जतन करून ठेवील. उदाहरणार्थ तिच्या काही पदांच्या पहिल्या ओळी पाहा—

" हे प्रिया, मी तुझ्या मुखाच्या दर्शनाने मोहून गेले आहे."[३]

" हे राणा, मला एक खेळणे खेळायला मिळाले आहे. ते खेळणे म्हणजे 'माझा राम."[४]

" राणाजी, आम्ही जाणून बुजून हे विषाचे प्याले प्यायलो आहोत."[५]

" मंदिर अगदी जीर्ण झाले आहे आणि त्यातील 'हंस'[६] अजून अगदी लहान आहे. "[७]

" प्रिया, आज तरी मला दर्शन दे. "[८]

ही सर्व पदे चिर-स्मरणीय आहेत. तिच्या सर्व पदांचा विषय मात्र एकच आहे. तो म्हणजे 'प्रेम' व त्या प्रेमाचे दोनच पैलू आहेत— कृष्णाशी मीलन व त्याचा वियोग; पण त्यातही विविध मनोवृत्ति व भावनांचा अविष्कार झालेला आपणास दिसून येतो.

मीराबाईची कृष्णाला भेटण्याविषयीची तळमळ, त्या तळमळीची तीव्रता, तिची अस्वस्थता, कृष्णप्रेमासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याचा तिचा निश्चय, श्रीकृष्णाला केलेले सर्वस्वाचे संपूर्ण समर्पण, आपल्या प्रियतमाच्या दर्शनाने किंवा त्याच्या पावलाचा नुसता आवाज ऐकून तिला झालेला अत्युत्कट आनंद, ह्या सर्व भावना तिच्या कवितात प्रगट झाल्या आहेत व त्या सर्व मध्ययुगीन गुजराती काव्यात अतुलनीय आहेत

## नरसिंह व मीराबाई (एक तुलनात्मक दृष्टिक्षेप)

गुजराती काव्याचे दोन अमर कवि म्हणजे नरसिंह मेहता व मीराबाई ह्या दोघात बरेच साम्य आहे. दोघे प्रथम पहिल्या प्रतीचे भक्त व नंतर कवि आहेत. दोघांनाही आपल्या अढळ भक्तिमुळे आपल्या नातेवाईकांकडून अत्यंत त्रास व छळ सहन करावा लागला त्यांचे नातेवाईक सांसारिक ऐहिक सुखात गढून गेलेले होते व त्यांच्या दृष्टीने काहीही करून ऐहिक सुखे प्राप्त करून घेणे हे महत्त्वाचे होते.

नरसिंह मेहता व मीराबाई ह्या दोघांना दैवी चमत्कारांचा अनुभव आला होता, असे ते म्हणतात. तसेच दोघांनाही भावी पिढीने जो मान व मोठेपणा दिला तो त्यांच्या समकालीनांकडून त्यांना मिळाला नाही.

दोघांचीही कविता अंत:प्रेरणेतून उस्फूर्त झालेली आहे. आपली भक्तीची आसक्ती प्रगट करण्याचा त्यांचा मार्ग कविता हा एकच होता; पण त्यांच्या भक्ती इतकीच त्यांची काव्येही उत्कट व खरीखुरी प्रामाणिक आहेत. त्या दोघांनीही स्वत:शी कधीच प्रतारणा केली नाही, व ज्यावर त्यांचा विश्वास नव्हता असे काहीही कधीही दुसऱ्यांना सांगितले नाही.

मीराबाईपेक्षा नरसिंहाची काव्यसंपदा विपुल आहे. दोघांच्याही काव्यांना कृष्णभक्तीपासूनच स्फूर्ती मिळालेली आहे. पण मीराबाईच्या काव्यापेक्षा नरसिंहाच्या काव्यात विषयांची व कथानकांची विविधता जास्त दिसते. तरी सुद्धा केव्हा-केव्हा मीराबाईची कविता नरसिंहाच्या कवितेपेक्षा श्रेष्ठ वाटते कारण मीराबाईचे हृदय हे एका गोपीचेच खरोखर निखालस असे हृदय आहे.

मीराबाईच्या काव्यावरून असे दिसून येते की, तिचे कृष्णाशी असलेले नाते हे एका अगदी निकटच्या आप्ताशी असावे तसे आहे; पण नरसिंह व श्रीकृष्ण ह्याचा अन्योन्य संबंध मात्र भक्त भगवान असाच राहिला आहे. मीराबाईच्या काव्यात जे शब्दांचे लालित्य, भावनांची कोमलता, अभिजात रुचि दिसून येते तितक्या प्रतीची नरसिंहांच्या काव्यात दिसून येत नाही. मीराबाईच्या काव्यात प्रेमाची आर्तता स्त्रीसुलभ भावनेमुळे ज्या स्वाभाविकपणे व सहजतेने प्रगट झालेली आहे त्याचा नरसिंहाच्या काव्यात अभाव दिसून येतो.

[ २ ]

सोळाव्या शतकात एक मीराबाई सोडली; तर दुसरे कोणतेही मोठे कवि किंवा कुठलीही श्रेष्ठ काव्यरचना आढळत नाहीत; पण अखो, प्रेमानंद व शामळ ह्या तीन मध्ययुगीन अमर कवींसाठी पार्श्वभूमि तयार करणारे काही लहान मोठे कवि मात्र होऊन गेले. ह्यापैकी मांडण बंधारो (इ. १४८०) ह्यांच्यात जगाकडे पाहण्याची सूक्ष्म अवलोकन शक्ती होती व सांसारिक रीतिभातींचा अनुभव होता. त्याचे 'रामायण' हे काव्य व 'रुक्मांगद कथा' हे आख्यानही सामान्य गुणवत्तेची काव्ये आहेत. त्याच्या 'प्रबोध-बत्रिशी' ह्या काव्यात चौपाई छंदातील (प्रत्येक ६ ओळींचा) २०-२० 'छप्पे' असलेले असे ३२ भाग आहेत. हे एक उपदेशपर काव्य आहे. माणसांचे अज्ञान, धर्मातील दंभ वगैरे दुर्गुणांवर त्याने कठोरपणे प्रहार केले आहेत. म्हणी व चटकदार व्याजोक्तींचा उपयोग त्याने ह्यासाठी केला आहे व लोकांना शहाणपणाचा व सुविचाराचा मार्ग अनुसरण्यास सांगितले आहे

उदाहरणार्थ " मूर्ख माणसाला तुम्ही जवळ बोलावलेत; तर तो दूर निघून जाईल तुम्ही त्याला थांबविलेत तर तो रागावेल. कुत्र्याची शेपटी सहा महिने मातीत पुरून ठेवा तरी ती सरळ होणार नाही. मूर्खाला उपदेश करा तो आरडाओरडा करील. गंजलेले लोखंड (सुरी) कधीही तीक्ष्ण होणार नाही."[५]

मांडण जरी साधारण प्रतीचा कवि होता तरी नवल हे आहे की, त्याने आपल्या मागून शंभर वर्षांनी झालेल्या अखो ह्या मध्ययुगातील प्रख्यात कवीला फार प्रभावित केले आहे.

## नाकर [ इ. स. १५०० ते १५७५ ]

हा बडोद्याचा रहिवाशी होता व जातीने वाणी होता. त्याने पौराणिक प्रसंगांवर अनेक आख्याने रचली आहेत. त्यापैकी ' शिव विवाह ', ' लवकुशाख्यान ', ' विराट पर्व ', ' नलाख्यान ', ' ओखाहरण ' ही नमूद करण्यासारखी आहेत.

नाकरने रामायण व महाभारत ह्यातील कित्येक अध्यायांचेही गुजरातीत रूपांतर केले आहे. भालण हा कवि मूळ संस्कृतात फार फेरफार करीत नसे, पण नाकरने मूळ संस्कृत कथात खूप फेरफार केले आहेत. आपल्या पदरचे असे त्यात खूप घातले आहे. आपल्या काळातील समाजाचे प्रतिबिंब त्याने त्यात दाखविले आहे आणि अशा रीतीने आपल्या वाचकांना त्याने मुग्ध करून टाकले आहे. ह्या बाबतीत तो प्रेमानंदाचा पूर्वगामी असून भालण व प्रेमानंद यामधील एक दुवाच आहे.

नाकर ब्राह्मण नसल्याने त्याला आपली आख्याने माणभट्टा[५A] प्रमाणे जाहीर रीतीने म्हणण्याचा अधिकार नव्हता; म्हणून ती आख्याने आपल्या ब्राह्मण मित्रांना देऊन तो त्यांच्याकडून लोकांपुढे म्हणवून घेत असे व त्यावर ते ब्राह्मण मित्र आपली उपजीविका चालवीत असत.

## केशव हृदेराम

हा कवीसुद्धा ब्राह्मण नव्हता. त्याचा जन्म 'पाटण' येथे झाला. त्याने इ. १५३६ मध्ये ' कृष्ण क्रीडा ' नावाचे काव्य रचले. त्याचे ४० अध्याय आहेत व त्यात ७००० ओळी आहेत. हे काव्य भागवताच्या दशमस्कंधावर आधारित आहे. ते प्रासादिक व सरळ सुलभ शैलीत लिहिलेले आहे. त्याचा १३ वा अध्याय सर्वच्या सर्व शार्दूलविक्रीडित वृत्तात आहे. ह्या वृत्ताचा उपयोग संस्कृत महाकाव्यातून करण्यात येत असे. ह्या रचनेत मधून मधून व्रजभाषेतील पदे घातली आहेत. त्याचप्रमाणे संस्कृतमध्ये लिहिलेले १०० श्लोक त्यात आहेत. त्यापैकी १५ कवीने स्वत: रचलेले आहेत.

## विष्णुदास [ इ. स. १५६४ ते १६३२ ]

ह्याचा जन्म 'खंबायत' येथे झाला. त्याने अनेक आख्याने लिहिली, त्यातील लक्ष्मणाहरण', 'शुकदेवाख्यान', 'चंद्रहासाख्यान', 'सुधन्वाख्यान' ही विशेष उल्लेखनीय आहेत. विष्णुदासाने महाभारताच्या व रामायणाच्या अनेक अध्यायांचे भाषांतरही केले आहे. त्याने 'मोसाळुं' व 'हुंडी' ही आख्याने लिहिली. ह्या आख्यानांचा विशेष हा आहे की आतापर्यंत गुजराती भाषेत एकाद्या देवाच्या किंवा दैवी शक्ती असलेल्या व्यक्तीच्या चरित्रातील एकाद्या प्रसंगाचे काव्यात वर्णन केलेले असे; पण ही दोन आख्याने एका सामान्य माणसाच्या–एका भक्ताच्या–नरसिंह मेह्ताच्या जीवनातील प्रसंगावर रचलेली आहेत. प्रेमानंदाने ह्या दोन आख्यानातून व 'लक्ष्मणाहरण' व 'सुदामा चरित्रातून' बरीच उसनवारी केलेली आहे.

'माधवानल कमलकन्दला दोग्धक' हे गणपतिरचित पद्यावर्त आहे. म्हणजे ह्यात दोन-दोन पंक्तींच्या अनुप्रासात्मक द्विपद्यांच्या २५०० पंक्ति आहेत. ह्याचे आठ भाग आहेत. माधवानल हा नायक कमलकन्दला ही नायिका ह्यांच्या प्रेमाची कथा ह्यात वर्णिली आहे. कमलकन्दला ही एक सुसंस्कृत गणिका आहे. ह्या दोघांचा वियोग होतो. ह्या प्रकारच्या इतर काव्यांपेक्षा ह्या काव्याचा विशेष हा आहे की ह्यात नायकाच्या विरहदुःखाचे हृदयस्पर्शी वर्णन केले आहे. शृंगार हा ह्या काव्यातील मुख्य रस असल्याने काव्याच्या सुरुवातीला कवीने कामदेवाला वंदन-आवाहन केले आहे.

गणपतीच्या ह्या काव्यात, तसेच कुशललाभ वाचक ह्या कवीने लिहिलेल्या वरील विषयावरील 'माधवानल कामकुंडला रास' ह्या काव्यात आपल्याला त्यानंतर १०० वर्षांनी झालेल्या शामल कवीची अगोदरच चाहूल लागते.

कुशल लाभाने 'मारू ढोला चुपाई' (इ. १५६१) हे आणखी एक प्रेम-काव्य लिहिले आहे. ह्या काव्याचा नायक ढोला अथवा साल्हकुमार ह्याचे बालपणी मारवाडमधील मारुवनी अथवा मारू[१०] हिच्याशी लग्न होते; पण त्याला ह्या लग्नाची आठवणही रहात नाही व तो मोठा झाल्यावर 'मालवा'ची राजकन्या मालवानी हिच्याशी लग्न करतो.

ढोला आपल्याला बोलावील म्हणून मारू वाट पहात असते. तिला त्याच्या मालवानीशी झालेल्या लग्नाची बातमी समजते; पण ढोलाचा विरह सहन न होऊन ती त्याला 'कर्ल्यु' पक्ष्यामार्फत व दुसऱ्या अनेक दूतांबरोबर संदेश पाठवते; पण मालवानीच्या कारस्थानामुळे ढोलाला एकही संदेश पोहोचत नाही. शेवटी भ्रमण करीत आलेल्या काही भाटांकडून ढोलाला मारूचा संदेश मिळतो. मालवानीच्या विरोधाला व दुःखाला न जुमानता तो मारूकडे जातो. त्याच्या मार्गात अनेक

विघ्ने येतात. ती पार करून तो मारूला घरी घेऊन येतो. मग मारू व मालवानी दोघी सख्ख्या बहिणींप्रमाणे राहून त्याला सुखी करतात.

ह्या काव्यात मारूच्या विरहव्यथेचे व मालवानीच्या ढोलावरच्या प्रगाढ प्रेमाचे फार सुंदर वर्णन केले आहे.

' रसमंजरी ' (इ. १५७९) हे काव्य वच्छराजाने एका लोककथेच्या आधारे लिहिले आहे. प्रेमराज हा ह्या कथेचा नायक. तो जेव्हा प्रवासास निघतो तेव्हा त्याची पत्नी प्रेमवती त्याला परत येताना ' स्त्री चरित्र ' ( स्त्रियांच्या प्रणयातील कारस्थानाच्या चतुर कथा) आणावयास सांगते.

प्रेमराज एका शहरात जातो. तेथे त्याला रसमंजरी नावाची सुंदर युवती भेटते. ती धनाशेठ नावाच्या एका मोठ्या व्यापाऱ्याची पुत्रवधू असते. रसमंजरीचा नवरा प्रवासास गेलेला असतो. एका चतुर गणिकेच्या साहाय्याने प्रेमराज स्त्री-वेषात रसमंजरीच्या महालात राहावयास जातो. रसमंजरीला काही दिवसांनी तो पुरुष असल्याचे कळते व ती त्याच्या प्रेमात पडते. ती त्याला प्रेमशास्त्रातील स्त्रियांचे चातुर्य कसे असते ते शिकविते. नंतर ती आपल्या पतीचा वध करविते व सासऱ्याला फसवून प्रेमराजाबरोबर निघून जाते.

आपणास शामळचे काव्य वाचताना या कथेची आठवण होते. खरे म्हणजे ही एकच सलग कथा नसून अनेक कथांचा संग्रह आहे आणि त्यामध्ये स्त्रीचे अंग-भूत व्यावहारिक चातुर्य चित्रित केलेले आहे.

## तळटिपा

१. राहिलेली इतर तीन स्थाने (धामे) : उत्तरेकडे बद्रिनाथ, पूर्वेकडे जगन्नाथ-पुरी व दक्षिणेकडे रामेश्वर ही आहेत.
२. बाई मीरां के प्रभु गिरधर नागर.
३. मुखडानी माया लागी रे.
४. रामरमकडुं जडियुं रे राणा.
५. झेर तो पीधां छे जाणी जाणी, राणाजी !
६. 'हंस'– येथे त्याचा अर्थ 'आत्मा' असा आहे.
७. जूनुं तो थयुं रे देवळ जूनुं तो थयुं,
मारो हंसलो नानो रे देवळ जूनुं तो थयुं.

८. प्यारे दरसन दीज्यो आज.

९. आणीतां आघेरु जाय, वारीतां वांकेरु थाय.
" स्वान पूंछ नली खट मास, तुहि न छंडई वंक अभ्यास "
शीख देअन्ता साहमुं भडई, मुलि लोहिन पोगर चडइ.

९–A. घागरीवर ताल धरून आख्याने सांगणारा भट्ट. परिशिष्ट 'फ' पहा.

१०. त्यावेळी असा रिवाज होता की राजदरबारात निरनिराळ्या राण्यांचा उल्लेख त्यांच्या पित्यांच्या-कुटुंबाच्या नावाप्रमाणे करण्यात येत असे. (उदाहरणार्थ, 'जाडेजी राणी,' 'हाडी राणी' वगैरे) अथवा राण्या ज्या प्रदेशातून किंवा गावाहून आलेल्या असत त्या प्रदेशाच्या नावावरून त्यांचा उल्लेख करण्यात येई. (उदाहरणार्थ 'मारुवानी', 'रोहा–वाळां बा' वगैरे)

प्रकरण पाचवे

# सतरावे शतक

[ १ ]

इ. स. १५७३ ते १७५३ पर्यंत गुजरातवर मोगल सुभेदारांची सत्ता होती; पण दिल्लीची मोगल सत्ता जसजशी दुर्बळ होत गेली तसतशी गुजरातमध्ये राजकीय अस्थिरता, अंदाधुंदी माजत गेली. तशात अवर्षणे, दुष्काळ, अन्नधान्याची टंचाई व महागाई वगैरे गोष्टींमुळे गुजरातेत अशांतता पसरली आणि त्यामुळे अहमदाबादेत जाळपोळ, बंडखोरी, लुटालूट ह्या दररोजच्या बाबी होऊन बसल्या. अकबराच्या कारकीर्दीत सौराष्ट्रात ध्रोळजवळ भूचरमोरी येथे भीषण लढाई झाली. अकबराच्या निधनानंतर ब्रिटिशांनी पोर्तुगीजांचा पराभव केला व सुरत, घोघा, अहमदाबाद व खंबायतमध्ये आपल्या कोठ्या स्थापन केल्या. इ. स. १६०९ मध्ये मलिकंबरने सुरत लुटली. नंतर औरंगजेबाच्या कारकीर्दीत जामनगर व चुनवल येथे बंडे झाली. शिवाजीने दोनवेळा हल्ले करून सुरत लुटली. औरंगजेब हयात असतानाच मराठ्यांचे वर्चस्व वाढत चालले. त्यांची लोभी दृष्टी गुजरातवर पडली व त्यांचे हल्ले चालूच राहिले. इ.स. १७०५ मध्ये व नंतर इ.स. १७०७ साली पुन्हा मराठ्यांनी सुरत शहर लुटले. त्या आधी इ. स. १७०२ मध्ये त्यांनी सुरतमध्ये करवसुली सुरू केलीच होती. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर तर गुजरातेत संपूर्ण अंदाधुंदी व राजकीय अस्वस्थता माजली. हा काळ मराठ्यांना फार सोईचा व अनुकूल असा वाटला व त्यांनी गुजरात-वर हल्ले करण्यास सुरुवात केली. शाहू छत्रपतींनी इ. स. १७०२ साली बादशाह महंमदशाहकडून गुजरातेतून चौथाई वसूल करण्याची सनद मागून घेतली आणि इ. स. १७३२ मध्ये दमाजीराव गायकवाडांनी गुजरातेत गायकवाडी सत्ता स्थापित केली. पुण्यात पेशवाईची सत्ता जशी दुबळी होत गेली तसे गुजरात व सौराष्ट्र येथील मराठे सरदार स्वतंत्र झाले व इ. स. १७५३ मध्ये त्यांनी आपले स्थान तेथे स्थिर केले.

पण ह्याच काळात गुजरातमध्ये ब्रिटिशांची सत्ताही वाढत चालली. ते फक्त व्यापारधंद्याकडेच लक्ष देऊन स्वस्थ बसले नाहीत; तर आपल्या बळाच्या

जोरावर एका ठिकाणच्या मराठी सत्तेला दुसऱ्या मराठी सत्तेशी लढाईत गुंतवीत राहून त्यांनी गुजरातमध्ये बरीच ठाणी काबीज केली आणि इ. स. १८०५ मध्ये त्यांनी मराठ्यांकडून सुरतेत चौथाई वसूल करण्याचा हक्क मिळवला.

सौराष्ट्राच्या (त्यावेळी त्याला काठियावाड असे म्हणत) लोकांचे मराठ्यांच्या हल्ल्यापासून रक्षण करण्यासाठी इ. स. १८०७ मध्ये कर्नल वॉकर काठियावाडच्या राजेरजवाड्यांना भेटला व ब्रिटिशांनी त्यांना देण्यात येणाऱ्या संरक्षणाच्या बदल्यात त्यांच्याशी खंडणी घेण्याचा करार करून घेतला. इ. स. १८१८ मध्ये पेशवाईचा अंत झाल्यावर गुजरातमध्ये ब्रिटिशांची सार्वभौम सत्ता स्थापन झाली.

[ २ ]

## अखो [ इ. स. १५९१ ते १६५६ ]

मध्ययुगीन गुजराती साहित्यात 'अखो' या कवीला एक स्वतंत्र मानाचे स्थान आहे. वेदान्ती तत्त्वज्ञान व ईश्वरीय अनुभव ह्यातून त्याने फार सुंदर काव्य-रत्ने पैदा केली आहेत. त्याला काव्यापेक्षा ज्ञानाची जास्त अभिलाषा होती.

त्याचे विषयी जी खरीखुरी माहिती मिळते त्यावरून त्याचा जन्म जेतलपूरला झाला असे दिसते. तेथून तो अहमदाबादला गेला व तेथेच स्थाईक झाला. जातीने तो सोनार होता. सांसारिक संबंध व पैसा-अडका ह्या बाबतच्या विफलतेने व्यथित होऊन त्याने अहमदाबाद सोडले व आपणास आत्मज्ञान देईल अशा गुरुच्या शोधार्थ तो बाहेर पडला. तो गोकुळ, श्रीनाथजी व काशी ह्या प्रसिद्ध यात्रेच्या क्षेत्रात गेला; पण तेथून निराश होऊन परतला.

वयाच्या अदमासे ५० व्या वर्षापासून त्याने लिहिण्यास प्रारंभ केला व १५–१६ वर्षे त्याचे लेखन चालू राहिले. त्याची ग्रंथसंपदा पुढीलप्रमाणे आहे – 'पंचीकरण', 'गुरुशिष्य संवाद', 'चित्तविचार संवाद', 'ब्रह्मलीला', (हिंदीत), 'कैवल्यगीता', 'अनुभव-बिंदु', 'अखेगीता' आणि '७४६ छप्पे' ह्याशिवाय त्याच्या नावावर 'परमपदप्राप्ति', 'पंचदशी', 'अखाजीना कक्का' इ. ग्रंथ आहेत; पण त्यांचा खरा कर्ता कोण ह्याबद्दल विवाद आहे.

अखो याने आपला पूर्वगामी कवि 'मंडन' ह्याच्यापासून बऱ्याच गोष्टी घेतल्या आहेत. तत्त्वज्ञानातून काव्यनिर्मिती करणे, चौपाई छंदात ६–६ पंक्तींचे 'छप्पे' बनविणे, अर्थवाही वाक्संप्रदाय व म्हणी वापरून आपले म्हणणे स्पष्ट करणे, स्वार्थी व भोंदू गुरुंची बिंगे बाहेर पाडणे, सामाजिक व धार्मिक ढोंगावर प्रहार करणे, ह्या गोष्टींचे अनुकरण तर त्याने केलेच आहे; पण त्याने मंडनच्या काही ओळी तर जशाच्या तशा घेतल्या आहेत व काही थोडे फार फरक करून घेतल्या आहेत.

**१) पंचीकरण–**

हे अखो याच्या साहित्य निर्मितीतील पहिले काव्य. १०२ श्लोकात अखोने सांख्य तत्त्वज्ञानाच्या प्रणालिकेप्रमाणे विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय ह्यांचे वर्णन केले आहे. ह्यात श्रेष्ठ काव्यगुण नाहीत; पण ह्यातील सुगम व सहज प्रतिपादनशैली वाखाणण्याजोगी आहे. ह्यात कवीने जटिल तत्त्वज्ञानपर विषयाचे सुंदर विवरण केले आहे.

**२) गुरु-शिष्य संवाद–**

ह्या ग्रंथात 'अखो'ने शिष्यास असा उपदेश केला आहे की, त्याने (शिष्याने) गुरुची जातपात, सामाजिक दर्जा ह्याविषयी विचार करू नये. ह्यात त्याने खऱ्या गुरुची लक्षणेही सांगितली आहेत आणि सरतेशेवटी शिष्याला स्वतःच आपला गुरु होण्याचे ध्येय ठेवण्यास शिकविले आहे.

**३) चित्र–विचार संवाद–**

ह्यात अखोने ठासून सांगितले आहे की, प्रत्येकाच्या हृदयात वसत असलेला प्रभु गोविंद हाच खरा एकमेव गुरु आहे. ह्यात त्याने जीव व शिव ह्यांच्या परस्पर संबंधाचे विवेचनही केले आहे. काव्यगुणांच्या दृष्टीने हे काव्य वरच्या दोन्ही काव्यांपेक्षा अधिक सरस आहे.

**४) अनुभव बिंदु–**

ही लहानशी पण सुंदर कविता आहे. ह्यात ४० श्लोक आहेत. ह्यात अखोने मायेच्या स्वरूपाचे वर्णन केले आहे आणि जीव व ब्रह्म ह्यांच्यातील अद्वैततत्त्वावर भर दिला आहे. जीव, जगत् व ब्रह्म (अन्तिम सत्य) ह्यांच्या एकमेकांशी असलेल्या संबंधाचे स्वतःच्या अनुभवावरून वर्णन केले आहे. ही सर्व कविता एखाद्या निर्झराच्या पाण्याप्रमाणे निर्मल व प्रसादपूर्ण आहे.

**५) अखे गीता–**

ही 'अखो' याची श्रेष्ठतम रचना आहे. खोल व गंभीर चिंतन करून आपल्या जीवनातील अनुभवांचे सारसर्वस्व अखोने ह्यात वर्णिले आहे. सरळ, प्रासादिक व स्पष्ट भाषेत कवीने ह्या ग्रंथात चित्तशक्ति, मायाशक्ति व प्रकृतिशक्ति ह्यांचे खरे स्वरूप आणि ज्ञान, भक्ति व वैराग्य ह्यांचा महिमा व वैभव वर्णिले आहे. तसेच जीव, ईश्वर व कैवल्य (ब्रह्म) ह्यांच्या अद्वैताचे वर्णन केले आहे. मायेला काचेचे घर संबोधून अखो म्हणतो की, 'ही तीन वस्तुतः एकच आहेत; पण मायेमुळे ती तत्त्वे निरनिराळी भासतात. (इंग्लिश कवि शेलीने 'आयुष्य हे विविधरंगी काचेचा घुमट [ dome ] आहे' असे म्हटले आहे त्याचीच येथे आठवण होते).

एका दृष्टीने पाहता 'अखो' याने आपल्या पूर्वीच्या काव्यातून जे जे काही सांगितले आहे त्याचेच पुनरावर्तन 'अखेगीता' यात सुंदर व मुद्देसूद रीतीने केले

आहे. आपल्या ह्या आध्यात्मिक यात्रेच्या शेवटी सिद्धीच्या प्राप्तीने आनंदित झालेला 'अखो'चा आत्मा उद्गारतो, 'अहाहा ! आजपर्यंत माझ्या इंद्रियांना अगम्य असे जे काही होते त्या 'काही'चा म्हणजे सत्याचा साक्षात्कार झाल्याने मला केवढा आनंद झाला आहे."[१]

'छप्पे' प्रमाणेच 'मुक्तके' (स्फुट श्लोक) लिहिणेही 'अखो'ची विशेषता आहे. तो आयुष्यभर 'छप्पे' रचत होता. 'अखो'ने ७४६ छप्पे लिहिले व विषयाप्रमाणे त्याचे निरनिराळे ४५ भाग (अंगे) केले. एकेक छप्पा ६–६ ओळींचा असून चौपाई छंदात लिहिलेला आहे. ह्या सुटसुटीत, चटकदार व झोंबणाऱ्या छप्प्यामार्फत अखोने ईश्वराचे प्रेषित व लाडके भक्त अन् साधु म्हणून मिरवणाऱ्या लोकांचा ढोंगीपणा, दंभ व द्वेषबुद्धी ह्यावर आणि तत्कालीन समाजाच्या खोटेपणावर कठोर प्रहार केले आहेत. त्याच्या सूक्ष्म दृष्टीला प्रत्येक गोष्ट स्पष्ट दिसते. त्याची शब्दांची योजना अचूक व अर्थ स्पष्ट करणारी आहे आणि अशा प्रभावी शब्दांद्वारे त्याने त्या वेळच्या समाजातील व धर्मातील दूषणे उघड करून दाखविली आहेत. भाषा हे 'अखो'च्या हातातील सहज वापरता येणारे असे प्रभावी शस्त्र होते. 'अखो'ला जे काही सांगावयाचे असते ते तो स्पष्टपणे व निःसंदिग्धपणे सांगतो. तो त्यावेळी भाषेचीही पर्वा करत नाही. तो रोजच्या व्यवहारातील शब्द, म्हणी, वाक्प्रचार व दृष्टान्त यांचा उपयोग करून आपले म्हणणे स्पष्टपणे मांडतो. ह्याचमुळे अखोची गुजराती भाषेतील शेकडो वचने सर्वतोमुखी झाली आहेत.

'नरहरी' हा 'अखो'चा समकालीन (इ. स. १६२१ साली हयात होता) त्याने भगवद्गीतेचे पहिल्यानेच गुजरातीत भाषांतर केले आहे.[२] 'विश्वनाथ जानी', याने दुसऱ्या इतर रचनाबरोबरच 'मोसाळचरित्र' हे काव्य लिहिले व त्यावरूनच बहुत करून प्रेमानन्दास आपले अमर काव्य 'कुंवरबाईनुं मामेरु' हे लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी. ह्या काव्यात नरसिंह मेहताची मुलगी कुंवरबाईच्या 'सीमन्त' समारंभाची कथा वर्णिली आहे. ह्याशिवाय विश्वनाथाने 'प्रेम पच्चिशी'ही लिहिली. ही कविता भागवतातील एका प्रसंगावरून केली आहे. ह्यात कृष्णाच्या वियोगाने अत्यंत व्यथित झालेल्या गोपीकडे उद्धव श्रीकृष्णाचा संदेश घेऊन येतो तो प्रसंग वर्णिला आहे. हे काव्य अत्यंत हृदयस्पर्शी आहे. नरसिंह मेहताच्या 'हारमाळेत' आढळणारी काही पदे विश्वनाथाची आहेत असा अभ्यासकांचा समज आहे.

## शिवानंद [ इ. स. १६०० ते १६४४ ]

ह्याने केलेल्या भक्तिपूर्ण आरत्याबद्दल हा प्रसिद्ध आहे. ह्या आरत्या देवाच्या मूर्तिपुढे नीरांजन ओवाळून घंटा, शंख इतर वाद्यांच्या नादाबरोबर समूहाने म्हणावयाच्या असतात. शिवानंदाने देवाच्या दिनचर्येतील एकूणएक प्रसंगावर

आरत्या रचल्या आहेत. उदाहरणार्थ–देवाचे स्नान, वस्त्रे, भोजन, भोगशृंगार वगैरे. हरि व हर-विष्णु व शिव ह्यात सांप्रदायिक भक्त भेद करीत असत त्याचा निषेध करून हे दोघे मूलत: एकच आहेत असे त्याने प्रतिपादिले आहे.

तो म्हणतो, 'हरि व हर' हे एकच आहेत. त्यांना एकमेकापासून भिन्न मानू नका. तुम्ही भोळ्या भूधराचे स्मरण केल्यास भवसागर तरून जाल.[३]

शिवानन्दाने श्रीकृष्ण, शिव व शक्तिमातेच्या आरत्या रचल्या आहेत. त्या आरत्या आजही गायल्या जातात. शिवानंदाच्या काही कविता हिंदी किंवा व्रजभाषेत लिहिलेल्या आहेत.

## महाकवि प्रेमानंद [इ. स. १६३६ ते १७३४]

प्रेमानंदाने आपल्या विविध आख्यानांनी आख्यान हा काव्यप्रकार उच्च-कोटीस पोहोचविला. प्रेमानंदाच्या आख्यानात तरुण व वृद्ध, निरनिराळ्या संस्कृतीचे स्त्री-पुरुष ह्यांची व्यक्तिचित्रे आहेत आणि त्याने आपल्या अनुपम निवेदनशैलीने त्यांच्या जीवनातील निरनिराळ्या प्रसंगांचे व परिस्थितीचे सुंदर वर्णन केले आहे. हे प्रसंग विविधतेने भरलेले आहेत. ते विनोदी तसेच करुण रसांचे आहेत; पण केव्हा केव्हा ओबड-धोबडही आहेत. मध्ययुगीन कवींमध्ये वास्तवलक्षी म्हणजेच वस्तुनिष्ठ कवि म्हणून त्याचे स्थान सर्वश्रेष्ठ आहे.

प्रेमानंदाचे जीवन व निर्मिती ह्याबद्दल अनेक दन्तकथा प्रचलित आहेत. त्याच्या नावावर असलेली अनेक आख्याने त्याचीच आहेत किंवा काय ह्याविषयी वाद आहे. ह्या ठिकाणी ह्या गोष्टींचा विस्तारपूर्वक विचार करणे शक्य नाही; म्हणून येथे निर्विवाद अशा गोष्टींबद्दल लिहिणेच योग्य आहे.

ह्याप्रमाणे पाहता प्रेमानंदाचा काळ निश्चितपणे इ. १६३६ ते १७३४ हा होता. त्याच्या लेखनकलेची सुरुवात अदमासे १६७६ मध्ये झाली व त्याचे लेखन १८ व्या शतकाच्या पूर्वार्धात चालू होते. त्याच्या लहानपणीच त्याचे आई-बाप वारले व तो अनाथ झाला. त्याच्या वडिलांचे नाव कृष्णराम भट्ट व त्याच्या गुरुचे नाव रामचरण असे होते. प्रेमानंद बडोद्याचा रहिवाशी होता व त्याने कीर्तन-काराचा पेशा पत्करला होता. बडोदा व त्याच्या आसपास त्या सुमारास भयंकर दुष्काळ पडल्याने तो काही काळ उदरनिर्वाहासाठी सुरतेस जाऊन राहिला. त्यानंतर काही काळ तो नंदुरबारच्या राजाच्या आश्रयाखाली नंदुरबारला राहिला. तो कथाकार म्हणून फार लोकप्रिय झाला व त्याने अमाप पैसाही मिळवला.

प्रेमानंदाच्या आयुष्याच्या पहिल्या पाच भागात गुजरातेत एकंदरीत स्थिरता व शांतता होती; पण मराठ्यांचे हल्ले, दुष्काळ, अन्नधान्याची टंचाई आणि अन्न-धान्य व रोजच्या जीवनोपयोगी वस्तूंच्या अफाट किंमती ह्यामुळे १६६४ पासून

ही परिस्थिती पार बदलली आणि प्रेमानंदाच्या आयुष्याचा बराचसा भाग अंदाधुंदी व अव्यवस्था ह्यांच्या वातावरणातच गेला.

पण लोकांच्या दैववादी वृत्तीमुळे[४] जसा काळ येईल तसे त्याला शांतपण तोंड देणे हे त्यांना सहज करता येत होते व त्यामुळे राजकीय अस्थिरतेचा फारसा परिणाम लेखकांच्यावरही झाला नाही. प्रेमानंदही स्थितप्रज्ञतेने आपले लेखनकार्य करीत होता.

प्रेमानंदाच्या साहित्यकृतींची संख्या फारच मोठी आहे. त्याने रामायण, महाभारत व भागवत यातल्या कथानकांवरून आपली आख्याने लिहिली आहेत. तसेच त्याने नरसी मेहताच्या जीवनातील चमत्कारपूर्ण प्रसंगांवरही आख्याने रचली आहेत. त्याच्या नावावर असलेल्या वादपूर्ण कृती वगळता त्याने आपल्या ४५ वर्षांच्या लेखनकालात ४० आख्याने तरी निश्चितच लिहिली आहेत.

प्रेमानंदाची बरीच आख्याने धार्मिक ग्रंथच म्हणून मानली जातात. ती विशिष्ट धार्मिक व सामाजिक उत्सव-समारंभात वाचली जात असत. उदाहरणार्थ, त्याचे 'ओखाहरण' चैत्र व वैशाख ह्या महिन्यात, 'दशमस्कंध' चातुर्मासात, 'मामेरुं' 'सीमन्त'प्रसंगी (ओटीभरण प्रसंगी) 'नरसी मेहताना बापनुं श्राद्ध'[५] श्राद्धाच्या वेळी, दर शनिवारी 'सुदामा चरित्र', 'हुंडी' दर रविवारी व 'देवीचरित्र' नवरात्रात[६] अशी त्याची काव्ये गुजरातच्या बऱ्याच घरात श्रद्धापूर्वक व निष्ठापूर्वक वाचली व म्हटली जात असत. त्याची विशिष्ट आख्याने विशिष्ट प्रसंगी गायली जाण्याची प्रथा प्रेमानंदाच्या मृत्यूनंतरही १०० वर्षे चालू होती.

जगातील अनेक श्रेष्ठ साहित्यिकांप्रमाणे प्रेमानंदाने आपल्या पूर्वगामी लेखकांच्या ग्रंथातून निःशंकपणे उसनवारी केलेली आढळते. ह्यामध्ये मुख्यत्वे 'नाकर', 'विष्णुदास' व 'विश्वनाथ जानी' हे होते.

ह्या लेखकांनी रचलेल्या अथवा वर्णन केलेल्या प्रसंगांचाच त्याने उपयोग केला आहे एवढेच नाही तर त्याने त्यांच्या काव्यातील काही पंक्ति जश्याच्या तशाच तरी उचलल्या आहेत अथवा त्यात थोडा फार फरक करून लिहिल्या आहेत.

**१) नलाख्यान—**

प्रेमानंदाच्या सर्व आख्यानात 'नलाख्यान' हे सर्वात श्रेष्ठ व सुंदर आख्यान आहे. ही नलराजा व त्याची राणी दयमन्ती ह्यांची कथा आहे. अधर्मी कलीच्या कारवायांनी नलदमयंतीला राज्याचा त्याग करून वनात जावे लागते. वनातून भटकत असताना त्यांची ताटातूट होते. नंतर त्या दोघांवर निरनिराळ्या भयंकर आपत्ति कोसळतात व सरते शेवटी त्यांच्या सत्त्वाची कसोटी झाल्यावर कली त्यांना सोडून जातो. मग त्या दोघांचे सुखद पुनर्मिलन होऊन त्यांना राज्य प्राप्ति होते व

ते पुन्हा सुखी होतात, ह्या नलाख्यानाचा कथाभाग आहे. प्रेमानंदाने महाभारतातील नलोपाख्यावरून हे कथानक घेऊन त्यात नवनवीन प्रसंग कल्पिले आहेत आणि आपल्या अनुपम निरूपणशैलीने व वर्णनशैलीने ते अतिशय रंजक व सुंदर बनविले आहेत.

प्रेमानन्दाने मूळ कथानकात केलेले सर्व बदल जरी उत्कृष्ट आहेत असे म्हणता येणार नसले तरीही 'नलाख्यान' हे एक श्रेष्ठ काव्य आहे ह्यात काही शंका नाही.

प्रेमानंदाने ह्या आख्यानातील काही विनोदी व काही करुण प्रसंग फारच सुंदर रीतीने वर्णिले आहेत. दमयन्तीच्या पहिल्या स्वयंवराच्या[७] वेळी इंद्र, अग्नि, वरुण व यम हे चार देव दमयन्तीशी लग्न करण्याच्या इच्छेने नलराजाचे रूप धारण करतात; पण शेवटी त्यांची कशी फटफजिती होते हा प्रसंग आणि नलराजाचा शोध घेण्यासाठी दमयन्तीचे दुसरे स्वयंवर होते. त्यावेळी दमयन्तीच्या प्राप्तिच्या इच्छेने ऋतुपर्ण राजा येत असता स्वतःच्या अतिशय मोठेपणाच्या कल्पनेने कसा वागतो, त्याचा घमेंडखोरपणा व बडबड कशी हास्यास्पद होते हा प्रसंग ह्या दोन्ही प्रसंगाचे वर्णन करताना विनोद साधण्याची प्रेमानंदाची शैली फारच बहारीची वठली आहे. तसेच नलराजाने त्याग केल्यावर एका घोर अरण्यात रात्रीच्या वेळी एकटी पडलेली दमयन्ती करुण विलाप करताना जेव्हा म्हणते, " हे हरी, तू सत्याचा वाली आहेस; पण मला मात्र कोणाचाच आधार नाही." तेव्हाचा प्रसंग आणि तिच्या मावशीच्या राजमहालात असताना तिच्यावर आलेला हार चोरल्याचा आरोप हे दोन प्रसंग तर करुणरसाने ओथंबलेले आहेत.

नंदुरबारला असताना कवीच्या आश्रयदात्या राजाच्या पत्नीचे निधन झाले. त्याचे सांत्वन करण्यासाठी कवीने हे आख्यान रचले असे म्हणतात.

**२) दशमस्कंध—**

प्रेमानन्दाने दशमस्कंध आपल्या आयुष्याच्या शेवट-शेवटच्या काही वर्षात लिहिला. ५२ अध्यायानंतर प्रेमानंदाच्या मृत्युमुळे तो अपुरा राहिला. तो त्याच्या 'सुंदर मेवाडो' नावाच्या एका शिष्याने पूर्ण केला.

भागवताच्या दशमस्कन्धाचे, विशेषतः त्यातील श्रीकृष्णाच्या बाललीलांचे, व त्याने केलेल्या अनेक खोड्यांचे वर्णन हा अनेक मध्ययुगीन गुजराती कवीच्या आख्यानांचा व पदांचा विषय झालेला आहे.

प्रेमानंदाने भागवताच्या दशमस्कंधाचे केवळ भाषांतर केलेले नाही. त्यात फेरफार करून, काही भाग स्वतःचा घालून व काही वगळून त्याने त्याचे उत्कृष्ट रूपान्तरच केले आहे. ह्यात अत्यंत हळुवारपणे केलेले माता-पित्यांच्या वात्सल्याचे आणि घरगुती कोमल कौटुंबिक भावाचे वर्णन फार रोचक आहे. हे सर्व प्रेमानंदाचे स्वतःचे आहे. तसेच त्याने देवकी व यशोदा ह्या दोघींच्या द्वारे

केलेले कोमल मातृभावाचे वर्णन अतुलनीय आहे. मातृप्रेमातील निरनिराळ्या छटा-स्वामित्व, भीती, अविश्वास, ईर्ष्या ह्यांचे त्यातले दर्शन फारच मनोहारी आहे.

**३) सुदामा चरित्र–**

आपल्या गरीब मित्राचे, सुदामाचे, सोन्याच्या राजप्रासादांमध्ये ऐश्वर्यात राहणाऱ्या श्रीकृष्णाने कसे सत्कारपूर्वक स्वागत केले, त्याला आपला स्वतःचा पाहुणा म्हणून कसे अगत्याने वागविले व सुदामाला स्वतः होऊन काही मागून घेण्याची लाचारी करू न देता, कोणाला काही कळू न देता, स्वतः कशी मदत केली, ह्या सर्व प्रसंगांचे फार सुंदर वर्णन यात केलेले आहे. ह्यात प्रेमानंदाने श्रीकृष्णाच्या खट्याळपणाचे वर्णन फारच सुंदर केले आहे. तसेच कृष्णाने दिलेले वस्त्रालंकार काढून ठेवून सुदामा परत जाताना पुन्हा आपले जुने फाटके कपडे घालतो व हे सर्व श्रीकृष्ण मनातल्या मनात हसत स्वस्थपणाने पाहात असतो, ह्यांचे फारच विनोदपूर्ण वर्णन केलेले आहे.

नरसिंह मेहताच्या 'सुदामा-चरित्रा'त त्यातील ठोकळ प्रसंगच वर्णिलेले आहेत; पण त्या प्रसंगावर रचलेले प्रेमानंदाचे आख्यान मात्र पूर्ण स्वरूपात आपल्याला पहावयास मिळते. ह्यात प्रेमानंदाच्या निरूपण कलेला, व्यक्तिचित्रणाला, विनोदाला व निरनिराळ्या भावनाविष्काराला पूर्ण वाव मिळाला आहे.

**४) कुंवरबाईनुं मामेरुं–**

ही सुद्धा एक श्रेष्ठ साहित्यकृती आहे. ह्यात नरसिंह मेहता आपल्या मुलीच्या 'सीमन्त'प्रसंगी तिला ' मामेरुं ' अथवा ' मोसाळुं '[१] देतो त्याचे वर्णन आहे. ह्यात ज्या प्रसंगाचे हुबेहूब चित्र आपल्या डोळ्यापुढे प्रेमानंदाने उभे केले आहे ते असे आहे – नरसिंहाची बैलगाडी, त्याचे मित्र, त्यांना उतरण्यासाठी म्हणून कुंवरबाईच्या सासरच्या माणसांनी दिलेला तबेला, आत्मानंदांत तल्लीन झालेल्या आपल्या पित्याची थट्टा केलेली पाहून कुंवरबाईच्या मनाला झालेले दुःख, तसेच आपली आई असती तर तिने योग्य रीतीने हा प्रसंग कसा निभावून नेला असता, याची खात्री पण आता नाही म्हणून तिला वाटलेली हळहळ, इत्यादी गोष्टी. त्याचप्रमाणे मेहताची शांतवृत्ती व देवावरचा दृढ विश्वास, कुंवरबाईची असहाय व दयाजनक मनःस्थिती आणि कुंवरबाईच्या सासरच्या मंडळींची घमेंड, उद्धटपणा, फाजील अभिमान व निष्ठुर उपहास ह्यांचे बारकाईने वर्णन केले आहे. तसेच योग्य वेळ येताच श्रीकृष्ण नरसिंह मेहताचा गुमास्ता म्हणून येतो व बरोबर देणग्या म्हणून देण्याच्या किमती वस्तूंच्या गाड्याच गाड्या कशा भरून आणतो व कुंवरबाईची कपटी सासू व आजेसासू ह्यांनी तिच्या पित्याच्या स्थितीची चेष्टा करून मागितलेल्या सर्व वस्तू अगदी यादीप्रमाणे कशा पुरवितो व कुंवरबाईच्या सासरच्या

माणसांची कशी फजिती करतो, त्याचे वर्णनही फार परिणामकारक रीतीने केले आहे. 'मामेरुं' हे काव्य प्रेमानंदाने विनोद व करुणा हे दोन भाव एकमेकात गुंफून फार सुंदर रंगविले आहे.

प्रेमानंदाने आपल्या आख्यानांची कथानके रामायण, महाभारत, भागवत व इतर पुराणांमधून घेतली असली तरी ती त्यांची केवळ भाषांतरे किंवा रूपांतरे नाहीत.

मध्ययुगात ब्राह्मणांच्या तोंडून पुराणातील गोष्टी ऐकणे हे एकच करमणुकीचे व सुसंस्कृत होण्याचे साधन होते. प्रेमानंदाने पुराणातून आपल्या आख्यानांची कथानके मुख्यत्वे घेतली असली तरी सर्जक बुद्धी, सूक्ष्म अवलोकन शक्ती, मनुष्य स्वभावाचा अभ्यास व गोष्ट रसमय करून सांगण्याची कला, ह्या आपल्या साहित्यगुणांमुळे त्याने त्या कथानकातील पात्रांना जिवंत केले व त्यांच्या द्वारे त्याने त्या वेळच्या गुजरातच्या लोकांच्या जीवनावर प्रकाश टाकला. त्याने वर्णिलेल्या कृष्ण, वसुदेव, देवकी, नंद, यशोदा, नल, दमयंती व इतर अनेक व्यक्ती ह्या पुराणकालीन न वाटता त्या वेळच्या गुजरातमधीलच अधिक वाटतात. प्रेमानंदाला त्या वेळच्या गुजरातचे पूर्ण ज्ञान आहे. त्या वेळचे निरनिराळ्या जातीचे व धंद्याचे पुरुष व स्त्रिया ह्यांची त्याला खडान् खडा माहिती आहे व त्याने आपल्या आख्यानातून त्यांची रीतभात, रिवाज, त्यांच्या मनातला सांस्कृतिक दृष्टि-कोण, त्यांची जीवनाकडे पाहण्याची दृष्टी, इत्यादींचे सविस्तर वर्णन केले आहे. आणि म्हणूनच 'नानालाल' ह्या श्रेष्ठ कवीने प्रेमानंदाविषयी म्हटले आहे, " प्राचीन व अर्वाचीन सर्व गुजराती कवींत प्रेमानंद ह्रा खऱ्याखुऱ्या अर्थाने गुजराती कवि आहे. "

' गुजरातीपणा ' हा प्रेमानंदाचा मोठा गुण, तसा मोठा दोषही आहे. कारण त्याने पुराणातील उदात्त व महान व्यक्तींवर चढविलेल्या गुजराती साजामुळे त्या व्यक्तींचे बोलणे, चालणे, वागणे हे कित्येकदा प्रेमानंदाच्या वेळच्या अगदी सामान्य प्रतीच्या लोकांसारखे वाटते.

सर्व मध्ययुगीन लेखकांप्रमाणे प्रेमानंदाचा मुख्य हेतू आपल्या श्रोत्यांच्या भावनांना स्पर्श करून त्यांचे मन जिंकणे हाच आहे. कथानिरूपण करीत असता त्यातून रसनिष्पत्ति कशी होईल इकडे त्याचे फार लक्ष असे. आपल्या रसप्रवाही निरूपणशैलीत एकही महत्त्वाचा बारीकसारीकसा मुद्दा किंवा त्यामागील भावना त्याच्या नजरेतून सुटत नाही व तो शेवटपर्यंत श्रोत्यांचे कुतूहल जागृत ठेवतो. कधी कधी सुंदर शब्दचित्रे रंगवून तो श्रोत्यांच्या कल्पनाशक्तीला चालना देतो, तर केव्हा केव्हा एखादे अरण्य, सभा अथवा मेजवानीचे ठराविक पद्धतीने बारीक-सारीक तपशीलासह वर्णन करून आपल्या सामान्य बुद्धीच्या व अप्रबुद्ध अशा

श्रोत्यांची बालसुलभ जिज्ञासा तृप्त करतो. कधी कधी तो एखाद्या उमद्या पुरुषाच्या किंवा सुंदर स्त्रीच्या वैशिष्टयांची वर्णने करतो. आपल्या अशा वर्णनांनी तो श्रोत्यांना कधीही कंटाळा आणीत नाही कारण त्यात योग्य शब्दयोजना, लयबद्धता, अनुप्रास, यमके इत्यादींचा भरपूर उपयोग करून तो ती रसपूर्ण बनवतो. व्यंग्य, उपहास, कटाक्ष, वक्रोक्ति व विनोद ह्यांचा उपयोग करून तो आपल्या श्रोत्यांना कधी हसवतो तर कधी एखाद्या प्रसंगाचे करुणरसाने भरलेले हृदयस्पर्शी वर्णन करून श्रोत्यांना रडायला लावतो. एखाद्या भावनेचे क्रमाक्रमाने वर्णन करून तिचा उत्तम परिपोष करणे ह्या बाबतीत प्रेमानंदाचा हात कोणीही धरू शकणार नाही.

प्रेमानंदाला मनुष्यस्वभावाची पूर्ण पारख असल्याने तो कोणत्याही एकाच रसाचे विस्ताराने वर्णन करीत नाही. उदाहरणार्थ, वीररसाचे वर्णन करताना तो त्याबरोबरच त्यात शृंगार, हास्य व करुण रसाचेही मिश्रण करून श्रोत्यांची मने त्यात गुंतवून ठेवतो.

प्रेमानंद एखाद्या रसाचे जसे अत्युत्कृष्ट वर्णन करू शकतो; तसेच एका रसाच्या वर्णनातून दुसऱ्या रसात कसा कुशलतेने प्रवेश करावा हे तो चांगले जाणतो. तो हे काम इतक्या सहजपणे व निर्वेधपणे करतो की दुसऱ्या रसाचे वर्णन जेव्हा उच्चकोटीला पोहोचते तेव्हा कुठे हा बदल श्रोत्यांच्या ध्यानात येतो. अनेक संवादी रसांचा कौशल्याने वापर करून प्रेमानंद आपल्या आख्यानातील मुख्य रस परिपूर्णतेस नेतो व अशा रीतीने एखाद्या जादूगाराप्रमाणे तो आपल्या वाचकांना एकत्वातून विविधतेकडे व विविधतेतून एकत्वाकडे नेतो म्हणूनच प्रेमानंद हा गुजराती साहित्यातील सर्वश्रेष्ठ वास्तवलक्षी कवि होय.

**५) प्रेमानंदाची नाटके–**

बडोद्यात प्रकाशित झालेल्या 'प्राचीन काव्यमाला' ह्या पुस्तकात ' सत्यभामा-रोषदर्शिका आख्यान', ' पांचालीप्रसन्नाख्यान ' व 'तपत्याख्यान' ह्या नावाची तीन नाटके इ. स. १८९२, १८९३ व १८९४ साली प्रसिद्ध झाली. ही नाटके प्रेमानंदाची असावीत असे मानले जात होते; पण सुरुवातीपासूनच त्याबद्दल वाद सुरू झाला. दोन्ही बाजूंच्या साहित्यिकांनी व विद्वानांनी ह्या वादविवादात भाग घेतला. इ. स. १९०९ पर्यंत हे वादंग चालू होते. शेवटी स्व. प्रा. नरसिंहराव दिवेटिया ह्यांनी 'प्रेमानंदाची नाटके' ह्या विषयावर एक उत्कृष्ट प्रबंध लिहून ती नाटके प्रेमानंदाच्या हातच्या कृती असणे शक्यच नाही असे निर्विवाद सिद्ध केले.

पण, मग ही नाटके कोणी लिहिली असा प्रश्न उपस्थित झाला. बराच काळ-पर्यंत हा विवाद चालल्यानंतर ही नाटके छोटालाल नरभेराम भट्ट व नाथाशंकर शास्त्री ह्यांनी लिहिली असावी असे मानले जाऊ लागले. तसेच स्व. प्रा. केशवलाल

ध्रुव ह्यांना हे माहीत असून त्यांनीच ती प्रकाशित करण्यात मदत केली असावी असेही मानले गेले.

ह्या नाटकात साहित्यिक गुण जवळजवळ शून्य आहेत. म्हणून ती आता कोणी वाचीतही नाहीत किंवा त्यावर चर्चाही करीत नाहीत. त्यामुळे ह्याबद्दलच्या वादाचा आता काही प्रश्नच शिल्लक राहिला नाही.

## तळटिपा

१. अभिनवो आनन्द आज अगोचर गोचर हवुं ए.

२. असे म्हणतात की, पंडित धनराज ह्यांनी सर्वात प्रथम १६०४ मध्ये भगवद्गीतेचे गुजरातीत भाषांतर केले; पण त्यांनी गीतेच्या प्रत्येक अध्यायाचा फक्त सारांश दिला आहे.

३. ए बे एक स्वरूप अन्तर नव धरशो,
प्रभु अन्तर...
भोळा भूधरने भजतां भवसागर तरशो,
जयदेव जयदेव ।

४. अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंतचे गुजराती साहित्य राजकारणापासून अगदी अलिप्त आहे हे ध्यानात ठेवण्यासारखे आहे.

५. श्राद्ध—मनुष्याच्या मृत्यूनंतर एका विशिष्ट दिवशी करावयाचा धार्मिक विधी व त्यानंतर दरेक वर्षी भाद्रपदाच्या कृष्णपक्षात त्या मनुष्याच्या मृत्युतिथीला करावयाचा धार्मिक विधी.

६. आश्विन महिन्यातील शुक्लपक्षाचे पहिले नऊ दिवस.

७. स्वयंवर – पूर्वी अशी चाल होती की, राजकन्येच्या स्वयंवराला सर्व राजांना आमंत्रण देऊन एकत्र बोलावले जाई व त्यातून राजकन्या तिच्या पसंतीप्रमाणे एकाला पती म्हणून निवडीत असे. काही वेळा राजकन्येचा पिता काही अटी पण घालीत असे अथवा परीक्षा घेत असे व त्यावरून वराची पसंती होत असे.

८. हे हरि सत्यतणा संघाती,
हरि हुं तो क्यांये नथी ज समाती.

९. मामेरुं— मुलीच्या 'सीमंत'प्रसंगी (ओटी भरणे करताना) मुलीचे आई-बाप मुलीला, जावयाला व तिच्या सासरच्या इतर माणसांना भेटी देतात, तो समारंभ.

प्रकरण सहावे

# अठरावे शतक

[ १ ]

## शामळ भट्ट [ इ. स. १६९० ते १७६९ ]

हा अहमदाबादमधील वेंगणपूरचा रहिवासी. त्यांच्या वडिलांचे नाव वीरेश्वर. शामळ कथा सांगण्यात इतका कुशल होता की, सिंहुजच्या जमीनदार पाटलाने त्याला आपल्या आश्रयास ठेवून घेतले. शामळने रचलेली आख्याने 'शिवपुराण', 'अंगदविष्टि', 'शुकदेवाख्यान', 'विश्वेश्वराख्यान', 'रावण-मंदोदरी संवाद' वगैरे होत ही सर्व पौराणिक प्रसंगावर रचलेली आहेत. प्रेमानंदाची आख्याने रचून झाल्यानंतर थोड्याच वर्षांनी ही लोकापुढे येऊ लागल्याने ती स्वाभाविकच तुलनेने फिकी पडली व जनमनावर त्यांची पकड बसली नाही.

शामळ हा 'पद्यावर्त' लिहिण्यात फार प्रसिद्ध होता. त्यापैकी विशेष गाजली ती म्हणजे 'पद्मावती', 'रूपावती', 'नन्दबत्रिशी', 'पंचदंडनी वार्ता', 'विनेचटनी वार्ता', 'बारस कस्तुरी', 'सूदबहोतरी,' 'सिंहासन बत्रिशी', 'सुंदर कामदार' आणि 'मदनमोहना.' त्याशिवाय शामळने 'उद्यमकर्म संवाद', 'रणछोडजीना श्लोको' (अथवा बोडाणा आख्यान), 'अभराम कुलीना श्लोको' (अथवा रुस्तम बहादुरना पवाडो), 'शामळ रत्नमाला', 'राखीदास चरित्र' वगैरे काव्ये रचली आहेत.

### १) पद्मावती (१७१८)

हे शामळचे पहिले 'पद्यावर्त'. ह्याची कथा अशी आहे. चंपावतीचा राजपुत्र पुष्पसेन ह्याला त्याच्या पित्याने हद्दपार केलेले असते. नशिबाने आलेल्या अनेक संकटपरंपरांतून जात-जात तो शेवटी धारा नगरीची राजकन्या पद्मावती हिच्याशी विवाह करतो. ह्या कामात त्याला गणिकेचे चांगले साहाय्य मिळते. शेवटी तो घरी परत येतो व सर्वांना आनंद होतो.

**२) सिंहासन बत्रिशी–**

ह्यामध्ये दंतकथांतून प्रसिद्ध झालेल्या विक्रम राजाची कथा आहे. हा राजा बहुमुखी प्रज्ञावान महान पंडित, नाना कलावंतांचा व कवींचा आश्रयदाता होता शिवाय तो अतिशय शहाणा व न्यायी राजा होता. त्याला भूतप्रेतादि अतिमानव व्यक्ती वश होत्या. अशा विक्रम राजाच्या सिंहासनावर भोजराजा आरूढ होणार तोच सिंहासनाच्या पायाखाली असलेल्या बत्तीस बाहुल्या जिवंत होऊन भोज-राजाला एकामागून एक विक्रम राजाच्या पराक्रमाच्या गोष्टी सांगू लागतात. तीच ही 'सिंहासन बत्रिशी.'

**३) मदनमोहना–**

शामळच्या उत्तम 'पद्यावर्ता'पैकी हे एक पद्यावर्त आहे. ह्यात राजकन्या मोहना व राजाच्या मुख्य मंत्र्याचा मुलगा मदन ह्याची प्रेमकहाणी वर्णिली आहे.

शामळने प्रेमानंदाप्रमाणेच आपल्या पूर्वगामी कवींकडून खूप उसनवारी केली आहे. त्याच्या बहुतेक सर्व पद्यावर्ताच्या कथांचे बीज त्याने काही जुन्या पद्यावर्तातून किंवा 'बृहत्-कथा-मंजरी' अथवा 'कथा-सरित्-सागर' ह्या संस्कृत ग्रंथातून व एखाद्या लोककथेतून घेतले आहे. आख्यानकाराच्या मानाने पद्यावर्तकाराला जास्त मोकळीक असते. त्याला मूळ कथेला पूर्णपणे धरून रहावे लागत नाही. मूळ कथे-तील पात्रांची नावे बदलणे, नवे काल्पनिक प्रसंग त्यात आणणे, प्रसंगांचा अनुक्रम बदलणे वगैरे गोष्टी तो करू शकतो. म्हणून शामळच्या कथांतील बीजे आपणास पूर्वीच्या अनेक कथांत असलेली आढळून येतात.

शामळच्या कथांचा विस्तार फार मोठा आहे. त्याच्या कथांत विविध प्रकारची पात्रे व घटना आहेत. त्याने पूर्वीच्या साहित्य-ग्रंथांतून बऱ्याच कथा उसन्या घेतल्या असल्या तरी आपल्या कल्पनाशक्तीनेही अनेक प्रसंग निर्मिले आहेत.

जशी ऐकलेल्या व वाचलेल्या गोष्टीवरून तशीच त्यात स्वतःच्या कल्पनेची भर घालूनही त्याने आपल्या आख्यानांची कथानके रचली आहेत. तसेच आपली कथानके फुलविण्यासाठी तो त्यात कोडी, कूटप्रश्न, सूत्रे व बोधवचने ह्यांचा मोकळ्या हाताने उपयोग करतो.

शामळच्या गोष्टी कूटप्रश्न व कोड्यांनी भरपूर आहेत. त्यातील विनोदाने तो वाचकांचे कुतूहल वाढवतो व त्यांना प्रसन्न करतो. कधी कधी त्याची एखादी नायिका आपल्या कूटप्रश्नाचे उत्तर शोधून देणाऱ्या पुरुषाशीच लग्न करते आणि केव्हा केव्हा काही कूटप्रश्न व त्यांची उत्तरे ह्यामुळेच पात्रांना एकमेकांची ओळख पटते.

शामळ हा आपल्या काव्यशक्तीपेक्षा कथाचातुर्याने श्रोत्यांवर प्रभाव पाडतो. त्याची विशिष्ट प्रकारच्या स्त्री-पुरुषांची वर्णने, तसेच अरण्ये, शहरे व राजदरबारांची

वर्णने एकात्र साच्याची व परंपरेला अनुसरूनच असतात. केव्हा केव्हा लांबलचक वर्णने करून तो म्हणतो, 'आता त्यांचे अधिक वर्णन करणे शक्य नाही',[२] व असे म्हणून तो त्यांचा संक्षेप करतो; पण अशा प्रसंगी प्रेमानंद मात्र मानवी मनाच्या भावभावनांचे सविस्तर वर्णन करण्याची एकही संधी जाऊ देत नाही.

दिवसभर काबाडकष्ट करून थकल्याभागलेल्या खेडेगावातील अशिक्षित स्त्री-पुरुषांना सायंकाळी मनोरंजक व बोधप्रद कथा सांगून रिझविणे हे शामळचे मुख्य कार्य होते. म्हणून त्याच्या कथात आपणाला चमत्कृतिपूर्ण वाक्ये, विनोद, चुटके, व्यावहारिक शहाणपणाच्या गोष्टी, मानवी स्वभावातील गोष्टींचे सूक्ष्म वर्णन वगैरे आढळते. आपल्या गोष्टीचा केव्हा केव्हा अकल्पित शेवट करून किंवा त्यात एकदम बदल करून वर सांगितलेल्या श्रोत्यांचे मनोरंजन तो पूर्णपणे करू शकत असे.

शामळच्या कथातील स्त्रिया, पुरुषांपेक्षा अधिक हुशार व तेजस्वी आहेत. 'हंसावती', 'पद्मावती', 'प्रेमावती', 'रस-मंजरी', 'कर्पूर मंजरी', 'भद्र भामिनी', 'विद्याविलासिनी', 'कामवती', 'तरंगवती' वगैरे ही त्याच्या कथांचीही नावे असून त्यातील नायिकांच्या नावावरूनच ती घेतली आहेत. ह्या नायिका धीट, चतुर, बुद्धिमती, प्रसंगावधानी व साहसी आहेत आणि ह्याच गुणांच्या जोरावर त्या अनेक आपत्तींना तोंड देऊन त्यातून सुखरूपपणे पार पडतात. बरेच प्रसंगी त्या पुरुषांहून जराही कमी प्रतीच्या नसतातच. उलट केव्हा केव्हा पुरुषांपेक्षा त्या काकणभर श्रेष्ठच ठरतात. पुरुषांची मने जिंकून घेऊन त्यांना त्या खूप सुख देतात. शामळच्या स्त्रीपात्रांत अनेक प्रकारच्या स्त्रिया आहेत. काही जन्मभर अविवाहित राहतात[3] व शेवटपर्यंत हिंमतीने आपल्या निश्चयाला चिकटून राहतात. काही प्रथमदर्शनीच पुरुषाच्या प्रेमात पडून आपल्या पसंतीच्या पुरुषाशी लग्न करणाऱ्या आहेत.[४] काही आपल्या कोड्याचे उत्तर शोधणाऱ्या पुरुषाशीच लग्न करणाऱ्या तर काही लग्न झालेल्या स्त्रिया पुरुषवेष घेऊन तरुण स्त्रियांचे मन आपल्या हुशारीने व बहादुरीने जिंकून त्यांच्याशी लग्न करणाऱ्या व मग त्या स्त्रिया आपल्या पतीना देणाऱ्या आहेत. काही स्मशानात जाऊन क्रियाकांड करणाऱ्याही आहेत.[५] काही चंचल मनाच्या, मोहात पडून आपल्या पतीला सोडून पळून जाणाऱ्या आहेत व काही इतक्या पतिपरायण आहेत की पतीच्या मृत्यूची बातमी ऐकताच ती खरी की खोटी ह्याचा जराही विचार न करता धक्का बसून प्राण सोडणाऱ्या आहेत. काही आपल्या पतींना खऱ्या आणीबाणीच्या वेळी मदत करून त्यांचे प्राण वाचवितात, तर काही अशाही आहेत की ज्या पतीवर चिडून त्याचा सूड घेतात व त्याला ठार मारतात. काहींची पतिभक्ती पराकोटीला पोहोचलेली आहे तर काहींची पातिव्रत्याची भावना अगदीच वरवरची आहे. अशा प्रकारे शामळच्या कथांतून आपल्याला स्त्री-स्वभावाच्या अनेक पैलूंचे दर्शन घडते.

संख्या व गुणवत्ता ह्या दोन्ही दृष्टींनी पाहता शामळ हा एक महान कथाकार होता व शामळच्या नंतर त्याच्यासारखी पद्यावर्ते पुढे कोणीही रचली नाहीत. त्यामुळे मध्ययुगातील श्रेष्ठ पद्यावर्तकार म्हणून शामळचाच निर्देश करता येतो.

[ २ ]

अठरावे शतक म्हणजे गुजरातच्या इतिहासातील अंदाधुंदीचा व अस्वस्थतेचा काळ होता. मोगलांची सत्ता संपुष्टात येत चालली होती. औरंगजेबाची धर्मांधता व मराठ्यांचे हल्ले ह्यामुळे अव्यवस्था व दुर्दशेचा काळ सुरू झाला होता. गुजरातची संपत्ती नष्ट झाली होती. शेतीचा नाश झाला होता, व्यापार-धंदे बुडाले होते व संस्कृती खंडित झाली होती.

अशी परिस्थिती असल्याने १८ व्या शतकाच्या शेवटच्या भागात दयारामाचा उदय होईपर्यंत साहित्य शोचनीय अवस्थेस पोहोचले होते आणि त्या वेळचे कोणीही कवी उच्च कोटीचे नव्हते. दयारामाच्या वेळी काहीशी शांतता प्रस्थापित झाली होती.

नरसिंह मेहता व मीराबाई यांच्या वेळेप्रमाणेच ह्या काळीही ज्ञान, भक्ती व वैराग्य विषयक पदांचे प्रमाण सर्वात अधिक होते; पण आता विषयांचा अग्रक्रम मात्र बदलला. नरसिंह मेहता व मीराबाई यांच्या काळात भक्तिपर पदांची संख्या ज्ञान व वैराग्य विषयक पदांपेक्षा अधिक होती व ती भक्ती मुख्यतः प्रेमलक्षणा भक्ती होती; पण १८ व्या शतकातील काव्यात ज्ञान व वैराग्यपर पदांची संख्या भक्तिविषयक पदापेक्षा कितीतरी अधिक आहे आणि ती भक्ती मुख्यतः शिव, कृष्ण व देवी (शक्ती) ह्यांची आहे.

ह्या काळचे बरेचसे कवी समाजाच्या खालच्या थरातील व खेडेगावातील होते. त्यामुळे त्यांच्या काव्याची भाषा सुसंस्कृत नव्हती, पण त्यांचे ते बोल हृदयाच्या अंतर्भागातून सहजपणे बाहेर पडलेले असल्यामुळे जनमानसावर त्यांचा फार प्रभाव पडला.

हा काळ आख्यानांसारख्या विस्तृत वर्णनात्मक काव्यांचा नसून लहान लहान पदांचा आहे. ह्या काळात ज्ञान, भक्ती व वैराग्यविषयक पदे तर परंपरेप्रमाणे झालीच; पण त्याचबरोबर गरबा, गरबी,[१] काफी, चाबखा, आरत्या व राजियांचा सुकाळ झाला.

ह्या वेळी स्वामीनारायण पंथाच्या कवींचा स्वतंत्र वर्गच निर्माण झाला होता.

## वल्लभ मेवाडो [ इ. स. १७०० त हयात ]

हा कवी ह्या काळचा सर्वात श्रेष्ठ गरबे रचणारा कवी होता. ह्याच्या पूर्वी रचले गेलेले गरबे मिळत नाहीत. याचे कारण हे असावे की वल्लभ मेवाडाचे

गरबे इतके लोकप्रिय झाले की त्यामुळे पूर्वीचे काही थोडेफार गरबे असले तरी ते लोकांच्या स्मरणातही राहिले नाहीत.

वल्लभने गुजरातच्या मुख्य तीन देवतांच्या (अम्बा, बहुचरा व काली ह्यांच्या) महानतेचा आपल्या काव्यातून उदो-उदो केला. तो अहमदाबादचा रहिवासी होता; पण त्याने आपल्या आयुष्याचा बराचसा भाग चुनवल ह्या बहुचरा मातेच्या पीठातच घालवला. तो देवीचा इतका एकनिष्ठ भक्त होता की आजसुद्धा बहुचरा मातेच्या दर्शनाला जाणारे यात्रेकरू एकमेकांना 'वल्लभ धोलानी[७] जय' म्हणून अभिवादन करतात.

वल्लभ आपल्या 'आनंदनो गरबो' ह्या गरब्यात बहुचरा देवीच्या शक्तीचे व वैभवाचे अप्रतिम वर्णन करतो. 'महाकालीनो गरबो' ह्यात तो देवी महाकालीचा कोप झाल्याने पावागढच्या राजाच्या घराण्याचा कसा नाश झाला त्याची कथा सांगतो. 'अंबाजीना शणगारनो गरबो' ह्यात तो अंबामातेच्या अंगोपांगाच्या सौंदर्याचे व त्या सौंदर्यात भर घालणाऱ्या कित्येक अलंकाराचे बारीक-सारीक तपशीलासह वर्णन करतो.

वल्लभने 'कलिकालनो गरबो' (कलियुगाचा गरबा) हा नैतिक अधःपाताच्या काळाचाही गरबा लिहिला आहे तसेच 'कजोडानो गरबो' म्हणजे अयोग्य वधू-वरांच्या जोडीचाही गरबा लिहिला आहे.

वल्लभने एका काव्यात १७३१ सालच्या दुष्काळाचे व अन्नटंचाईचे वर्णन केले आहे. तो म्हणतो, 'अन्नधान्य फार महाग झाले आहे. अधर्माचा इतका प्रसार झाला आहे की तो सुधारण्याच्या पलीकडे गेला आहे. कोणी कोणाचा न्याय करावा? कारण प्रत्येक जण दुसऱ्यापेक्षा जास्तच अन्याय करीत आहे. प्रत्यक्ष आपल्या पोटच्या पोरांना आपले पोट भरण्यासाठी आईबाप सोडून जात आहेत किंवा त्यांना विकण्याची त्यांच्यावर पाळी आली आहे."[८]

'कजोडानो गरबो' मध्ये पुढील वर्णन आहे—

एका तरुण मुलीचे लग्न एका अतिशय वृद्ध माणसाशी होते. ती आपल्या हृदयातले दुःख गोरमा[९]जवळ जाऊन तिला सांगते, 'हे गौरीमाते, तू माझ्या नशिबी एक वृद्ध पती लिहिलास. हे माते, मी आता भर तारुण्यात आले आहे व व तो वार्धक्याने किळसवाणा झाला आहे. मी फक्त १६ वर्षांची आहे आणि तो ८० वर्षांचा आहे. थंडीच्या भर रात्री कोणालाही नाना प्रकारचे सुखोपभोग भोगावेसे वाटतील पण त्या मूर्ख म्हाताऱ्याची तर जशी काही वाचाच बसली आहे. हे माते, जन्मताच माझा गळा का कोणी दाबून टाकला नाही? मला विष देऊन मारून का टाकले नाही?'[१०]

वल्लभच्या गरब्यांची लोकप्रियता इतकी वाढली की दुसऱ्या लेखकांनी लिहिलेले काही गरबे सोडले तर फक्त वल्लभचेच गरबे आजपर्यंत टिकून राहिले आहेत.

## प्रीतम अथवा प्रीतमदास [ १७२० ते १७९८ ]

प्रीतम अथवा प्रीतमदास ह्या रामानंदी साधूने भगवद्‌गीतेचे गुजरातीत भाषांतर केले आहे. त्याशिवाय त्याने 'एकादश स्कंध', 'धरमगीता', 'सरसगीता', 'ज्ञानगीता' व 'अध्यात्म रामायण' व इतर अनेक ग्रंथ रचले आहेत.

नरसिंह मेहता जसा आपल्या 'प्रभातियाँ'नी, अखो जसा आपल्या 'छप्प्यां'नी तसा प्रीतम आपल्या 'पदां'नी प्रसिद्ध झाला आहे. प्रीतमने ज्ञान, भक्ती, वैराग्य व शृंगारविषयक पदे लिहून सोप्या भाषेत नैतिक व धार्मिक उपदेश केला आहे. *त्याने आपल्या काही पदांत सामाजिक दुष्ट रीतिरिवाजांवर प्रकाश टाकला आहे;* पण त्याने जरी त्यावर टीका केली तरी त्यात 'अखो' व 'भोजो' यांच्याप्रमाणे त्वेष व संताप दिसून येत नाही. त्याच्या काही पदांची सुरुवात अशी होते–"हरीचा मार्ग हा शूराचा मार्ग आहे. ते कायर माणसाचे काम नाही."[१०] "हे वेणु, तू व्रज-नारींची वैरीण झाली आहेस."[११] "हे जिव्हे, तुला हरिगुण गाण्याचा एवढा आळस का?"[१२] ह्या सुरुवातीच्या पंक्ती अतिशय लोकप्रिय झाल्या आहेत.

प्रीतमच्या रचनांमध्ये अनेक प्रकार आढळून येतात. त्याने कक्का, महिना, तिथि, वार, ढोळ, गरबी, आरती, थाळ, प्रार्थना, चेतवणी वगैरे प्रकार लिहिले आहेत; पण त्याच्या काव्याचे मुख्य विषय ज्ञान, वैराग्य व भक्ती हे तीन आहेत. त्यांपैकी 'सरसगीता' हे काव्य उल्लेखनीय आहे. श्रीकृष्ण गोकुळ सोडून मथुरेला जातो. तेथून तो उद्धवाला नंद,[१३] यशोदा[१४] व गोपी यांचे सांत्वन करण्यासाठी गोकुळात पाठवतो. उद्धव मोठ्या-मोठ्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगून त्यांचे सांत्वन करण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा गोपी त्याला आपल्या कृष्णाविषयीच्या आठवणी सांगतात. त्या कृष्णाच्या बालक्रीडांचे वर्णन करतात आणि आपले कृष्णविरहाचे दुःख व व्यथा किती खोल आहेत ते सांगतात. ह्या प्रेममय भक्तीच्या दर्शनाने उद्धव अगदी भारावून जातो व संतुष्ट होऊन तो मथुरेला परत जातो.

सारांश, प्रीतम हा ज्ञान, भक्ती व वैराग्य यांचे वर्णन करणारा कवी आहे. हे विषय वर्णिताना त्याने मधुर, सहज व साध्या शब्दांचा उपयोग केला आहे. त्यामुळे मध्ययुगातील बऱ्याच कवींपेक्षा तो अधिक लोकप्रिय झाला आहे.

## रत्नो [ सुमारे सन १७४० ]

हा अंदाजे १७४० मध्ये होऊन गेला. 'बारमासी' प्रकारच्या काव्यातील महिना' ही त्याची प्रसिद्ध रचना आहे. कृष्णाच्या विरहाने व्यथित झालेल्या

राधेच्या हृदयातील भावभावनांचे–वेदनांचे सविस्तर वर्णन ह्या काव्यात केले आहे. वर्षाच्या प्रत्येक महिन्यातील निसर्गाचे निरनिराळे सौंदर्य व बाह्य प्रकृतीच्या विविध छटा पाहून तिच्या मनाची कस-कशी स्थिती होत जाते हे त्यामध्ये वर्णिले आहे. निसर्गसौंदर्याचे वर्णन, प्रत्येक ऋतूबरोबर बदलत जाणारी त्याची रूपे व त्यांचा विरहाने झुरणाऱ्या स्त्रियांच्या हृदयावर होणारा परिणाम ह्यांचे वर्णन ह्यामुळे हे काव्य गुजराती साहित्यातील उत्कृष्ट ' बारमासी ' म्हणून प्रसिद्ध आहे.

## धीरो [ १७५३ ते १८२५ ]

धीरो निरक्षर होता. त्याला संस्कृत येत नव्हते; पण संन्यासी व साधुसंतांच्या सहवासाने त्याला योगशास्त्राची[१५] व ज्ञानाची बरीच जाणीव होती.

असे सांगतात की, तो आपल्या कवितांच्या नकला करून लहान लहान बांबूच्या नळ्यात ठेवून त्या महीनदीच्या पाण्यात सोडून देत असे. अशा रीतीने त्याच्या कविता लोकांपर्यंत पोहोचल्या व त्याला प्रसिद्धी मिळाली.

धीरो याने 'रणयज्ञ', 'अश्वमेध' व 'द्रौपदी वस्त्रहरण' ही आख्याने लिहिली; पण तो आपल्या 'काफी' या काव्य प्रकाराबद्दल प्रसिद्ध आहे. 'काफी' हे अशा प्रकारचे पद असते की त्यात पहिली ओळ (टेक-ध्रुपद) पुढील २ ओळींच्या ५ कडव्यातील एक ओळ सोडून नंतरच्या ओळीशी यमक साधते. धीराची बहुतेक पदे अशा 'काफी' च आहेत. त्या सर्वांमध्ये 'स्वरूपनी काफी' ही उल्लेखनीय आहे. ह्यात गुरु कसा असावा यासंबंधीचे आणि माया, मन, तृष्णा (लोभ), लक्ष्मी, यौवन व काया ह्यांच्या स्वरूपाविषयीचे विचार विषद केलेले आहेत. ह्या 'काफी' मध्ये धीरो अतिशय यशस्वी झाला आहे. 'धीरो'च्या काही 'काफी'च्या आरंभीच्या ओळी अशा आहेत.

" राम ज्यांचे रक्षण करतो तो . . . . ."[१६]

" तू गर्वाने इकडेतिकडे का फिरतोस ? तू मार्ग चुकला आहेस व ह्या संसाराच्या विहिरीत (गंगेत) पडला आहेस."[१७]

" जन्ममृत्यूच्या शृंखला तुटून पडल्या आहेत व ब्रह्मभवनाचे दरवाजे उघडले आहेत."[१८]

ह्या 'काफी' रचना फार लोकप्रिय आहेत.

आपल्या 'काफी' मध्ये रोजच्या व्यवहारातील उदाहरणे देऊन जगातील वैभव व त्याविषयीचे आकर्षण कसे व्यर्थ आहे, तसेच सुखोपभोग कसे क्षणभंगुर आहेत व ईश्वरावर खरी दृढ श्रद्धा ठेवल्याने मनुष्याला कशी खरी मनःशांती प्राप्त होते ते विशद करून सांगितले आहे.

'काफी' व्यतिरिक्त, धीरोने 'अवळवाणी' म्हणजे गूढार्थाने भरलेली नेहमीपेक्षा वेगळ्या शब्दातील धार्मिक-तात्त्विक वचने लिहिली आहेत. अशा कवितात केलेली विधाने वरून वरून अगदी विचित्र वाटतात; पण त्याखाली एक गूढार्थ लपलेला असतो आणि त्यावरून कवीच्या आध्यात्मिक गूढ अनुभवांची व भावनांची प्रचीती येते.

पुढील ओळी ह्या 'धीरो' याच्या 'अवळवाणी'ची विशिष्ट उदाहरणे आहेत–

"अंबारीने हत्तीला गिळले, खोगिराने घोड्याला गिळून टाकले, कपड्यावर कुंपण वाळत घातले, फेसाने समुद्राला गिळून टाकले, सशाने आपल्या हुशारीने सिंहाला लढाईत हरवून टाकले."[१५]

तदुपरांत 'धीरो' याने 'ज्ञानकक्को' म्हणजे ज्ञानाची 'क-का' वगैरे बाराखडी वा मूळाक्षरे ही उपदेशपर कविता आहे व त्यात प्रत्येक ओळीच्या पहिल्या शब्दाचे पहिले अक्षर गुजराती भाषेतील मूळाक्षरांच्या अनुक्रमाने आले आहे. त्याशिवाय त्याने गरबी, धोळ वगैरे काव्यप्रकारही लिहिले आहेत.

## नरभेराम [ १७६८–१८५२ ]

नरभेराम आपल्या 'बोडाणानी मूछना पदो' (बोडाणाच्या मिशांची पदे) ह्या काव्याबद्दल प्रसिद्ध आहे. ह्या काव्याला हे नाव देण्याच्या मागे मिशा ह्या मर्दुमकीचे चिन्ह आहेत असे मानण्याची प्रथाही आहे. ज्याने काही शौर्याची कामे केली आहेत असा मनुष्य अभिमानाने आपल्या मिश्याना पीळ भरतो. बोडाणा हा डाकोरचा रहिवासी. तो द्वारकेच्या रणछोडजीचा (कृष्णाचा) नम्र भक्त होता. द्वारकेहून आपल्या आराध्य दैवताची मूर्ती डाकोरला आणण्याचे अशक्यप्राय असे काम त्याने अनेक आपत्तींना तोंड देऊन करून दाखविले.

कवीच्या दृष्टीने हे मोठे शूरपणाचे काम होते व म्हणून आपल्या मिशांना पीळ देऊन ताठ ठेवण्याचा त्याला अधिकार होता असे तो मानत होता. त्याच्या पदामध्ये बोडाणाने हे अवघड कार्य यशस्वीपणे कसे पार पाडले ह्याचे वीररसयुक्त वर्णन केले आहे.

नरभेराम आपणास विनयाने 'नरभो' असे म्हणतो. त्याच्या 'नाणुं आपे नरभो रे' (नरभो तुम्हाला पैसे देतो) ह्या पदाबद्दलही तो प्रसिद्ध आहे. हे पद द्वारकेचे मुख्य दैवत जो रणछोडजी त्याला संबोधून केलेले आहे. पवित्र गोमतीमध्ये स्नान करण्यासाठी व मंदिरात प्रवेश करण्यासाठी जी ठराविक रक्कम भरावी लागते ती भरल्याशिवाय त्याच्या हातावर (भक्तिपंथाची) मुद्रा उठविण्यात येणार नाही असे त्याला सांगण्यात येते, तेव्हा त्याने हे पद देवाला उद्देशून लिहिले आहे.

अखिल धनवैभवाची देवी, जी लक्ष्मी तिचा जो स्वामी आहे अशा देवाला तो दोष देतो की, "तुला माझ्यासारख्या निर्धन माणसाकडून उकळलेल्या पैशावर अवलंबून रहावे लागते? व हे पैसे कशासाठी जबरदस्तीने घेतले जातात? तर त्यांना नुसता स्पर्श करून नंतर बंदोबस्तात कडीकुलपात घालून ठेवण्याच्या आनंदासाठीच ना?" पुढे तो देवाला त्याच्या असा कर वसूल करणाऱ्या (भक्त वा पंडे) लोकांबद्दलही ठपका देतो. तो म्हणतो, 'हे असा कर वसूल करणारे आलेल्या लोकांकडे फक्त वरवर पाहतात. कर भरू शकणारा श्रीमंत कोण आहे व कर भरू न शकणारा गरीब कोण आहे, हे पारखण्याची दृष्टीच त्यांना नाही.' जो देवाचा सच्चा निःस्वार्थी भक्त आहे तोच अशा प्रकारे देवाला उद्देशून बोलू शकेल.

कवि म्हणतो, 'हे कृष्णा, नरभो तुला पैसे देतो, तू ते खुशाल खर्च कर. ते तुझ्या मुठीत घट्ट धरून ठेव. अरे बाबा, तुझ्या मंदिराच्या कळसावर पांढरा शुभ्र ध्वज फडकत आहे. मला जर पहिल्यापासून माहीत असते की तू कपटी आहेस तर इतकी योजने दूर मी तुझ्याकडे कशाला आलो असतो? मी असे ऐकले होते की, साधूना मुद्राछाप फुकट मिळतो त्यामुळेच माझे मन उतावीळपणे तुला पाहण्यासाठी धावले. म्हणून ह्या तुझ्या पहारेकऱ्याना कृपा करून दूर कर व मला तुझे दर्शन घडू दे. कोणी मनुष्य संन्याशाचा वेष घेऊन आला की तू दुसऱ्या कशाकडेही पहात नाहीस व त्याच्या हातावर मुद्रा उठवतोस, पण माझ्या डोक्यावरची पगडी पाहून मुद्रा मिळण्यासाठी तू मला पैसे भरायला भाग पाडतोस? तू अशीच लोकांची परीक्षा करतोस. हे काळ्या (कृष्णा) मी थोडक्यात जे बोलतो त्याचा कृपा करून नीट अर्थ समजून घे. तू जाणून बुजून लोकांकडून आपला पराभव करवून घेतोस. खरे तर तुला कोणीही हरवू शकणार नाही. म्हणून हे हरि, तू आपला हट्ट सोडून दे. छोटालालच्या[२०] कृपेने नरभो म्हणतो की, ह्या तिळात आता जराही तेल नाही. तू माझ्याकडून घेऊन घेऊन काय घेणार? ज्या माळेने मी 'हरि हरि' असा जप करतो ती माझी जपमाळ हवी तर काढून घे."[२१]

## बापूसाहेब गायकवाड [ १७७९ ते १८४३ ]

हे महाराष्ट्रीय व बडोद्यात राहणारे. त्यांनी गुजराती भाषेत ज्ञान व वैराग्यपर पदे लिहिली आहेत. ते धीरोचे शिष्य होते व त्या वेळच्या परंपरेप्रमाणे अत्यंत विनम्रभावाने व निरभिमान वृत्तीने ते गुरूची सेवा करीत असत. इतकी सेवा की ते गुरूचा हुक्का सुद्धा तयार करून ठेवीत असत. त्यांनी काही ज्ञानविषयक पदेही लिहिली आहेत.

१८३४ मध्ये त्यांनी 'महिना' हे काव्य रचले, पण त्या वेळच्या इतर कवींप्रमाणे त्यात विरहव्यथेचे वर्णन करण्याऐवजी त्यानी प्रत्येक महिन्यात ब्रह्मानुभूतीने

आपल्याला जो अनुपम आनंद लाभतो त्याचे वर्णन केले आहे. त्यांची ब्रह्मज्ञानपर काही पदे आहेत, पण त्यात यमके, अनुप्रास ह्यांची इतकी गुंतागुंतीची योजना केलेली आहे की त्याचे तंतोतंत भाषांतर करणे शक्य नाही. मूळ गुजराती उताऱ्यावरूनच वाचकांना त्याची कल्पना करता येईल व त्यावरून बापूसाहेबांनी साधे शब्द वापरून त्यात कशी गेयता आणली आहे तेही समजेल.

" प्रथम सद्‌गुरुनो सत्संग साचो,
बीजो जे करो ते जाणो काचो
हरिनाम भूल्या एज पड्यो खांचो
माटे तमे सद्‌गुरुने निशदिन जाचो."

" एवुं समज्ये आवे पार
मळे सार, एक तार.
मटे खार, आधार
नेतिपार, विश्वाधार. "

नामरहित लेजो मानी, मानी के तेज ज्ञानी "[२२]

बापूसाहेबांनी आपल्या काही 'काफी'त वेदांत तत्त्वाचे सहज समजेल असे सुंदर विवेचन केले आहे. एका काफीत ते म्हणतात–

"मातीचा घडा पाण्याने भरलेला होता व सूर्याने त्यात प्रवेश केला होता. माझा घडा फुटून गेला व ज्याने माझा घडा फोडून टाकला त्याच्याशी मी किती भांडलो."

मी म्हणालो, " माझा सूर्य त्या घड्यात होता आणि मूर्खा तू तो फोडलास. माझा घडा फुटून गेला त्याचे मला काही फारसे वाटत नाही; पण माझा सूर्य नाहीसा झाला त्याचे काय ? त्याला आता मी कोठे शोधू ? मी त्याला कसा शोधू ?"[२३]

पण बापूसाहेब आपल्या 'राम राजियो' ह्या काव्यासाठी अधिक प्रख्यात आहेत. 'राजियो' हे मृत्यूनंतरचे शोकगीत[२४]; पण बापूसाहेबांनी आपल्या 'रामराजियो' मध्ये मानवाचे षड्‌रिपु काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर[२५] ह्याविषयी सविस्तर वर्णन केले आहे. गुजरातेत बऱ्याच ठिकाणी मृत्यूनंतर सामान्य 'राजिया'ऐवजी बापूसाहेबांचे 'रामराजियो' गाण्यात येत असे.

## भोजो [ १७८५ ते १८५० ]

भोजो आपल्या 'चाबखा' नामक (चाबकाचे फटके) काव्यांबद्दल प्रसिद्ध आहे. हे एक प्रकारचे गीत आहे. ह्यात दुष्ट प्रवृत्तीवर किंवा दुष्ट प्रवृत्तीच्या माणसावर द्वेषभावना न ठेवता, कवीने तडाखे हाणले आहेत. त्याप्रमाणेच साधू

अगर ईश्वराचे भक्त म्हणून मिरवणारे भोंदू लोक आणि समाजाचे धुरीण म्हणून म्हणवून घेणारे लोक ह्यांच्या ढोंगीपणावर व मानभावीपणावर कवीने कठोर प्रहार केले आहेत. तसेच त्या काळच्या समाजाच्या अपप्रवृत्तींवरही चाबकाचे फटके मारले आहेत.

त्याच्या काही 'चाबखां'ची सुरुवात अशी होते : "हे प्राण्या, ईश्वराची भक्ती कर म्हणजेच ईश्वरावर प्रेम कर, हा संसार हे एक स्वप्न आहे[२६] व ह्या जगातल्या 'बाबा' (बुवा अथवा साधू) लोकांकडे पहा. त्यांनी लोकांना फसविण्यासाठी व लुबाडण्यासाठी हा साधुवेष धारण केला आहे."[२७] 'भोजो' याने 'सेलैया आख्यान' नावाचे एक दीर्घ काव्यही लिहिले आहे. त्यात पुढील कथा आहे. शेठ सगाळशा, त्याची पत्नी व त्यांचा एकुलता एक मुलगा चेलैयो ह्यांची अघोरी साधूच्या[२८] वेषात येऊन देवाने इतकी भयंकर सत्त्वपरीक्षा केली त्याचे वर्णन आहे की ही सत्त्वपरीक्षा ऐकूनच आपले रक्त गोठून जाईल. ह्या तिघांची देवावर नितान्त श्रद्धा असते व त्याच्या बळावर ते ह्या कसोटीतून आनंदाने पार उतरतात आणि शेवटी देवाची त्यांच्यावर कृपा होते. हे 'सेलैया आख्यान' व 'काचबा-काचबानुं भजन' (कासव–कासवीचे भजन) ही काव्ये गुजरातेत कितीतरी दशके अतिशय लोकप्रिय होती.

चेलैयाची कथा मध्ययुगीन गुजराती साहित्यातील कितीतरी कवितांचा विषय बनली आहे. त्यांपैकी रतनदासाने लिहिलेली कविता उल्लेखनीय आहे. त्याची सुरुवात अशी : 'शेठ सगाळशा साधूंची सेवा करतो व त्या वाण्याचे लक्ष आपली प्रतिज्ञा तंतोतंत पाळली गेली की नाही हे पाहण्याकडे .'[२९]

भोजोने काही 'होरी'ही लिहिल्या आहेत. ह्या पदात वसंत ऋतूतील सौंदर्याचे व त्यामुळे मनाला होणाऱ्या आनंदाचे वर्णन आहे. होरीचा आरंभ असा आहे, 'हे नाथ अविनाशी, कृपा करून माझी विनंती ऐक. मी तुझी जन्मोजन्मीची दासी आहे.'[३०] ही 'होरी' फार प्रसिद्ध आहे.

## रणछोडजी दिवाण [ १७८५–१८४१ ]

ह्यांची बुद्धी अनेक कार्यक्षेत्रात चालत होती. तो कवी, इतिहासकार, मुत्सद्दी, राज्यकारभारी व लढवैय्या होता. तो जुनागढचा दिवाण होता. त्याने स्वत: अनेक लढायात भाग घेतला होता. त्याची मुत्सद्दी व कारभारी म्हणून सर्व काठेवाडभर कीर्ती पसरली होती. ब्रिटिशांनी सुद्धा त्याच्या धैर्याची व मुत्सद्दीपणाची वाखाणणी केलेली आहे.

त्यांना संस्कृत, हिंदी व फारसी भाषा येत होत्या. त्यांनी 'शिव माहात्म्य' हे व्रजभाषेत आणि 'तारीखे सोरठ' (याचे इंग्लिश भाषेत भाषांतर झाले आहे)

व ' रुकत्-ए-गुनगुन् ' (निरनिराळ्या पत्रांचा संग्रह) हे दोन ग्रंथ फारसी भाषेत लिहिले आहेत.

रणछोडजी हे शिव व शक्तीचे उपासक होते. त्यांनी ' शिवगीता ' लिहिली आहे व ' दुर्गासप्तशती 'चा गुजरातीत स्वैर अनुवाद केला आहे; पण ते आपल्या गरब्यांबद्दलच फार प्रसिद्ध आहेत. मध्यकालीन कवींमध्ये वल्लभ मेवाडो व रणछोडजी दिवाण हे असे दोन कवी आहेत की ज्यांच्या गरब्यांनी गुजराती स्त्रियांच्या मनावर आपला अधिकार गाजवला आहे.

## गिरधर [ १७८७–१८५२ ]

ह्याने 'तुलसी विवाह', 'राजसूय यज्ञ', 'अश्वमेध', 'गोकुळलीला', 'कृष्णलीला', 'राधाकृष्णना महिमा ' इत्यादी ग्रंथ लिहिले आहेत; पण तो आपल्या ' रामायण ' ह्या ग्रंथाबद्दल प्रसिद्ध आहे. त्याचे ' रामायण ' हे कशाचे भाषांतरही नाही किंवा रूपान्तरही नाही. ती एक स्वतंत्र निर्मिती आहे. मात्र त्यासाठी त्याने 'हनुमान नाटक' ' अग्निपुराण ', ' पद्मपुराण ' व ' तुलसीदास रामायण ' ह्यांतील घटनांचा आधार घेतला आहे. हे ' रामायण ' फार सोप्या भाषेत लिहिलेले आहे व वर्षानुवर्षे गुजरातेत घरोघर भक्तिभावाने त्याचे पठण केले जात असे.[३१]

ह्या काळातील दुसरे उल्लेख करण्यासारखे कवी म्हणजे रघुनाथदास व रावो भगत हे होत. रघुनाथदास हा आपल्या "ओधवजी! संदेशो कहेजो श्यामने"[३२] (ओधवजी ! कृपा करून हा निरोप कृष्णाला सांगा) ह्या सुंदर गरबीमुळे प्रसिद्ध आहे व रावो भगत पुढील अमर काव्य पंक्तीबद्दल प्रसिद्ध आहे. " बेडो बाई बुडतो तारो रे, अंबे आई, पार उतारो"[३३] (हे माते, ह्या बुडणाऱ्या नौकेला वाचव. हे अंबे आई, माझी नौका भवसागरातून पार नेऊन सोड.)

### तळटिपा

१. कृपया परिशिष्ट 'ह' पहा.
२. कहेतां नावे पार.
३. हिंदु म्हणजे भारतीय परंपरेप्रमाणे पुरुष जन्मभर अविवाहित राहू शकतो; पण स्त्री कधीही अविवाहित राहू शकत नाही.
४. भारतीय परंपरेप्रमाणे मुलामुलींची लग्ने आई-बापांनीच जुळवावयाची असा नियम आहे.

५. स्मशान– हिंदूना अग्निसंस्कार करण्याची जागा. अशी समजूत होती की स्मशानात भुते, चेटकिणी व इतर अमंगल पिशाच्च समंध वगैरे राहतात. अशा जागी संध्याकाळनंतर पुरुषसुद्धा जाण्याची हिम्मत करण्यास कचरतात.

६. कृपया अॅपेंडिक्स परिशिष्ट 'आय' पहा.

७. 'धोळा' हाही निःसीम भक्त होता व तो वल्लभचा भाऊ होता.

८. अन्न अति मोंघा हुवा, हो बहुचरी ! अधर्म व्याप्यो असाध्य,
को कोनी करणी जुवे, हो बहुचरी ! एक थकी एक अगाध,
उदर थकी उपजावियां, हो बहुचरी ! उभय तणो जे अंश,
ते तन पेट तजावियां, हो बहुचरी ! विक्रय कीधो वंश.

९. गौरी माता आपली भक्ती करणाऱ्या तरुण कुमारिकांना योग्य पती प्राप्त करून देऊन त्यांच्यावर कृपा करते, अशी मान्यता होती.

१०. "गोरमा ! घरडो के भरथार के मुजने आपियो रे, लोल,
गोरमा ! धिक्क कीधो अवतार, के शुं कहुं तुजने रे, लोला,

o o o

गोरमा ! मारूं थयुं जोबन के पियु बरवो थयो रे, लोल.
गोरमा ! सोळ मुने प्रत्यक्ष के एने हेंसी थयां रे, लोल.

o o o

गोरमा ! शियाळानी रात के स्वाद होये घणा रे, लोल.
गोरमा ! मूरख घरडी जात के जेवो गुंगणो रे लोल.

o o o

गोरमा ! जणतां न दीधी फांसी के विख दई मारती रे, लोल."
वरील दोन्ही गरब्यातील ह्या उताऱ्यांतील काही भागांचे भाषांतर स्व. कृ. मो. झवेरींच्या Milestones in Gujarati Literature ह्या पुस्तकातून साभार उद्धृत करून घेतले आहेत.

१०. हरिनो मारग छे शूरानो कायरनुं नहि काम जोने

११. हो वांसलडी ! वेरण थई लागी रे व्रजनी नारने.

१२. जीभलडी ! तने हरिगुण गातां आवडुं आळस क्यांथी रे ?

१३. श्रीकृष्णाचा पालक पिता.

१४. श्रीकृष्णाची पालक माता.

१५. 'योग'– चित्तवृत्तींवर संयम ठेवून असीम आनंदाची प्राप्ती करून देणारे शास्त्र.

१६. 'जेने राम राखे रे.'

१७. फूल्यो शुं फरे रे ? भूलो भवकूपमां पडयो.

१८. भांगी गई भवबेडीओ, उघडयां ब्रह्मभोवननां ताळां रे.

१९. अंबाडीए गजराज गळियो,
घोडाने गळी गयुं जीण,
वस्त्र उपर वाड सुकाणी,
समुद्र ने गळी गयुं फीण,
शशलो तो शाणो थईने रे
शार्दूलने नाखे पेटमां.

२०. 'छोटालाल' हे नरभेराम यांचे गुरू.

२१. नाणुं आपे नरभो रे, वावरजो छोगाळा !
गांठ मारजो ताणी रे, धोळी धजावाळा !
कपटी केशव जाणत तो शाने आवत पचास जोजन ?
सांभळ्युं श्रवणे, साधुने छापे छे माटे मळवा धश्युं मन,
दरशन द्योने रे, दूर करी पाळा.
भेख देखीने नजर नथी करता, छाप आपो छो हरि !
पाघडी भाळी छाप खावी छबीला ! परीक्षा तो एवी करी,
समस्या लेजो समजी रे, जे कही कानड काळा !
हारो छो जनथी, नथी हरवाता, माटे हरि ! हठ मेल,
कहे नरभो छोटालाल प्रतापे, नथी ए तलमां तेल.
लेवानुं मुज पासे रे, हरि हरि जपमाळा.

२२. प्रथम सद्‌गुरुनो सत्संग साचो,
बीजो जे करो ते जाणो काचो,
हरिनाम भूल्या ए ज पडयो खांचो,
माटे तमे सद्‌गुरुने निशदिन जाचो.
एवुं समज्ये आवे पार, मळे सार, एक तार,
मटे खार आधार, नेति पार, विश्वाधार,
नामरहित लेजो मानी, मानी के तेज ज्ञानी.

२३. घडे भर्युं पाणी रे, सूरज माहे आवी पडयो,
घटाकाश भास्युं रे, भाग्यो तेनी साथे लडयो.
घडामां मारो सूरज हतो ते भागी नाख्यो अल्या भूर !
घडो गयो तेनी चिंता नथी भाई (पण) नाशी गयो मारो सूर.
एने क्यांही देखुं रे, जुक्तिए शेमां जडयो... घडे भर्युं.

२४. गुजरातेत कोणाही हिंदूच्या मृत्यूनंतर जेव्हा त्याचे शव स्मशानात नेऊ लागतात तेव्हा घरातील व कुटुंबातील स्त्रिया वर्तुळाकार उभ्या राहून तालावर छाती कुटून-पिटून मृत व्यक्तीच्या मोठेपणाबद्दल व वैभवाबद्दल वर्णन करणारी गाणी म्हणतात. ह्या गाण्यांना 'राजिया' असे म्हणतात.

२५. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर.

२६. प्राणिया ! भजी लेने किरतार, आतो सपनुं छे संसार.

२७. जोई ल्यो जगतना बावा, धर्यो भेख धूतीने खावा.

२८. एक प्रकारचे हिंदू संन्यासी. त्यांचे जीवन अघोरी, अमानुष प्रकारचे असते.

२९. शेठ सगाळशा साधुने सेवे, वाणियो पाळे व्रत.

३०. नाथ ! मोरी अरज सुनो अविनाशी !
हुं तो जनम जनम तोरी दासी.

३१. गिरधरची देवाबरची भक्ती प्रखर व अढळ होती. जेव्हा तो उत्तर हिंदुस्थानातील तीर्थक्षेत्रांची यात्रा करीत होता तेव्हा त्याला राजस्थानातील श्रीनाथजीला जाण्याची इच्छा झाली; पण ज्या एका रंगीलालजी महाराजां-बरोबर (देवाच्या सेवेकऱ्याबरोबर) गिरधर त्या यात्रेला निघाला होता त्यांनीच त्याला तेथे जाण्याची मनाई केली. म्हणून मग श्रीनाथजीचे अखंड स्मरण करीत व त्याच्या नावाचा जप करीत यात्रेतच गिरधरने देह ठेवला.

३२. ओधवजी ! संदेशो कहेजो श्यामने

३३. बेडो बाई बुडतो तारो रे,
अंबे आई, पार उतारो रे.

प्रकरण सातवे

# अठरावे शतक ते एकोणिसाव्या शतकाचा पूर्वार्ध

[ १ ]

## स्वामिनारायण-संप्रदाय व त्याचे साहित्य

मध्यकालीन साहित्यात स्वामिनारायण-संप्रदायाचे साहित्य आपल्या निराळे पणाने उठून दिसते.

रामानंद हा ह्या संप्रदायाचा संस्थापक; पण त्याचा शिष्य सहजानंदस्वामी ह्यानेच ह्या संप्रदायास प्रतिष्ठा मिळवून दिली व सर्वसामान्य लोकात ह्याचा प्रचार केला.

## सहजानंदस्वामी [१७८१ ते १८३०]

हा उत्तर प्रदेशात अयोध्येजवळ छपैया येथे जन्मला. तो १८०१ मध्ये गुजरातेत आला. त्यावेळी धर्माबाबतची परिस्थिती अगदी असमाधानकारक होती. धर्माचे धुरीणत्व व सत्ता ब्राह्मणांचे हाती होती व ब्राह्मणांनी धर्माचा जवळ जवळ मक्ताच घेतला होता. भक्तिसंप्रदायाने जरी जाती, पंथ, स्त्री-पुरुष व समाजातील व्यक्तींचे स्थान ह्यात भेदभाव न ठेवता सर्वांना आपल्या संप्रदायाची द्वारे खुली करून दिली होती, तरी त्यांचे धार्मिक विधी, क्रियाकांड व समारंभ ह्यासाठी जो पैसा खर्च करावा लागे तो सर्वांना परवडण्यासारखा नव्हता. मागासलेल्या वर्गातील लोकांकडे कोणाचेच लक्ष नव्हते आणि त्यांची गरिबी, अज्ञान व योग्य सांस्कृतिक वातावरणाचा अभाव ह्यामुळे ह्या वर्गातील बरेच लोक अंधश्रद्धेने ग्रासले होते आणि त्यामुळे ते चुकीच्या व वाईट मार्गाचे अवलंबन करीत होते. विशेषत: खेडयापाडयातील लोक ह्याला बळी पडत होते.

सहजानंदाचे हृदय हे सर्व पाहून अतिशय द्रवले. म्हणून खेडीपाडी हीच त्याने

आपले कार्यक्षेत्र म्हणून निवडली व आपल्या संप्रदायाच्या तत्त्वांचा त्याने तेथेच प्रचार केला. हिंदु धर्माच्या निरनिराळ्या शाखा व पंथ ह्यातून जे काही चांगले होते ते घेऊन त्यांचे एक रसायनच त्याने बनविले आणि त्यामार्फत लोकांना पवित्र, शुद्ध, उपयोगी व निष्ठामय जीवन कसे जगावे ते दाखवून दिले. त्यांच्या संप्रदायाचे मुख्य दैवत श्रीकृष्ण हेच होते; पण इतर वैष्णवांच्या मंदिरातील पूजेच्या रीतीपेक्षा ह्या संप्रदायाची रीत अतिशय सोपी व साधी होती आणि त्यांची शिस्तही फार कडक होती.

ह्या संप्रदायाला ' उद्धव-संप्रदाय ' किंवा ' स्वामिनारायण-संप्रदाय ' म्हणून ओळखले जाऊ लागले. वडताल, गढडा व अहमदाबाद ही ह्या संप्रदायाची मुख्य केन्द्रे आहेत. ह्या पंथाच्या अनुयायांना ' सत्संगी ' ( चांगल्या व खऱ्या गोष्टींचे सोबती ) असे संबोधण्यात येऊ लागले. वैष्णवसंप्रदाय किंवा पुष्टिमार्ग यांच्या अनुयायांना वैष्णव असे म्हणत. त्यापेक्षा निराळे नाव ह्यांनी धारण केले.

ह्या संप्रदायाच्या साधूंना काही अतिशय कडक निर्बंधांचे कसोशीने पालन करावे लागते. सहजानंदस्वामी अथवा स्वामिनारायण ह्यांनी विचार, वाणी व वर्तन ह्याविषयी हे निर्बंध घालून दिले आहेत. साधूंनी पाळण्याचे नियम व 'सत्संगी' लोकांनी (सामान्य अनुयायांनी) पाळण्याचे नियम ' शिक्षापत्री ' ह्या ग्रंथात ग्रथित केले आहेत.

ह्या संप्रदायाच्या साधूंच्या विचारातील व आचारातील पवित्रपणा व साधेपणा, तसेच मागासलेल्या वर्गातील लोकांबद्दलचा त्यांचा आपलेपणा, ह्यामुळे कामकरी वर्ग आणि समाजातील खालच्या थरातील लोक ह्यांच्यावर ह्या संप्रदायाचा खोल परिणाम झाला व त्यांच्या मनावर ह्या संप्रदायाची पकड बसली. ह्या संप्रदायाचे पालन कोणीही करू शकतो. त्यात जात-पात कोणतेही भेदभाव नाहीत. ह्या संप्रदायाचे साधू व सामान्य लोक साधे, शुद्ध, प्रामाणिक व कष्ट करणारे असतात. ते दुर्व्यसने, मादक पदार्थांचे सेवन व विषयसुखोपभोग ह्यापासून दूर असतात आणि ह्या सर्वांमुळे लोकांच्या मनात त्यांच्याविषयी विश्वास उत्पन्न झाला व त्यामुळे लोकांचे नैतिक जीवन फारच सुधारले.

ह्या संप्रदायाने लोकांना आपली जमीन, धनदौलत, स्त्रिया व आपले जीवन ह्याच आपला फार पवित्र व महत्त्वाचा ठेवा आहे, असे मानून राहण्यास सांगितले आहे. वेश्यागमन, मांसाहार व सुरापान ह्यांचा निषेध केला आहे. साधूंना स्त्री-संपर्कापासून अलिप्त राहण्याचा कडक निर्बंध घातला, तरीपण त्यांनी स्त्रियांना पुरुषांपेक्षा कोणत्याही दृष्टीने कमी मानले नाही. उलट ह्या संप्रदायाने स्त्रियांना पवित्र मानले आहे व त्यांचा आदर करण्यास सांगितले आहे. त्याने विधवा विवाहालाही मान्यता दिलेली आहे.

ह्या संप्रदायातील अनेक साधू जरी गरीब, अशिक्षित व संतुष्ट वृत्तीच्या खालच्या वर्गातून आलेले आढळतात, तरी त्यांच्या साहित्यातून त्यांनी केलेली लोकांची सेवा अप्रतिम आहे. हे साहित्यिक देवाचे अनन्य भक्त आहेत. त्यांनी आपल्या साहित्यातून ज्ञान, वैराग्य व त्यागाची खरी शिकवण, संयमित व शांत वृत्तीने दिली आहे, आणि हेच ह्या संप्रदायाचे वैशिष्ट्य आहे. विशेष गोष्ट अशी की प्रपंचातील मालमिळकत, प्रतिष्ठा व सुखोपभोग ह्यांचे वैयर्थ्य उपदेशूनदेखील त्यांनी इतर कवींप्रमाणे वैराग्याला फाजील महत्त्व दिलेले नाही. मानवी जीवनाची महत्ता समजून शरीरधारणेस आवश्यक अशा गोष्टींना तुच्छ न लेखता व्यावहारिक व पारमार्थिक विकास साधणे अत्यंत जरुरीचे आहे, असे त्यांनी प्रतिपादिले. इतर कवी पूर्वीच्या परंपरेप्रमाणे शरीराला तुच्छ मानून त्याला कच्च्या मडक्याची उपमा देत; पण स्वामिनारायण-संप्रदायाच्या साधूंनी शरीर तुच्छ असले तरी आध्यात्मिक प्रगतीसुद्धा त्यामुळेच शक्य आहे, असे प्रतिपादित केले.

ह्या संप्रदायातील साधुकवींमध्ये पाच कवींची नावे ठळकपणे नोंदण्याजोगी आहेत. ते कवी पुढीलप्रमाणे आहेत --

## मुक्तानंद [ १७६१ ते १८३० ]

मुक्तानंद हा सहजानंदाचा वडील गुरुबंधू होता. असे म्हणतात की त्याने ज्ञान, वैराग्य व शृंगार ह्या विषयांवर जवळ जवळ ९००० पदे लिहिली आहेत. त्याशिवाय त्याचे 'ओधवगीता', 'सती गीता', 'शिक्षापत्री', 'धर्मामृत', 'प्रेमलीला' व 'रामलीला' हे ग्रंथही आहेत. त्याने मुकुंद अथवा मुकुंददास ह्या नावाने 'मुकुंद-बावनी' नावाचा ग्रंथही लिहिला. 'मुकुंदबावनी' म्हणजे मुकुंदाने लिहिलेली ५२ पदे. मुकुंद अथवा मुकुंददास हे मुक्तानंदाचे दीक्षा घेऊन सांप्रदायिक साधू[१] होण्या-पूर्वीचे नाव. तो मुख्यत्वे आपल्या ज्ञानविषयक कवितांबद्दल प्रसिद्ध आहे.

## ब्रह्मानंद [१७७२ ते १८४९]

ब्रह्मानंदाने चारणी[३] छंदांचा पद्धतशीर अभ्यास केलेला होता व त्याला गुजराती, चारणी व हिंदी ह्या तीन भाषा येत होत्या.

त्याने गुजराती कविता ' ब्रह्मानंद ' ह्या नावाने लिहिल्या. चारणी कविता ('चारणी' ही चारण लोकांची बोलीभाषा. चारण हे दरबारी लौकिक कवी त्यांच्या छंदातील कविता) 'लाडू'[४] ह्या नावाने व हिंदी कविता 'श्रीरंग' ह्या नावाने लिहिल्या. त्याने जवळ जवळ ८००० पदे लिहिली असे म्हणतात. त्याच्या एका पदाची पहिली ओळ ' एक दिन शशि अति उजास '[५] अशी असून ते पद 'चर्चरी'[६] छंदात लिहिलेले आहे व मावदानजी नावाच्या सत्संगीने गायिलेले आहे. इ. स. १८२६ ते १८३४ दरम्यानच्या काळात ह्या पदाने हजारो लोकांना आकर्षित केले होते.

त्यांची काही पदे—उदाहरणार्थ ज्याची सुरुवातीची ओळ अशी आहे– 'आ तनरंग पतंगसरिखो जाता वार न लागे जी।'[७] यासारखी पदे गुजराती कवितेच्या चाहत्यांना वर्षानुवर्षे फार आवडती झाली होती. ज्ञान व वैराग्यविषयक पदांशिवाय त्याने 'दानलीला', 'कृष्णकीर्तन' ह्यांविषयीची पदे व शृंगारविषयक पदेही लिहिली आहेत; पण ब्रह्मानंदाचे विशेष कौशल्य मात्र त्याच्या बोधपर कवितांत दिसून येते.

## प्रेमानंदस्वामी [ १७७९ ते १८४५ ]

सहजानंदस्वामी याला प्रेमानंद सखी अथवा प्रेमसखी[८] असेही संबोधत असत. भक्ती, ज्ञान व शृंगारविषयक पदांव्यतिरिक्त या प्रेमसखीने सहजानंद-स्वामींचा[९] वियोग झाल्यावर त्याविषयी अतिशय हृदयस्पर्शी पदे लिहिली आहेत. त्याचा आवाज फारच गोड होता व त्याला संगीताचे सखोल ज्ञान होते. त्याचे पुढील पद ऐकून त्याच्या श्रोत्यांच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. ते पद "वंदु सहजानंद रसरूप अनुपम सारने जो।"[१०] असे आहे. ह्या पदातून विरहव्यथेने व्याकुळ झालेल्या हृदयातील भावना सुंदर रीतीने प्रगट झाल्या आहेत. प्रेमसखीने 'तुलसी-विवाह' व 'थाळ' ही काव्ये रचिली आहेत. 'थाळ'मध्ये गुजरातेतील विवाहादि मोठ्या समारंभाच्या वेळी ताटात (थाळीत) वाढलेल्या उत्कृष्ट भोजनातील विविध रुचकर मिष्टान्नांचे वर्णन केलेले आहे.

## निष्कुलानंद [ १७६६ ते १८४८ ]

याने ३००० पदे रचली आहेत. त्यांचे मुख्य विषय त्याग व वैराग्य आहेत. त्याची पुढील पदे—*"जननी जीवो रे गोपीचंदनी (जेणे) पुत्रने प्रेर्यो वैराग्यजी।"*[११] तसेच "त्याग न टके रे वैराग्य विना"[१२] आणि ह्यासारखी काही इतर पदे रस्त्यावरून फिरणारे साधू-संन्यासी व भाट-चारण भिक्षा मागताना गात असत.

ह्या पदांव्यतिरिक्त निष्कुलानंदांनी 'भक्त चिंतामणि' 'धीरजाख्यान' ही काव्ये रचली आहेत; पण त्याचे खास वैशिष्ट्य वैराग्यपर कवनातच आहे.

## देवानंद

देवानंदाने भक्ती व वैराग्यपर बरीच पदे लिहिली आहेत. साधू-संन्यासी व रस्त्यावरून भटकणारे भिक्षेकरी भिक्षा मागताना त्याची पदे म्हणत असत. त्याचे "ईश्वरावर दृढ प्रेम (भक्ती) करा, येथून जाताना सर्व मालमत्ता येथेच टाकून द्यायची आहे. मृत्यूच्या वेळी आपण एकटेच आहोत. आपणाला त्यावेळी कोणी मित्र, आप्तबांधव असत नाहीत." ह्या अर्थाचे पद[१३] एके काळी सर्वतोमुखी झाले होते. देवानंदाने 'गरबी' व 'चाबखा' ही सुद्धा लिहिली आहेत. तो दलपतरामाचा गुरू होता व अशा रीतीने तो जुन्या व नव्या काळाला जोडणारा दुवाच ठरतो.

[ २ ]

## ह्या युगातील स्वामिनारायण-संप्रदायाव्यतिरिक्त इतर कवि

### रणछोड [ १८०४ मध्ये हयात ]

हा 'रामायण', 'राधाविवाह' व 'रणछोडजीनो गरबो' ह्या रचनांबद्दल ख्यातनाम आहे. 'रणछोडजीनो गरबो' ह्या गरब्यात रणछोडजी (श्रीकृष्ण) हा आपला नम्र प्रेमळ भक्त बोडाणा ह्याच्यासाठी द्वारका सोडून डाकोरला येतो त्याचे वर्णन आहे. हा गरबा आजसुद्धा गाण्याची प्रथा आहे. रणछोडची विशेष ख्याती मात्र 'अन्नदेव-स्तोत्र' ह्यामुळे आहे. ह्यात अन्नस्वरूपी देवाचा महिमा गायला आहे. नरसिंह, प्रेमानंद व शामळ ह्यांनीही आपल्या काव्यात 'मूठभर तांदुळा'ची अमाप स्तुती केली आहे. कारण त्या शिवाय ह्या जगात कोणतीच गोष्ट— देवाची भक्तीसुद्धा—शक्य होणार नाही; पण मध्ययुगीन साहित्यात रणछोड हा असा एकच कवी आहे की ज्याने प्रत्यक्ष अन्नाला संबोधूनच कविता केली आहे. अन्न हे प्रत्यक्ष देवच आहे व बाकीचे सर्व पदार्थ त्याच्या अंकित आहेत, असे तो त्यात म्हणतो. (परंतु) हे काही एखादे विनोदी किंवा केवळ गमतीचे काव्य नाही, एवढे मात्र वाचकांनी लक्षात ठेवले पाहिजे.

ह्या काव्याचा भावार्थ असा आहे –

"हे अन्नदेवा, माझा पहिला प्रणाम तुला. सकाळच्या प्रहरी लहान मुले झोपेतून जागी झाली की ती रडून ओरडून त्यांच्या आईपाशी पहिल्याने काहीतरी खायला मागतात. कोणालाही वेळेवर खायला मिळाले की त्याला कसे प्रसन्न व स्वस्थ वाटते; पण अन्न मिळायला थोडासा जरी विलंब झाला तरी माणूस कमजोर व दुबळा बनून जातो; मग तो दुसऱ्याशी बोलताना चिडतो, संतापतो, अभ्यासात त्याचे मन लागत नाही, त्याला भोवळ येऊ लागते व मरगळून गेल्यासारखे होते. एकादशी[१४] १५–१५ दिवसांनी एकदाच येते व लोक ती पाळतातही; पण त्या रात्री त्यांना स्वप्नेसुद्धा अन्नाचीच पडतात व ते उत्सुकतेने सकाळ होण्याची वाट पहात राहतात. जो स्वतःला सर्वांत बलवान मानतो अथवा जो खरोखरच सर्वांपेक्षा बलवान असतो, त्यालासुद्धा जर तुझी प्राप्ती वेळेवर झाली नाही तर तोसुद्धा अगदी मरगळून जातो. त्याचा शक्तिपात होतो. तेहतीस कोटी देव[१५] सुद्धा हे अन्नदेवा, तुझीच पूजा करतात."

रणछोड म्हणतो– "हे अन्नदेवा, खरोखर प्राणिमात्राची प्रत्येक कृती किंवा हालचाल तुझ्यावरच अवलंबून आहे."[१६]

[ ३ ]

## दयाराम [१७७६ ते १८५२]

मध्यकालीन गुजराती साहित्यातील प्रमुख कवींपैकी शेवटचा हा मोठा कवी. त्यावेळच्या दुसऱ्या कोणत्याही कवीच्या जीवनापेक्षा दयारामच्या जीवनाविषयी बरीच अधिक माहिती उपलब्ध आहे. तरी त्याच्या नावाशी काही दन्तकथा निगडीत झालेल्या आहेतच.

दयारामाचा जन्म नर्मदेच्या काठच्या चांदोद ह्या गावी १७७६ मध्ये झाला. त्याचे वडील प्रभुराम त्याच्या वयाच्या १० व्या वर्षी निवर्तले व त्यानंतर दोन वर्षांनी त्याची आई महालक्ष्मी (राजकोर) ही कालवश झाली.

तो १३ वर्षांचा असताना योगायोगाने त्याची डाकोरच्या इच्छारामभट्टजी ह्याच्याशी भेट झाली. ह्या भेटीचा त्याच्या कोमल मनावर इतका प्रभाव पडला आणि त्याच वेळी त्याने निश्चय केला की आपण ह्या संसाराच्या फंदात कधीही पडावयाचे नाही व आपला देवाधिदेव जो श्रीकृष्ण त्याची भक्ती करण्यातच आपले आयुष्य व्यतीत करावयाचे.

काही दिवसांनी त्याच्या कानावर आले की आपले मामा आपले लग्न जमविण्याच्या खटपटीत आहेत, तेव्हा तो घरातून पळून गेला. पूर्ण १२ वर्षे तो सबंध भारतभर फिरला व त्याने प्रत्येक मुख्य तीर्थधामाची यात्रा केली.

ही सर्व यात्रेची ठिकाणे त्याने पुन्हा दोन वेळा पाहिली. त्याने आपल्या आयुष्याची २५ वर्षे प्रवास करण्यात घालविली. त्यामुळे त्याला बरीच ठिकाणे, क्षेत्रे पहायला मिळाली; तसेच जीवनाचे विविध पैलू त्याने पाहिले व भारताच्या अनेक भाषांशी त्याचा परिचय झाला. दयारामाने गुजराती, हिंदी व मराठी भाषेत कविता लिहिल्या आहेत.

जेव्हा तो प्रवास करीत नसे तेव्हा तो चांदोद गावी अथवा जवळच्या डभोई ह्या लहान शहरात रहात असे व तेथेच ९ फेब्रुवारी १८५२ मध्ये त्याचे निधन झाले. तो शेवटची १७ वर्षे डभोईत रहात होता.

दयारामाच्या मृत्यूच्या वेळी ब्रिटिश हे हिंदुस्तानात आलेलेच होते. इंग्रजी शिक्षणाच्या शाळा सुरू झाल्या होत्या. 'मुंबई समाचार', 'ज्ञानप्रसारक' ही गुजराती वृत्तपत्रे व अँग्लोइंडियन वृत्तपत्र 'चाबूक' ही प्रसिद्ध होऊ लागली होती. 'दि गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी' आणि 'बुद्धिवर्धक सभा' ह्यांनी आपले कार्य सुरू केले होते आणि सामाजिक, सांस्कृतिक व साहित्यिक बाबतीत गुजरातमध्ये नवी स्पंदने उत्पन्न झाली होती.

पण दयारामाची मनोवृत्ती बाळपणापासून निराळ्याच साच्यात घडलेली

असल्यामुळे ह्या सर्व घडामोडींचा त्याच्यावर काहीही परिणाम झाला नाही. त्याच्या मृत्यूबरोबरच गुजराती साहित्याचा मध्यकालही संपुष्टात आला.

प्रेमानंद व शामळ यांप्रमाणेच दयारामाची साहित्यनिर्मिती विपुल व बहुरंगी आहे. दयारामाने पदे[१७], आख्याने[१८], महिना[१९], चरित्रकाव्ये[२०], संवाद[२१], गरबे व गरबी लिहिली आहेत. त्याव्यतिरिक्त त्याने 'रसिकवल्लभ', 'संप्रदायसार', 'रसिकरंजन' इ. पुष्टिमार्गी तत्त्वे विशद करणारी काव्ये आणि 'प्रबोध-बावनी', 'प्रश्नोत्तर-मालिका' व 'भक्तवेल' ही बोध व भक्तिपर काव्येही लिहिली आहेत. त्याने हिंदीत 'सत्सैया' हे काव्य लिहिले आहे. त्याने काही गद्यरचनाही केलेली आहे.

**१) रसिकवल्लभ–**

पुष्टिमार्गातील तत्त्वांचे सविस्तर व विशद वर्णन करणारी ही दीर्घ कविता म्हणजे दयारामाच्या तत्त्वज्ञानाची चावीच असून त्याच्या सर्व काव्यकृतीत ह्याच तत्त्वज्ञानाचा स्रोत वाहात आहे.

**२) मीरा-चरित्र–**

ह्या लहानशा सुंदर कवितेत मीराबाईच्या जीवनातील चमत्कार व अद्भुत प्रसंग वर्णिले आहेत. गुजरातीत मीराबाईच्या चरित्रावर कविता लिहिणारा दयाराम हा पहिला कवी आहे.

दयारामची विशेष ख्याती त्याने रचलेल्या 'गरबीं'बद्दल आहे.

**३) गरबी–**

ज्याप्रमाणे नरसी मेहताची 'प्रभातिया', अखोचे 'छप्पे', वल्लभचे 'गरबे', प्रीतमची 'पदे', धीरोची 'काफी', बापूसाहेबांचे 'राजिया', भोजोचे 'चाबखा' त्याप्रमाणे दयारामाच्या 'गरबी' खास उल्लेखनीय आहेत.

'गरबी' लिहिणारा दयाराम हा पहिला कवी नाही. नरसी मेहता, भालण, प्रेमानंदस्वामी व दुसऱ्या काही कवींनी पूर्वी 'गरबी' रचल्या होत्या; पण दयारामानेच 'गरबी'ला पूर्ण स्वरूप देऊन तिला उच्चकोटीला पोहोचविले. त्याच्या बऱ्याच उत्कृष्ट रचना भावपूर्ण काव्यांचे वा गीतांचे नमुनेच आहेत.

दयारामाच्या 'गरबी'मध्ये नवविधा भक्तीचे[२२] व अष्टनायिकांचे[२३] सुंदर चित्रण झालेले दिसून येते. एवढेच नव्हे तर मानवमात्राच्या अंतःकरणाचे सत्य-चित्र रेखाटण्यात दयारामाची सिद्धहस्तता दिसून येते. दयारामाच्या गरबीमध्ये राधा, कृष्ण, व्रजांगना गोपी, बांसरी व वृंदावन ह्यांचे भरपूर उल्लेख आहेत. त्याच्या गरबीतील मुख्य वस्तू म्हणजे राधाकृष्णाचे प्रेम. ह्या प्रेमातील शृंगार कधी 'संयोग-शृंगार' आहे तर कधी 'विप्रलंभ' म्हणजे 'वियोग-शृंगार' आहे, राधेच्या हृदयातील भावविश्व दयारामाने जितके स्पष्टपणे व कुशलतेने रंगविले

आहे तितके कृष्णाचे भावविश्व उत्कटपणे रंगविलेले नाही. राधेच्या हृदयातील उत्कट प्रेमाच्या निरनिराळ्या छटांचे–आर्तता, ईर्ष्या, कोप, अभिमान, क्षमा, पश्चात्ताप, धिक्कार वगैरेचे–जितके सुंदर वर्णन करता येईल तितके त्याने केले आहे.

खेळकर विनोद व मधुरता हे दयानंदाच्या काव्याचे मुख्य विशेष होत. 'लोचनमननो झगडो' (डोळे व मन ह्यांचे भांडण) यामध्ये गोपींची विरहव्यथा, गोपींचे मन व डोळे ह्यांच्या भांडणाच्या रूपाने, फार सुंदर रीतीने व्यक्त केलेली आहे. ज्या क्षणी गोपीने श्रीकृष्णाला पाहिले त्याच क्षणी तिचे मन त्याच्या आधीन झाले. मनात सारखा कृष्णाचाच ध्यास आहे; पण तो प्रत्यक्ष कोठेच दिसत नाही ! म्हणून गोपीचे डोळे मनाशी भांडण उकरून काढतात व म्हणतात, " तू आमचा विश्वासघात केला आहेस. कारण खरोखर डोळ्यांमार्फतच मनाची श्रीकृष्णाशी[२४] ओळख झाली व आता मन मात्र डोळ्यांनी आपल्यावर काय उपकार केले आहेत याची जराही पर्वा न करता कृष्णावर आपला एकट्याचा अधिकार चालवीत आहे." मन ह्या आरोपाला उत्तर देते, "मी निःसंशय नेहमी कृष्णाबरोबरच आहे; पण जोपर्यंत मी तुमची त्याच्याशी भेट घडवून आणणार नाही तोपर्यंत मला जराही स्वस्थता-शांती लाभणार नाही."[२५]

कृष्णाने राधेला 'शशिवदनी' असे संबोधिले तेव्हा राधेने आपला तीव्र रोष व्यक्त केला आहे, त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे. राधा म्हणते, "हे सखि, मी आता त्या नंदकुमाराशी कधीही बोलणार नाही. त्याने मला 'शशिवदनी' म्हटले त्याच क्षणी माझा संताप अनिवार झाला. चंद्रबिंबावर तर कलंक (डाग) असतो व दर सहा महिन्यानी (चंद्रग्रहणात) राहू त्याला गिळून टाकतो. चंद्र प्रतिपक्षी वाढत जातो व क्षीण होत जातो आणि नेहमी पूर्ण तेजाने तळपत नाही. 'शशिवदनी' म्हणून त्याने मला चंद्राच्याच पंक्तीला बसविले आहे."[२६]

आपल्या 'रंगव्यत्यय' (रंगाची अदलाबदल) ह्या काव्यात राधा थट्टेने कृष्णाला आपल्यापासून दूर राहण्यास व आपल्याला स्पर्श न करण्यास बजावते. कारण ती म्हणते, "तुला जर मी माझ्या शरीराला स्पर्श करू दिला तर माझा रंग काळा होईल."[२७] त्याबरोबर कृष्ण ताबडतोब तिला एक सुंदर उपाय सुचवतो. तो म्हणतो, "असं होय ? तर मला पुन्हा एकदा आलिंगन दे म्हणजे पुन्हा रंगाची अदलाबदल होईल. माझा काळा वर्ण मला पुन्हा प्राप्त होईल व तू पुन्हा गोरी होशील."[२८]

ही दयारामाच्या खेळकर विनोदाची काही उदाहरणे आहेत. त्यावरून आपल्याला संस्कृत सुभाषितांची[२९] आठवण होते. तसेच व्रजभाषेचा कवी सूरदास आणि गुजरातच्या भक्तिपरंपरेतील नरसिंह मेहता व मीराबाई यांचीही आठवण

होते; पण दयारामाच्या ह्या काव्यातील त्याप्रमाणेच इतर काव्यातील नादमधुर शब्दयोजना मात्र खास त्याची स्वत:चीच आहे.

दयारामाच्या 'गरबी'च्या सुरुवातीच्या ओळी नेहमीप्रमाणे फार आकर्षक आहेत. अनेक गरबींचा आरंभ पुढे दिलेल्या भावार्थाच्या ओळींनी होतो. "माझ्या लाडक्या बिहारी, तू जरा थांबलास तर मी तुला काहीतरी सांगणार आहे."[३०] "माझ्या प्रियतमाने माझ्यात काय पाहिले ते मी कसे सांगू ?[३१] मी आजपासून काळ्या रंगाच्या कोणत्याही वस्तूजवळ जाणार नाही.[३२] प्रेमाचा अंश घेऊन जो जन्माला येतो त्याच्याच हृदयात प्रेमाचे वास्तव्य असते."[३३] ह्या गुजराती साहित्यातील अत्युत्तम पंक्ती आहेत.

ह्या काळातील इतर कवींच्या उल्लेखनीय ग्रंथांमध्ये पुढील पुस्तकांची नोंद केली पाहिजे.

### १) विमल प्रबंध (१५१२)–

लावण्यसमय कवि-रचित हे विमलशाचे ९ अध्यायात लिहिलेले चरित्र आहे. विमलशा हा पहिला भीमदेव ह्या राजाचा मंत्री होता व तो कलांचा महान भोक्ता व आश्रयदाता होता. माउंट आबूच्या पहाडावरील त्याने बांधून घेतलेली मंदिरे हे शिल्पशास्त्राचे उत्कृष्ट नमुने आहेत. ह्या प्रबंध ग्रंथाचे ऐतिहासिक महत्त्व फार नाही व त्यात उच्च साहित्यिक गुणही नाहीत; पण ह्या ग्रंथावरून त्या काळातील सामाजिक व्यवस्थेची, जातिभेद, उद्योगधंदे, स्त्रिया व पुरुष ह्यांच्या शरीरावरील मंगल व अमंगल चिन्हे, शुभ व अशुभ शकुन, ज्योतिषशास्त्र, लढायांची रीत व शस्त्रास्त्रे वगैरेंची बहुमोल माहिती आपल्याला मिळते.

### २) रूपचंदकुंवर रास (१५८१)–

नयसुंदर-लिखित ह्या रासात उज्जयिनीच्या एक व्यापाऱ्याचा मुलगा रूपचंद व उज्जयिनीत राहण्यासाठी आलेल्या गुणसेनाची मुलगी 'सोहाग' ह्यांच्या प्रेमाची कथा वर्णिली आहे. सोहागने अविवाहित राहण्याचा निश्चय केलेला होता; पण ती १७ वर्षांची झाल्यावर आपल्या रूप व बुद्धिमत्तेला योग्य असा जोडीदार मिळावा अशी तिला तळमळ लागली. हे गुण तिला रूपचंदात दिसले, कारण तिचा एक कूटप्रश्न त्याने सोडविला. तेव्हा तिला तोच सुयोग्य वर आहे असे स्वभाविकपणे वाटते; पण तो कूटप्रश्न अथवा कोडे इतके अवघड होते की राजा विक्रमसुद्धा ते सोडवू शकला नाही. सगळे प्रयत्न करून विक्रम राजाही थकल्यावर तो आपल्याच मुलीचे (राजकन्येचे) लग्न रूपचंदाशी लावून देतो व अशारीतीने रूपचंदाने सोहागचे कोडे कसे सोडवले ते आड मार्गाने जाणून घेण्याची त्याची इच्छा असते. आपल्या सौंदर्याने व पतिभक्तीने संतुष्ट झालेल्या रूपचंदाकडून

राजकन्या ते रहस्य काढून घेण्यात यशस्वी होते. ती ते रहस्य आपल्या पित्याला सांगते. राजा विक्रम रूपचंदाच्या बुद्धिमत्तेवर इतका खूष होतो की तोही त्याच्या बदल्यात रूपचंदाचे सोहागशीही थाटामाटाने लग्न लावून देतो. मात्र ह्या 'रास'चा कवी स्वतः जैन असल्याने त्याने आपल्या कथेच्या शेवटी विक्रमाने जैनधर्म स्वीकारला व नायक रूपचंदानेही संसाराचा त्याग करून जैन धर्माची दीक्षा घेतली, असे लिहिले आहे.

ह्या कथेत अभिजात संस्कृत कवींच्या पद्धतीची आलंकारिक भाषेतील वर्णने आहेत. स्व. कनैय्यालाल मुनशी म्हणतात, "ह्या काव्यात त्या (ठिकाणी कवीच्या प्रदेशात) बोलल्या जाणाऱ्या भाषेतील व परदेशी भाषेतील शब्दांचा फार भरणा आहे. तसेच भालणपेक्षाही ह्या काव्याची भाषा जास्त आलंकारिक आहे. काही ठिकाणी मात्र त्यात संगीतमयता व भव्यता भरलेली आहे.

**३) नलदमयंती रास (१६०९)–**

कवी नयसुंदर-रचित हा रास 'नलायन' ह्या काव्यावर आधारित आहे. 'नलायन' हे वर्णनात्मक काव्य संस्कृतमध्ये आहे. माणिक्यचंद्राने ते सन १२२० मध्ये लिहिले. नयसुंदरला संस्कृत, प्राकृत, हिन्दी व उर्दू भाषा अवगत असल्यामुळे तो मूळ संस्कृत काव्यातील सौंदर्य व कोमलता आपल्या काव्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात आणण्यात यशस्वी झाला आहे.

## तळटिपा

१. त्यावेळच्या रीतिरिवाजाप्रमाणे आणि काही हिंदूंच्या जुन्या धर्मग्रंथाना अनुसरून साधारणपणे विधवाना पुनर्विवाह करता येत नसे.

२. असा रिवाज होता की हिंदू साधू व संन्यासी संसारत्याग केल्यावर नवे नाव धारण करीत असत. कदाचित भूतकाळाशी कोणत्याही तऱ्हेचा संबंध न ठेवण्याची ही खूण असावी.

३. चारणी– आपल्या काव्यात चारण कवी उपयोगात आणीत असलेले छंद. जाहीर ठिकाणी गाण्यास हे छंद फार योग्य असत.

४. त्याने संसाराचा त्याग केला त्यापूर्वी त्याचे नाव लाडू बारोट असे होते.

५. 'एक दिवस चंद्र अति उज्ज्वल दिसत होता.'

६. ह्या पदाचे बरेचसे सौंदर्य मनाची पकड घेणाऱ्या नादमाधुर्यावर आणि आणि छंदाच्या गती व लयीवर अवलंबून असते. ते सौंदर्य दुसऱ्या इतर कोणत्याही भाषेत आणणे अशक्य असते.

७. 'ह्या शरीराचा रंगढंग पतंग-फुलपाखरासारखा आहे. तो नाहीसा व्हायला वेळ लागत नाही.'

८. असा रूढ रिवाज होता की, वैष्णव भक्त स्वतःला स्त्री समजत असत व फक्त एका श्रीकृष्णालाच पुरुष मानीत असत. असे सांगतात की, मीराबाई व्रजला गेली होती व तेथे तिने एक प्रख्यात वैष्णव आचार्य जीवगोस्वामी ह्यांची भेट घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. मीराबाईला असे सांगण्यात आले की, गोस्वामी स्त्रियांची भेट घेत नाहीत. तेव्हा मीराबाईने कवितेच्या दोन पंक्ती रचून त्यांच्याकडे पाठविल्या. त्यांचा भावार्थ असा होता—
"आतापर्यंत मी खात्रीपूर्वक असे मानीत होते की, 'व्रजा'त श्रीकृष्ण हा एकटाच पुरुष आहे. तुम्ही वृंदावनात राहात असूनसुद्धा स्वतःला अजून पुरुष मानता ! ठीक, तुमच्या विवेकबुद्धीची धन्य आहे."
"आज लगी हुँ एम जाणतीती, जे व्रजमां कृष्ण पुरुष छे एक.
वृंदावन वसी हजी पुरुष रह्या छो तेमां धन्य तमारो विवेक."
असे म्हणतात की, गोस्वामींना मीराबाईच्या म्हणण्याचा अर्थ समजला व त्यांनी मीराबाईला भेटण्यास बोलावले.

९. स्वामिनारायण-संप्रदायाचे अनुयायी सहजानंदस्वामींना परमदेव – साक्षात् श्रीकृष्णच—असे मानतात. प्रेमसखी-गोपीचा श्रीकृष्ण म्हणजे सहजानंदस्वामी होते.

१०. "जो सहजानंद रसरूप अन् अनुपम तत्त्वस्वरूप आहे, त्याला वंदन असो."

११. "जिने पुत्र गोपीचंद याला वैराग्याची प्रेरणा दिली त्या (गोपीचंदाच्या) जननीला उदंड आयुष्य लाभो."

१२. "त्याग वैराग्याविना टिकतच नाही."

१३. कर प्रभुसंगाथे दृढ प्रीतडी रे,
मरी जावुं मेली धनमाल,
अंतकाळे सगुं नहि कोईनुं रे.

१४. चांद्रमासाच्या प्रत्येक पंधरवड्यातील (पक्षातील) अकरावा दिवस. त्या दिवशी उपवास व प्रार्थना करावयाची असते.

१५. १ कोटी म्हणजे १०० लक्ष. तेहतीस कोटी देव आहेत अशी हिंदूंची मान्यता आहे; पण 'कोटी' म्हणजे 'वर्ग' 'प्रकार' असाही अर्थ आहे.

१६. तमने आराधुं अन्नदेव! परथम करुं तमारी सेव,
सवार पहोरे सूतां उठे, बकोर करतां बाळ;
माता पासे खावा मांगे परथम प्रातःकाळ. तमने...
पहोर दहाडामां आवी मळे तो काया करे कल्लोल;
माणस थाय छे मरवा जेवुं घडी थाय जो सोळ. तमने...
वात करता वढी पडे छे, भणतां जाय छे भूली;
आंखडीए अंधारां आवे, काया थई जाय लूली. तमने...
पंदर दिने एकादशी आवे, व्रततणो महिमाय
रात पडेने सपनुं लागे, वाहाणुं क्यारे वाय ? तमने...
बळियामां जे बळियो कहावे, जे छे सहुथी बळियो;
ते जो पामे त्रीजे पहोरे, धूळ थईने ढळियो-तमने...
तेत्रीश कोटि देव मळीने सहू को तमने पूजे;
कहे रणछोड, अन्नदेव मळे तो सर्व वातो सूझे. तमने...
('बृहत् काव्यदोहन,' ग्रंथ २, पृ.७६९)

१७. 'बाळलीला', 'रूपलीला', 'दानलीला', 'प्रेमरसगीता,' 'प्रेमपरीक्षा', 'व्रीहाविलास' वगैरे.

१८. 'अजामिलाख्यान', 'वृत्रासुर-आख्यान' वगैरे.

१९. 'रसियाजीना महिना', 'बार मासनी गरबी', 'वहालाजीना महिना', वगैरे.

२०. 'मीरा चरित्र', 'नरसिंह मेहतानी हुंडी' वगैरे.

२१. 'हनुमान गरुड संवाद', 'मन-मति संवाद' वगैरे.

२२. श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चना, वंदना, दास्य, सख्य, आत्मनिवेदन.

२३. 'स्वाधीनभर्तृका', 'वासकसज्जा', 'विरहोत्कंठिता'
'विप्रलब्धा,' 'खंडिता', 'कलहांतरिता,' 'अभिसारिका',
'प्रोषितभर्तृका', या संस्कृत साहित्यशास्त्रातील अष्टनायिका.

२४. भलुं कराव्युं में तने सुंदरवर संजोग;
हुंने तजी तुं नित्ये मळे,
हुं रहुं दुःखविजोग.

२५. व्रजमां वालाजी कने हुं वसुं छुं, नेण !
पण तुजने वणमेळवे हुं ना भोगवुं चेन.

२६. हावा सखी हुं नहि बोलुं रे, कदापि नंदकुंवरनी संगे,
मने शशीवदनी कही छे रे, त्यारनी दाझ लागी छे अंगे.
चंद्रबिम्बमां लांछन छे, वळी राहू गळे खटमासे रे,
पक्षे वधे ने पक्षे घटे, कळा नित्यना पूरण प्रकाशे.
चंद्रवदनी कही तो ठर्या हुं ने चंद्र एक राशे रे.

२७. कहानकुंवर काळा छो, अडतां हुं काळी थई जाउं.

२८. फरी मळतां रंग अदलाबदली, मुज मोरो, तुज तोरो.

२९. सुभाषिते—महत्त्वाची व अनेकवेळा श्लेषपूर्ण अशा पद्यात सांगितलेल्या उक्ती.

३०. उभा रहो तो कहुं वातडी, बिहारीलाल!

३१. हुं शुं जाणुं जे वहाले मुजमां शुं दीठुं ?

३२. श्याम रंग समीपे न जावुं मारे आजथकी.

३३. जे कोई प्रेमअंश अवतरे प्रेमरस तेना उरमां ठर.

## प्रकरण आठवे

# एकोणिसावे शतक : समान्तर वाङ्मयीन प्रवाह

एकोणिसावे शतक हे गुजराती साहित्यात एक महत्त्वाचा टप्पा आहे. ब्रिटिशांचे भारतात आगमन झाले तो प्रसंग, ते १९४७ साली भारतातून निघून गेले ह्या प्रसंगा इतकाच महत्त्वाचा, नव्या युगाचा आरंभ करणारा आहे. अनेक शतकांपासून भारतात सारख्या राजकीय घडामोडी होत होत्या. निरनिराळ्या देशांतून आलेल्या अनेक धर्मांच्या व संस्कृतींच्या लोकांनी अनेकदा आपापली सत्ताकेंद्रे येथे स्थापून आपले वर्चस्व गाजवले; पण ब्रिटिश भारतात आल्यानंतर त्यांच्याशी झालेल्या संपर्काने आपल्या संस्कृतीवर व जीवनाकडे पाहण्याच्या आपल्या दृष्टिबिंदूवर जो परिणाम झाला तसा इतर कोणत्याही देशाच्या किंवा धर्माच्या लोकांमुळे झाला नाही, हे आपल्याला भारताचा इतिहास पाहिला असता दिसून येईल.

ब्रिटिश लोक भारताच्या भूमीवर १८ व्या शतकात उतरले; पण त्यांची सत्ता येथे १९ व्या शतकात पूर्णपणे प्रस्थापित झाली.

भारतातील ब्रिटिशांच्या सत्तेचे आणखी तीन प्रतिस्पर्धी होते. फ्रेंच, हैदर व टिपू सुलतान आणि मराठे. पण वाँदीवाॅशच्या लढाईत १७६० मध्ये फ्रेंचांचा पराभव झाला. १७८१ मध्ये हैदरचा पराभव झाला. १७९९ मध्ये टिपू सुलतान मृत्यू पावला. अशा रीतीने १८ व्या शतकाच्या शेवटी ब्रिटिशांचे दोन बलवान प्रतिस्पर्धी नाहीसे झाले व शेवटी उरलेला एकच प्रतिस्पर्धी म्हणजे मराठे यांचाही ब्रिटिशांनी १८१८ मध्ये पराभव केला आणि १९ व्या शतकाच्या प्रथमार्धाच्या मध्यापर्यंत ब्रिटिशांची एकछत्री सत्ता भारतावर प्रस्थापित झाली. १८२६ पासून गुजरातमध्ये सुरत, अहमदाबाद, भरुच, खेडा, धोळका व नडियाद येथे नियमित शाळा सुरू झाल्या व त्या शाळांतून मुंबईत शिक्षण घेतलेले शिक्षक नेमण्यात आले.

१८४० मध्ये 'नेटिव्ह बोर्ड ऑफ एज्युकेशन'ची स्थापना झाली व दरेक जिल्ह्याच्या शिक्षणावर त्याची देखरेख सुरू झाली. १८५५ पासून शाळांतून इंग्रजी माध्यमाची सुरुवात झाली. १८५२ मध्ये मध्ययुगीन गुजराती साहित्याचा शेवटचा महान् प्रतिनिधी दयाराम हा मृत्यू पावला. १८५७ मध्ये दोन महत्त्वाच्या अशा घटना घडल्या की, त्यांनी भारतातील सर्वच गोष्टींचे स्वरूप पार बदलून टाकले. एक म्हणजे मुंबई, कलकत्ता व मद्रास येथे युनिव्हर्सिटी स्थापन झाल्या व त्यामुळे ह्या युनिव्हर्सिटींच्या कॉलेजांतून शिक्षण घेणाऱ्या तरुण वर्गाच्या सांस्कृतिक, मानसिक व वैचारिक प्रवृत्तींवर हळूहळू फार परिणाम होऊन त्यात फार मोठे परिवर्तन होऊ लागले. दुसरी घटना म्हणजे '१८५७ चे शिपायांचे बंड'. ह्या घटनेमुळे तर देशाची राजकीय स्थिती संपूर्णपणे बदलून गेली.

अशा रीतीने १९ वा शतकाच्या मध्यापर्यंत भारतात ब्रिटिश राजवट भक्कम पायावर संपूर्णपणे स्थिर झाली. इंग्लिश भाषेचा प्रसार वाढला व इंग्रजीच्या प्रभावामुळे येथील लोकांना सर्व जगाकडे पाहण्याचे एक द्वारच खुले झाले. इंग्लिश भाषा, इंग्लिश साहित्य व इंग्लिश राजवट ह्यांमुळे परंपरागत विचार, सामाजिक चालीरीती व दैनंदिन व्यवहार ह्यांकडे बुद्धिवादाच्या आधारे पाहण्याची व इष्टानिष्ट पारखण्याकडे भारतीयांचा कल झुकत चालला. कन्याविक्रय, वरविक्रय, वर व वधू ह्यांच्यातील बौद्धिक व शारीरिक तफावत, बालविवाह, बालविधवांची दु:स्थिती अशा काही वाईट चालीरीती लोकांना असह्य वाटू लागल्या, कारण त्यामुळे आपल्या समाजाची शक्ती व उत्साह ह्यांचा अध:पात झाला होता. ब्रिटिशांच्या मार्फत आपला पाश्चिमात्य संस्कृतीशी प्रथमच उत्तम परिचय झाला व आपली पारलौकिक सुखाकडेच लागलेली दृष्टी थोडीतरी ऐहिक सुखाकडे वळू लागली. परिणामत: आपल्यातील काही आदर्शवादी तरुण व निष्पक्षपाती विचारवन्तांच्या विचारांचा केन्द्रबिन्दू साहजिकच सामाजिक सुधारणा हा बनला.

तो काळ असा होता की, जेव्हा (जगात) चहूकडे अस्वस्थता होती. नव्या नव्या कार्यप्रवृत्तींकडे लोक वळू लागले होते. काहींना काही करून दाखविण्याच्या वेडाने लोक झपाटल्यासारखे झाले होते व काहीतरी करून राष्ट्राची प्रगती साधणे हे त्यांचे ध्येय झाले होते.

ह्या प्रवृत्तीचे दृश्य रूप म्हणजे १७७८ मध्ये रुस्तमजी केरसपजी ह्यांनी मुंबईला सुरू केलेला पहिला छापखाना होय. आणि 'मुंबई समाचार' हे साप्ताहिक वृत्तपत्र १ जुलै १८२२ ला प्रसिद्ध झाले. हे मुंबईतील पहिले व भारतातील दुसऱ्या नंबरचे वृत्तपत्र होय. ते दैनिक वृत्तपत्राच्या रूपाने १८४० पर्यंत प्रसिद्ध होत होते.

१८३१ मध्ये 'चाबूक' हे वृत्तपत्र सुरू झाले. त्याचे संपादक नौरोजी दोराबजी चंदारू उर्फ नौरोजी हरकारू हे होते.

१८४९ मध्ये अहमदाबाद येथे 'गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी'ने 'वर्तमान' हे साप्ताहिक वृत्तपत्र सुरू केले. ते दर बुधवारी प्रसिद्ध होत असल्यामुळे त्याचे लोकप्रिय नाव 'बुधवारीयुं' असे पडले. गुजरातमधून प्रसिद्ध झालेले हे पहिलेच साप्ताहिक वृत्तपत्र होय.

१८४३ साली मुंबईत दुसरे एक नियतकालिक सुरू झाले. त्याचे नाव 'ज्ञानप्रसारक' होते आणि १८५१ मध्ये दादाभाई नौरोजींनी मुंबईला ' रास्त गोफ्तार ' नावाचे म्हणजे सत्य बोलणारे नियतकालिक सुरू केले.

ही वृत्तपत्रे व नियतकालिके तर प्रसिद्ध होऊ लागलीच; पण त्याचवेळी गुजरातच्या सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक क्षेत्रातही नवजीवनाचा संचार होऊ लागलेला दिसून येतो. सुरतेला १८४४ मध्ये दुर्गाराम महेताजींची 'मानवधर्म-सभा' स्थापन झाली. अहमदाबादला १८४८ मध्ये ' गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी'ची स्थापना झाली व मुंबईला १८५१ मध्ये ' बुद्धिवर्धक-सभा ' सुरू झाली.

'वराळियो राक्षस' (वाफेचा राक्षस – रेल्वे इंजिन) गर्जना करीत देशाच्या निरनिराळ्या भागात धावू लागला व पूर्वी अंतरहित वाटणारे देशाच्या एका भागापासून दुसऱ्या भागापर्यंतचे अंतर आता जवळ जवळ नाहीसेच झाले.

रेल्वे हे प्रवास करण्याचे व व्यापाराचे साधन बनले. तार नि टपालाच्या सोयीमुळे व वृत्तपत्रांमुळे एखादा चमत्कार वाटावा अशा प्रकारे दूरदूरच्या देशांतील बातम्या अतिशय थोड्या वेळात लोकांना मिळू लागल्या. राजकीय अशांतता व अस्वस्थता दूर झाली आणि देशात एकदम असे जे परिवर्तन झाले त्याने लोकांना अचंबाच वाटू लागला. 'गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी'तर्फे प्रसिद्ध होणाऱ्या 'बुद्धिप्रकाश' ह्या नियतकालिकावर आगगाडीचे चित्र छापलेले असे व त्याखाली लिहिलेले असे की, 'सुधारणेसाठी सज्ज व्हा–दुसरी तिसरी काही गोष्ट बोलू नका. आगगाडीकडे म्हणजेच ह्या सुधारणेच्या प्रतीकाकडे पहा.'[१] कधी कधी आगगाडी ऐवजी पाण्याच्या नळाचे चित्र छापलेले असे व त्याखाली लिहिलेले असे, 'रक्त साऱ्या शरीरात फिरते. वायूचा दाब सगळीकडे असतो. जर हे ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटत असेल तर ह्या पाण्याच्या नळाकडे पाहून खात्री करून घ्या.'[२]

ह्याच वेळेला एकीकडे 'आर्यसमाज', 'थिऑसॉफिकल् सोसायटी' व ' श्रेयसाधक अधिकारी वर्ग' अशा संस्था निघाल्या आणि त्यांचा हेतू जीवनाविषयीचा लोकांचा कल जो ऐहिक सुखाकडे जास्त जास्त होऊ लागला होता. तो ऐहिक सुखाच्या पलीकडे असलेले पारमार्थिक श्रेय साधणे जरूर आहे, असा व्हावा.

अशा ह्या निरनिराळ्या विचारधारांमुळे १९ व्या शतकाच्या पहिल्या अर्ध्या भागात गुजराती साहित्यात दोन निरनिराळ्या प्रकारचे प्रवाह समांतरच चाललेले दिसून येतात. एक प्रवाह – जुन्या परंपरेप्रमाणे चालत आलेला व आपल्या

पुरातन संस्कृतीचे 'हार्द' रक्षण करणारा आणि दुसरा—परंपरागत रिवाज व अंध-श्रद्धेच्या विरुद्ध बुद्धिनिष्ठ प्रयत्नाने समाजाला सुखी करणाऱ्या पश्चिमात्य संस्कृतीला अनुसरणारा. त्यामुळे नव्या विचारधारेने प्रभावित झालेल्या काव्याबरोबरच जुन्या परंपरेला चिकटून राहणाऱ्या कवींची काव्येही लिहिली जात होती व लोकांना ती आवडतही होती. ती जुन्या प्रकारची काव्येही, नव्या काव्यापेक्षा संख्येने, जराही कमी नव्हती व त्या काव्यांचा वाचकवर्गही संख्येने खूप मोठा होता.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धातही साहित्यातील नवा व जुना असे दोन्ही प्रवाह बरोबरच चालू होते; पण ज्ञान व वैराग्य हे परंपरागत विषय हळूहळू दूर झाले व पौरणिक कथानकांतील प्रसंगांवर काव्ये न करता जुने कवी हळूहळू गद्याकडे वळले व पद्यात लिहिण्याचा प्रघात कमी होऊ लागला. फक्त 'भक्ती' हा विषय मात्र पूर्वीप्रमाणेच आपल्या स्थानावर स्थिर राहिला; पण ऋषिराय, त्रिभुवन, प्रेमशंकर व सागर ह्या कवींनी जरी मुख्यत्वे भक्तिविषयकच रचना केल्या तरी त्यांच्या लिहिण्याच्या पद्धतीवर आधुनिकतेचा प्रभाव पडलेला दिसून येतो.

परंपरागत जीवनपद्धती व रीतरिवाज ह्यांत अनेक वर्षांपासून असलेल्या सामाजिक दूषणांकडे १९ व्या शतकाच्या पूर्वार्धातील गुजराती लेखकांचे जेवढे लक्ष वेधले होते त्यापेक्षाही १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील लेखकांचे लक्ष त्या दूषणांकडे जास्तच वेधले गेले आणि मध्यकालीन कवींच्या काव्यापेक्षा ह्या काळातील कवींच्या काव्याचे स्वरूप व आशय अजिबात निराळेच झाले.

पूर्वीचे मध्ययुगीन साहित्य आणि १९ व्या शतकाच्या अखेरीस लिहिले गेलेले साहित्य ह्यांत संपूर्ण कायापालट झाला. कारण तेव्हा विश्वविद्यालयीन पदवीधर आणि त्यांच्या प्रभावाखाली आलेले लेखक हे साहित्यक्षेत्रात चमकू लागले. नवलराम, भोळानाथ, नथुराम सुंदरजी इत्यादी लेखकांवर दलपतराम अथवा नर्मद ह्यांच्या काव्याचा जितका प्रभाव पडलेला दिसतो, तितका तो नरसिंहराव दिवेटिया हे ज्यांचे अग्रणी होते, असे युनिव्हर्सिटीशिक्षित लेखक व त्यांच्या प्रभावाखाली आलेले इतर लेखक ह्यांच्या लेखनावर तादृशपणे झालेला दिसत नाही. ह्या उच्चशिक्षणसंपन्न नव्या लेखकांच्या लेखनावर संस्कृत, इंग्रजी, पर्शियन साहित्य व लोकसाहित्य ह्यांचा विशेष प्रभाव पडलेला दिसून येतो. एवढेच नव्हे तर त्या युनिव्हर्सिटीतून नवशिक्षण घेतलेल्या पदवीधर लेखकांची व त्यांच्या प्रभावाखाली आलेल्या इतर लेखकांची गद्यशैली ही दलपत-नर्मद-युगातील लेखकांच्या गद्यशैलीपेक्षा स्पष्टपणे भिन्न अशी दिसून येते.

युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमात संस्कृत भाषेला स्थान व महत्त्व प्राप्त झाले १८८५ साली इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना झाली. स्थानिक स्वराज्याची चळवळ आणि इतर चळवळी सुरू झाल्या आणि ह्या सर्वांचा परिणाम म्हणून की काय

देशात सांस्कृतिक व राजकीय जागृतीचा प्रादुर्भाव झाला आणि त्याने सुशिक्षित वर्गाला पाश्चिमात्य संस्कृती व भारतीय संस्कृती ह्यांत इष्ट व अनिष्ट काय आहे, ह्याचा मुळापासून विचार करण्यास प्रवृत्त केले.

गुजरातेत गोवर्धनराम व इतर बहुतेक लेखक यांची अशी बालंबाल खात्री झाली होती की, भारताचा ब्रिटिशांशी आलेला संबंध म्हणजे ईश्वरी कृपेचेच फळ होय, आणि देशाच्या आत्यंतिक हितासाठी ब्रिटिश लोकांशी सहकार करणेच आवश्यक आहे. त्यावेळच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीमुळे खेडेगावातील महत्त्वाकांक्षी आणि बुद्धिमान युवकांना शहराचे आकर्षण वाटू लागले. विशेषत: संस्थाने वगळता ब्रिटिशांच्या सत्तेखाली असलेल्या प्रांतात[3] तर हे शहरात येण्याचे ग्रामीण युवकांचे प्रमाण बरेच वाढले, कारण तेथे खूप स्वातंत्र्य व मोकळीक मिळत होती. त्यांना ब्रिटिश संस्कृती व जीवनपद्धती स्वतंत्रतेची दिशा दाखवू लागली होती. शतकानुशतके रूढ झालेली एकत्र कुटुंबपद्धती टिकणे हळूहळू अशक्य झाले. त्या पद्धतीतील नियंत्रित व संकुचित विचार सोडून सुखशांती मिळविण्यासाठी व प्रगती साधण्यासाठी नवे विचार धैर्याने आचरणात आणले पाहिजेत. कुटुंब, जात व समाज ह्यांच्या निर्बंधातून मुक्त होण्याची चालून आलेली संधी घालविता उपयोगी नाही, कारण नवप्रभात उजाडली आहे, असे विचारवन्तांना वाटू लागले.

गुजरातेत गोवर्धनरामसारख्या दीर्घदृष्टीच्या विचारवंतांना वाटू व पटू लागले की, पश्चिमेकडून आलेल्या वाऱ्याकडे पाठ न फिरवता आपल्या प्राचीन संस्कृतीतील चांगले असेल ते टिकवणे व सुधारणे, अनिष्ट गोष्टींचा त्याग करणे व पाश्चिमात्य संस्कृतीत जे योग्य व हितावह आहे ते घेऊन, सुबुद्धपणे पूर्वेच्या व पश्चिमेच्या संस्कृतींचा समन्वय करण्याचा हा काळ आहे. आपण पूर्वेच्या संस्कृतीत मुरलेले आहोत; पण त्यात असलेल्या जडप्राय, भाररूप विचारांचा व आचारांचा त्याग केला पाहिजे. पश्चिमेच्या संस्कृतीतील बुद्धिवाद, व्यक्तिस्वातंत्र्य, उदारबुद्धी समाज घडविण्यास लागणारे चातुर्य आपण आत्मसात केले पाहिजे, इ. विचारांना अग्रस्थान मिळू लागले.

नर्मद-दलपत यांच्या काळातील समाजसुधारकांप्रमाणे ह्या वेळच्या समाज-सुधारकांना व विचारवन्तांनाही वाटू लागले की, आपली चुकीची लग्नसंस्थाच आपल्या सगळ्या अनिष्टांचे मूळ आहे. नर्मद-दलपतच्या काळातील समाज-सुधारकांना वाटे की, आपली लग्नपद्धती सुधारावयाची असेल तर बालविवाहाची प्रथा बंद केली पाहिजे व अमुक वर्गातल्या विधवांना परिस्थितीप्रमाणे पुनर्विवाह करावयास परवानगी दिली पाहिजे; पण सन १८८५ सालानंतरच्या गोवर्धनराम वगैरे विचारवंतांना वाटले की, ह्या प्रश्नाकडे अधिक खोलवर जाऊन पाहिले पाहिजे आणि त्याप्रमाणे त्यांनी विचार करून त्यावर पुढील तोडगा शोधून काढला. त्यांच्या

मते आपल्या लग्नव्यवस्थेची वाईट स्थिती सुधारायची असल्यास मुलांची लग्ने आई-बापांनी ठरवता कामा नयेत; कारण त्यांची दृष्टी पैसा, समाजातील स्थान, कुटुंबाची खानदानी वगैरे बाबींकडेच असते व मुख्य त्या गोष्टीकडे तर त्यांचे दुर्लक्षच होते आणि ती गोष्ट म्हणजे नवरा मुलगा व नवरी मुलगी ह्यांचे एकमेकांवर प्रेम आहे की नाही ते पाहणे. ते न पाहिल्यामुळे दोघांच्यात शारीरिक, बौद्धिक अथवा भावनिक विसंवाद उत्पन्न होतो व ह्या विसंवादामुळे फक्त त्या दोघांचेच जीवन दु:खी होते असे नाही, तर त्यामुळे ते सबंध कुटुंबच दु:खी होऊन त्याला शांती व सुख मिळत नाही आणि त्याचा विकास खुंटतो. ही व्यवस्था सुधारण्यासाठी ह्या विचारवन्तांनी दोन उपाय सुचविले. एक म्हणजे प्रेमविवाहाची पद्धती रूढ करणे, मात्र त्या दोघांचे प्रेम टिकणारे, खरे व दृढ असले पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे मुलींना सुशिक्षित करणे म्हणजे त्या आपल्या पतीच्या बरोबरीने शारीरिक, बौद्धिक व भावनिक जबाबदाऱ्या अंगावर घेऊ शकतील.

थोडक्यात सांगावयाचे तर असे म्हणता येईल की, ज्याला 'पंडितयुग' म्हणून संबोधतात त्या १८८५ नंतरच्या काळाच्या साहित्यामध्ये 'प्रेम' हा जीवनाचा ध्रुव-तारा आहे असे मानणे व स्त्रीदाक्षिण्यावर भर देणे, ह्या दोन गोष्टी पायाभूत आहेत असे म्हटले पाहिजे. फक्त गोवर्धनराम वगैरे जुन्या मताच्या लेखकांचा स्त्रियांकडे पाहण्याचा दृष्टिकोण आणि रमणलाल व नरसिंहराव यांसारख्या जहाल लेखकांचा स्त्रियांकडे पाहाण्याचा दृष्टिकोण ह्यात थोडा फरक आहे, पण हा फरक अंशमात्र आहे.

## तळटीपा

१. सजो रे सुधारो, तजो वात आडी,
सुधाराथी थै आ जुओ आगगाडी.

२. शरीरमां शोणित संचरे छे,
वायू दबाणो सघळे फरे छे;
ए वातथी जो उपजे अचंबो,
जुओ जुओ आ जलयंत्र बंबो.

३. त्याकाळचा हिंदुस्थान तीन इलाख्यात विभागला गेला होता. मुंबई, मद्रास व बंगाल. ह्या प्रत्येक इलाख्यातील काही भागांवर ब्रिटिश इंडियन सरकारची प्रत्यक्ष सत्ता होती व काही भागांवर देशी राजे राज्य करीत होते. पहिल्या भागाला 'ब्रिटिश इंडिया' असे म्हणत व दुसऱ्या भागाला 'देशी संस्थाने' असे नाव होते.

४. मुलगे ह्यापूर्वीच शाळा व कॉलेजांत जाऊ लागले होते.

प्रकरण नववे

# १८५० ते १८८५ चा कालखंड

[ १ ]

## नर्मद-दलपत-युग

अर्वाचीन गुजराती साहित्याचे दलपतराम व नर्मदाशंकर हे मुख्य अग्रणी होते. दोघेही आपापल्या विशिष्ट पद्धतीने त्या वेळच्या सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करीत होते. आणि त्या काळच्या साहित्यिक प्रवृत्तींसही त्यांनी आपापल्या परीने समृद्ध करण्यास हातभार लावला.

### दलपतराम [ १८२०–१८९८ ]

पूर्ण नाव दलपतराम डाह्याभाई त्रवाडी (त्रिवेदी). त्याचा जन्म काठेवाडात (आताच्या सौराष्ट्रात) वढवाण येथे १८२० साली झाला. त्याचे प्राथमिक शिक्षण झाल्यावर त्याने स्वामिनारायण–संप्रदायाचे देवानंदस्वामी ह्यांच्यापाशी 'पिंगळ' म्हणजे छंदःशास्त्र व अलंकारशास्त्र यांचा अभ्यास केला. त्याला इंग्रजीचे ज्ञान नव्हते; पण त्याला व्रज-भाषा व संस्कृत-भाषा चांगल्या अवगत होत्या. लहानपणापासूनच त्याला कविता करण्याचा नाद होता.

१८४८ मध्ये सर अलेक्झांडर किनलोच फॉर्बस्[1] यांना गुजरातबद्दल माहिती गोळा करण्यासाठी एका योग्य मनुष्याची जरूर होती. भोलानाथ साराभाई, म्हणजे प्रख्यात साहित्यिक नरसिंहराव दिवेटिया ह्यांचे वडील, ह्यांच्या शिफारशीवरून फॉर्बस्‌नी दलपतरामला ह्या कामावर नेमले. पहिल्याच मुलाखतीत दलपतरामाच्या बुद्धिमत्तेचा व योग्यतेचा फॉर्बस्‌वर इतका प्रभाव पडला की, तो दलपतरामला 'कवीश्वर' असे संबोधू लागला. फॉर्बस् साहेबांनी दलपतरामच्या जीवनाला एक नवीन व महत्त्वाचे वळण लावले. जेव्हा फॉर्बस् इंग्लंडला गेला तेव्हा त्याने महसुली खात्यात, सादरा येथे दलपतरामची नेमणूक करून दिली; पण 'गुजरात व्हर्नाक्युलर

सोसायटी'चा नवा सेक्रेटरी कर्टिस, ह्याने विनंती केल्यावरून फॉर्बस्‌नी दलपतरामला १८५५ मध्ये पत्र लिहून त्या सोसायटीचा आसिस्टंट सेक्रेटरी म्हणून काम करावे असे कळविले. आपला साहाय्यक व मित्र फॉर्बस् ह्याच्या इच्छेला मान देऊन दलपतरामने सरकारी नोकरी सोडली व 'गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी'त सेक्रेटरी म्हणून तो काम करू लागला. ह्या घटनेमुळे दलपतरामच्या जीवनाला नवेच वळण मिळाले व त्यामुळे त्याची विनोदबुद्धी, हुशारी, सार्वजनिक संबंध जोडण्याची त्याची शक्ती यांना त्याच्या जीवनात चांगला वाव मिळाला.

ह्या सोसायटीचा असिस्टंट सेक्रेटरी म्हणून त्याने १८७८ पर्यंत काम केले व ह्या सोसायटीने १५ मे १८५० पासून चालविलेल्या 'बुद्धिप्रकाश' ह्या मासिकाचा संपादक म्हणून त्याने समर्थपणे कामगिरी केली.

आयुष्याच्या शेवटच्या काही वर्षांत त्याला अंधत्व आले; परंतु तरीही त्याने आपले काव्यलेखनाचे काम शेवटपर्यंत अव्याहत चालू ठेवले. १८९८ मध्ये ७८ व्या वर्षी त्याचे निधन झाले. त्याला खूपच प्रसिद्धी मिळाली आणि संस्थानिक व सामान्य लोक ह्यांच्या आदरास तो सारखाच पात्र झाला. व्हिक्टोरिया राणीने त्याला C. I. E. (Companion of the Indian Empire) हा किताब दिला.

दलपतरामने जीवनभर मुख्यत्वे काव्येच लिहिली; पण त्याशिवाय त्याने नाटके व बोधपर निबंधही लिहिले आहेत.

त्याच्या काव्यरचना 'विजयक्षमा', 'हंस काव्य शतके', 'हुन्नरखाननी चडाई', 'गमारबावनी', ऋतुवर्णन', 'संप-लक्ष्मी संवाद', 'जडावस्थली', 'वेनचरित्र', 'फॉर्बस् विलास' व 'फॉर्बस् विरह' वगैरे आहेत. त्याने त्याशिवाय गरबी, लग्नगीते व विविध विषयांवर शेकडो लहान लहान कविता रचल्या आहेत. त्याने 'लक्ष्मीनाटक' व 'मिथ्याभिमान' ही दोन नाटके लिहिली. त्याने 'भूतनिबंध', 'ज्ञातिनिबंध' व 'बाल-विवाह-निबंध' हे तीन गद्यग्रंथ लिहिले. त्याने व्रजभाषेत 'ज्ञानचातुरी' व 'व्रजचातुरी' ही दोन पुस्तके आणि 'श्रवणाख्यान' हे पुस्तक हिंदी भाषेत लिहिले आहे.

ह्यात १८५१ मध्ये लिहिलेले 'हुन्नरखाननी चडाई' हे एक रूपककाव्य आहे. परदेशातून आलेल्या पक्क्या मालामुळे भारताच्या कलाकारागिरी व उद्योगधंदे कसे नाश पावले, हे ह्यात रूपकाद्वारे दाखविले आहे. ह्यात हुन्नर (उद्योग) हा एक राजा आहे. यंत्रखान (यंत्रसामग्री) हा त्याचा प्रधान. मादरपाट (मांजरपाट—एक प्रकारचे कापड) हा मुख्य सेनाधिपती व चीन, इंग्लंड यांसारख्या परदेशांतून भारतात आयात केलेल्या असंख्य लहान मोठ्या वस्तू ह्या म्हणजे सैन्य. ह्यांच्या लढाईचे तपशीलवार वर्णन फार बहारीचे केले आहे. ह्या अगदी नवीनच रीतीच्या वस्तूंच्या व प्रसंगांच्या वर्णनामुळे आणि निवेदन-पद्धतीमुळे हे काव्य त्यावेळी फारच लोकप्रिय झाले होते व त्यातील विषयामुळे ह्या काव्याने बरीच खळबळही उडवून दिली होती.

**वेनचरित्र (१८६८)–**

हे एक आख्यान आहे. मध्यकालीन आख्यानकारांनी उपयोगात आणल्याप्रमाणे ह्यातही कडव्यांचा उपयोग करून आख्यानाचे निरनिराळे भाग पाडले आहेत व त्यांच्यासारखेच छंद उपयोगात आणले आहेत. ह्या काव्याचा विषय विधवा-पुनर्विवाह हा आहे.

वेन नावाचा एक तरुण राजकुमार आपल्या राज्याची पाहणी करण्याचे काम पूर्ण करून राजधानीकडे परत येत असतो. त्याला कमला नावाची एक तरुण स्त्री दिसते. ती चितेवर सती म्हणून आपल्याला जाळून घेण्याच्या तयारीत असते. तपास केल्यावर त्याला कळते की, कमला बाळपणीच विधवा झालेली असते व तिला अशा स्थितीत कुटुंबात राहून दिवस कंठणे अगदी असह्य होते आणि ह्या दुःखातून सुटण्याचा एकच मार्ग तिला दिसतो, तो म्हणजे सती जाऊन जीवनाचा अंत करणे. वेन तिची परोपरीने समजूत घालून तिला ह्या विचारापासून परावृत्त करतो व तो कमलाला आपल्या बरोबर राजधानीत घेऊन जातो आणि तो तिला समजावतो की पराशर ह्या प्रख्यात स्मृतिकाराने आपल्या 'पराशर-स्मृतीत'[२] विधवा-विवाहाला मान्यता दिलेली आहे. तिची समजूत पटल्यावर तो तिच्या जातीचाच एक अनुरूप वर शोधून काढतो व त्याच्याशी तिचे लग्न लावून देतो.

ह्या काव्यात विशेष असे साहित्यिक गुण नाहीत; पण त्या काळी सामाजिक दूषणांच्या विरुद्ध मोहीम चालू होती. अशा वातावरणात हे काव्य लोकांना इतके आवडले व ते इतके यशस्वी झाले की, लोक त्याला 'सामाजिक सुधारणेचे पुराण' असे संबोधू लागले.माणभट्ट हे इतर आख्यानाप्रमाणेच हेही आख्यान घागरिया पुराणासारखे लोकापुढे जाहीरपणे गाऊन दाखवू लागले. जरी ह्या काव्यात काही मूलभूत दोष आहेत, भावनांची कृत्रिमता आहे, तरी काही करुण भाव व विनोद फार चांगले चितारलेले आहेत.

**फॉर्बस् विरह (फॉर्बस्च्या मृत्यूनंतरचे शोकगीत) (१८६५)–**

हे काव्य दलपतरामाच्या दीर्घ वर्णनात्मक काव्यात सर्वात उत्तम काव्य आहे. हे गुजराती भाषेतील पहिलेच शोकगीत आहे. सर ए. के. फॉर्बस् हा दलपतरामाचा मोठा सहायक होता व तो नसता तर दलपतरामाचा जो लौकिक झाला आणि त्याला जे उच्च स्थान प्राप्त झाले, ते झाले असते की नाही ह्याची शंका वाटते. त्या दोघांचा सहवास झाला व त्या सहवासाचे रूपांतर त्यांच्या गाढ व्यक्तिगत मैत्रीत झाले आणि दोघांनाही एकमेकांबद्दल आदर वाटू लागला व ते एकमेकांची कदर करू लागले. ४४ व्या वर्षी झालेला फॉर्बस्चा मृत्यू हा दलपतरामच्या दृष्टीने एक कठोर वज्राघातच होता.

'फॉर्बस् विरहा'त फॉर्बस्च्या उच्च गुणांबद्दल केलेली प्रशंसा आहे. फॉर्बस्ने दलपतरामबद्दल जे काही केले व दलपतरामला फॉर्बस्ची किती किंमत वाटत होती त्याबद्दल ह्या काव्यात त्याने आपली विशेष कृतज्ञता व्यक्त केली आहे. फॉर्बस्च्या मृत्यूने दलपतरामची फार मोठी व्यक्तिगत हानी झाली व आयुष्यात कधीही भरून न येणारी पोकळी निर्माण झाली. ह्याची कल्पना ह्या काव्यावरून दिसून येते. दलपतरामाच्या काव्याचे खास लक्षण शब्दांची कसरत, ती ह्याही काव्यात असली तरी काही ठिकाणी ही कविता बरीच चांगली वठली आहे.

अशा ह्या दीर्घकाव्याव्यतिरिक्त दलपतरामाने गरबी, पदे, मुक्तके (चटकदार दोन अथवा चार पंक्तींची अर्थगर्भ रचना) व छप्पे ह्यांसारख्या शेकडो स्फुट कविता लिहिल्या आहेत. ह्या कवितांत कवीने निरनिराळ्या प्रकारच्या देशी व जुन्या छंदांचा उपयोग केला आहे. 'दलपतराम'ने पिंगळचे छंद:शास्त्र, रस व अलंकार-शास्त्रांचा सखोल अभ्यास केला होता. त्याने जवळ जवळ सर्वच छंद आपल्या कवितांत उपयोगात आणले आहेत. त्याला शब्दही अगदी सहज स्फुरत असत. ह्या सर्व ज्ञानामुळे दलपतरामाच्या कवितांचे बाह्य स्वरूप अगदी निर्दोष झाले आहे.

विषयवैविध्याच्या बाबतीतही दलपतरामाची सुसंपन्नता दिसून येते. त्यात विविध स्थळांच्या व प्रदर्शनांच्या वर्णनापासून आणि सामाजिक सुधारणांच्या वर्णनापासून ते निरनिराळ्या संस्थांच्या इतिहासापर्यंतचा समावेश झालेला आहे.

त्याची मूळची बुद्धिमत्ता, संस्कृत व व्रजभाषांचे ज्ञान, मध्यकालीन गुजराती साहित्य व लोकसाहित्य ह्यांचा त्याला असलेला चांगला परिचय, देशभर केलेला विपुल प्रवास व जगाचा सखोल अनुभव ह्यांमुळे दलपतरामाचे लेखन आशयघन व विविध विषयांनी परिपूर्ण आहे. त्या काळचा एकही सामाजिक, राजकीय अथवा इतर बाबींसंबंधी-विषय त्याच्या लेखणीतून सुटला नाही. भाषांवरचे प्रभुत्व व कवित्व करण्याचा सतत अभ्यास ह्यांमुळे त्याची काव्ये सुंदर झाली आहेत आणि त्यात सहजतेचा व स्वस्थतेचा गुण आलेला आहे. दिलेल्या कोणत्याही विषयावर शीघ्रकवित्व करणे, हा त्याच्या हातचा मळ होता. त्याच्याहून थोडा लहान पण त्याचा समकालीन प्रतिस्पर्धी नर्मद ह्याची बरोबरी करण्यासाठी त्याने देशभक्ती, निसर्गसौंदर्य ह्या विषयांवरही काव्ये केली आहेत. खरे पाहिले तर हे दोन विषय त्या वेळी नवे होते व ह्या विषयांवर नर्मदने प्रभावीपणे लेखन केले होते; पण त्यातही आपण मागे नाही, हे दाखविण्यासाठी दलपतरामने ह्या दोनही विषयावर आपली लेखणी चालवली.

एकंदरीत पाहता दलपतरामच्या काव्यात छंद, बाह्यस्वरूप व विषय ह्यांची विविधता आढळून येते. अनुप्रास, अन्तिम अनुप्रास, यमक, श्लेष व इतर काव्यालंकार ह्यांचा उपयोग हे दलपतरामाचे वैशिष्ट्य आहे. त्याची दुसरी विशेषता म्हणजे

उपदेश. त्याची बहुतेक सर्व काव्ये बोधपर—उपदेशपर—आहेत. त्याची दृढ मान्यता होती की, कविता मनोरंजक तर असावीच; पण त्याचबरोबर ती उपदेशपरही असली पाहिजे व म्हणून त्याने आपल्या काव्यात काही ठिकाणी प्रत्यक्ष उपदेश केला आहे किंवा काही ठिकाणी प्रसंग, उदाहरणे, कोणाच्या जीवनात घडलेल्या मजेदार घटना व वक्रोक्ति ह्यांचा उपयोग करून अप्रत्यक्ष उपदेश केला आहे. त्याच्या 'अडपलो जीवो', 'माखीनुं बच्चुं', 'गंडु राजा', 'भोळो कणबी', 'शरणाईवाळो', 'भोळो भाभो' 'नमेली डोशी', 'ऊँट कहे' इ. कविता अशा ह्या दुसऱ्या प्रकारच्या आहेत.

अत्यंत साधी शब्दरचना आणि सरळ व साधी वर्णनपद्धती हे दलपतरामाच्या काव्याचे खास विशेष गुण आहेत. त्यात काहीही गूढ व दुर्बोध असे नाही आणि त्यापासून जनमानसाला अभिजात मनोरंजनाची प्राप्ती होत होती. दलपतरामला सामाजिक जबाबदारीची पहिल्या प्रतीची जाणीव असल्यामुळे त्याचे लक्ष सतत आपल्या श्रोत्यांकडे व वाचकांकडे असे आणि त्यामुळे त्यांच्या आवडीला वाईट वळण लागेल असे काहीही अश्लील अथवा हलके असे त्याच्या लेखणीतून कधीही काहीही लिहिले गेले नाही. त्याची अशी मान्यता होती की, कोणतेही काव्य असे असावे की जे एखादा वृद्ध पिता व त्याची तरुण मुलगी हे दोघे बरोबरच ते काव्य निःसंकोचपणे वाचू शकतील.

त्याच्या बुद्धीला काही मर्यादा पडल्यामुळे महान् कवीच्या प्रतिभेला सहज-साध्य अशा अत्युच्च शिखरापर्यंत जरी त्याची कविता पोहोचली नाही तरीपण त्यात व्यावहारिक शहाणपण व बुद्धिमत्ता भरपूर प्रमाणात आहे. जगाच्या व्यवहाराचे शांतपणे व निष्पक्षपातीपणाने निरीक्षण करून जी जी घटना घडेल त्या त्या प्रत्येकी-पासून काहीतरी बोध शोधून काढणे, हे त्याचे ध्येय होते.

दलपतराम हा काव्याचा खरा भक्त होता. १८४५ साली त्याने आपली पहिली कविता 'बापानी पीपर' लिहिली. तेव्हापासून ते १८९८ मध्ये त्याचे निधन होईपर्यंत जवळ जवळ ५५ वर्षे त्याचे काव्यलेखन अखंडपणे सतत चालू होते. त्याचे साहित्य मध्यकालीन व अर्वाचीन गुजराती काव्यांना जोडणारा एक दुवाच होता.

दलपतरामने लिहिलेले 'गुजराती पिंगळ' म्हणजे गुजरातीचे छंदःशास्त्र. हे पाठ्यपुस्तक त्या काळी इतके गाजले होते की, त्यालाच 'दलपत पिंगळ' या नावाने लोक ओळखू लागले. मराठीतील 'वृत्तदर्पणा'शी हे समकालीन व समधर्म आहे.

## नर्मद [१८३३ ते १८८६]

नर्मदाशंकर लालशंकर दवे – हे 'नर्मद' ह्या लोकप्रिय नावाने प्रसिद्ध झाले आहेत. ते दलपतरामपेक्षा १३ वर्षांनी वयाने लहान होते. दलपतरामनी भारतात

उगवणाऱ्या नव्या युगाचे स्वागत केले; पण नर्मद ह्याला खऱ्या अर्थाने नव्या युगाचा 'अरुण' म्हणणे उचित ठरेल. कारण विषय, प्रकार, शैली, भावना इत्यादी साहित्याच्या अनेक बाबतीत नर्मदनेच अर्वाचीन साहित्य-युगाचा आरंभ केला.

नर्मदचा जन्म सुरत येथे १८३३ मध्ये झाला. त्याचे प्राथमिक शिक्षण सुरत येथे झाले व माध्यमिक शिक्षण मुंबईच्या 'एल्फिस्टन इन्स्टिटयूट'[३] (स्थापना १८२७) मध्ये झाले. त्याची पत्नी वयात आल्यामुळे त्याला मुंबईतील शिक्षण सोडून सुरतेला यावे लागले व त्याच्या श्वशुरांच्या सांगण्यावरून त्याने एका शाळेत शिक्षकाचा सामान्य पेशा स्वीकारला; पण त्याची पत्नी लवकरच वारल्यामुळे तो मुंबईला परत गेला व त्याने पुन्हा शिक्षण सुरू केले. त्याबरोबरच तो सामाजिक सुधारणेच्या चळवळीत भाग घेऊ लागला. त्या वेळी मुंबई हे सामाजिक सुधारणेचे केंद्र बनले होते. बुद्धिवर्धक-सभेच्या (१८५१) संस्थापकांपैकी तो एक होता व तेथे त्याने आपले पहिले लिहिलेले भाषण 'मंडळी मळवाथी थतां लाभ विशे' (समूहात भेटण्याने होणारे फायदे) हे वाचून दाखविले.

अशा रीतीने समाजसुधारणेचे साधन म्हणून त्याच्या साहित्यिक जीवनाची सुरुवात झाली. कॉलेजमध्ये अभ्यास करीत असताना त्याला एकदम धीरोच्या एका 'काफी'ची नक्कल करण्याची स्फूर्ती झाली व ती रचत असताना त्याला इतका अवर्णनीय आनंद आला की, लेखन हाच आपला मुख्य व्यवसाय असावा, असे त्याने ठरविले. 'एक मूठभर ज्वारी काय, कशीही मिळेल' असे म्हणून त्याने आपले मन साहित्याकडेच एकाग्र केले. ह्याच वेळी त्याला कॉलेज सोडून मुंबईच्या एका शाळेत शिक्षकाची नोकरी करावी लागली; पण थोडयाच दिवसात शाळेतील अशांत, अप्रिय वातावरणाचा त्याला वीट आला. त्याने पूर्णपणे जाणले की, आपण जर ह्याच वातावरणात राहिलो तर साहित्य-निर्मितीला आवश्यक असा उत्साह व मानसिक शांती आपल्याला मुळीच मिळणार नाही. म्हणून त्याने आपल्या नोकरीचा राजीनामा दिला आणि घरी येऊन अश्रुपूर्ण डोळ्यांनी आपल्या लेखणीकडे पाहून तो तिला उद्देशून म्हणाला, "आजपासून मी सर्वस्वी तुलाच शरण आलो आहे."[४] आपल्या ह्या निश्चयाला चिकटून राहण्यासाठी नर्मदला अनेक अडचणींना तोंड द्यावे लागले व अनेक संकटांशी झगडावे लागले. ह्या रीतीने २४ वर्षे धडपड करून त्याला शेवटी माघार घ्यावी लागली.

नर्मद हा ह्या परिवर्तनशील युगाचा प्रतिनिधी होता. त्याचे अध्ययन फार सखोल किंवा पद्धतशीर नव्हते व त्याची निर्णयशक्ती बऱ्याच प्रसंगी त्याच्या लहरी-नुसार बदलत असे; पण काहीतरी नवे व सर्वांपेक्षा काहीतरी निराळे करून दाखविण्याच्या बाबतीतच त्याला अमर्याद उत्साह होता. ह्या उत्साहामुळे त्या काळच्या इतर अनेक युवकांप्रमाणे नर्मद पाश्चिमात्य संस्कृतीकडे आकृष्ट झाला व

त्याप्रमाणे आपल्या संस्कृतीला वळण देण्याची त्याने जणू शपथच घेतली. त्याचे नैतिकबळ व आपल्या मतासाठी धैर्याने झगडण्याची त्याची शक्ती ह्यामुळे त्याने ह्या कार्यासाठी खूप परिश्रम केले; पण अनेक वेळा निराशा पदरी आल्याने आणि त्याचे प्रयत्न फसल्याने त्याची खात्री झाली की, मनुष्याला कितीही शक्ती असली तरी शेवटी तो अज्ञात व गूढ अशा नियतीच्या हातातील एक खेळणे आहे आणि त्याला पटले की कोणत्याही देशाची परिस्थिती व परंपरा बदलायची झाल्यास त्यासाठी अतिशय चिकाटीने व संपूर्ण तयारीने योग्य समय येण्याची वाट पाहिली पाहिजे. नर्मदची व्यक्तिगत लोकप्रियता लक्षणीय होती; पण त्याची विशेष पर्वा न करता त्याने आपल्या मित्रांना व अनुयायांना स्पष्टपणे समज दिली, "बंधूनो, मागे परत फिरा. आपण एक महान् चूक करत होतो" आणि त्याप्रमाणे तो स्वत: रूढीने दृढ केलेल्या हिंदूंच्या जीवनमार्गाकडे वळला. ही वैचारिक माघार त्याच्या काव्यात मात्र प्रतिबिंबित झालेली दिसून येत नाही.

नर्मदला इंग्रजी साहित्यात जे जे काही आकर्षक वाटले ते ते सर्व गुजराती साहित्यात आणण्याचा त्याने आटोकाट प्रयत्न केला. त्याने निसर्ग, देशभक्ती, शौर्य व प्रेम इ. विषयांवर भावनोत्कट कविता लिहिल्या. 'वीरसिंह' ह्या नावाचे महाकाव्य लिहिण्याचा त्याने प्रयत्न केला. इंग्लिशमध्ये Blank Verse नियमक कविता विषयाला अनुरूप अशी भव्यता व जोर आणण्यास समर्थ आहे आणि तशा प्रकारचे एकही वृत्त गुजरातीत नाही की, जे त्याच्या विषयाची भव्यता योग्य रीतीने प्रगट करू शकेल. म्हणून त्याने रूढ असलेल्या एका वृत्तात थोडासा फेरफार करून एक नवे वृत्त बनवले व त्याला 'वीरवृत्त' असे नाव दिले. तसेच त्याने 'रोला' नावाचे एक वृत्तही लिहिले.

गद्याच्या निरनिराळ्या क्षेत्रातही तो आद्यप्रवर्तक होता. नर्मदच्या पूर्वी गुजराती गद्यसाहित्य लिहिलेच गेले नाही असे नाही. मुनी जिनविजयजींनी म्हटल्याप्रमाणे चांगल्या प्रतीचे गद्य १४ व्या, १५ व्या व १६ व्या शतकांत खूप लिहिले गेले होते.[५] १७ व्या व १८ व्या शतकांतही आपणास गद्याचे काही नमुने आढळतात. नर्मदच्या जन्मापूर्वी छापखाने सुरू झाले होते व गुजराती पुस्तके आणि वृत्तपत्रे छापली जाऊन बाहेर पडत होती;[६] पण नर्मद हा अर्वाचीन गद्यलेखकात पहिला गद्यलेखक होता. कारण त्याने गद्य हे विचारविनिमय किंवा माहिती पुरविण्याचे साधन आहे असे न मानता, ते सुंदर, आनंद देणारे, ललित माध्यम बनविले.

नर्मदने गद्यात निबंध,[७] चरित्रे,[८] विपुल आत्मचरित्रपर टिपणे,[९] इतिहास,[१०] संवाद व नाटके,[११] पत्रे, संपादकीये[१२] व साहित्य-समीक्षा वगैरे लिहिली आहेत. तसेच गद्यामध्ये त्याने धर्माची मूलतत्त्वे,[१३] छंद:शास्त्र,[१४] अलंकारशास्त्र[१५] व

काव्यशास्त्र[१६] इ. विषयांची चर्चा केली आहे. त्याने ९ वर्षे परिश्रम करून एकट्याने गुजराती भाषेचा शब्दकोश[१७] बनवला. तसेच त्याने एकट्याने पौराणिक कथांचा एक कोश बनवला.[१८] नर्मद हा अर्वाचीन गद्य व पद्य साहित्याचा जनक समजला जातो, कारण अर्वाचीन गद्य व पद्याची[१९] बहुतेक सर्व लक्षणे पहिल्यानेच आपल्याला नर्मदच्या गद्य व पद्य लेखनात विपुल प्रमाणात पाहावयास मिळतात.

'नर्मगद्य', 'नर्मकविता' 'नर्मकोश' 'राज्यरंग', 'मारी हकीकत' व 'धर्मविचार' हे नर्मदचे मुख्य ग्रंथ आहेत. नर्मदच्या सर्व कविता 'नर्मकविता' व सर्व गद्यलेखन 'नर्मगद्य' ह्यात संग्रहित केलेले आहे.

कॉलेजमध्ये शिकत असतानाच नर्मदने काव्यनिर्मिति हे आपले मुख्य जीवनध्येय मानले होते व पूर्ण निश्चय करून लेखनावरच आपला उदरनिर्वाह करावयाचा हेही त्याने ठरवले होते; पण १८६५–६६ मध्ये त्याने आपला 'राज्यरंग' (जगाचा इतिहास) ग्रंथ लिहिण्यास सुरुवात केली तेव्हा त्याला इतिहासाचे सखोल व विस्तृत अध्ययन करावे लागले, तेव्हा त्याच्या पूर्वीच्या विचारात मोठी क्रान्ती घडून आली. त्याने आपल्या पूर्वीच्या कल्पना व विचार ह्यांचे विचारपूर्वक अवलोकन केले आणि तसे करताना त्याने आपल्या पूर्वीच्या कित्येक कल्पना व विचार त्याज्य ठरवून सोडून दिले. ह्यामुळे त्याच्यात कविता लिहिण्याचाही उत्साह व मनीषा राहिली नाही. म्हणूनच त्याच्या बहुतेक सर्व कविता १८५५ ते १८६५–६६ सालापर्यंतच लिहिल्या गेल्या आहेत; पण त्यानंतरच्या जवळ जवळ २० वर्षांत म्हणजे त्याने आपल्या वैचारिक भूमिकेत बदल केल्यापासून त्याचे कवितालेखन जवळ जवळ संपुष्टातच आले.

तथापि नर्मदचा एकंदर कवितासंभार विपुल आहे. दलपतरामशी स्पर्धा करण्यासाठी त्याने जो विषय हाती येईल त्यावर कविता लिहिण्याचा सपाटा चालविला. कवितांच्या गुणवत्तेपेक्षा त्यांच्या संख्याबाहुल्याकडे त्याचे अधिक लक्ष होते तरी पहिल्यापासून काव्याचे हार्द समजून घेण्याचा त्याचा प्रयत्न असे व प्रथमपासूनच काव्यातील अलंकारवैभव आणि वृत्तरचनेतील नैपुण्यापेक्षा रसाला प्राधान्य देत असे. चांगली कविता व वाईट कविता ह्यांतील फरक त्याच्या चटकन् ध्यानात येत असे. म्हणून कवितेचे स्वरूप व कविता लिहिण्याची कला ह्यांत तो अनभिज्ञ होता असे म्हणता येणार नाही; पण कवितेच्या स्फूर्तीबद्दलची[२०] त्याची चुकीची कल्पना, त्याचा स्वतःविषयीचा फाजील अभिमान[२१] व थोड्याशा विकृत मानसिक वृत्तीमुळे त्याच्या कवित्वशक्तीची फारच मोठी हानी झाली होती, ह्यात काही शंका नाही. कारण आपल्याला असे दिसून येते की, त्यांची सर्वांत उत्तम कवितासुद्धा फार उच्च कोटीची वाटत नाही.

नर्मदने ज्ञान, भक्ती व वैराग्य ह्या विषयांवर मध्यकालीन कवींच्या पद्धतीप्रमाणे शेकडो फुटकळ पदे केली आहेत. त्याने दीर्घ वर्णनात्मक काव्ये 'गोपीगीत' व 'रुक्मिणीहरण' एकाच पद्धतीने लिहिली आहेत.

पण नर्मद विशेष चमकतो तो आपल्या अर्वाचीन शैलीच्या कवितांमध्येच. प्रेमाने व रास्त अभिमानाने गुजरातची अस्मिता ठळकपणे अंकित करणारा पहिला कवी तर तो आहेच. त्याचे उदाहरण म्हणजे त्याची 'जय जय गरबी गुजरात' ही कविता व गुजरातविषयी दुसऱ्या काही कविता. एवढेच नाही तर तो गुजरातचा पहिला भावनोत्कट ऊर्मिशील कवीही आहे. त्याने आपल्या मनातील ऊर्मी, भावना, विचार व आंतरिक संघर्ष आपल्या कवितांत नि:संकोचपणे आणि निर्भीडपणे चित्रित केले आहेत. त्याच्या कवितांत त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटलेला आपणास स्पष्ट दिसतो. ह्याच शैलीत नर्मदने सामाजिक सुधारणा, स्वातंत्र्य, निसर्ग, प्रेम, वगैरे विषयांवर कविता केल्या आहेत. त्याने तीन दीर्घ काव्ये लिहिली आहेत. ती अशी – 'वीरसिंह', 'रुदनरसिक' व 'हिंदुओनी पडती'. ह्यांतील 'वीरसिंह' व 'रुदनरसिक' अपूर्णच राहिली आहेत. 'हिंदुओनी पडती' हे काव्य नर्मदने धावत्या ओळींच्या एकाच 'रोला' नावाच्या छंदात लिहिले आहे. ते १५०० ओळींचे आहे. नर्मदने स्वत: त्या कवितेचे वर्णन 'समाजसुधारकांचे बायबल' असे केले आहे. हे रूपकात्मक महाकाव्य आहे. ह्या काव्यात अशी कथा आहे–सुधारादित्य नावाचा राजा (सुधारणा) वहेम यवनाशी (अंधश्रद्धा) लढाई करतो. नर्मद हा त्याचा सरसेनापती असतो. धर्म व इतिहास ह्यांच्या अभ्यासाने एकत्र केलेले सर्व ज्ञानकण नर्मदने ह्या काव्यात उपयोगात आणले आहेत. भारत वैभवाच्या शिखरावर असलेल्या काळापासून घसरत घसरत येत त्याची कशी अधोगती झाली, त्याचे अगदी स्पष्ट वर्णन केलेले आहे. ह्या अधोगतीचे कारण रूढींचे अवास्तव प्राबल्य, अंधश्रद्धा, अदूरदृष्टी, जातीयता व सामाजिक विषमता हे होय. त्याने केलेले वीररस व करुणरसाचे चित्रण मनावर प्रभाव पाडणारे आहे आणि काव्याचा शेवट मात्र आशावादाने झाला आहे. ही कविता काहीजणांच्या मते दलपतरामाच्या 'वेनचरित्रा'पेक्षा काव्यगुणात श्रेष्ठ आहे.

ह्या संदर्भात ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे की, नर्मदने वर्णन केलेला भारत हा फक्त हिंदूचा भारत देश आहे. म्हणून हिंदूंचे वैभव म्हणजेच भारताचे वैभव अशी त्याची निष्ठा आहे आणि हिंदूंच्या स्वभावातील दोष व सामाजिक आर्थिक विषमता ह्याचमुळे भारताचा ऱ्हास व अधोगती झाली, असे तो ठामपणे मानतो.

नर्मदने गुजराती गद्यलेखनात घातलेली भर त्याने पद्यात घातलेल्या भरीपेक्षा अधिक मोलाची आहे. गद्यात त्याचे विविध विषयांवर लेखन आहे. 'नर्मगद्य' हा त्याच्या निबंधांचा व लेखांचा संग्रह आहे. 'राज्यरंग' हा सर्व जगातील मुख्य

देश व संस्कृती ह्यांच्या उन्नती व अधोगतीचा इतिहास आहे. 'मारी हकीकत' (माझ्या विषयीची सत्य हकीकत) व 'उत्तर नर्मद चरित्र' ह्यांत आपल्या जीवनातील अनेक घटनांचे सविस्तर वर्णन त्याने केले आहे. ह्यात त्याचे वडील लाभशंकर ह्यांचे आलेखिलेले चित्र फारच सुंदर आहे. 'धर्मविचार' ह्यात नर्मदच्या वैचारिक परिवर्तनानंतरच्या लेखांचा संग्रह आहे. ह्या सर्व पुस्तकांतील गद्य फारच सुंदर रीतीने लिहिलेले आहे आणि ते आजसुद्धा वाचताना आनंद होईल, असे आहे.

## दलपतराम व नर्मद

दलपतराम व नर्मद हे आपल्या सामाजिक सुधारणांच्या युगातील दोन महत्त्वाचे कवी आहेत. युयुत्सू वीराच्या आवेशाने नर्मदने आपली सामाजिक सुधारणेची चळवळ सुरू केली हे त्याचे युद्धगीत आहे. "मारू किंवा मरू असा निश्चय करून समरांगणात उडी घ्या—पुढे तुम्हाला विजय मिळेल."[२२]

दलपतरामने आपल्या वाचकांना सावधगिरीचा इशारा दिला आहे. तो म्हणतो— "बंधूनो, लोकांना हळूहळू सुधारणा करायला शिकवा, जर तुम्ही एक सबंध लाडू उचलून मुंग्यांच्या समूहावर टाकाल तर त्या चिरडल्या जाऊन मरून जातील; पण जर तो फोडून त्याचा चुरा करून त्यांच्यापुढे पसराल तर त्या आनंदाने तो खातील."[२३]

ह्यावरून ह्या दोघांच्या स्वभावातील फरक दिसून येतो. नर्मद सुधारणांच्या बाबतीत अधीर, उतावळा होता. दलपतराम धीरोदात्त व शान्त होता. आवेश व उत्साह ह्या नर्मदच्या प्रेरणा तर स्वस्थपणाने विचारपूर्वक सर्व बाबतींचा विचार करून पुढे जाणे ही दलपतरामची वृत्ती. भावनांचा आविष्कार हा नर्मदच्या काव्याचा विशेष, तर दलपतरामाच्या काव्यातून व्यावहारिक विचार व कलाकौशल्य दृग्गोचर होतात.

शिवाय दलपतमध्ये एक मोठी गोष्ट होती, जिचा नर्मदमध्ये अभाव होता, ती म्हणजे विनोदबुद्धी. दलपतराम आपल्या स्वतःच्या चुकांबद्दल अथवा मूर्खपणाबद्दल स्वतःलाच हसणारा होता. हे आपल्याला त्याच्या जीवनातील एका प्रसंगावरून दिसून येते. त्याने एकदा शेअरबाजारात पुष्कळ पैसा घातला व १८६५ मध्ये शेअरमार्केट पडले व त्याचा पैसा बुडाला. तेव्हा त्याने आपल्या मूर्खपणाबद्दल आपलीच थट्टा केली.

शब्दावर श्लेष करून त्याने म्हटले आहे :

"शेर-सिंह व शेर-गुंतवलेला पैसा—
शिकारी 'शेर' ची शिकार करायला गेला
पण पारडे उलटेच फिरले व शेरानेच
शिकाऱ्याला मारून टाकले"[२४]

विनोद, उपहास व परिहासयुक्त अशा कविता दलपतने जितक्या लिहिल्या तितक्या गुजरातच्या दुसऱ्या कोणत्याही कवीने लिहिल्या नाहीत.

नर्मद उत्साही व स्वप्ने पाहणारा होता तर दलपतराम व्यवहारी बुद्धीचा व विचारवन्त होता; पण दोघेही 'नव्या युगाच्या प्रभात' चे स्वागत करणारे होते. दोघानाही हे पूर्णपणे पटले होते की, जग पूर्वीपेक्षा खूपच बदलले आहे व झपाट्याने एकसारखे बदलतच चालले आहे. जर आपल्या देशाला ह्या सर्वांशी टक्कर देऊन टिकून राहायचे असेल तर आपल्यालाही आवश्यक ते बदल केलेच पाहिजेत व जगाशी सामंजस्य साधले पाहिजे. माणसाने देश, समाज व आपल्या स्वत:बद्दलचे कर्तव्य काय आहे, त्याचा पूर्ण विचार करून योग्य ते बदल केले पाहिजेत, असे दोघांनीही प्रतिपादन केले. बालविवाह, शारीरिक दृष्टीने विषमता असलेल्या वधूवरांची लग्ने, म्हातारपणी जीर्ण झालेल्या पुरुषांची लग्ने, मृत्यूनंतर काही दिवस देण्यात येणाऱ्या जेवणावळी वगैरे सामाजिक अपप्रवृत्ती व रीतरिवाजांचा दोघांनीही सारखाच धिक्कार केला. दोघांनीही वाचकांच्या मनावर पुढील गोष्टी जोरदारपणे बिंबविण्याचा प्रयत्न केला. "वैमनस्य, आळस, परनिंदा ह्यांचा त्याग करा. भुतेखेते, चेटकिणी, जारण-मारणादि क्रिया ह्यांसारख्या अंधश्रद्धा सोडून द्या." दोघांनी व्यापार व उद्योगधंदे ह्यांचे महत्त्व काय आहे ते सांगितले. दोघांनी जवळ जवळ एकसारख्याच विषयावर लिहिले व त्याबद्दल दोघांचीही मते जवळ जवळ एकसारखीच होती. फक्त त्यात एक मोठा फरक होता. तो म्हणजे नर्मदची मते जास्त जहाल होती व ती तो प्रखरपणे प्रगट करी; पण दलपतरामाचे विचार जास्त व्यवहारी होते व दलपतरामाची भव्य शब्दसंपत्ती, विचार प्रगट करण्याची संस्कारी शैली, छंदांची पूर्णता वगैरे गोष्टींचा नर्मदमध्ये अभाव दिसून येतो.

दलपतरामने सुद्धा गद्यलेखन केले आहे; पण गद्यलेखनात नर्मदचा वाटा फार मोठा आहे. नर्मद व दलपत ह्यांची तुलना करण्याचे बरेच प्रयत्न झाले आहेत. अशा एका प्रयत्नात नवलरामने नर्मदला दलपतरामपेक्षा महान व अधिक सरस कवी ठरविले होते; पण काही वर्षांनी त्याने आपले मत बदलले व असे प्रतिपादन केले की, दोघेही सारखेच अलौकिक होते. १९३३ साली जेव्हा नर्मदची पहिली जन्मशताब्दी गुजरातमध्ये अनेक ठिकाणी साजरी करण्यात आली तेव्हा नर्मदचा साहजिकच जास्त उदो उदो करण्यात आला. विश्वनाथ भट्टला नर्मदचे लहानसे चरित्र लिहिण्याचे काम सोपविले होते. त्याशिवाय त्याला नर्मदच्या गद्यलेखांचा एक संग्रह व पद्यांचा एक संग्रह, चांगले चांगले उतारे पसंत करून प्रकाशित करण्याचे काम देण्यात आले होते. ते त्याने उत्तम रीतीने पार पाडले. त्याचे लेखन म्हणजे एखाद्या निष्ठावान प्रशंसकाने आपल्या दैवताची केलेली प्रशंसा

होती व ज्या प्रशंसा विशिष्ट प्रसंगाला उद्देशून विश्वनाथभट्टला ही कामगिरी सोपविण्यात आली होती त्या दृष्टीने त्याने ज्या प्रकारे लिहिले ते योग्यच होते; पण त्यामुळे अजाणतेपणे अथवा बिनहेतुपुर:सर का होईना, ज्या लोकांनी नर्मद व दलपतच्या लेखनाचे बरोबर वाचन केले नव्हते ते लोक दलपतरामला योग्य न्याय न देता नर्मदपेक्षा कमी लेखू लागले.

आणखी थोड्या वर्षांनी उच्चभ्रू पंडित श्री. जे. ए. संजाना ह्यांनी ह्या अवास्तव स्तुतीला कंटाळून नर्मद व दलपत ह्या दोघांच्या ग्रंथांचा व काव्यांचा अभ्यास केला आणि म्हटले, 'मी दलपतरामची एक कवी व एक मनुष्य म्हणून फार स्तुती केली, कारण माझे असे ठाम मत आहे की, त्या स्तुतीला तो पात्रच आहे व मला मनापासून असे वाटते की गुजरातने (आपलेच नुकसान करून) गुजरातच्या ह्या कवीश्वरावर अन्याय केला आहे व त्याचा काही अपराध नसताना त्याला उच्च स्थानापासून (सिंहासनावरून) दूर केला आहे. ह्या जगातील खऱ्या राजपुत्रांना सिंहासनावरून कायमचे दूर करता येईल अथवा त्यांना कायमचे त्यांच्या स्थानाला मुकावे लागेल; पण ह्या कवीश्वराला तुम्हाला कायमचे त्याच्या उच्च स्थानावरून दूर करता येणार नाही. तो आज ना उद्या आपले उच्च स्थान प्राप्त केल्याशिवाय राहणार नाही. कारण समय हा त्याचा साहायक आहे व तो कल्पान्तापर्यंत वाट पाहू शकेल. आज नाही तर आणखी २० वर्षांनी अथवा आणखी ५० वर्षांनी दलपत पुन्हा आपले स्थान प्राप्त करील. गेल्या सहाशे वर्षांतील श्रेष्ठ गुजराती कवींची यादी करू गेल्यास पहिल्या ६ नंबरात दलपतचा नक्की समावेश होईल. इतकेच नव्हे, तर त्या यादीत तो फारच मानाचे व उच्च स्थान प्राप्त करील.'[२५]

संजानाच्या ह्या मताशी आपण शब्दश: सहमत झालो नाही तरी आपल्याला असे कबूल करावे लागेल की, काही आपल्याला अज्ञात अशा कारणांनी दलपतरामाची प्रमाणाबाहेर उपेक्षा करण्यात आली व नर्मदची अवास्तव अशी फार स्तुती करण्यात आली.

## भोळानाथ साराभाई

प्रार्थना समाजाच्या स्थापकांपैकी एक (१८२३–१८८६) 'ईश्वरप्रार्थनामाला' ह्या काव्यासाठी प्रसिद्ध आहे. ह्या भक्ताच्या ईश्वराबद्दलच्या भक्तिभावनेचे एक निराळेच रूप आढळते. मध्यकालीन भक्त आपल्या व्यक्तिगत देवाची पूजा, उपासना वगैरे करून ईश्वराला याचना करीत असे. आपल्यावर देवाची कृपा व्हावी व आपल्या सांसारिक अडचणी दूर व्हाव्यात, असा वैयक्तिक दृष्टिकोण त्यांच्या भक्तीत असे.

'प्रार्थना समाज' व कलकत्त्याचा 'ब्राह्मो समाज' ह्यांची तत्त्वे एकच आहेत, फक्त फरक एवढाच की सुरुवातीला जातिभेदाचे समूळ उच्चाटन करणे ह्या गोष्टीचा अंतर्भाव प्रार्थना समाजाने आपल्या पंथात केला नव्हता. बाकी दोघांनाही ईश्वराचे निराकार रूप मान्य होते. मध्यकालीन भक्त-कवी ईश्वराच्या साकार रूपाला मानीत असत बाकी ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान व सर्वत्र असणारा असा आहे, ह्या बाबतीत 'ब्राह्मो समाज', 'प्रार्थना समाज' व मध्यकालीन कवी ह्यांचे एकमत होते; पण एक मोठा फरक हा आहे की, मध्यकालीन भक्त-कवी अनेक देवांना भजत असत; पण 'प्रार्थना समाजा'चे अनुयायी असे मानत की देव फक्त एकच आहे. तोच एक जगाचा उत्पत्तिकर्ता, नियंता व संहारकर्ता आहे. त्याने निर्माण केलेल्या अनेक वस्तूपेक्षा तो निराळा आहे व त्या एकाशिवाय दुसरा कोणीही ईश्वर नाही.

'प्रार्थना समाजा'च्या सभासदांची (प्रार्थनासमाजी) मध्यकालीन भक्ताप्रमाणे प्रार्थनेवर श्रद्धा होती; पण त्यांचा पूजेच्या कोणत्याही बाह्य उपचारावर विश्वास नव्हता. तसेच सांसारिक गोष्टींसाठी ईश्वराची प्रार्थना करणे हे त्यांना मान्य नव्हते. ते ईश्वराकडे – एखादे बालक आपल्या मातापित्यांकडे ज्या भावनेने जाते– तसे जातात (प्रेमी किंवा प्रेमिकेप्रमाणे नाही) व त्याला अनन्यभावे शरण जाऊन प्रार्थना करतात–

असतो मा सत् गमय
तमसो मा ज्योतिर्गमय
मृत्योर्मा अमृतं गमय ।।

"मला असत्यातून सत्याकडे ने. अंधारातून प्रकाशाकडे ने व मृत्यूपासून अमृताकडे (शाश्वत सत्य) घेऊन जा. मला सदाचरणाचे पालन करण्याची शक्ती दे". एकाच शुद्ध पवित्र देवावर (शक्तीवर) श्रद्धा ठेवून आपले व्यक्तिगत आचरण सात्त्विक व निःस्वार्थी असावे, हे त्यांच्या भक्तीचे मर्म होते. ह्या प्रकारच्या भक्तीमुळे ईश्वरही प्रसन्न होतो आणि तो भक्ताच्या आत्म्याला इहलोकी व परलोकीही साहाय्य करतो, अशी त्यांची मान्यता होती.

भोळानाथची 'ईश्वरप्रार्थनामाला' ह्याच प्रकारच्या भक्तीचा मुद्रालेख आहे. ह्याचे दोन मोठे ग्रंथ आहेत व त्यात ३० अंक आहेत. त्यातील २८ भोळानाथने लिहिले व त्याच्या मृत्यूनंतर शेवटचे दोन अंक त्याचा मुलगा नरसिंहराव ह्याने पूर्ण केले. एक एक अंक महिन्याच्या प्रत्येक दिवशी वाचला जावा, असा हेतू होता.

'ईश्वरप्रार्थनामाले'च्या एकेका भागात थोडी थोडी पदे आहेत. ती चांगली सुस्वर गाण्यासारखी आहेत. गद्यात एक एक प्रार्थना आहे. ती त्या वेळच्या

कोणत्याही लेखकाच्या गद्याशी बरोबरी करू शकेल अशी आहे. सर्वात शेवटी आरती आहे. आरती अभंग व दिंडी वृत्तात आहे. मुंबईच्या 'प्रार्थना समाजा'च्या आरतीवरून ह्या आरतीची रचना सुचली असावी.

'फर्दर माईलस्टोन्स इन गुजराती लिटरेचर' ह्यात स्व. कृष्णलाल मो. झवेरी हे सारांशरूपाने लिहितात, "प्रत्येक गद्य-प्रार्थना नम्र, भक्तियुक्त भाषेने नटलेली आहे. अत्यंत नम्रतेने व भावनापूर्ण शब्दांनी ईश्वराला विनंती केली आहे. आपले दोष व अपूर्णता विसरून गरीब व निःसीम उपासकाला शक्ती द्यावी, अशी मागणी केली आहे. चांगली प्रेरणा लाभून ईश्वरी आज्ञा व मार्गदर्शनापासून आपण ढळू नये अशी विनंती केलेली आहे. 'सदाचार बल दे', ईश्वराची भक्ती, त्याची दैवी दया, मानवाची क्षुद्रता व त्याची दुर्बलता इ. त्याच्या प्रार्थनेचे विषय आहेत."

भक्ती हा भोलानाथाच्या कवितेचा स्थायिभाव आहे.

त्याने ईश्वराची उपासना केली; पण त्याच्या उपासनेच्या काव्यात नरसिंह, मीरा किंवा दयारामासारखी प्रखरता किंवा भावनोत्कटता नाही; पण भोलानाथाचे अंतःकरण हे खऱ्या भक्ताचे अंतःकरण आहे व कोणत्याही मध्यकालीन भक्तकवीच्या कवितेत दिसून येते तशीच शुद्ध सन्निष्ठा त्याच्या कवितेत दिसून येते. त्याचे समकालीन नर्मद व दलपत ह्यांच्या भक्तिकाव्यापेक्षा भोलानाथाचे विचार व शब्द ह्यात जास्त सुसंस्कृतता उठावाने दिसून येते.

भोलानाथाची सबंध 'ईश्वरप्रार्थनामाला' हिन्दीत अनुवादित झाली आहे. त्याच्या काही कवितांचे तर बंगालीतही भाषांतर झाले आहे.

## महिपतराम रूपराम नीलकंठ [ १८२९–१८९१ ]

महिपतराम रूपराम नीलकंठ ह्याचा जन्म सुरत येथे झाला. तो समाजसुधारक व शिक्षणखात्यात सरकारी अधिकारी होता. त्याने एक सामाजिक कादंबरी 'सासू-वहूनी लडाई' (सासू-सुनेचे भांडण) व दोन ऐतिहासिक कादंबऱ्या 'वनराज चावडो' व 'सुधारा जेसंग' (सिद्धराज जयसिंह) ह्या लिहिल्या आहेत. त्याशिवाय त्याने करसनदास मूळजी व त्याची पत्नी पार्वती कुंवर ह्यांची जीवनचरित्रे व 'इंग्लेंडनी मुसाफरीनुं वर्णन' (इंग्लंडच्या प्रवासाचे वर्णन) हे प्रवासवर्णन लिहिले. हे गुजराती भाषेतील पहिलेच प्रवासवर्णन आहे. त्यात त्याने ब्रिटिश लोकांचे जीवन व त्यांचा समाज ह्यांचे वर्णन केले आहे. महिपतरामने 'भवाईसंग्रह' नावाच्या पुस्तकात भवाईचा संग्रहही प्रसिद्ध केला आहे.

ह्यांपैकी 'सासू-वहूनी लडाई' (१८६६) ही गुजरातीतील पहिली सामाजिक कादंबरी आहे. इतकेच नव्हे तर ती गुजराती भाषेतील पहिलीच कादंबरी आहे,

कारण ती 'करण घेलो' ह्या कादंबरीच्याही पूर्वी लिहिली आहे; परंतु 'करणघेलो' त्यात जरी काही दोष आहेत तरी ती त्या काळाचे जास्त चांगले प्रतिनिधित्व करणारी असल्याने तिलाच गुजराती भाषेतील पहिली कादंबरी मानण्यात येते.

'सासू-बहूनी लडाई' मध्ये गुजरातमधील मध्यमवर्गीय कुटुंबाचे गृहजीवन विनोदी भाषेत चितारले आहे. त्यात आपल्याला दुष्ट सासूची अरेरावी व जुलूम त्यामुळे साऱ्या कुटुंबातील झालेले दुःखी वातावरण ह्यांचे स्पष्ट चित्र दिसून येते. ह्या कादंबरीत तत्कालीन समाजाची स्थिती व लेखकाचा सुधारक दृष्टि-बिंदु प्रतिबिंबित झालेला दिसतो; पण त्याची शब्दसंपत्ती तोकडी आहे व विचार व्यक्त करण्याची पद्धतही अगदी सामान्य असल्यामुळे ती कमी दर्जाची झाली आहे. साहित्याच्या दृष्टीने त्यात चांगले गुण आढळत नाहीत; पण त्या वेळच्या सामाजिक परिस्थितीचा एक पुरावा म्हणूनच फक्त ह्या पुस्तकाला महत्त्व आहे. ह्यात लेखकाने प्रत्यक्ष घडलेल्या काही प्रसंगांचे वर्णन केलेले असल्यामुळे त्यात आपल्याला त्या वेळच्या समाजाचे प्रतिबिंब आरशाप्रमाणे स्पष्ट दिसते.

'वनराज चावडो' आणि 'सुधारा जेसिंग' ह्या दोन कादंबऱ्यात साहित्यिक गुण फारसे नाहीत.

महिपतराम हा जरी फार मोठा लेखक नसला तरी साहित्याचे तीन प्रकारचे लेखन करण्यात तो अग्रणी आहे. त्याने पहिली सामाजिक कादंबरी 'सासू-बहूनी लडाई' (१८६६) ही लिहिली. पहिले प्रवासवर्णन 'इंग्लेंडनी मुसाफरीनुं वर्णन' लिहिले (१८६२) व तिसरे म्हणजे सविस्तर चरित्र 'उत्तम कपोल करसनदास मूळजी' (१८७८) लिहिले.

## करसनदास मूळजी [ १८३२–१८७१ ]

करसनदासचा जन्म मुंबईत झाला. तो एक मोठा समाजसुधारक म्हणून जास्त प्रसिद्ध आहे. त्याने मोठ्या हिरिरीने 'महाराज लायबल केस' लढवली.

नर्मदचा सुरतच्या 'वैष्णव संप्रदाया'च्या मुख्य अधिपती महाराज जदुनाथ–ह्यांच्याशी वाद झाला. करसनदासने आपल्या 'सत्यप्रकाश' ह्या वृत्तपत्रात त्याविषयी लिहिले व जदुनाथ महाराजांवर खूप टीका केली. महाराजांनी करसनदासवर अब्रूनुकसानीची फिर्याद दाखल केली. त्याने महाराज जदुनाथ सारख्या एका श्रीमान्, नशिलेबाज व एका संप्रदायाच्या मुख्यावर जे आरोप केले होते ते सर्व खरे ठरले व करसनदासने ही केस जिंकली.[२६]

करसनदास पत्रकारही होता व लेखकही होता. त्याने जवळ जवळ १५ पुस्तके लिहिली. त्या सर्वांत 'इंग्लेंडमां प्रवास' हे पुस्तक उत्तम आहे. त्यातील

माहितीमुळे व लेखकाच्या लिहिण्याच्या कौशल्यपूर्ण पद्धतीमुळे ते फार गाजले. त्याचे मराठीतही भाषांतर झाले आहे.

## नंदशंकर [ १८३५–१९०५ ]

नंदशंकर तुळजाशंकर महेता ह्याचा जन्म सुरतेला झाला. शिक्षणाधिकारी मिस्टर रसेल ह्यांच्या हाताखाली तो काम करत होता. त्यांच्या प्रोत्साहनाने नंदशंकरने १८६६ मध्ये 'करण घेलो' ही कादंबरी लिहिली. ती गुजरातीतील पहिली ऐतिहासिक कादंबरी अथवा तिला पहिली अद्भुत कादंबरी म्हणता येईल. गुजरातचा शेवटचा हिंदू राजा करण वाघेला ह्याच्या पराभवाच्या प्रसंगावर ही कादंबरी आधारलेली आहे. त्याच्या विचित्र स्वभावामुळे त्याचे नाव वाघेलो (वंशाचे नाव) ऐवजी घेलो (वेडा) असे पडले. करण वाघेलोने आपला मंत्री माधव ह्याची पत्नी स्वप्नसुंदरी हिचे अपहरण केले. ह्या जुलमाने अतिशय क्रोध येऊन माधवने दिल्लीचा सुलतान अल्लाउद्दीन खिलजी ह्याला गुजरातमध्ये येऊन गुजरात जिंकून घेण्यास आमंत्रण दिले. अल्लाउद्दीनने गुजरातवर चढाई केली; पण दुसरा कोणताही हिंदू राजा करण घेलोच्या साहाय्यासाठी धावून आला नाही. शेवटी करण घेलोचा पराभव होतो. तो दक्षिणेकडच्या एका लहानशा संस्थानात बागलाण येथे पळून जाऊन आश्रय घेतो. तेथील किल्ल्यात तो आपले उर्वरित आयुष्य घालवितो आणि मानहानी व निराशेत त्याचा तेथेच अंत होतो.

ही पहिलीच ऐतिहासिक कादंबरी असल्यामुळे तीत बऱ्याच उणिवा राहिल्या आहेत. ह्या कादंबरीच्या कथावस्तूत व पात्रातही खास उल्लेखनीय असे काही नाही आणि ह्यात आपल्याला करण वाघेलोच्या वेळच्या गुजरातचे दर्शन न घडता लेखकाच्या वेळच्या गुजरातचे व विशेषकरून सुरतचेच दर्शन घडते.

नंदशंकरच्या वेळी सुरत हे सामाजिक सुधारणेच्या चळवळीने गाजत होते व त्यामुळे लेखकाने ह्या पुस्तकात बऱ्याच ठिकाणी आपले स्वतःचे प्रगत विचार प्रगट केले आहेत. तसेच त्याने त्यात आपले नैतिकता, नीतिशास्त्र, धर्म, देशभक्ती ह्यां विषयीचे व त्याच्या समकालीन वाचकांच्या आवडीचे इतर विषय ह्या विषयींचे आपले विचार प्रगट केले आहेत.

ह्या पुस्तकाचे दोन मुख्य गुण म्हणजे हुबेहुब वर्णन व उत्तम शैली. जेव्हा जेव्हा एखाद्या स्थळाचे स्वरूप व प्रसंग ह्यांचे वर्णन येते ते अतिशय उच्च कोटीचे असते.

त्या वेळी 'करण घेलो' ह्या कादंबरीचे नाव इतके गाजले की त्यापासून स्फूर्ती येऊन त्याच धर्तीवर महिपतरामने 'वनराज चावडो' व 'सुधारा जेसिंग' आणि अनंत प्रसाद त्रिकमलाल वैष्णव ह्यांनी 'राणकदेवी' ह्या ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या. 'करण घेलो'चे मराठीतही भाषांतर झाले आहे.

## नवलराम पंड्या [ १८३६ ते १८८८ ]

नवलराम लक्ष्मीशंकर पंड्याचा जन्मही सुरतेलाच झाला. कुटुंबाच्या वाईट आर्थिक परिस्थितीमुळे त्याला शाळा सोडून सुरतेच्या एका शाळेत शिक्षकाची नोकरी पत्करावी लागली; पण परिश्रम, चिकाटी, मनोबल व आत्मविश्वास ह्या गुणांच्या जोरावर त्यांची पहिल्याने सुरतेच्या 'टीचर्स ट्रेनिंग कॉलेज'च्या प्रिन्सिपॉलच्या जागेवर नेमणूक झाली. नंतर त्याची अहमदाबादला व शेवटी राजकोटला प्रिन्सिपॉल म्हणून नेमणूक झाली आणि त्याचे आपल्या वयाच्या ५२ व्या वर्षी राजकोट येथे निधन झाले.

नवलरामाला उच्च शिक्षणाचा लाभ झाला नव्हता तरी तो आपल्या चिकाटी, बुद्धिमत्ता व प्रामाणिकपणा ह्या गुणांमुळे एक प्रख्यात साहित्य-समीक्षक, कवी, नाटककार व परिपक्व विचारक म्हणून शिक्षणक्षेत्र आणि सामाजिक सुधारणांच्या क्षेत्रात तो चांगलाच गाजला.

नर्मद त्याचा निकटचा स्नेही होता. त्याच्याशी व दलपतरामशी तुलना करता नवलरामचे लेखन विपुल नव्हते; पण एकंदरीत त्याच्या लेखनाची गुणवत्ता ह्या दोघांपेक्षा अधिक दर्जाची आहे.

नवलराम बरीच वर्षे 'गुजरात शालापत्रा'चा संपादक होता. ह्या शालापत्रात मुख्यत: शिक्षणविषयक लेख असत. महान कवी कालीदासाच्या मेघदूताचे गुजरातीत भाषांतर करणारा तो पहिला लेखक होय.

ह्याशिवाय नवलरामचे ग्रंथ पुढे दिल्याप्रमाणे आहेत– 'भटनुं-भोपाळुं', 'वीरमती', 'बाळ-लग्न-बत्रिशी', 'इंग्रजी लोकोनो संक्षिप्त इतिहास' आणि 'नवल ग्रंथावली'.

'भटनुं भोपाळुं' व 'वीरमती' ही दोन नाटके आहेत. 'भटनुं भोपाळुं' हे नाटक फील्डिंग ह्या इंग्लिश लेखकाने केलेल्या *The Dumb Lady or the mock Doctor* ) ह्या मोलिअरच्या फ्रेंच नाटकाच्या ( *Un Medicine Malgre-ul* ) अनुवादाचे गुजराती रूपान्तर आहे. ह्यात नवलरामने युरोपातील सामाजिक राहणी, रीतरिवाज वगैरे बदलून त्याऐवजी गुजराती राहणी, रीतरिवाज ह्यांचे चित्र रंगविले आहे. मूळच्या पुस्तकातील हास्यरस व सौंदर्यस्थळे फारच उत्तम रीतीने नवलरामने ह्यात आणली आहेत.

'वीरमती' ह्या नाटकात माळव्याचा राजपुत्र जगदेव परमार ह्याचे फार सुंदर वर्णन केले आहे. ह्याचे कथानक काही अंशी इतिहासावरून व काही अंशी दंतकथांवरून घेतले आहे. ए. के. फॉर्बस्च्या रासमालेतून हे कथानक घेतले आहे. दुर्दैवाच्या तडाख्यांनी जगदेवची जी दुर्दशा झाली तिचे वर्णन करणारी काही भाषणे व गाणी फार सुंदर आहेत; पण एकंदरीत हे नाटक सामान्य प्रतीचेच आहे.

'बाळ लग्न बत्रिशी' व 'बाळगरबावली' ही कवितांची पुस्तके आहेत. नवलरामने थोड्याच कविता लिहिल्या आहेत पण त्यातील काही नर्मद व दलपतरामच्या कवितांपेक्षा वरच्या दर्जाच्या आहेत; 'बाळ लग्न बत्रिशी' त ३२ कविता आहेत. ह्यामध्ये कवीने उपहास, कटाक्ष, विनोद वगैरेंचा उपयोग करून बालविवाह पद्धतीवर प्रहार केले आहेत. लहान वयाच्या नवरदेवाबरोबर येणाऱ्या वऱ्हाडी लोकांचे वर्णन करताना त्यांची जनावराच्या समूहाशी तुलना केली आहे. प्रत्येक व्यक्तीच्या दर्जाप्रमाणे त्याची त्या त्या दर्जाच्या श्रेष्ठ व हलक्या प्राण्याशी त्याची तुलना केली आहे.[२७] ही कटाक्ष करण्याची पद्धत फार अभिनव आहे. 'बाळगरबावलीत' तरुण अविवाहित मुलींसाठी रचलेल्या सुंदर गरबींचा संग्रह केलेला आहे.

'गुजरातनो प्रवास' ह्या कवितेत 'रमीये गुजराते' (गुजरात मध्ये फिरूया चला) हे पालुपद वापरून केलेले वर्णन सुंदर आहे. ह्यात गुजरातमधील सुरत, अहमदाबाद वगैरे शहरातील लोकांची वृत्ती, राहणी, विचारसरणी वगैरेंचे सूक्ष्म दृष्टीने वर्णन केले आहे. ते व त्यातील विनोद फार सुंदर आहेत. 'इतिहासनी आरसी' (इतिहासाचा आरसा) ह्या त्याच्या 'गरबी'ची सुरुवात अशी आहे. "मी इतिहासाचा आरसा समोर धरून त्यात पाहिले. त्यात शाश्वत व स्थिर असे मला काहीच दिसले नाही. मला फक्त पळणाऱ्या सावल्याच दिसल्या."[२८] ह्या कवितेची शैली व शब्दसंपत्ती उल्लेखनीय आहे.

त्याची "इंग्रज राज्य करतात व ह्या देशाचे लोक दबून राहतात."[२९] ही कविता–गांधीजींनी आपल्या आत्मचरित्रात लिहिल्याप्रमाणे–गांधीजी शाळेत शिकत होते तेव्हा–तरुण व प्रौढ ह्यांना एकसारखीच प्रिय होती.[३०]

'नवल ग्रंथावली'चे चार खंड आहेत. हा नवलरामच्या गद्यलेखांचा व कवितांचा संग्रह आहे. त्यापैकी 'कवि-जीवन' – नर्मदचे चरित्र–पहिला खंड त्याच्या शैली व अभ्यासाबद्दल उल्लेखनीय आहे.

नवलराम हा गुजरातीतील श्रेष्ठ साहित्य-समीक्षकांपैकी एक आहे. तोच पहिला असा समीक्षक आहे की, ज्याने आपल्या लेख व टीपा ह्यांमध्ये साहित्याच्या आंतर व बाह्य रूप – आकार, प्रकार व आशय ह्यांबद्दल चर्चा केली आहे. त्याने साहित्यातील सर्व पैलूंचा विचार केला आहे. शब्द, शब्दकोश, छंद, व्युत्पत्ती, लिपी ह्या बाह्य अंगांपासून ते रस, कल्पनाशक्ती, मनाचे तरंग व श्लेष आदी आंतर अंगांविषयीही त्याने चर्चा केली आहे. त्याशिवाय त्याने सबंध देशाची एकच भाषा व एकच लिपी असावी[३१] व गुजरातीत शब्दांच्या जोडणीत (Spelling) समानता असावी, असे जोरदारपणे प्रतिपादन केले. वास्तववाद व आदर्शवाद, कवींचे शब्दभांडार, ऐतिहासिक कादंबऱ्यात कल्पनांचा भाग किती असावा आणि

संगीत व कविता ह्यांचा परस्पर संबंध ह्या सर्व विषयांवर त्याने चर्चा केली आहे. शिक्षणाचे माध्यम मातृभाषाच असले पाहिजे असे त्याचे म्हणणे होते व त्यासाठी त्याने ह्या कार्यात प्रत्यक्ष उडी घेतली. नरसिंहराव ह्यांनी म्हटले आहे, " नवलराम हा नुसता विद्वान् असून सामान्य प्रतीचा साहित्य-समीक्षक होता असे नव्हे तर त्याला अतिशय दूरदृष्टी होती, ती दूरवरच्या भविष्याचासुद्धा वेध घेऊ शकत होती. आज आपल्यापुढे ज्या महत्त्वाच्या समस्या उभ्या आहेत त्या स्पष्टपणे पाहणारा व त्यावर चर्चा करणारा नवलराम हा सर्वांत पहिला समीक्षक होता."

एखाद्या विशिष्ट ग्रंथाची समीक्षा करताना नवलराम स्वस्थ चित्ताने, सहानुभूतिपूर्ण पण सडेतोड व निर्भयपणे त्याचे मूल्यांकन करीत असे. " चांगल्या ग्रंथाची स्तुती करणे व वाईट ग्रंथाचा धिक्कार करणे, हे जगातील प्रत्येक समीक्षकाचे कर्तव्य आहे. "[३२] असे तो म्हणत असे व त्याप्रमाणे त्याने संनिष्ठापूर्वक आपले समीक्षाकार्य केले. केव्हा मनुष्याच्या अंगी असलेल्या दुर्बलतेमुळे त्याच्या हातून क्वचित् प्रसंगी पक्षपात झाला असेल; पण बहुतेक सर्वच प्रसंगी त्याने निष्पक्षपातीपणाने समीक्षा केलेली आहे.

समीक्षा करताना नवलराम नेहमी अगदी जागृत व तत्पर असे. आपली मते चुकीची वाटली तर जरूर असेल त्या वेळी त्याने विचारपूर्वक ती बदललेली आहेत. नर्मदच्या बाबतीत त्याने ह्याप्रमाणे केलेले आहे. जेव्हा तो तरुण होता व त्याला अशी महत्त्वाकांक्षा होती की, असा समीक्षक म्हणून आपली गणना झाली पाहिजे, ज्याला गुजरातेत नव्याने उदयास येणाऱ्या कवितांचे अस्तित्व व त्यांतील सौंदर्याची प्रथमच जाणीव झाली आहे. त्या वेळी त्याने नर्मदबद्दल असे म्हटले की; नर्मद हा अशा प्रकारचा कवी आहे की असा कवी गुजरातेत ह्यापूर्वी कधी झाला नाही व पुढे कधी होणार नाही; पण पुढे काही वर्षांनी जेव्हा त्याची मते जास्त परिपक्व झाली तेव्हा त्याने असे म्हटले, नर्मद हा त्या वेळच्या दोन मुख्य कवींपैकी[३३] एक आहे आणि आता भविष्यकाळच नक्की करील की त्यांपैकी कोणता कवी आपल्या स्थळकाळाच्या मर्यादा ओलांडून पुढे गेला आहे.

## रणछोडभाई उदयराम [१८३७–१९२३]

रणछोडभाईचा जन्म नडियादजवळ महुधा येथे झाला. त्यांनी गुजराती नाट्यसाहित्यात फार मोलाची भर घातली. त्यांनी सामाजिक व पौराणिक मिळून १४ नाटके लिहिली. त्यातील ' हरिश्चंद्र ', 'जयाकुमारी विजय', ललितादुःखदर्शक', 'नलदमयन्ती' 'तारामती स्वयंवर', 'प्रेमराय अने चारुमती' ही उल्लेखनीय आहेत.

ह्यांपैकी 'हरिश्चंद्र' हे मूळ तामीळ भाषेतील नाटकाचे इंग्रजीत केलेल्या भाषांतराचे गुजराती रूपांतर आहे. गांधीजी शाळेत शिकत असताना ह्याच

नाटकाचा फार त्यांच्या मनावर खोल परिणाम झाला होता. 'जयाकुमारी विजय' १८६२ मध्ये प्रसिद्ध झाले. ते त्यांचे स्वतःच रचलेले स्वतंत्र नाटक आहे. त्याची नायिका जयाकुमारी ही एक सुशिक्षित मुलगी आहे. ती एका अतिशय गरीब कुटुंबात जन्मलेली आहे व नायक प्राणलाल हा सुसंस्कारी आणि श्रीमंत कुटुंबात जन्मलेला युवक आहे. जयाकुमारीच्या सद्गुणांनी आकर्षित होऊन तो तिच्याशी लग्न करण्याचे ठरवतो. त्याच्या मार्गात खूप मोठी विघ्ने येतात ती पार करून तो शेवटी आपल्या कामात यशस्वी होतो. ह्या नाटकात जरी फारशी कलात्मकता नाही तरी रंगभूमीवर ते फार यशस्वी ठरले व त्यानंतर झालेल्या अनेक नाटकांचा ते नाटक आदर्शरूप ठरले. 'ललिता दुःखदर्शक' हे एक दुःखपर्यवसायी नाटक आहे. समाजातील रूढ प्रणालिकांच्या भाराखाली व्यक्ती कशी चेंगरून जाते, हे ह्यात दाखविले आहे. ललिता ही ह्या नाटकाची नायिका आहे. ललितेचे आई-बाप तिचे लग्न नंदनकुमार नावाच्या वराशी ठरवितात. त्यांनी त्याचे खानदानी कुळच फक्त लक्षात घेतलेले असते. नंदनकुमार हा एक उधळा, नीच, व्यसनाधीन व बाहेरख्याली मनुष्य असतो आणि आपल्या रखेलीचा गुलाम असतो. त्याची आई व बहिणी ह्यांना आपल्या कुटुंबाच्या मोठेपणाचा फार अभिमान असतो आणि त्यामुळे त्या नंदकुमार-पेक्षाही ललिताचा असह्य छळ करतात. तिला अत्यंत दारुण दिव्यातून जावे लागते. नंदनचा खून होतो व ललिता घर सोडून जाते; पण तरी तिला सुरक्षितता व शांती न मिळता मृत्यू येईपर्यंत झगडत राहावे लागते. ह्या नाटकाच्या कथानकाची रचना सुव्यवस्थित नाही; पण त्या वेळी ह्या नाटकाने फारच खळबळ उडवून दिली होती व त्याचा गुजरातच्या सामाजिक जीवनावर फार प्रभाव पडला होता आणि खोल परिणाम झाला होता. असे म्हणतात की ललितेची दुर्दशा पाहून कित्येक आई-बापांनी आपल्या मुलींची ठरलेली लग्ने मोडली व कित्येक वर्षे नंदन ह्या नावाचा उपयोग मूर्ख व व्यभिचारी व्यक्तीसाठी गुजराती कादंबऱ्यांचे वाचक करीत असत.

भवाईच्या ओबडधोबडपणाचा व बीभत्सपणाचा तिरस्कार वाटून रणछोड-भाईनी शिष्ट व सुसंस्कृत नाटके लिहून ते रंगभूमीवर आणू लागले. त्यांच्या दृष्टीने नाटक म्हणजे नुसते प्रेक्षकांचे मनोरंजन करणारे असे नसून नाटक हे प्रेक्षकांची मनोवृत्ती व दृष्टी सुधारून त्यांना चांगले जीवन कसे जगावे, हे शिकवण्याचे एक साधन होते. ह्या मुद्द्यावर त्यांनी कोणाशीही केव्हाही तडजोड केली नाही.

रणछोडभाईनी 'विक्रमोर्वशीयम्, 'मालविकाग्निमित्र' व 'रत्नावली' ह्या संस्कृत नाटकांचे व चार्ल्स लँब ने लिहिलेल्या *'Tales from Shakespeare'* ह्या इंग्लिश पुस्तकाचे गुजरातीत भाषांतर केले आहे.

त्यांनी 'नाट्यप्रकाश' व 'रणपिंगल' हे ग्रंथही लिहिले.' नाट्यप्रकाश' ह्या

ग्रंथात नाटचशास्त्राचे सिद्धांत वर्णिले आहेत व रणपिंगल हा छंद:शास्त्रावरील ग्रंथ आहे. त्यात मराठीतून घेतलेले 'अभंग' 'दिंडी' व 'ओवी' ह्यांचेही सविस्तर वर्णन आहे. 'रणपिंगल' हा ग्रंथ तपशीलवार व सविस्तरपणे लिहिलेला असा छंद:शास्त्रावरचा पहिलाच ग्रंथ आहे.

## भगवानलाल इंद्रजी [ १८३९-१८८८ ]

पंडित भगवानलाल इंद्रजी ह्यांचा जन्म जुनागढ येथे झाला. त्यांना शिक्षण जवळ जवळ मुळीच मिळाले नव्हते; पण त्यांनी स्वत:च परिश्रमाने लक्षपूर्वक ऐतिहासिक संशोधन व शिलालेखांचा अभ्यास केला. त्यांनी ह्या क्षेत्रात इतकी बहुमोल व महत्त्वाची कामगिरी केली आहे की १८८४ मध्ये लंडन युनिव्हर्सिटीने त्यांना 'डॉक्टर ऑफ लिटरेचर' ही पदवी बहाल केली आणि हेगच्या 'रॉयल इंस्टिटयूटने' त्यांना विदेशातील आपला सदस्य म्हणून नेमले.

गिरनार पर्वताच्या पायथ्याशी असलेला अशोक शिलालेख पूर्णपणे वाचून भगवानलाल इंद्रजींनी त्याचा संपूर्ण अर्थ विशद केला व जेम्स प्रिन्सेप ह्या पहिल्या विद्वानाने केलेले अशोक शिलालेखासंबंधीचे गैरसमज व चुका दुरुस्त केल्या.

भगवानलाल इंद्रजीला उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून इतिहासाची बरोबर मांडणी करण्याची फार तीव्र बुद्धी होती. फक्त नाणेशास्त्राचा उपयोग करून क्षत्रप राजवंशाचा अनुक्रम लावण्याचे जवळ जवळ अशक्य असे कार्य भगवानलालनी करून दाखविले. खारवेल शिलालेखाचा अर्थ लावून त्यांनी केलेली निदाने ही अगदी खरी आहेत व आजपर्यंत कोणताही इतिहाससंशोधक त्याला अमान्य करू शकलेला नाही किंवा त्याच्यांत जरा सुद्धा बदल करू शकलेला नाही.

प्रोफेसर बळवंतराय ठाकोर म्हणतात, "दुसऱ्या अनेक क्षेत्रात ज्याप्रमाणे आपल्या गुजरात-काठेवाडच्या भूमीने अनेक रत्ने पैदा केली आहेत, त्याप्रमाणे इतिहाससंशोधनाच्या क्षेत्रातही ह्या भूमीने आपल्याला एक असे नररत्न बहाल केले आहे की, जे जगातील नामांकित व निवडक विद्वान इतिहाससंशोधकांच्या पंक्तीमध्ये आपल्या तेजाने जास्त उठून दिसेल. ते नररत्न म्हणजे पंडित भगवानलाल इंद्रजी होय.[३४]" *'The Catalogue of coins of the Andhra Dynasty, The Western Satraps, Traikutak Dynasty and the Bodhi Dynasty'* ह्या ग्रंथाचा कर्ता प्रो. ई. जे. रॅपसन हा आपल्या प्रस्तावनेच्या शेवटी म्हणतो, "हे माझे आभार प्रदर्शन श्री. पंडित भगवानलाल इंद्रजी ह्यानी माझ्यावर केलेल्या उपकारांचा गौरवपूर्ण उल्लेख केल्याशिवाय पूर्ण होणार नाही. मी भारतीय नाणेशास्त्राचा एक विद्यार्थी आहे व पंडित भगवानलाल इंद्रजी ह्या महान भारतीय विद्वानाच्या कार्यामुळे माझ्यावर फार उपकार झाले आहेत. भगवानलालजींच्या कार्याचे स्मारक

म्हणून ह्या म्युझियममध्ये जे शील्ड ठेवण्यात आले आहे त्यामध्ये भगवानलालच्या वैभवशाली कार्याचा गौरव केलेला आहेच. ह्या ग्रंथाचा वरवर अभ्यास करणाऱ्यालाही स्पष्टपणे समजून येईल की, भगवानलालनी घातलेल्या पायावरच माझ्या संशोधनाची इमारत बहुतांशी उभी आहे."[३५]

## जयकृष्ण इंद्रजी [ १८४९–१९२९ ]

हा भगवानलालचा मित्र व शिष्य होता. त्यालाही विशेषसे शालेय शिक्षण मिळाले नव्हते; पण त्याने एक श्रेष्ठ वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणून नाव कमावले आहे. त्याचे 'वनस्पतिशास्त्र' हे पुस्तक तज्ज्ञांकडून गौरवान्वित झालेले आहे. त्यांची 'बरोडानी वनस्पति' व 'कच्छनी वनस्पति' ही पुस्तके आजसुद्धा संदर्भ-ग्रंथ म्हणून फार मौल्यवान मानली जातात. ऐतिहासिक संशोधनाच्या बाबतीत भगवानलालला जसे मानाचे स्थान प्राप्त झाले तसेच मानाचे स्थान जयकृष्ण इंद्रजीला वनस्पतिशास्त्रात प्राप्त झाले.

## जहांगीर आर्देसर तल्यारखान [ १९२३–१९४६ ]

हे बडोदा सरकारचे पोलीस कमिशनर होते. आपल्या ' मुद्रा व कुलीन ' ह्या कांदबरीबद्दल ते विशेष प्रसिद्ध आहेत (१८८४). त्या काळी लिहिलेल्या दुसऱ्या अनेक कादंबऱ्यांप्रमाणे ह्या कादंबरीवर कर्नल मेडोज टेलरच्या कादंबऱ्यांचा प्रभाव पडलेला आढळतो. ' मुद्रा अने कुलीन ' ह्यात नायक कुलीनसिंह व नायिका मुद्रा अनेक संकट-परंपरांतून गेल्यानंतर शेवटी शक्तिशाली ब्रिटिश सिंहाने दिलेल्या संरक्षण व मदतीने सुखी होतात असे दाखविले आहे. कथानकातील मुख्य गोष्टींचा हैदरअल्लीचा उदय व त्याने व त्याचा पुत्र टिपू सुलतान ह्यांनी केलेला जुलूम ह्या गोष्टींशी संबंध जोडला आहे. ही कादंबरी व ' रत्नलक्ष्मी ' (१८८१) ही कादंबरी ह्या चांगल्या लिहिल्या आहेत. पात्रांचे रेखाचित्र स्पष्टपणे रेखाटलेले असून, ह्यांत सर्वत्र लेखकाची मानवी स्वभावाचे निरीक्षण करण्याची सूक्ष्म दृष्टी दिसून येते. १९ व्या शतकाच्या शेवटची २० वर्षे तल्यारखानाच्या कादंबऱ्यांनी असामान्य लोकप्रियता प्राप्त केली. गुजराती कादंबऱ्यांच्या वाचकांत कित्येक वर्षे तल्यारखानाचे नाव अतिशय परिचित व प्रिय झाले होते.

त्याशिवाय त्याने 'काव्यगुटिका अथवा स्थिति-प्रदर्शन' (१९०६) हा कविता-संग्रहही रचला आहे. त्यातील काही कविता शुद्ध गुजरातीत तर काही कविता पारसी गुजरातीत लिहिल्या आहेत. पारसी गुजराती म्हणजे पारसी लोकांनी वापरलेले वाक्यप्रचार जीत अधिक आहेत अशी भाषा. कवी सुन्दरम्नी म्हटले आहे की, 'त्या काळी समाजातील वर्गभेदाची इतकी विदारक जाणीव कवीने व्यक्त केली आहे

ही एक आश्चर्याची गोष्ट आहे. उदाहरणार्थ पुढील ओळी–"हे धनवन्ता, तुला गरीब लोकांच्या दुर्दशेची कशी कल्पना येणार ? त्यांच्या हालअपेष्टा, दुःखे तुला कशी कळणार ? भुकेल्या माणसाचा भुकेचा भडका म्हणजे काय हे तुला अनुभवाशिवाय कळायचे नाही. भुकेने व्याकुळ झालेल्या मुलांची तू कशाला काळजी करशील ? नग्न माणसाच्या थंडीची तुला काय कल्पना येणार ? तू तर चांगला शाल लपेटून बसला आहेस."[३६]

## हरगोविंददास द्वारकादास कांटावाला [ १८४९–१९३२ ]

ह्यांचा जन्म खेडा जिल्ह्यात उमरेठ येथे झाला. साहित्याचे संशोधन व मध्यकालीन साहित्याचे संपादन ह्यांबद्दल ते जास्त प्रसिद्ध आहेत. 'प्राचीन काव्य त्रैमासिक' ह्याच्या ३० अंकांतून व 'प्राचीन काव्यमाला' ह्याच्या ३५ अंकांतून हे सर्व त्यांनी प्रसिद्ध केले. ही मासिके बडोदा सरकारतर्फे प्रसिद्ध होत असत. श्री. कांटावाला हे त्या वेळी बडोदा संस्थानात शिक्षणाधिकारी होते. 'प्रेमानंदनां नाटको' व इतर काही वादग्रस्त ग्रंथही ह्याच मालिकेतून प्रसिद्ध झाले.

हरगोविंददासनी एक कविताही लिहिली आहे. तिचे नाव 'पानिपत' अथवा 'कुरुक्षेत्र'. त्यानी 'बे बहेनो' आणि 'अंधेरी नगरीनो गर्दभसेन' ह्या दोन गोष्टी व 'केळवणीनुं शास्त्र अने कला', 'संसार सुधारो' व 'देशी कारीगरीने उत्तेजन' ही तीन पुस्तके लिहिली आहेत. 'पानिपत' ह्या कवितेत दिल्लीजवळच्या पानिपत नावाच्या रणक्षेत्रावर झालेल्या कित्येक निर्णायक लढायांचे वर्णन आहे. ह्यांत साहित्यिक गुण फारसे नाहीत; पण त्यात प्रखर देशभक्तीचा उद्रेक दिसून येतो आणि लढाईतील काही प्रसंगांचे जोरदार व उत्साहपूर्ण भाषेत केलेले वर्णन आढळून येते. हरगोविंददास हे साहित्यात दैनंदिन व्यवहारातील साध्या व सरळ भाषेचे पुरस्कर्ते होते.

## इच्छाराम देसाई [ १८५३–१९१२ ]

इच्छाराम सूर्यराम देसाई ह्यांचा जन्म सुरत येथे झाला. जबाबदारीचे पूण भान असलेला एक श्रेष्ठ पत्रकार म्हणून त्यांची ख्याती आहे. मध्यकालीन गुजराती कवींच्या हजारो अप्रसिद्ध अशा कविता उजेडात आणून त्या 'बृहत् काव्यदोहन'च्या आठ खंडांत प्रसिद्ध करण्याचे महत् कार्य त्यांनी केले.

दलपतरामने ह्यापूर्वी 'काव्यदोहना'चे दोन खंड तयार केले होते; पण बऱ्याच वर्षांपूर्वी त्याच्या सर्व प्रती खलास झाल्या होत्या व सरकारी आदेशानुसार 'ओखाहरण' व 'नलाख्यान' ह्या प्रेमानंदाच्या आख्यानातील भडक शृंगाराचा भाग वगळून ते दोन खंड इच्छारामाने पुन्हा प्रसिद्ध केले.

१८१८ मध्ये ' स्वतंत्रता ' ह्या नावाचे मासिक प्रसिद्ध करून त्यांनी आपली पत्रकाराची कारकीर्द सुरू केली. 'स्वतंत्रता' ह्या मासिकाच्या तिसऱ्या अंकात प्रसिद्ध झालेल्या ' आम्हाला राजकीय स्वातंत्र्य द्या ' ह्या लेखामुळे इच्छारामला अटक करून त्याच्यावर राजद्रोहाचा खटला भरण्यात आला; पण त्यात तो निर्दोषी ठरला व त्याची सुटका करण्यात आली; पण १८८९ मध्ये 'स्वतंत्रता' मासिक मात्र बंद पडले.

नंतर १८८० च्या जून महिन्याच्या ६ तारखेस इच्छारामने 'गुजराती'[३७] हे साप्ताहिक मुंबईहून सुरू केले. नर्मदचे बरेच लेख 'गुजराती'तून प्रसिद्ध झाले. पुढे ते लेख त्याच्याच 'धर्मविचार' ह्या पुस्तकात व मणिलाल द्विवेदींच्या 'नारीप्रतिष्ठा' ह्या पुस्तकात संग्रहित करण्यात आले. १८८५ मध्ये 'इंडियन नॅशनल कॉंग्रेस'ची स्थापना झाल्यानंतर 'गुजराती' हे साप्ताहिक कॉंग्रेसच्या राजकीय विचारांचा पुरस्कार करणारे पत्र झाले. गुजरातच्या राजकीय व सांस्कृतिक जीवनावर पुष्कळ वर्षेपर्यंत 'गुजराती'चा फार मोठा प्रभाव होता.

सरकारला अर्थातच 'गुजराती'चे स्पष्ट व निर्भीड विचार-दृष्टिकोण सहन होणे किंवा त्याकडे लक्ष न देणे शक्यच नव्हते. म्हणून १९१० मध्ये सरकारने 'गुजराती'कडून २५०० रु. चा जामीन मागितला. इच्छारामच्या मनावर ह्यामुळे मोठा आघात झाल्याने त्याने 'गुजराती'तून आपले अंगच काढून घेतले. १९१२ मध्ये त्याचा मृत्यू झाल्यानंतर त्याचा मुलगा मणिराम ह्याने 'गुजराती'चे संपादक-पद स्वीकारले व ते १९२९ पर्यंत चालविले. नंतर त्याचे दिवाळे निघाल्यामुळे ते बंद पडले. इच्छारामने काही कादंबऱ्याही लिहिल्या आहेत. त्यांपैकी 'गंगा—एक गुर्जरवार्ता', 'हिंद अने ब्रिटानिया' आणि 'चंद्रकांत'— ३ भाग, उल्लेखनीय आहेत. 'गंगा—एक गुर्जरवार्ता' (१८८८) ही एकेकाळी एक चांगल्यापैकी कादंबरी म्हणून गाजली होती. मणिलाल द्विवेदींनी गुजराती साहित्यातील उत्तम अशा १०० ग्रंथांच्या यादीत तिचा समावेश केला आहे. ह्या कादंबरीचे मराठीत भाषांतर झाले आहे.

'हिंद अने ब्रिटानिया' (१८८६) ह्या कादंबरीत भारत व ब्रिटन ह्यांचा ऐतिहासिक संबंध व ब्रिटिशांची येथील राजवट ह्याची चर्चा आहे. काही ॲंग्लोइंडियन पत्रकारांना त्यात राजद्रोहाचा वास आला व त्यांनी इच्छारामला अटक केली पाहिजे असा आरडाओरडा चालविला;[३८] पण दोन इंग्लिश सद्‌गृहस्थांनी हे पुस्तक वाचले व खाजगी रीतीने सरकारला कळविले की, त्यांत राजद्रोह किंवा आक्षेप घेण्याजोगे काहीच नाही. ह्या पुस्तकाचेही मराठीत भाषांतर झाले आहे 'चंद्रकान्त' (तीन भाग १८८९, १९०१ व १९०७) ह्या पुस्तकास कादंबरी असे म्हणता येणार नाही. ह्या पुस्तकाचा खरा कर्ता कोण

ह्याबद्दल वाद चालू होता. काही लोकांनी असे उठविले की, इच्छारामाने ते पुस्तक कोणा वेदान्ती पंडिताकडून लिहवून घेतले. त्यामध्ये आणखी एक घोटाळा म्हणजे हरजीवन केवलराम नावाच्या डाकोरच्या एका हरदासाने तो ग्रंथ आपण स्वत: लिहिला, असा प्रचार चालू केला.[३९]

खरे पाहता इच्छारामचा मुलगा नटवरलाल ह्याने म्हटल्याप्रमाणे इच्छाराम त्या वेळी इतका कर्जबाजारी झाला होता की कोणाकडूनही ग्रंथ लिहवून घेणे त्याला शक्यच नव्हते. उलट ज्या ज्या वेळी इच्छारामने शास्त्र्यांकडून संस्कृत ग्रंथांची भाषांतरे करवून घेतली त्या प्रत्येक वेळी त्याने त्या त्या ग्रंथांवर अनुवाद करणाऱ्यांची नावे लिहवून प्रसिद्ध केली आहेत. 'चंद्रकान्त' ह्या कादंबरीचा मराठी व हिंदी अनुवाद झालेला आहे. हा समय पुढील साहित्यिकांबद्दलही उल्लेखनीय आहे.

## दुर्गाराम मंछाराम दवे [ १८०९–१९७८ ]

दुर्गाराम मंछाराम दवे हा शाळेत शिक्षक असल्यामुळे दुर्गाराम महेताजी ह्या नावाने प्रख्यात होता. हा आपल्या दैनंदिनी (डायरी) बद्दल प्रसिद्ध आहे. ह्या दैनंदिनीत सुरतेच्या 'मानवधर्मसभे'च्या १८४३ ते १८४५ ह्या वर्षांतील कार्याच्या अहवालाची टिपणे व त्याच्या स्वत:च्या जाहीर जीवनातील कार्यांची नोंद केलेली आहे.[४०] ही दैनंदिनी म्हणजे गुजरातीतील पहिली आत्मचरित्रात्मक टिपणे आहेत. दुर्गारामाने दलपतराम, नर्मद व रणछोडभाई गिरधरलाल ह्यांच्या पूर्वी गद्यात लिहिण्याची सुरुवात केली. म्हणून ही दैनंदिनी म्हणजे चांगल्या चिंतनात्मक गद्यशैलीचा सर्वात जुना नमुना म्हणता येईल व ह्यापासूनच पुढे निबंध कला उदयास आली.

## वज्रलाल कालिदास शास्त्री [ १८२५–१९०३ ]

ह्यांचे नाव भाषाशास्त्राचा पहिला लेखक म्हणून प्रख्यात आहे.

## वल्लभजी हरिदत्त आचार्य [ १८४०–१९११ ]

ह्याने भगवानलाल इंद्रजीला अशोक शिलालेखाच्या नकला करण्यास मदत केली. त्याचप्रमाणे स्वत: पाटण येथील अनेक शिलालेखांच्या नकलाही केल्या. त्याने इतिहास व पुरातत्त्वविद्ये– (Archaeology)– चा अभ्यास केला होता. त्याने 'रामायणा'चे समश्लोकी गुजराती भाषांतर केले असा निर्देश केला जातो; पण ते संपूर्ण 'रामायणा'चे भाषांतर होते की, त्यातील फक्त कांही थोड्या भागांचेच भाषांतर होते हे समजण्यास मार्ग नाही. हे भाषांतर छापून प्रसिद्ध झालेले नाही. त्याने काही कविताही लिहिल्या आहेत.

## अंबालाल साकरलाल देसाई [१८४४–१९१४]

ह्यांचे नाव उद्योगधंदे, राजकारण, राज्यकारभार, अर्थशास्त्र वगैरे विषयांवर परिपक्व समतोल बुद्धीने केलेल्या चर्चेबद्दल प्रसिद्ध आहे. काही बाबतीत ते महात्मा गांधींचेही पूर्वगामी आहेत. त्यांची 'शांतिदास' (१९००) ही गुजरातीतील पहिली स्वतंत्रपणे रचलेली लघुकथा आहे, असे काही तज्ज्ञांचे मत आहे.

## तळटीपा [ भाग १ ]

१. ए. के. फॉर्बस् (१८२१–१८६५) हा स्कॉटलंडचा होता; पण त्याचा जन्म लंडनला झाला होता. त्यांची 'ईस्ट इंडिया कंपनी'च्या सिव्हिल सर्व्हिसमध्ये नेमणूक झाली. म्हणून ते १८४३ साली मुंबईला आले. १८४६ मध्ये ते असिस्टंट जज्ज म्हणून अहमदाबादला (गुजरात) आले. त्यांना गुजरातच्या जुन्या पुरातत्त्वविषयक व ऐतिहासिक अवशेषांमध्ये फार रस होता. त्यांनी इंग्लिशमध्ये 'रासमाला' पुस्तक लिहिले. हे पुस्तक म्हणजे प्राचीन व मध्ययुगीन गुजरातच्या इतिहासाचा फार महत्त्वाचा पुरावा आहे. त्यांनी 'गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी'ची (आताची गुजरात विद्यासभा) १८४८ मध्ये अहमदाबाद येथे स्थापना केली. ह्यात त्यांचा हेतू, जुनी गुजराती हस्तलिखिते एकत्र करून ती सांभाळून ठेवणे, तसेच इंग्लिश भाषेतील व इतर भाषांतील पुस्तकांची गुजरातीत भाषांतरे करण्याची योग्य व्यवस्था करणे व मूळ गुजरातीतच प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांना उत्तेजन देणे, हा होता. ज्या लोकांच्यात त्याला थोडे दिवस तरी राहावयाचे होते त्या लोकांच्याबद्दल त्यांच्या मनात गाढ व खरी सहानुभूती असल्यामुळे त्यांनी गुजराती साहित्याच्या प्रगतीसाठी चिवटपूर्वक काम केले. पुढे त्यांची बदली सुरत येथे झाली. तेथे त्यांनी 'सुरत अठ्ठाविसी सोसायटी' स्थापन केली व त्यामार्फत त्यांनी 'सुरत समाचार' हे वर्तमानपत्र सुरू करवले. जेव्हा ते मुंबईला हायकोर्ट जज्ज म्हणून गेले तेव्हा १८६५ साली स्थापन झालेल्या 'फॉर्बस् गुजराती सभा' नावाच्या सोसायटीशी त्यांचे नाव जोडले गेले. सर ॲलेक्झांडर फॉर्बस् १८६१ मध्ये मुंबई युनिव्हर्सिटीचे व्हाईस चान्सेलर होते. ते १८६५ मध्ये पुणे येथे मृत्यू पावले. 'फॉर्बस्' या नावाचे 'फॉर्बस' असे रूप गुजरातमध्ये एकदा चालू झाले ते कायमचे.

२. स्मृती

३. ह्या संस्थेचे १८५६ मध्ये एलफिन्स्टन हायस्कूल व एलफिन्स्टन कॉलेज असे दोन भाग झाले. ह्या संस्थेचे प्रो. रीड (Reid) ह्यांनी आपल्या विद्यार्थ्यांच्या मनावर असे ठसविले की त्यांचे स्वतःचे शिक्षण पूर्ण झाल्यावर त्यांनी अशिक्षित लोकांना शिक्षण देण्याचे व आपला समाज सुधारण्याचे कर्तव्य बजावावे. ह्या संस्थेच्या दादाभाई नौरोजी, नौरोजी फारदुनजी, मोहनलाल रणछोडदास झवेरी, महिपतराम रूपराम, करसनदास मूळजी वगैरे विद्यार्थ्यांनी आपल्या देशाच्या जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रात महत्त्वाची कामगिरी बजावली.

४. आजथी हुं तारे खोळे छउं.

५. कृपया पृष्ट ९ पहावे.

६. 'मुंबई समाचार' पहिले गुजराती वर्तमानपत्र, हे पत्र अजूनही चालू आहे. ते पहिल्याने १ जुलै, १८२२ मध्ये प्रकाशित झाले.

७. नर्म—गद्य

८. नरसिंह; दयाराम (कविचरितरास)

९. 'मारी हकीगत' आणि 'उत्तर नर्मद चरित्र.'

१०. 'राज्यरंग', 'सुरतनी मुख्तेसर हकीकत', 'मेवाडनी मुख्तेसर हकीकत.'

११. 'राम-जानकी-दर्शन', 'कृष्णाकुमारी,' 'सीता-हरण,' 'श्री सार शाकुन्तल,' 'श्री बालकृष्ण विजय', 'द्रौपदी दर्शन.'

१२. 'दंडियो'चा संपादक म्हणून.

१३. धर्म विचार.

१४. पिंगळ प्रवेश.

१५. अलंकार प्रवेश.

१६. रस-प्रवेश.

१७. 'नर्मकोश' अथवा 'गुजराती शब्दार्थसंग्रह' १८७३ मध्ये प्रकाशित झाला.

१८. नर्म-कथा-कोश.

१९. १८५० नंतरचे पद्य व गद्य.

२०. त्यांचा असा विश्वास होता की औषधींचा उपयोग करून हवी तेव्हा स्फूर्ती आणता येते.

२१. ते स्वतःला एक महान् कवी प्रत्यक्ष 'पैगंबर' देवाचा संदेशवाहक मानीत असत.

२२. 'याहोम' करीने पडो, फतेह छे आगे.

२३. सज्जन, संभळावजो रे, धीरे धीरे सुधारानो सार—लाखो कीडी पर लाडवो आखो मेलियो तो मरी जाय : भूको करी भभरावीए तो ते खासी रीतेथी

खाय, सज्जन.

२४. गया शिकारे शेरने शिकारना करनार;
त्यां सामो शेरे कर्यो शिकारीनो शिकार.

२५. मुंबई युनिव्हर्सिटीने १९५० मध्ये प्रकाशित केले. पृष्ठ १५१.

२६. जदुनाथ महाराजानी करसनदासवर अब्रू नुकसदानीची फिर्याद केली व आपल्या नावाला–कीर्तीला कलंक लावल्याबद्दल त्या नुकसानीची भरपाई म्हणून ५०,००० रुपयांची मागणी केली. करसनदासनी आपल्या बचावासाठी आठ मुद्दे मांडले. कोर्टाने असा हुकूम दिला की करसनदासानी महाराजांची बेअब्रू केल्याबद्दल त्यांना नुकसान भरपाई म्हणून पाच रुपये द्यावे. बाकीच्या सात मुद्द्यांबद्दल करसनदासांचा बचाव मान्य करण्यात आला व महाराजांनीच करसनदासना खटल्याचा पुरा खर्च म्हणून ११,५०० रु. द्यावेत, असा हुकूम देण्यात आला.

२७. जान जनावरनी मळी मेघाडंबर गाजे,
बकरीबाईनो बेटडो परणे छे आजे.

२८. इतिहासनी आरसी साही, में जोयुं मांही;
थिरथावर दीठुं न कांई, फरती छे छांई.

२९. अंग्रेजो राज करे, देशी रहे दबाई.

३०. नजरचुकीने गांधीजींनी ही गरबी नर्मदची म्हणून धरली आहे.

३१. त्या वेळी हायस्कूल व कॉलेजमध्ये शिक्षणाचे माध्यम म्हणून इंग्रजी भाषेचा उपयोग केला जात असे.

३२. "सारा ग्रंथने वखाणवा अने नठाराने
तोडी पाडवा ए
ग्रंथपरीक्षकोनो दुनियामां सघळे ठेकाणे
धर्म गणाय छे."

३३. दुसरे म्हणजे दलपतराम.

३४. 'प्रो. ठाकोरनी इतिहास मीमांसा'
लेखक रसिकलाल सी. परीख.
प्रो. बी. के. ठाकोर अध्ययन ग्रंथ–पृष्ठ २७–२८
महाराजा सयाजीराव युनिव्हर्सिटी–वडोदरा.

३५. वरील पुस्तक.

३६. गनी तुं गरीबनी शुं समजे गमी,
शुं जाणे जफाओ शुं दुःखनी गती,
भुख्यांना भुखनी बळती छे आंच,

टळवळतां बच्चांनी, कोने छे दाझ ?
नागांनी ताढनो तुंने ते शुं ख्याल !
उत्तनी तुं हूंफ ले त्हारी पीठे छे श्याल !
'अर्वाचीन कविता' पहिली आवृत्ती–पृष्ठ १४२.

३७. हे नाव इच्छारामला नर्मदनी सुचवले होते.

३८. काहींचे असे म्हणणे आहे की, इच्छारामला अटक झाली, त्याच्यावर खटला चालला व मग त्याला मुक्त करण्यात आले.

३९. 'लिहिलेले' ह्याचा अर्थ कोणी सांगून उतरवून घेतले अथवा नक्कल (Copy) केली असाही होऊ शकतो.

४०. दुर्गारामनी आपली रोजनिशी १८५२ पर्यंत लिहिली; पण त्यातील बरेचसे लिखाण अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडले. जेव्हा त्यांच्या चौटा येथील शाळेला आग लागली तेव्हाच ही रोजनिशी जळून गेली. फक्त १–१–१८४५ पर्यंतची हकीकत त्यातून वाचली.

# [२]

# पंडित युग [१८५५ ते १९१५]

## गोवर्धनराम (१८५५–१९०७)

गोवर्धनराम माधवराम त्रिपाठींचा जन्म खेडा जिल्ह्यात नडियाद येथे झाला प्रत्येक व्यक्तीने स्वार्थत्यागपूर्वक आपणास योग्य व अनुकूल अशा धार्मिक, राजकीय अथवा साहित्यिक क्षेत्रांत कामगिरी करून अधिकातील अधिक लोकांचे जास्तीत जास्त हित करण्यासाठी झटले पाहिजे व त्याच्या सर्व कार्याचे तेच उद्दिष्ट असले पाहिजे असे त्याचे मत होते.

हेच ध्येय मनात ठेवून गोवर्धनरामनी आपल्या वयाच्या १६ व्या किंवा १७ व्या वर्षी आपले जीवन साहित्यांच्या द्वारे समाजसेवेसाठी अर्पण करण्याचा निश्चय केला. साहित्यिकाबाबत पहिली इच्छनीय गोष्ट ही आहे की त्याने आपल्या स्वत:शी प्रामाणिक राहिले पाहिजे व तो आर्थिक दृष्टचा स्वतंत्र असेल तरच ही गोष्ट शक्य होईल म्हणून गोवर्धनरामनी कोठलीही नोकरी न स्वीकारण्याचे ठरविले व वकीलीचा व्यवसाय करून साहित्यसेवेसाठीच आपला समय पूर्णपणे व्यतीत करण्याचे त्यांनी ठरविले. वकिलीचा धंदा करून काही झाले तरी ४०व्या वर्षी त्यातून निवृत्त

होण्याचे व साहित्यसेवेस वाहून घेण्याचे त्यांनी ठरविले कारण त्यांचे असे मत होते की, ४० व्या वर्षी माणसाची कार्यशक्ती परिपक्व व उत्तम होते. अशा प्रकारच्या दृढनिश्चयाने त्यांनी आपल्या कार्यास सुरुवात केली. कांही विशिष्ट परिस्थितीमुळे गोवर्धनरामना एकदोन प्रसंगी थोडी तडजोड करावी लागली; पण त्यांचा मुख्य निश्चय तडीस गेला. मुंबईच्या कोर्टात आपला अतिशय उत्तम चाललेला वकिलीचा व्यवसाय सोडून ४२ व्या वर्षी मुंबई सोडून ते नडियादला आले आणि तेथेच स्थाईक झाले.

ह्या कालावधीत त्यांनी इंग्लिश व संस्कृत साहित्याचे विपुल अध्ययन केले होते. मनुष्याच्या सर्व प्रकारच्या बौद्धिक कार्याची त्यांना फार आवड होती आणि सूक्ष्म दृष्टी व विषयावरील पकड असल्यामुळे ह्या जगातील जवळ जवळ सर्वच विषयांवरील अनेक पुस्तके त्यांनी वाचून काढली होती. जगातील अनेक उत्तम, प्राचीन व आधुनिक विचारवंतांशी सतत संपर्क साधून, सूक्ष्मचिंतन व शांतपणे विचार करून त्यांनी आपला स्वतःचा स्वतंत्र दृष्टिकोण बनविला होता आणि त्याच्या मदतीने ते जीवनाचे निरीक्षण करीत होते. जीवनाचा अर्थ समजून घेत होते व जीवनाचे मूल्यांकनही करीत होते.

गोवर्धनरामनी गुजराती, इंग्लिश व संस्कृत ह्या तीन भाषांत लेखन केले आहे. आपल्या वयाच्या १६ व्या वर्षी त्यांनी आपली पहिली संस्कृत कविता लिहिली. १८ व्या वर्षी त्यांनी संस्कृतमध्ये गिरनार पर्वताचे वर्णन लिहिले व कालिदासाच्या 'मेघदूत' ह्या खंडकाव्याचे अनुकरण करून आपले 'मनोदूतम्' हे काव्य लिहिण्यास सुरुवात केली व २० व्या वर्षी त्यांनी संस्कृतमध्ये 'हृदय-रुदित-शतकम्' हे काव्य लिहिले व सुंदरजी जिवाजी निबंध स्पर्धेच्या पारितोषिकासाठी 'विधिकुंठितम्' हा संस्कृत पद्यमय ग्रंथ लिहिला. वयाच्या ४३ व्या वर्षी त्यांनी 'सरस्वतीचंद्र' ह्या पुस्तकाच्या तिसऱ्या भागांत 'लक्ष्य लक्ष्य रहस्यम्' हे प्रकरण लिहिले व ४५ व्या वर्षी त्यांनी 'माधवराम स्मारिकेत' ३ उत्तम व सुंदर कविता संस्कृतमध्ये लिहिल्या.

वयाच्या १६ व्या वर्षापासून ते इंग्लिशमधून लेखन करू लागले. २२ व्या वर्षापर्यंत ते फक्त इंग्रजीतच लिहीत होते. ह्याला अपवाद फक्त संस्कृतमध्ये लिहिलेले 'हृदय-रुदित-शतकम्' व 'विधिकुंठितम्' आणि काही इतर संस्कृत गद्य लेखन आहे. २२ व्या वर्षानंतरसुद्धा ते मधून मधून इंग्रजीत लेखन करीतच होते. *The Classical poets of Gujarat and their in flunce on Society on Moral* हा त्यांनी वयाच्या ३७ व्या वर्षी रचलेला एक मोठा ग्रंथ आहे. गोवर्धनरामनी इंग्लिशमध्ये अनेक विषयांवर लेख लिहिले. ते विषय म्हणजे समाजशास्त्र, शिक्षण, अर्थशास्त्र, राजकारण, विज्ञान, इतिहास, तत्त्वज्ञान, कायदा वगैरे. हे सर्व लेख सुंदर गद्यांत लिहिलेले आहेत. फक्त एक लेख पद्यात्मक आहे.

गुजरातीत गोवर्धनरामनी पुढील पुस्तके लिहिली. 'सरस्वतीचंद्र', 'स्नेहमुद्रा', 'साक्षरजीवन', 'द लाइफ ऑफ दि लेट साक्षर नवलराम–लक्ष्मीराम', 'लीलावती जीवनकला' आणि 'कवी दयारामनो अक्षरदेह'. ह्यांशिवाय त्यांनी अनेक विद्वत्ताप्रचुर व्याख्याने दिली. १९०५ साली अहमदाबाद येथे भरलेल्या पहिल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून केलेले त्यांचे भाषण उल्लेखनीय आहे. १९०५ साली जूनच्या ३० तारखेला आणि जुलैच्या १ व २ तारखांना अहमदाबाद येथे झालेले साहित्य संमेलन हे भारतातील प्रादेशिक भाषेचे असे पहिलेच साहित्य संमेलन होय.

**सरस्वतीचंद्र–**

ही चार भागात लिहिलेली कादंबरी आहे. ह्यातील प्रत्येक भागाला स्वतंत्र नाव आहे. पहिला भाग 'बुद्धिनो कारभार'[१] १८८७ मध्ये, दुसरा भाग 'गुणसुंदरीनुं कुटुंबजाल'[२] १८९२ मध्ये, तिसरा भाग 'रत्ननगरीनुं राज्यतंत्र'[३] १९९८ मध्ये व चौथा भाग 'सरस्वतीनुं मनोराज्य'[४] अथवा लेखकाने भाषांतर केल्याप्रमाणे– *The Dreamland of Minerva of our Indian Athenaeum* ह्या नावाने सन १९०१ मध्ये ते छापून प्रसिद्ध करण्यात आले. अशा रीतीने हे पुस्तक पूर्ण करण्यास एकंदर १४ वर्षे लागली.

'सरस्वतीचंद्र' ही गुजरातीची निःसंदेह श्रेष्ठतम साहित्यकृती आहे. गोवर्धनरामच्या कृतीमध्ये ती श्रेष्ठ आहे एवढेच नाही अथवा त्या काळाचीच श्रेष्ठ कृती आहे एवढेही नाही तर ती सर्व गुजराती साहित्यातील पहिल्या प्रतीची रचना म्हणून ख्यातनाम आहे.

ह्या कादंबरीचा नायक सरस्वतीचंद्र हा तरुण, सुशिक्षित, सुसंस्कृत, सुधारलेला व श्रीमान् युवक आहे. त्याच्या लग्नाचा वाङ्निश्चय कुमुदसुंदरी नावाच्या सुंदर, शालीन, गुण व कलासंपन्न युवतीशी झालेला असतो; पण काही कारणांनी सरस्वतीचंद्र घर सोडून जातो. कुमुदसुंदरीचे आईबाप तिचे लग्न प्रमादधन नावाच्या तरुणाशी करून देतात. प्रमादधन बाहेरख्याली, दुर्व्यसनी व कुमुदसुंदरीच्या कोमल भावनाना न जुमानणारा असा निघतो. जीवनातील नानाविध परिवर्तने व आपत्तींना तोंड देत देत जीवनाचे भयंकर स्वरूप समजून घेतलेले सरस्वतीचंद्र व कुमुदसुंदरी हे दोघे पुष्कळ वर्षांनी कर्मधर्मसंयोगाने सुंदरगिरी पर्वतावरील आश्रमात एकमेकांना भेटतात. नंतर बराच गंभीर ऊहापोह व हृदयमंथन केल्यावर दोघेही आपले उर्वरित जीवन देशसेवेसाठी अर्पण करण्याचे ठरवितात. कुमुदसुंदरीची बहीण कुसुमसुंदरी हिच्याशी सरस्वतीचंद्राचे लग्न होते.

'सरस्वतीचंद्र' ह्या कादंबरीचे वरीलप्रमाणे मुख्य कथासूत्र आहे. गोवर्धनरामने कथानकात अनेक आनुषंगिक उपकथानके किंवा घटना, प्रसंग आणून जीवनाचे

सर्वांगीण स्वरूप चित्रित करून कथानकाचा विकास केला आहे. ह्यात सामाजिक, राजकीय व तत्त्वज्ञान-विषयक विषयांवर चर्चा केलेली आहे. त्यात अनेक प्रकारची पात्रे आपणास दिसून येतात. पशुतुल्य स्वभावाची पात्रे आहेत, त्याचप्रमाणे बौद्धिक व आध्यात्मिक दृष्ट्या उच्चकोटीची पात्रेही आहेत. निरनिराळ्या वयाच्या तसेच निरनिराळ्या सांस्कृतिक पातळीवरील स्त्रीपुरुषांची चित्रे आपणास त्यात दिसतात. ह्यात मनुष्याच्या बाह्य जीवनातील कलह व संघर्ष ह्यांचे वर्णन तर आहेच; पण मनुष्याच्या अंतर्मनातील संघर्ष व कलह ह्यांचे फार अद्भुत असे वर्णन आहे. सुसंस्कृत व जबाबदार मनुष्याचे स्वत:विषयीचे, त्याच्या नातलग व मित्रांविषयीचे, सामाजाविषयीचे, देशाविषयीचे, सर्व मानवजातिसंबंधीचे आणि जगातील प्रत्येक सजीव अथवा निर्जीव वस्तूसंबंधी काय कर्तव्य असले पाहिजे ह्याबद्दलच्या त्याच्या विचारदृष्टीचे समर्पक वर्णन ह्यात आहे. पाश्चिमात्य संस्कृतीच्या भारतीय संस्कृतीशी आलेल्या संपर्काने जे नवे युग उजाडले ते दृष्टीपुढे ठेवून वरील सर्व गोष्टींच विचार केलेला आहे. ह्याबद्दल त्या युगातील आपल्या जीवनावर परिणाम करणाऱ्या एकूणएक विषयांची ह्यात तात्त्विक व विचारपूर्वक चर्चा केलेली आपणास दिसून येते. ह्या बहुविध व सर्वस्पर्शी आशयामुळेच डॉ. आनंदशंकर ध्रुव ह्यांनी 'सरस्वतीचंद्रा'ला 'पुराण', ह्या संज्ञेने संबोधले असावे. ह्याचा अर्थ असा की, आपणास इतर ठिकाणी जे काही येथे आहे तेच मिळू शकेल आणि जे येथे नाही ते इतरत्र कोठेही मिळू शकणार नाही.

गोवर्धनरामचा मूळ उद्देश असा होता की, आपण आयुष्यभर केलेल्या सर्व विद्याभ्यासाचा आणि चिन्तनाचा सारांश आपल्या वाचकांपुढे ठेवावयाचा. तो सारांश एखाद्या निबन्ध किंवा प्रबन्धरूपानेही देता आला असता; पण तो कादंबरीच्या माध्यमाने दिला तरच अनेक वाचकांच्या हृदयाला जाऊन भिडेल असे वाटल्यावरून त्यांनी एवढे मोठे गुंतागुंतीचे कथानक घेऊन त्यामध्ये अनेक उपकथानके व अनेक पात्रे घेऊन, विचारांचे धागेदोरे गुंफून, प्रसंगोपात्त दीर्घ चर्चा करून, निबंधवजा विचार गुंफून व त्यांना जे जे काही सांगावयाचे होते ते सर्व सविस्तर विशद करून कादंबरीरूपाने हा ग्रंथ वाचकांपुढे ठेवला. ह्यामुळे अनेक वेळा कथेचा प्रवाह खंडित होतो हे कादंबरीच्या तिसऱ्या व चौथ्या भागात बऱ्याच मोठ्या प्रमाणात आढळून येते. अनेकदा वाचकांवर तत्त्वज्ञान, चर्चा वगैरेंचा फार ताण पडतो. केव्हा केव्हा ह्यामध्ये असंभवनीय असे प्रसंगही असतात. उदाहरणार्थ—सरस्वतीचंद्र व कुमुदसुंदरी ह्या दोघांनाही सारखे एकच स्वप्न पडते व एकामागून एक येणाऱ्या दोन अथवा तीन रात्री स्वप्नांचा अनुक्रम एकसारखाच चालू राहतो आणि अशाच सारखे आणखी काही प्रसंग आहेत. कथाप्रवाहाला अडवणारे प्रसंग, चर्चा, असंभवनीय गोष्टी व विरोधी संग असे आले असले तरी एकंदरीत सर्व कथाविस्तार पाहता असे आढळून येईल

की, मध्यवर्ती सूत्र व विचार न सोडता मूळ कथानकाचा विस्तार व विकास करून लेखक वाचकांचे मनावर प्रभावी छाप पाडतो ह्यात शंका नाही.

त्या कालखंडातील वाचकांच्या मनावर 'सरस्वतीचंद्र' ह्या कादंबरीने फार मोठा ठसा उमटविला होता ह्याबद्दल शंका नाही. अनेक लेखकांनी चार चार भागात कथानक रचले. कोणी त्यांची शैली उचलली, धर्म आणि तत्त्वज्ञानात्मक चर्चा व उपदेश करून कोणी सरस्वतीचंद्राची नक्कल करू लागले. काहींनी गोवर्धनरामची भाषा, शैली व शब्दसंपत्ती उपयोगात आणली आणि एका लेखकाने तर कमाल केली. त्याने 'प्रमादधननी प्रभुता' ह्या नावाची कादंबरी लिहून 'सरस्वतीचंद्र'चे कथानक लांबविण्याचा प्रयत्न केला. गुजरातमधील सुशिक्षित तरुण-तरुणी सरस्वतीचंद्र' कुमुद व कुसुम ह्यांच्या स्वप्नसृष्टीत रंगून जाऊ लागले. गोवर्धनरामनी सरस्वतीचंद्र व कुमुद ह्यांच्या प्रेमाच्या प्रश्नाचा' केलेला शेवट हा अनेक विद्वान व टीकाकारांचा बरेच दिवसपर्यंत वादाचा विषय झाला. 'सरस्वतीचंद्रा'ची मराठी, हिंदी व बंगाली भाषांतरे झाली. 'सरस्वतीचंद्र'चा त्या काळच्या लेखकांवर आणि त्यानंतरच्या लेखकांवर जितका प्रभाव पडला तितका दुसऱ्या कोणत्याही कादंबरीचा पडला नाही. आतापर्यंत गुजराती भाषेत शेकडो कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आहेत आणि त्यातील कित्येक अशा आहेत की, वाचक एकदा वाचायला लागल्यावर त्या वाचून पूर्ण होईपर्यंत हातातून खाली ठेवणे त्याला शक्य होत नाही.

जरी गेल्या ७० वर्षांत 'सरस्वतीचंद्रा'च्या वेळची सामाजिक व राजकीय परिस्थिती संपूर्णपणे बदलली आहे, तसेच देशाच्या राजकीय परिस्थितीच्या बाबतीत गोवर्धनरामने केलेली भविष्ये व निदाने चुकीची ठरली आहेत. त्यांच्या वेळच्या निरनिराळ्या समस्या आता अस्तित्वात नाहीत, तरी स्वरूप, शैली, सार व दूरदृष्टीचा मोठेपणा ह्या बाबतीत 'सरस्वतीचंद्र'ची बरोबरी कोणीही करू शकत नाही.

### स्नेहमुद्रा (१८८९)

ही कविता पहिल्याने १८७४–७५ मध्ये लिहिली होती; पण ती त्यानंतर १४–१५ वर्षांनी प्रसिद्ध झाली. जेव्हा ती पुस्तकरूपाने छापण्यात आली तेव्हा तीतील बराचसा भाग काढून टाकण्यात आला.

ह्या दीर्घ काव्यामागची प्रेरणा म्हणजे लेखकाची प्रथम पत्नी हरिलक्ष्मी हिचे निधन ही आहे; पण लेखक हे आपले दुःख प्रत्यक्ष प्रकट न करता एका कथेच्या नायकाची पत्नी, त्याच्या मित्राची पत्नी व स्वतः नायक ह्यांचा झालेला मृत्यू ह्या प्रसंगाचे ह्यात वर्णन केले आहे.

काव्याचा नायक उत्तरध्रुव प्रदेशातील रहिवाशी असतो. तो शूर व आदर्शवादी तरुण आहे. याची पत्नी अत्यंत प्रेमळ, मनमिळाऊ व पतीच्या प्रत्येक

शौर्याच्या व उदात्त कार्यात सहकार देणारी असते.

नायक उत्तर ध्रुवाभोवतीचा प्रदेश जिंकतो व तो भाग आपल्या मित्राच्या हवाली करून तो आपल्या पत्नीबरोबर काही राक्षसांचा संहार करण्याच्या मोहिमेवर निघतो. शेवट ते भारतात येतात. ते भारताच्या भूमीवर पाय ठेवताच त्यांना एक पेटलेली चिता दिसते व तिच्या भोवती उभे राहून लोक आरडा ओरडा आणि आकान्त करताना त्यांना दिसतात. तपास केल्यावर नायकाला असे समजते की एक स्त्री सती[१] जात असते. नायक तिला त्यातून वाचवतो व सर्व हकीकत विचारतो ती स्त्री आपल्या दुःखी वैवाहिक जीवनाची हकीकत त्याला सांगते. अत्यंत जुन्या समजुती असलेल्या हिंदू समाजाने तिचा असह्य छळ केलेला असतो. हिंदु स्त्रियांची अशी दुर्दशा व दुःख पाहून नायकाची पत्नी दुःखावेगाने जमिनीवर कोसळते व मृत्यू पावते. भारतातून परत आल्यावर नायक एका पर्वतावर जातो. तेथे त्याला आपल्या मित्राची पत्नी व तिच्या मैत्रिणी भेटतात. सर्व नायकाच्या व त्याच्या पत्नीच्या शोधात निघालेल्या असतात. तो त्यांना आपली सर्व हकीकत सांगतो आणि जेव्हा तो आपल्या पत्नीच्या मृत्यूची हकीकत सांगत असतो तेव्हा दुःखावेगाने तो बेशुद्ध पडतो व पुन्हा वर उठत नाही. मित्राची पत्नी ह्या हृदयद्रावक दृश्याने धक्का बसून नायकाच्या अंगावर पडून मृत्यू पावते; पण ह्या दोघांचे आत्मे त्यांच्या देहाभोवती पहारा करीत असतात. त्याच वेळी नायकाचा मित्र त्यांचा शोध घेत घेत त्या ठिकाणी येऊन पोहोचतो व त्याला हे करुण दृश्य दिसते. तो आपल्या मित्राच्या आत्म्याला आपली हकीकत सांगण्यास प्रवृत्त करतो आणि नायकाचे हृदय त्याला आपले सर्व दुःख निवेदन करते. ह्या ठिकाणी खरोखर 'स्नेह-मुद्रा' ह्या काव्याचा आरंभ होतो. शेवटी जेव्हा दिवस उजाडतो तेव्हा नायकाच्या हृदयातून (आत्म्यातून) एक दिव्य ज्योत प्रकट होते त्या दिव्य ज्योतीत मित्राच्या पत्नीची ज्योत एकरूप झालेली असते. मित्र त्या दिव्य ज्योतीला दृढ आलिंगन देतो व तोही त्यातच विलीन होतो. ती ज्योत वर वर जाते व त्याच वेळी सूर्य पाण्याच्या पृष्टभागातून वर येतो आणि क्षितिजावर प्रकाशू लागतो.

अशा रीतीने ' स्नेहमुद्रा ' ह्या कवितेचे कथानक गुंतागुंतीचे व अद्भुत आहे. भाषाही सरळ व प्रवाही नाही. शब्दयोजना कित्येक ठिकाणी सरळ व साधी आहे तर कित्येक ठिकाणी दुर्बोध व क्लिष्ट आहे.

पण ' स्नेहमुद्रा ' जर आपण धीराने, चिकाटीने व सहानुभूतीने वाचली तर वाचकाला त्यात निसर्गाची अतिशय सुंदर वर्णने व भव्य कल्पनाशक्तीचा अनुभव येईल. एका टेकडीच्या माथ्यावर उभे राहून वर्षाऋतूतील मेघांचे केलेले वर्णन वाचून त्याची प्रतीती होईल. याचे हे एक उदाहरण पहा–

"आणि पुन्हा तिकडे पहा. पांढऱ्या ढगाची किती सुंदर जाळीदार खिडकी झाली आहे आणि पुढे ते ढग एक सुंदर तरंगाची आकृती वाऱ्याच्या मंद झुळकेने

तळयाच्या पाण्यावर उठणाऱ्या नाजूक तरंगाप्रमाणे दिसत आहेत. हे नाजूक तरंग संथपणे वर उठत आहेत, एकमेकात मिसळत आहेत तर एका क्षणात एकमेकांपासून दूर होत आहेत. लाटालाटातून मध्ये मध्ये समांतर असे खांब तयार होत आहेत. व ते मोठे अजस्त्र खांब आकाशाच्या घुमटाला आधार देत आहेत. क्षणात ते हत्तीच्या पायाप्रमाणे सूर्यमहाराजांना गजगतीने सामोरे जात आहेत."[७].

'स्नेहमुद्रे'तील प्रेमाच्या मध्यवर्ती कल्पनेचे हे असे चित्रण आहे. पतिपत्नीच्या प्रेमाचे व्यावहारिक व शारीरिक स्वरूप शुद्ध व आत्मिक कोटीला पोहोचत जाते आणि व्यक्तीच्या प्रगती व विकास यांचे सर्वव्यापी अशा समष्टीची प्रगती व विकास यांमध्ये रूपान्तर होते.

**साक्षर-जीवन–**

गोवर्धनराम निवृत्त झाल्यानंतर १८९८ मध्ये त्यांनी हा निबंध लिहिण्यास सुरुवात केली व 'समालोचना' ह्या मासिकात पाच वर्षे हप्त्याहप्त्याने तो लिहिला तरी तो अपूर्णच राहिला आहे. गोवर्धनरामाच्या बहुतेक रचनांप्रमाणे ह्या निबंधात-सुद्धा देशभक्ती ओतप्रोत दिसून येते. गोवर्धनराम म्हणतात, 'युरोपमधील विद्वान सत्यासाठी सत्य, ज्ञानासाठी ज्ञान अशा घोषणा देत असताना येथील विद्वानांची सरस्वती-उपासना मात्र लक्ष्मीच्या सेवेत विलीन होत आहे.' गोवर्धनरामाच्या मते साक्षर (विद्वान, शाश्वताच्या मागे लागलेला) अन्नपूर्णेच्या प्रसादावर संतुष्ट असावा. म्हणजे त्याने आपल्या उपजीविकेसाठी जे काही जरुरीचे आहे त्यावरच संतुष्ट राहिले पाहिजे आणि स्वतःच्या हितासाठी व मानवजातीच्या हितासाठी ज्या प्रत्यक्ष प्रवृत्तीत भाग घ्यावा लागेल त्यापासून दूर राहिले पाहिजे आणि अशा प्रवृत्तीचा निरपेक्षपणे अभ्यास केला पाहिजे. साक्षर वर्ग जर मिळकत, पैसा इत्यादि कमावण्याच्या मागे लागला तर समाजकल्याण दूरच राहील व खरा विद्येचा अभ्यासही होणार नाही. जे खरे साक्षर आहेत ते ज्या वस्तू त्यांना दिसतात व दिसू शकतात त्यांचे पूर्ण निरीक्षण करून त्यांचे खरे स्वरूप शोधून काढतात. त्यांचे महत्त्व जाणून घेतात आणि त्यावरून त्यांचे होणारे परिणाम व नियम शोधून काढतात. खऱ्या व खोल अर्थाने साक्षर हा लोकहितासाठी कायदे करणारा समजला पाहिजे.

गोवर्धनरामने लिहिलेली 'नवलराम', 'लीलावती' (गोवर्धनरामची कन्या) व दयाराम ह्यांची चरित्रे ही मुख्यत्वे ह्या व्यक्तींचे अंतरंग स्पष्टपणे समजावे अशाच रीतीने लिहिलेली आहेत.

'नवलराम'चे चरित्र, त्याचे जीवन व लेखनकार्य ह्याविषयी जी जी माहिती मिळाली त्याचा संपूर्ण उपयोग करून, ते संपूर्णपणे तोलून मापून लिहिले आहे. 'लीलावती'च्या चरित्रात तिच्या बौद्धिक व भावनिक जीवनाचा सहानुभूतिपूर्ण

आढावा घेतलेला आहे आणि त्याच्या अनुषंगाने गोवर्धनरामनी अनेक तात्त्विक विषयांची चिकित्सा केली आहे.

दयारामाच्या चरित्रात कवीच्या जीवनातील सत्य घटनाच लिहिण्यापेक्षा त्याच्या काव्याचे मूल्यांकन करून त्याच्या शुद्धाद्वैत तत्त्वज्ञानाचे सविस्तर वर्णन विशद केले आहे.

गोवर्धनराम यांचे *Scrap-Book* (रोजनिशी) इंग्लिशमध्ये लिहिलेली आहे. ते ३० वर्षांचे होते तेव्हापासूनच त्यांनी ही रोजनिशी लिहिण्यास सुरवात केली. ह्यात लेखकाच्या मनात उठलेल्या स्वैर विचारांचा संग्रह आपणास दिसतो. त्याशिवाय त्यात काही महत्त्वाच्या नैतिक व आध्यात्मिक विषयांवरील समस्यांचे विचार दिसून येतात. शिवाय त्यात स्वतःच्या आयुष्यातील अनेक महत्त्वाच्या गोष्टींची माहिती मिळते. त्यावरून त्यांच्या कौटुंबिक जीवनाविषयीही चांगली सामग्री मिळू शकते. मात्र ही रोजनिशी म्हणजे त्याने स्वतःशी केलेले स्वगत संभाषण म्हणता येणार नाही.

## मणिलाल [ १८५८–१८९८ ]

मणिलाल नभुभाई द्विवेदी ह्यांचाही जन्म नडियादलाच झाला. नडियाद व मुंबईला शिक्षण घेऊन ते भावनगरच्या सामळदास कॉलेजात संस्कृतचे प्राध्यापक झाले. ते फक्त ४० वर्षांचे असतानाच त्यांचे निधन झाले.

'आत्मनिमज्जन', 'कान्ता', 'प्राणविनिमय', 'गुलाबसिंह', 'बालविलास' आणि 'सिद्धान्तसार' हे त्यांचे मुख्य ग्रंथ होत. त्याशिवाय त्यांनी तत्त्वज्ञान-विषयक व साहित्यिक विषयांवर अनेक लेख लिहिले. ते लेख 'सुदर्शन गद्यावली'त संग्रहित केले आहेत. अद्वैत वेदान्ताचे स्पष्टीकरण करण्यासाठी व त्यातील सूक्ष्म बारकावा विशद करण्यासाठी त्यांनी अनेक लेख व पुस्तके इंग्लिशमध्ये लिहिली.

'आत्मनिमज्जन' (१८९५) हा मणिलालच्या कवितांचा संग्रह आहे. त्यांच्या कवितेचा 'प्रेम' हा मुख्य विषय आहे. मणिलालच्या श्रद्धेनुसार अद्वैताचा अनुभव घ्यावयाचा असल्यास प्रेमाचे खरे स्वरूप ओळखणे जरूर आहे व अद्वैताचा अनुभव म्हणजेच मोक्ष. हा अनुभव केवळ मनानेच मिळू शकेल आणि त्याचे आपल्या व्यवहारातील भाषेत वर्णन करावयाचे झाल्यास त्याला शब्दरूप देण्यासाठी व्यवहारातील घटनांचा उपयोग करावा लागतो. ह्यामुळे एखाद्याला असे वाटेल की ह्या कविता अद्वैताच्या शुद्ध व स्वर्गीय तत्त्वांचे प्रतिपादन करीत नसून केवळ बाह्य दैहिक उपभोगांचे चित्रण करीत आहेत. मणिलालच्या कित्येक कवितांबद्दल वाचकांचा असा गैरसमज झालेला आहे. अर्थात अशा प्रत्येक वेळी वाचकाचाच दोष असतो असे नाही. या वेळी कवीचा स्वतःचा अनुभव अपूर्ण आहे व त्यामुळे त्या

कवितेत अद्वैत तत्त्वाचे योग्य निरूपण होत नाही त्या वेळी ती कविता फक्त व्यावहारिक व दैहिक पातळीवरच येऊन उभी राहते; पण मणिलाल ह्यांच्या काही अत्युत्कृष्ट कवितांत वाचकाला त्यांच्या भावनांची खोली व खरेपणा, अत्युत्कृष्ट शब्दचित्रे, वर्णने व स्पष्ट प्रासादिक शैलीचा अचूक अनुभव येतो. मणिलालची गुजराती भाषेला दिलेली मोठी देणगी म्हणजे त्यानी रचलेले अनेक गझल. हे गझल पर्शियन सूफींच्या[८] शैलीत लिहिलेले आहेत. कित्येक ठिकाणी त्याने पर्शियन शब्दांचा गैर उपयोग केलेला असला व कित्येक पर्शियन शब्दांचे स्पष्ट अर्थ त्यात आले नसले तरी त्यात गझल ह्या काव्य प्रकारचे हार्द मात्र चांगलेच आलेले दिसते. ह्या गझलांमधून मणिलालने सूफी कवींनी वापरलेल्या शब्दांद्वारे कित्येकदा अद्वैत वेदान्ताच्या तत्त्वांची शिकवण देण्याचा प्रयत्न केला आहे. कित्येकदा त्याने प्रेमाच्या बाबतीत दारुण निराशा प्रकट केली आहे. कित्येकदा खऱ्या व उत्कट प्रेमाची अपूर्ण अशी तृष्णा यात दिसून येते. केव्हा केव्हा नियतीच्या अनाकलनीय वळणांनी तो गोंधळून गेलेला दिसतो. नियती – नशीब – माणसाला सुख व दु:ख, आनंद व दैन्य, हर्ष व शोक ह्यांच्या झुल्यावर झुलवीत असते. तो नशीबाला विचारतो, 'हे नशीबा, अशी प्रतारणा करून तू मला कोठे नेत आहेस ?'[९] केव्हा केव्हा तो प्रेमाच्या सामर्थ्याचे वर्णन करतो. प्रेमाचे सामर्थ्य इतके मोठे आहे की, ते माणसाला जगातील सर्वात उच्च स्थानी नेऊन बसविते अथवा त्याला बाकी सर्व गोष्टींचा विसर पाडते.

मणिलालचा खालील भावार्थाच्या ओळीने सुरू झालेला गझल म्हणजे गुजराती भाषेतील एक अनुपम रत्न आहे.

> "लाखो निराशात कुठे तरी
> एखादी अमर आशा दडून राहिलेली असते."[१०]

### कान्ता (१८८२)

ह्या नाटकात संस्कृत आणि इंग्लिश नाटकाचे तंत्र उपयोगात आणले आहे. त्याचे अंक, प्रवेश, कवितांचा मध्ये मध्ये उपयोग केलेले संवाद, शृंगार, वीर, करुण व बीभत्स[११] रसांचे चित्रण संस्कृत-नाटयशैलीत केलेले आहे. त्यातील पात्रे, पात्रांच्या अन्तरंगात चाललेला संघर्ष व नाटकाचा दु:खान्त ह्यावर शेक्सपीअरच्या नाटयतंत्राचा प्रभाव दिसून येतो.

खरे पाहिले असता ह्या नाटकाचे कथानक ऐतिहासिक आहे; पण ते कथानक अशक्य वाटल्याने लेखकाने त्यात खूप फेरफार केले आहेत. लेखकाने स्वत: हे कथानक काल्पनिक आहे असे म्हटले आहे. नाटकाचे मुख्य सूत्र असे आहे. शूरसेन आपली पत्नी कान्ता हिला एक गळयातील हार देतो व त्यांचा असा विश्वास असतो की, जोपर्यंत शूरसेन जिवंत आहे तोपर्यंत तो हार

तुटणार नाही; पण असे असूनसुद्धा शूरसेन जिवंत असताना तो हार तुटतो. तेव्हा त्याची पत्नी कान्ता रूढीप्रमाणे सती जाण्याचे ठरविते. तिच्या आज्ञेप्रमाणे शहराचे मोठे बंद दरवाजे आपोआप उघडले जातात. कान्ताच्या हातातून शेंदूर, कुंकू व अग्नीचा वर्षाव होतो व चिता आपोआप पेट घेते आणि हे सर्व तिचा पती जिवंत असतानाच होते. ह्या विसंगतीमुळे मुख्य सूत्रालाच कमीपणा येतो व सुज्ञ वाचकाला नाटकापासून पूर्ण रसनिष्पत्ती होत नाही आणि नाटकापासून खरा आनंद मिळत नाही; पण नाटकातील काही वर्णने फार सुंदर आहेत. विशेषत: तरला हार तोडून टाकण्यासाठी जेव्हा कान्तेच्या शयनगृहात जात असते त्या वेळी तिच्या मनात चाललेल्या आंतर संघर्षाचे वर्णन फारच सुंदर आहे.

श्री. रमणभाई नीलकंठ ह्यांनी 'हे नाटक म्हणजे गुजराती साहित्यातील वास्तवलक्ष्यी काव्याचा एक उत्कृष्ट नमुना आहे' अशा शब्दात त्याचा फार मोठा गौरव केला आहे. मुंबई गुजराती नाटक समाजाने आपल्या रंगभूमीवरील प्रयोगाची सुरुवात ह्या नाटकाला 'कुलीन कान्ता' असे नाव देऊन १८८९ मध्ये केली.

स्व. श्री. कृष्णलाल मो. झवेरी म्हणतात, 'ह्या नाटकाचा प्रयोग मोठा प्रभावी व अजोड होता आणि तो प्रेक्षकांपुढे सादर केला तेव्हा तो एखाद्या रत्नाप्रमाणे प्रकाशमान वाटला. ह्या नाटकाचा मुंबईतील प्रयोग फार यशस्वी झाला. भावनांची प्रखरता व त्याचबरोबर त्यात भर घालणारी रंगभूमीची रचना ह्यांमुळे सुरुवातीपासून अखेरपर्यंत ह्या नाटकाने प्रेक्षकांच्या चित्तवृत्ती प्रफुल्लित ठेवल्या व गुजराती नाटक मंडळीने सादर केलेले 'कान्ता' नाटक कित्येक वर्षेपर्यंत मुंबईत फार गाजले आणि लोक त्याच्या मागे अगदी वेडे होऊन गेले. हे नाटक लिहिल्यानंतर मणिलालनी नाटके लिहिणे बंद केले आणि त्यामुळे गुजराती साहित्याची फार मोठी हानी झाली".[१२]

**नृसिंहावतार–**

मणिलालनी 'नृसिंहावतार' नावाचे दुसरे नाटक १८९७ त मुंबई गुजराती नाटक कंपनीच्या विनंतीवरून लिहिले. संस्कृत नाटकाच्या धर्तीवर ते लिहिले आहे. नाटकाचे कथानक पौराणिक कथेवर आधारित आहे; पण आपल्या जरुरी प्रमाणे त्यात त्यांनी योग्य ते फेरफार केले आहेत. लेखकाच्या मृत्यूनंतर १८९९ मध्ये रंगभूमीवर त्याचा प्रयोग करण्यात आला. 'कुलीन कान्ता' ह्या नाटकाइतके ते यशस्वी झाले की नाही ते सांगता येत नाही; पण बहुत करून ते 'कुलीन कान्ता' इतके गाजले नसावे.

**प्राणविनिमय (१८८८)–**

ह्या ग्रंथात मणिलालनी आपला योगशास्त्र व भक्तियोग ह्यांच्या अभ्यासाचे सार गोवले आहे. ह्यात जडवादापेक्षा चेतनवादाचे श्रेष्ठत्व वर्णिलेले आहे. हे

सिद्ध करण्यासाठी मणिलालनी स्वत: प्राणविनिमयाचे अनेक प्रयोग करून पाहिले. ह्या पुस्तकात त्यांनी पाश्चिमात्य (Mesmerism) वशीकरणविद्या आणि भारतीय योगशास्त्राची व स्वरशास्त्राची तुलना केली आहे.

**सिद्धान्तसार** (१८८९)–

ह्या पुस्तकात मणिलालनी भारतीय तत्त्वज्ञानविषयक विचाराच्या प्रगतीची रूपरेखा दिली आहे व असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे की, जगातील सर्व धर्मांपेक्षा सनातन 'आर्यधर्म' हाच फक्त जागतिक (विश्व) धर्म होण्याच्या योग्यतेचा आहे.

**बालविलास** (१८९३)–

नीतिशास्त्र व धर्म ह्यांवरील खास मुलींसाठी लिहिलेल्या अनेक निबंधांचा हा संग्रह आहे.

**गुलाबसिंह** (१८९७)–

लॉर्ड लिटनच्या (Zanoni) झेनोनी ह्या पुस्तकाचे गुजराती रूपांतर आहे. ह्यातील गूढार्थवादाचा मणिलालच्या मनावर फार प्रभाव पडला होता.

**सुदर्शन गद्यावली** (१९०९)–

'सुदर्शन' ह्या मासिकात वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या अनेक लेखांचा हा संग्रह आहे. मणिलाल १८९० ते १८९८ पर्यंत ह्या मासिकाचा संपादक होता. हे लेख निरनिराळ्या विषयांवर आहेत. उदाहरणार्थ : धर्म, शिक्षण, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, साहित्य, संगीत वगैरे व त्यावरून आपणास मणिलालच्या बुद्धिमत्तेची उंची दिसून येते. 'सुदर्शन गद्यावली'वरून मणिलाल हा गुजराती गद्याचा स्वामी आहे असे स्पष्ट होते.

मणिलालने इंग्लिशमध्ये 'मोनीझम' ( *Monizm* ) 'अद्वैतवाद' 'राजयोग' व 'अद्वैत तत्त्वज्ञान' ह्या विषयांवर पुस्तके लिहिली आहेत. ही पुस्तके भारत, युरोप व अमेरिकेतही प्रशंसेला पात्र झालेली आहेत.

मणिलालने भवभूतीच्या संस्कृत 'मालतीमाधव' 'उत्तररामचरित' ह्यांची केलेली गुजराती भाषांतरेही उल्लेखनीय आहेत. त्यातही 'उत्तरराम-चरिता'चे गुजराती भाषांतर हे पुष्कळ वर्षेपर्यंत एक उत्कृष्ट भाषांतर म्हणून गाजत होते. मणिलालने स्माइलसच्या *Charaeter* 'कॅरॅक्टर' ह्या इंग्लिश पुस्तकाचे केलेले भाषान्तर, 'चारित्र्य', हेही प्रसिद्ध आहे.

डॉ. धीरुभाई ठाकर ह्यांनी मणिलाल यांचे जीवन व ग्रंथ यांचा विशेष अभ्यास करून म्हटले आहे, "पुष्कळ वर्षांच्या वाचन व मननानंतर मणिलाल अशा सिद्धान्ताप्रत पोहचले की, धर्म व प्रेम ही फक्त दोनच मानवी जीवनाची मुख्य मूल्ये

आहेत. पुष्कळ गंभीर व दीर्घ मननानंतर त्यांना कळून चुकले की, ही दोन्ही मूल्ये अभिन्न आहेत व शेवटी ते अशा निर्णयाला पोहोचले की, अत्युच्च प्रेम—सर्व विश्वाला सामावून घेणारे श्रेष्ठ प्रेम—म्हणजेच मोक्ष होय. ह्या विचाराने त्यांची 'शांकर वेदान्ता'वरील श्रद्धा दृढ झाली व सर्व तत्त्वज्ञानविषयक विचारांचा आधार म्हणजे अद्वैतच आहे, असे त्यांना पटले."[13]

प्राचीन भारतीय संस्कृतीचा मणिलालना फार आदर होता. भारतीय संस्कृतीत जे जे काही उत्तम देण्यासारखे आहे त्याचे तर संपूर्ण ज्ञान मणिलालना होतेच. एवढेच नव्हे, तर त्याबरोबरच पाश्चिमात्य संस्कृतीचे जे ठळक विशेष आहेत त्यांचा सहानुभूतिपूर्ण अभ्यास करण्याची, ते समजून घेण्याचा शक्य तेवढा प्रयत्न त्यांनी केला होता; पण ह्या दोन्ही संस्कृतींची तुलना करताना त्यांना भारतीय संस्कृती अधिक आदरणीय वाटू लागली व तसे त्यांनी अगदी स्पष्ट निःसंदिग्धपणे व प्रकटपणे बोलूनही दाखविले.

मणिलालना भारतीय संस्कृतीबद्दल जाज्वल्य अभिमान होता; पण ह्याचा अर्थ असा नव्हे की, त्यातील मुख्य उणिवा व दोष त्याना दिसत नव्हते. पूर्ण विचार केल्याशिवाय ते कोणत्याच गोष्टीशी—विचाराशी—सहमत होत नसत. 'नारी प्रतिष्ठा' ह्या लेखात त्यांची स्त्रीकडे पाहण्याची दृष्टी स्पष्ट दिसून येते. स्त्रीकडे पाहण्याची त्यांची दृष्टी अंध रूढिवादाची नसून त्यांनी स्त्रीच्या बाह्य आचरणावर[14] भर न देता ज्यावरून बाह्य आचरण दिसून येते त्या आंतरिक विचारावर ते भर देत असत. पंडित युगातील एका सुपुत्राला साजेसेच हे सर्व आहे असे असूनही केव्हा केव्हा पौर्वात्य संस्कृतीची तरफदारीची अतिशयोक्ती करताना वैज्ञानिक बाबतीविषयी ते असे मुद्दे मांडतात की, त्यांना शास्त्रीय ज्ञानाचा काहीच आधार नसतो, तसेच काही वेळा ते पाश्चिमात्य संस्कृतीबद्दल कारण नसताना दुराग्रही वृत्ती ठेवतात व त्याचमुळे ते नरसिंहरावाच्या कवितेला योग्य न्याय देऊ शकले नाहीत; पण एवढे मात्र म्हणता येईल की, पौर्वात्य संस्कृतीबद्दल त्यांना इतका अत्यादर होता व त्यांची खात्री होती की पौर्वात्य संस्कृती पाश्चिमात्य संस्कृतीपेक्षा निःसंशय श्रेष्ठ आहे म्हणून साहजिक ते पाश्चिमात्य संस्कृतीच्या सामाजिक सुधारणांच्या जोरदार प्रवाहाबरोबर वाहात गेले नाहीत आणि त्यांचे भाट बनले नाहीत.

## बाळाशंकर [ १८५८–१८९८ ]

बाळाशंकर उल्लासराम कंथारियांचा जन्म नडियाद येथे झाला. त्यांचे प्रिय मित्र मणिलाल ह्यांच्या प्रमाणेच ते साहित्याचे अनन्य भक्त होते, व ते बऱ्याच मासिकांचे संपादक होते. ती मासिके म्हणजे 'भारती भूषण', 'कृष्ण महोदय' व

' बुद्धि प्रकाश ' ही होत. त्यांनी संस्कृतमधील ' मृच्छकटिकम् ', 'कर्पूरमंजरी', व 'सौंदर्यलहरी'चे गुजरातीत भाषांतर केले व हाफेजच्या काही पर्शियन गझलाचेही त्यांनी गुजरातीत भाषान्तर केले. हरिश्चंद्राच्या हिंदीतील ' चंद्रावली'चेही त्यांनी गुजरातीत भाषांतर केले. ' क्लांत कवि ' ( १९४२ ) हा बाळाशंकर ह्यांच्या कवितांचा संग्रह आहे. त्यातील मुख्य कविता ' क्लान्त कवि ' (थकलेला कवि) ही आहे. तीत छंदविषयक व भाषाविषयक अनियमितता असली तरी एकंदरीत ती कविता उल्लेखनीय आहे. उत्कट प्रेम व भक्ती ह्यांविषयीची त्यांची विधाने व शब्द-प्रयोग कविता, प्रेयसी व शक्ती ह्या तिन्हींना सारखीच लागू पडतात. ती विधाने अनुपम आहेत व त्यांतील काहीत अभिजात संस्कृत साहित्यातील सौंदर्य आपणास दिसून येते.

बाळाशंकर हा पहिला गुजराती कवी म्हणावयाचा की ज्याने पर्शियन काव्यातील मस्तपणा व एकाकार (तादात्म्य) होण्याची वृत्ती गुजरातीत आणली. त्यांची ' हरिप्रेमपंचदशी ' ही कृती ह्याची साक्ष देते. हा ३८ ऊर्मिकाव्यांचा संग्रह आहे. कवी सुंदरम्ने म्हटले आहे, " ह्या कवितात कलेच्या दृष्टीने ओढाताण झालेली दिसली तरी गझलच्या विकासाच्या व मौलिक ऊर्मि-काव्यांच्या दृष्टीनी गुजराती कवितेत ह्या कवितांनी एक महत्त्वाचे स्थान प्राप्त केले आहे."[१५]

काही प्रसिद्ध गझल पंक्तींनी बाळाशंकरचे नाव सर्वश्रुत झाले आहे. उदाहरणार्थ–" गुजारे जे शिरे तारे जगतनो नाथ ते सहेजे–विश्वचालक ईश्वर जे जे तुला भोगायला लावील ते सर्व तू सहन कर." [१६]

" जिगरनो यार जुदो तो बधो संसार जुदो छे"

" तुझा जिगरजान दोस्त जर बदलला तर सर्व जगच बदलले आहे असे समज." [१७]

" दिलदारना दर्शन विना बीजुं मने गमतुं नथी "

"माझ्या प्रेयसीच्या मुखाच्या दर्शनासारखे मला दुसरे काहीच प्रिय नाही."[१८]

ह्या ओळी प्रख्यात व लोकप्रिय झाल्या; पण एकंदरीत बाळाशंकर हा पुष्कळ दिवस एक उपेक्षित कवीच होता. मात्र १९४२ साली श्री. उमाशंकर जोशींनी आपल्या विद्वत्ताप्रचुर प्रस्तावनेसह 'क्लान्त कवि'चे संपादन व प्रकाशन करून त्याला पुन्हा उजेडात आणले आणि त्याच वेळी आपणास (गुजराती वाचकांना) समजले की, बाळाशंकरचे ' क्लान्त कवि ' हे पुस्तक १८८५ त प्रसिद्ध झाले होते– म्हणजे नरसिंहरावांच्या ' कुसुममाले'पूर्वी दोन वर्षे आधी ते प्रसिद्ध झाले होते व ही ४०० ओळींची कविता आशय, शैली व शब्दयोजना ह्या बाबतीत मध्यकालीन काव्यापेक्षा निराळी आहे. इतकेच नाही, तर दलपत व नर्मद ह्यांच्या काळच्या काव्यापेक्षासुद्धा भिन्न आहे, हे त्याच वेळी सर्वांना समजून आले.

पण ही कविता पूर्वीच्या गुजराती कवितांपेक्षा निराळी असली तरी ती संस्कृत काव्याच्या धर्तीवर लिहिलेली आहे व त्याच वेळेनंतर पुढे असे कळून चुकले की अनेक वर्ष इंग्लिश काव्याच्या धर्तीने गुजराती काव्य-रचना होत होती.

बाळाशंकरनी व्रजभाषेतसुद्धा काही सुंदर कविता रचलेल्या आहेत.

## नरसिंहराव [ १८५९–१९३७ ]

नरसिंहराव भोळानाथ दिवेटिंचा जन्म अहमदाबाद येथे झाला. त्यांनी गद्यांत व पद्यांत असे दोन्ही प्रकारे लेखन केले. पद्यांत त्यांनी 'कुसुममाला', 'हृदयवीणा', 'नूपुरझंकार', 'स्मरणसंहिता', आणि 'बुद्धचरित' ही पुस्तके लिहिली. गद्यग्रंथ–'मनोमुकुर' (चार भागात) 'स्मरणमुकुर' 'विवर्तलीला' आणि 'अभिनयकला' हे आहेत. ह्याशिवाय प्रेमानंदाच्या नावावर प्रसिद्ध असलेल्या तीन नाटकांच्या कर्त्याबद्दल त्यांनीच चर्चा केली आहे. गुजराती शुद्धलेखनाविषयी नियमावली व मार्गदर्शक तत्त्वे स्पष्ट केली आणि मुंबई युनिव्हर्सिटीने आयोजित केलेल्या 'विलसन फायलॉजिकल व्याख्यानमाले'त गुजराती भाषा व साहित्य ह्यांवर व्याख्याने दिली.[१९] त्यांचे पहिला (१९२१) व दुसरा (१९३२) असे दोन खंड आहेत. तसेच 'ठक्कर वसनजी माधवजी व्याख्यानमाले'त 'गुजराती भाषा व साहित्य' ह्या विषयांवर व्याख्याने दिली.[२०]

**कुसुममाला (१८८७)**–

नरसिंहराव दिवेटिनी १८८७ मध्ये 'कुसुममाला' हा कविता-संग्रह प्रसिद्ध करून गुजराती साहित्यात पहिले पाऊल टाकले. नर्मदची कविता जशी मध्यकालीन, कवीच्या कवितांपेक्षा निराळी दिसून आली त्याचप्रमाणे नरसिंहरावांची कविता नर्मदच्या कवितांपेक्षा रूप व आशय ह्या दोन्हीत निराळी आहे, असे दिसून आले. नर्मदने इंग्लिश कवितेचा गाभा आपल्या कवितात आणण्याचा प्रयत्न केला; पण नर्मदच्या अभ्यासाचा विस्तार व सखोलता मर्यादित असल्यामुळे त्याला ह्या कामात अल्प प्रमाणात यश मिळाले आणि त्याचे मनही शांत व स्थिर नव्हते. नरसिंहरावला उलटपक्षी युनिव्हर्सिटीच्या पद्धतशीर अभ्यासाचा लाभ झाला होता आणि त्यांची विचारपद्धती ही सुसूत्र होती. नर्मदला हे लाभ नसल्याने इंग्रजी काव्याचा व्यासंग पचवता आला नाही म्हणून नरसिंहरावच्या 'कुसुममाले'त इंग्रजी कवितेचा ठसा गुजरातीवर पूर्ण प्रमाणात प्रथमच पडलेला दिसून येतो.

'कुसुममाले'त प्रथमच प्रेम व निसर्ग ह्या विषयांवरील इंग्रजी काव्याच्या धर्तीवर लिहिलेली गुजरातीतील ऊर्मिकाव्ये–अस्सल ऊर्मिकाव्यांचे नमुने–दिसून येतात. ह्यावरून हे सिद्ध झाले की, खऱ्या ऊर्मिकाव्याला उत्कट भावनांच्या (ज्याला

नर्मद 'जुस्सा' म्हणत असे) उद्रेकाबरोबरच कल्पनाविलास, विचारवैभव व भाषासामर्थ्याचीही जरूर आहे.

नरसिंहरावांच्या काव्यात दृष्टीचा मर्यादितपणा व प्रतिभेच्या उणिवा हे दोष असले तरी वरील सर्व गुणांमुळे त्यांची 'कुसुममाला' प्रसिद्ध होताच नरसिंहरावांना अर्वाचीन गुजराती कवितेचा जनक म्हणून मानण्यात येऊ लागले.

**हृदयवीणा** (१८९६)–

ह्या कवितासंग्रहात निरनिराळ्या विषयांवरील भावगीताशिवाय काही खंडकाव्येही आहेत. ह्यात निसर्गकाव्यापेक्षा चिन्तनकाव्ये अधिक आहेत. 'कुसुममाले'तील उल्हासापेक्षा ह्यात गांभीर्य विशेष प्रतीतीस येते.

**नूपुरझंकार** (१९१४)–

ह्यांत 'चित्रविलोपन' व 'अग्निहोत्र' ह्यासारख्या श्रेष्ठ कविता असल्या तरी ह्या संग्रहात नवीन किंवा स्फूर्तिमय असे फारसे काही नाही.

**स्मरण संहिता** (१९१५)–

हे कवीचा सुपुत्र नलिनीकान्त ह्याच्या मृत्यूनंतर लिहिलेले एक शोकगीत आहे. ह्यात हृदयात उठणाऱ्या करुण कोमल भावांचे खरेखुरे दर्शन आपणास घडते. एकीकडे हृदयावर दारुण आघात झाला आहे. त्याचे वर्णन व त्याचबरोबर ईश्वरावरील दृढ श्रद्धेविषयी व संकेताविषयी मनाची खात्री पटलेली आहे. ह्यात दैवी संकेताबद्दल दृढ श्रद्धा व एका विनम्र सेवकाचा ईश्वरी इच्छेपुढे मान तुकविण्याचा दृढ निश्चय दिसून येतो. ईश्वराच्या इच्छेत आपली स्वतःची इच्छा विलीन करून पिता आपला आर्त विलाप विसरून मृत्यूकडे एक शेवट ह्या दृष्टीने न पाहता तो शाश्वताकडे जाण्याचा एक मार्ग आहे, अशा दृष्टीने आपल्या पुत्राच्या मृत्यूकडे पाहतो. नरसिंहराव पित्याच्या कोमल हृदयाने, अत्यंत विनम्र भावाने दयाळू ईश्वराला प्रार्थना करतात की, हे ईश्वरा–तुझा दरवाजा खडखडावणाऱ्या ह्या निर्दोष बालकाला तुझ्या भव्य मंगल अशा मंदिरात (प्रासादात) येऊ दे व तुझ्या हृदयाशी तू त्याला धर.

**बुद्धचरित** (१९३४)–

गौतम बुद्धाच्या जीवनाविषयी लिहिलेल्या ८ कवितांचा हा संग्रह आहे. त्यापैकी एक 'बुद्धनुं गृहागमन' (बुद्धाचे गृहागमन) ही दामोदर खुशालदास बोटादकरनी लिहिलेली आहे व बाकीच्या सात नरसिंहरावनी लिहिल्या आहेत. ह्या सातांपैकी एक तद्‌गुण (स्वतःच्या सद्‌गुणांच्या जागी जवळच्या दुसऱ्या वस्तूच्या अधिक चांगल्या गुणांची केलेली तात्पुरती अदलाबदल) ही त्यांनी स्वतः रचलेली

आहे. बाकीच्या सहा ह्या सर एड्विन आरनोल्ड ह्याने इंग्लिशमध्ये लिहिलेल्या *The Light of Asia* (दी लाइट ऑफ एशिया) वरून भाषांतरित केलेल्या आहेत. ह्यापैकी 'महाभिनिष्क्रमण' (बुद्धाचा गृहत्याग) ह्यात त्यांनी केलेल्या कार्डिनल न्यूमनच्या 'लीड काइण्डली लाइट' ह्या कवितेच्या 'प्रेमळ ज्योती' ह्या भाषांतराप्रमाणेच नरसिंहरावांची भाषांतरकाराची अप्रतिम बुद्धिमत्ता दिसून येते.

नरसिंहरावांची योग्यता एक कवीपेक्षा एक विद्वान पंडित म्हणून अधिक आहे. 'मनोमुकुर'च्या चार भागात अनेक गोष्टींची चर्चा केलेली आहे. त्यात साहित्याची मूलभूत तत्त्वे, तसेच काही विशिष्ट पुस्तकांचा अभ्यास व समीक्षा' आहेत. त्यांच्या मूलभूत तत्त्वांवरील चर्चेवरून त्यांची गाढ विद्वत्ता, विचारांची स्पष्टता, पृथक्करणात्मक बुद्धिमत्ता, तीव्र बुद्धी, विचारांचा अचूकपणा व संपूर्णता ह्यांची साक्ष आपणाला पटते व त्यांच्या विशिष्ट पुस्तकांचा अभ्यास व समीक्षेवरून त्यांची आकलनशक्ती व सर्वग्राहकता ह्या गुणांकडे लक्ष वेधल्याशिवाय राहात नाही. कधीकधी एखाद्या क्षुल्लक गोष्टीकडे लक्ष वेधल्यामुळे ते मूळ वस्तू विसरून जातात व कधी कधी वाचकाला त्यांची मते मुळीच पटत नाहीत तरी लेखकाच्या गाढ अभ्यासाबद्दल व प्रामाणिकपणाबद्दल आपल्याला निःसंशय आदरच वाटतो.

नरसिंहरावांनी दिलेल्या 'विल्सन फायलालॉजिकल लेक्चर्स'चे दोन खंड हे गुजराती भाषा व गुजराती साहित्यावरील सर्वात मोठे व श्रेष्ठ ग्रंथ आहेत. नर्मद, नवलराम व व्रजलालशास्त्री ह्यांनी गुजराती भाषाशास्त्रासंबंधी काही पायाभूत कार्य केले होते; पण नरसिंहरावांनीच ह्या शास्त्राचा अभ्यास संपूर्ण शास्त्रीय दृष्टीने केला. ह्या व्याख्यानात नरसिंहरावांनी पुढील विषयांची सविस्तर चर्चा केली आहे. गुजराती भाषेचा उद्‌गम व विकास, तिच्या स्वरूपात फेरफार करणारे अनेक प्रवाह, त्यातील विशिष्ट ध्वनी, उच्चाराचे नियम, नाम व क्रियापदे ह्यांच्या विभक्ति-प्रत्ययात झालेली उत्क्रांती, गुजराती शब्दांच्या व्युत्पत्तीचे नियम इत्यादी विषयांवर चर्चा आहे. थोडक्यात ही व्याख्याने म्हणजे गुजराती भाषेचा सर्वप्रथमच सविस्तर व शास्त्रीय दृष्टीने केलेला अभ्यास होय.

**अभिनयकला—**

हा 'अभिनय' ह्या विषयावर लिहिलेला प्रबंध आहे. अभिनय म्हणजे नाटकातील पात्राने घेतलेला पवित्रा, आवाज व हावभाव ह्यांमधून प्रगट केलेला भावनाविष्कार. अभिनय हा नाटकाचा आत्मा व प्राणच आहे. ह्या प्रबंधात नरसिंहरावांनी अभिनयकलेचे स्वरूप व त्याला जरूर असलेली व्यवच्छेदक लक्षणे ह्यांचे शास्त्रीय दृष्ट्या विवेचन केले आहे व पाश्चिमात्य देशातील अभिनयकलेच्या विकासाच्या तुलनेने गुजराती रंगभूमीला काय काय सुधारणा करणे आवश्यक आहे, तेही सुचवले आहे.

**स्मरणमुकुर–**

नरसिंहरावांच्या पूर्वायुष्यात त्यांना भेटलेल्या अथवा त्यांनी पाहिलेल्या अनेक प्रख्यात व्यक्तींच्या शब्दचित्रांचा हा संग्रह आहे. ह्या पुस्तकात १९ व्या शतकातील काही प्रख्यात साहित्यिक, समाजसुधारक व पुढारी ह्यांच्याबद्दलचे माहितीपूर्ण त्रोटक विनोदी किस्से आपल्याला पाहावयास मिळतात व त्यावरून १९ व्या शतकातील लोकजीवनाचे आपणास ओझरते दर्शन घडते; पण लेखकाच्या स्वतःच्या अहंपणामुळे त्याच्या कुटुंबातील अगदी जवळच्या वर्तुळातील लोकांशिवाय इतरांकडे पाहण्याची त्याची दृष्टी विशाल नसल्यामुळे त्यांना कमी लेखण्याची त्याची वृत्ती पाहून आपल्यावर कधी कधी ह्या पुस्तकाचा म्हणावा तसा अनुकूल प्रभाव पडत नाही.

**विवर्तलीला–**

हा निरनिराळ्या नोंदी, संपादकाना लिहिलेली पत्रे व नरसिंहरावानी 'ज्ञानबाळ' ह्या टोपण नावाने लिहिलेले निबंध ह्यांचा संग्रह आहे. ह्या लेखात त्यांनी सौंदर्य व तत्त्वज्ञान ह्यांतील काही प्रश्नांवर चर्चा केली आहे. ही चर्चा तुलनेने बरीच साधी, खेळकर व स्फुट अशी वाटते. ह्यापासूनच ललित निबंध लिहिण्याची सुरुवात झाली.

नरसिंहरावांच्या रोजनिशीतून काही ठिकाणी आपल्याला त्यांच्या हृदयाची खरी कोमलता व ईश्वराच्या इच्छेपुढे समर्पित होण्याच्या भावनेचे दर्शन घडते. आपत्प्रसंगी आणि कसोटीच्या वेळी धीरोदात्तपणे ईश्वरावर श्रद्धा ठेवून ते कसे राहात असत ते आपणास ह्यावरून कळून येते.

नरसिंहराव आपल्या काळातील एक महान साहित्यकार होते. आत्मप्रौढी व विनम्रता, कठोरता व कोमलता, अंमल गाजविण्याची वृत्ती व खेळाडूपणा ह्या मुळातच परस्पर विरोधी गुणांचे त्यांच्या ठिकाणी स्वाभाविक मिश्रण झालेले दिसून येते. कवितेला एक नवे वळण लावणारा कवी म्हणून त्यांच्या समकालीनांना त्यांच्याविषयी अतिशय मान व आदर होता. तसेच सहजपणे खूश न होणारा असा समीक्षक, गुजरातमध्ये त्यावेळेपर्यंत न अ ढळलेला असा भाषाशास्त्री, शुद्ध अंतःकरणाचा व ईश्वरावर गाढ व अढळ श्रद्धा असणारी प्रामाणिक व्यक्ती म्हणून ते सर्वांच्या आदरास पात्र झाले.

## केशवलाल ध्रुव [ १८५९–१९३७ ]

केशवलाल हर्षदराय ध्रुव हे भाषांतरकार, संशोधक आणि जुन्या व मध्य-कालीन गुजराती ग्रंथांचे संपादक ह्या नात्याने ख्यातनाम आहेत.

केशवलालनी विशाखदत्ताच्या संस्कृत 'मुद्राराक्षसा'चे व कालिदासाच्या

' विक्रमोर्वशीय'चे गुजरातीत 'वनमाली' ह्या टोपण नावाने भाषांतर केले, तसेच त्यांनी जयदेवाच्या संस्कृत ' गीतगोविंद 'चे अमरूच्या 'अमरुशतका'चेही गुजरातीत भाषांतर केले. त्यांनी श्रीहर्ष व भासाच्याही काही नाटकांचे संस्कृतमधून गुजरातीत भाषांतर केले आहे.

अनुवाद करताना त्यांनी मूळग्रंथातील पाठभेदांचे सूक्ष्म परीक्षण केले व नंतरच त्यांनी मूळग्रंथांतील खरा पाठ कोणता आहे ते निश्चित करून त्याचा अनुवाद केला. मूळ ग्रंथातील केवळ शब्द व त्यांचा अर्थ ह्याकडे लक्ष न देता त्यांनी ग्रंथातील मूळचा भाव व रस अनुवादात आणण्याकडे अधिक लक्ष दिले. संस्कृत नाटकाप्रमाणे निरनिराळ्या सांस्कृतिक थरातील, त्यांना अनुरूप थरातील पात्रांच्या योग्यतेप्रमाणे त्यांना अनुरूप अशी भाषा व भाव प्रकट करण्याची रीत ह्याकडे त्यांनी पूर्ण लक्ष पुरविले आहे. ह्यामुळे अर्थातच केव्हा केव्हा मध्ययुगीन अथवा जुन्या गुजराती भाषेतील अपरिचित व वापरात नसलेले शब्द त्यांनी अनुवाद करताना उपयोगात आणले आहेत व हे विशेषेकरून मूळ ग्रंथातील प्राकृत भाषणांचा अनुवाद करताना दिसून येते. त्यामुळे कित्येकदा केशवलाल ह्यांची भाषांतरे काही ठिकाणी दुर्बोध व अयोग्य अशी झाली आहेत. तरी एकंदरीत केशवलालनी केलेली भाषांतरे मूळ ग्रंथाचे हार्द त्यात बरोबर उतरले असल्यामुळे फार गाजली.

भाषांतराव्यतिरिक्त केशवलालनी खूप परिश्रमपूर्वक संशोधन करून भाषांतराच्या मूळ ग्रंथावर व त्यांच्या कर्त्यांच्या जीवनासंबंधी आणि ग्रंथासंबंधी विद्वत्तापूर्ण निबंध लिहिले. त्यांचा समय नक्की ठरवला. त्यांनी पौर्वात्य व पाश्चिमात्य प्रमाणभूत लेखकांनी प्रकट केलेली मते आणि जी काही माहिती उपलब्ध होईल तिचा पूर्ण उपयोग करूनच हे निबंध लिहिले आहेत. त्यांच्या संशोधन पद्धतीवर आनंदशंकर ध्रुव व नरसिंहराव ह्या निष्णातांनी असा जोरदार आक्षेप घेतला आहे की, ते पुरेशा पुराव्याच्या अभावीच आपले निर्णय जाहीर करतात. केशवलालनी काही मध्यकालीन व जुन्या गुजराती ग्रंथांचे संपादनही केले आहे. उदाहरणार्थ—शालणची 'कादंबरी', १५ व्या शतकातील काही जुन्या गुजराती कविता व ' अखो 'च्या, ' अनुभवबिंदु 'चे व ' कादंबरी 'चे संपादन फार सुंदर केले गेले आहे.

मध्ययुगीन आख्यानांच्या धर्तीवर केशवलालनी कालिदासाच्या मेघदूताचे भाषांतर करण्यास आरंभ केला होता. त्याप्रमाणे त्यांनी काही श्लोक लिहिलेही होते. त्यावरून केशवलाल ह्यांचा मध्यकालीन, अर्वाचीन व नेहमीच्या व्यवहारातील गुजराती भाषेवर किती अधिकार (ताबा) होता ते सिद्ध होते. हे भाषांतर अपुरेच राहिले.

१९३२ साली मुंबई युनिव्हर्सिटीच्या तर्फे त्यांनी ' ठक्कर वसनजी माधवजी

व्याख्याने दिली. व्याख्यानाचा विषय होता 'अपभ्रंश, प्राकृत आणि वैदिक छंद:शास्त्राच्या मार्गाने देशी भाषात झालेली पद्यरचनेची ऐतिहासिक उत्क्रांती व मूल्यांकन'. ह्यात त्यांची गाढ विद्वत्ता व उच्च साहित्यिक प्रतिभा दिसून येते.

प्रेमानंदाच्या नावावर असलेल्या काही नाटकांच्या रचनेत केशवलालनी मदत केली होती असे काही ठिकाणी बोलले जात होते. त्यांची गद्यशैली अत्युत्तम आहे.

## विहारी [ १८६६-१९३७ ]

बहेचरदास त्रिकमजी पटेल हे 'विहारी' ह्या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांचा जन्म सौराष्ट्रातील सिहोर येथे झाला.

कविवर्य सुंदरमनी ह्या कवीविषयी असे म्हटले आहे. "'रासमालिका' नावाच्या कविता संग्रहात कवी विहारीच्या ९ ऊर्मिकविता आहेत. ह्या कवितांवरून कवीच्या भावाभिव्यक्तीमधील बुद्धिवैभव इतके दिसून येते की, त्याची कविता पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली नसली तरी त्याचे नाव प्रामुख्याने लक्षात घेतले पाहिजे. त्यांचे भाषावैभव समृद्ध आहे. ती भाषा फार उच्च दर्जाची आहे. सामान्य लोकांच्या व्यवहारातील भाषेचा त्यात कलात्मक रीतीने भरपूर उपयोग केलेला आहे. अशी भाषा, कल्पनाशक्तीची उच्च भरारी व भावगीते (ऊर्मिकाव्ये) रचण्यातील नैपुण्य हे गुण आजच्या कोणत्याही 'रास' रचणाऱ्या कवीपेक्षा त्यांच्यात कितीतरी पटीने अधिक आहेत. त्यांच्या सर्व रचनात 'हिंदनुं झाखुं चित्र' (भारताचे ओझरते दर्शन) हे अत्युत्तम आहे. त्यात त्यांनी भारताचा भूतकाळ, वर्तमानकाळ व भविष्यकाळ ह्यांचे ओझरते दर्शन घडविले आहे. भारताच्या भावी काळाविषयी त्याचे दृश्य रंगविताना अत्युच्च कल्पनाशक्तीने परिपूर्ण अशा त्यांनी लिहिलेल्या काही पंक्ती पुढे उद्धृत केल्या आहेत."

"उत्तरेकडून हिमालयावरून येणाऱ्या मंद व मृदु मारुतलहरी वाहत राहतील व त्यामुळे रोग, दुष्ट प्रवृत्ती व दु:खांचा नाश होईल. सगळीकडे शांती व स्वस्थता प्रस्थापित होईल. हे माते, पर्जन्य अमृताचा वर्षाव करील व पृथ्वीला जलमय करील. कल्पतरूच्या[२१] मुळाभोवतीच्या आळघात पडलेल्या पाण्याने आपण पेरले आहे त्याच्यापेक्षा हजारपट अधिक पीक उत्पन्न होईल. हे माते, असा इच्छित सोन्याचा पाऊस पडेल व सागराच्या लाटा आपल्या बाजारात रत्नांच्या राशी आणून ओततील."[२२]

त्याने केलेल्या मेघदूताच्या भाषांतरात त्याचे अनुपम रचनाकौशल्य दिसून येते. दु:खाची गोष्ट आहे की, त्याच्या इतर रचना पुस्तकरूपाने आपणास उपलब्ध झालेल्या नाहीत.

विहारीने 'पंचदशी', 'ब्रह्मसूत्र', 'उपनिषदे', 'भगवद्गीता', 'उत्तररामचरित'

व 'शाकुंतला'चेही भाषांतर केल्याची नोंद आहे; पण ती प्रसिद्ध झाली की नाही ह्याविषयी काही माहिती मिळत नाही.

## कान्त [ १८६७–१९२३ ]

मणिशंकर रत्नजी भट्ट हे 'कान्त' ह्या नावाने कवी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचा जन्म सौराष्ट्रात चावंड येथे झाला. मुंबईहून पदवीधर होऊन त्यांनी बडोदा सरकारच्या शिक्षण खात्यात नोकरी स्वीकारली व नंतर ते भावनगर येथील शिक्षण खात्यात राहिले. बडोद्यात असताना त्यांनी स्वीडेनबर्गचे ग्रंथ वाचले आणि त्यांचा त्यांच्या मनावर इतका प्रभाव पडला की, वयाच्या ३३ व्या वर्षी त्यांनी ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केला. ह्या धर्मान्तराने त्यांच्या मनात इतकी भयंकर खळबळ माजली की, वयाच्या ४५ व्या वर्षी त्यांनी ख्रिस्ती धर्माचा त्याग केला व आपल्या कुटुंबीयांच्या व मित्रांच्या समवेत राहावयास मिळावे म्हणून त्यांनी पुन्हा हिन्दू धर्म स्वीकारला; पण त्यांचा ख्रिस्ती धर्मावरचा विश्वास मरेपर्यंत त्यांच्या मनात टिकून राहिला.

'कान्त' ह्यांनी थोडे गद्यलेखनही केले. त्यात दोन नाटकांचा समावेश आहे. 'रोमन स्वराज्य' व 'गुरु गोविंदसिंग'. त्यांचे इतर ग्रंथ–'प्रेसिडेण्ट लिंकननुं चरित्र' (प्रे. लिंकनचे चरित्र), 'शिक्षणनो इतिहास' (शिक्षणाचा इतिहास) व 'सिद्धान्त सारनुं अवलोकन' (मणिलाल द्विवेदींच्या सिद्धान्तसाराचे समीक्षण) हे आहेत. कान्तनी त्याशिवाय गटे, स्वीडनबर्ग, ॲरिस्टॉटल, प्लेटो व रवींद्रनाथ टागोरांच्या काही पुस्तकांचे भाषांतर केले आहे. कान्तनी काही पत्रेही लिहिली आहेत त्यावरून त्यांच्या कनवाळू व भावनापूर्ण मनाची साक्ष पटते.

ह्या सर्व ग्रंथांत 'शिक्षणनो इतिहास' हा त्या विषयांवरील प्रमुख पुस्तकांत आजही अत्युत्तम म्हणून गणला जातो. त्यांच्या नाटकात उच्च साहित्यिक गुण दिसून आले नाहीत तरी त्यातील शब्दांच्या चमत्काराने ती मनोरजक झाली आहेत.

पण कान्त हे 'कवी' म्हणूनच जास्त प्रसिद्ध आहेत व विशेषकरून ते खण्डकाव्ये लिहिणारे कवी आहेत. ही खण्डकाव्ये व त्यांच्या इतर कविता 'पूर्वालाप'मध्ये ग्रथित केल्या आहेत.

'कान्त'नी फक्त सात खण्डकाव्ये लिहिली आहेत. त्यांपैकी तीन– 'रमा', 'कल्पना अने कस्तुरीमृग' आणि 'मृगतृष्णा' सामान्य प्रतीची आहेत. 'अतिज्ञान' ही बऱ्यापैकी आहे. सहदेवाच्या मनातील भावनांचे युद्ध (संघर्ष) ह्यात वर्णिले आहे. पांडवांपैकी फक्त सहदेवालाच भविष्यात काय होईल ह्याचे ज्ञान होते; पण सर्व पांडवांनी तो लहान असल्यामुळे त्याच्याकडे दुर्लक्षच केले व सर्व कुटुंबाला भविष्यकाळी भोगाव्या लागणाऱ्या विपत्तीबद्दल त्याचा सल्ला कोणीही विचारला

नाही. दुर्योधनाने द्यूत खेळण्याचे आमंत्रण दिले व ह्या आमंत्रणाचा युधिष्ठिराने स्वीकार केला ह्याचा भावी परिणाम काय होणार ह्याचे सहदेवालाच फक्त पूर्ण ज्ञान होते. त्यामुळे आपण व आपले इतर बंधू ह्यांना तोंड मिटून द्रौपदीची घोर विटंबना प्रेक्षक म्हणून पाहावी लागणार हे ही तो जाणून होता. हे सहन न झाल्यामुळे तो साह्यासाठी द्रौपदीकडे जातो. ज्या ज्या वेळी त्याच्या मनात भावनांचा आंतरिक संघर्ष होत असे त्या त्या वेळी शांती प्राप्त करण्यासाठी तो द्रौपदीकडे जात असे; पण संकटाच्या वेळी आपण द्रौपदीचे रक्षण करू शकणार नाही ही खात्री असल्यामुळे द्रौपदीकडून सांत्वन करून घेण्याचा आपल्याला काहीही हक्क नाही, ही जाणीव झाल्यामुळे दारुण निराशेने तो बाटलीतील एक मादक द्रव पितो व बेशुद्ध होऊन पडतो.

बाकीची 'वसंतविजय', 'चक्रवाक मिथुन' व 'देवयानी' ही खंडकाव्याचे उत्कृष्ट नमुने आहेत. गुजराती खंडकाव्यात उत्कृष्ट काव्यप्रतिभेचे त्यांनी एक उदाहरण घालून दिले आहे.

**वसंतविजय–**

ह्या काव्यात पंडुराजाच्या वाट्याला जे दुःख (शाप) आले होते त्याचे वर्णन आहे. हस्तिनापुरचा राजा पण्डु ह्याला ऋषींनी शाप दिलेला असतो की, ज्या क्षणी त्याचा पत्नीशी समागम होईल त्याच क्षणी त्याला मृत्यू येईल. हा शाप डोक्यावर टांगलेला असल्यामुळे–राज्याचा–जगाचा व्यवहार सोडून आपल्या कुंती व माद्री ह्या दोन बायकांना बरोबर घेऊन तो एका पर्वतावर जातो व तेथे दोन पर्णकुट्या–एक आपल्या स्वतःसाठी व एक आपल्या २ पत्नींसाठी–बांधून राहतो.[१४] असे करण्याचा हेतू हा असतो की त्यांच्यापैकी कोणीही एकीने पंडु राजाची भेट घेऊ नये. तो स्वतः संन्यस्त जीवन जगत असतो; पण काही दिवस गेल्यावर परिस्थिती अशी उत्पन्न होते की, पण्डुराजाचा स्वतःवर काही ताबा राहत नाही व सर्वतऱ्हेची काळजी घेत असताना व ह्याचा काय परिणाम होईल ते पूर्णपणे माहीत असतानासुद्धा आपली धाकटी पत्नी माद्री हिच्याकडे तो आकृष्ट होतो व शापवाणी खरी होते–तो मृत्युमुखी पडतो.

ह्या काव्यातील संघर्ष हा नुसता मनुष्य व अनाकलनीय नियती ह्यांच्यातील नाही. किंवा फक्त मनुष्य व वसंतऋतूतील सौंदर्य ह्यातीलही नाही किंवा मनुष्याच्या अंतरमनातील चांगल्या व वाईट प्रवृत्तीमधीलही हा झगडा नाही. हा संघर्ष आहे पंडूच्या मनातील दोन इच्छांचा. एकीकडे धर्मपत्नीवरील प्रेम व दुसरीकडे त्याचे नियमबद्ध जीवन–जे त्याच्या जिवंत राहण्यासाठी आवश्यक आहे. ह्या दोन गोष्टींमधला हा संघर्ष आहे. त्यातील एकही वाईट किंवा अनीतिमय नाही. ह्या संघर्षाच्या भोवऱ्यात सापडल्यामुळे शेवटी ह्या दोन्ही गोष्टींपैकी कोणत्यातरी एका

गोष्टीची सरशी होऊन मनुष्य हतबल होतो—खाली दिलेल्या टीपेतील काही विसंगती सोडल्यास कान्तनी फार विचारपूर्वक व पायऱ्या पायऱ्यांनी काव्याची रचना करीत करीत स्वाभाविकपणाने काव्याला शेवटच्या अंतापर्यंत आणून पोहोचविले आहे.

**चक्रवाक-मिथुन—**

ह्या खण्डकाव्यात प्रेमरज्जूने बांधलेल्या एका एकनिष्ठ पक्ष्यांच्या दंपतीची दुःखान्त कहाणी आहे. 'चक्रवाक' व 'चक्रवाकी' त्यांच्या नशिबात असे लिहिलेले असते की, दिवसभर ते एकमेकांना भेटतात; पण संध्याकाळ झाली की त्यांचा वियोग होतो व एकमेकांना न भेटता सारी रात्र त्यांना आक्रंद करीत काढावी लागते.[२५]

ह्यामुळे निराश व दुःखित होऊन व ह्यातून बाहेर पडण्याचा काही मार्ग नाही हे पाहून चक्रवाक व चक्रवाकी असा निश्चय करतात की, ह्या वियोगाचा आता अंत आणला पाहिजे व त्यासाठी आपण दोघांनी बरोबरच मृत्यूला शरण गेले पाहिजे. म्हणून मावळत्या सूर्याच्या किरणाच्या बरोबर मध्ये येऊन ते आकाशात उंच उंच उडत राहतात. त्यांनी एकमेकांना गाढ आलिंगन दिलेले असते व सूर्याचे शेवटचे किरण अंधारात विलीन होण्याच्या क्षणीच ते गाढ आलिंगनात अगदी बद्ध झालेली पक्ष्यांची जोडी डोळे मिटते व मृत्यू येऊन जमिनीवर पडते.[२६]

**देवयानी—**

हे काव्य 'वसंतविजय' व 'चक्रवाक-मिथुन' ह्या काव्यापेक्षा निराळे आहे. एवढेच नव्हे, तर कान्तच्या इतर सर्व काव्यांपेक्षा निराळे आहे. त्याचा शेवट सुखद आहे. देवयानीचा कचाबद्दलचा मृदू कोमल भाव विकास पावत जाऊन त्याचे संपूर्ण उमललेल्या प्रेमपुष्पात परिवर्तन होऊन तो तिचा प्रियतम पुरुष होतो. कान्तच्या इतर काव्यात प्रेम निष्फळ होते ह्याचे कारण एका प्रेमिकाकडून दुसऱ्या प्रेमिकाला प्रतिसाद मिळत नाही किंवा दुसऱ्या कोणत्याही गोष्टीमुळे किंवा व्यक्तीमुळे प्रेमाच्या मार्गात अडथळे येतात; पण 'देवयानी' हे आनंद व सौंदर्यपूर्ण सुखान्त काव्य आहे. हे काव्य एका पौराणिक प्रसंगावर आधारित आहे. कच हा देवांचा गुरू बृहस्पती ह्याचा मुलगा असतो व देवयानी ही राक्षसांचा गुरू शुक्र ह्यांची मुलगी असते. कच विद्याप्राप्तीसाठी शुक्राचार्याकडे येतो. कच व देवयानीचे प्रेम सफल होत नाही. हे काव्य व म्हणूनच बहुतेक अपूर्णच राहिले आहे. येथेच त्याचा सुखद शेवट दाखविला आहे. कवी कान्तच्या खंडकाव्याचे विषय मनुष्याच्या जीवनांतील कसोटीच्या प्रसंगावर आधारित आहेत. गोष्टीचा आरंभ, मध्य व अन्त स्पष्टपणे वर्णन निरनिराळ्या भावनांचा सुंदर मिलाप कसा होतो आणि त्यामुळे कथेचा शेवट कसा अनिवार्य होतो व मनुष्य त्यात कसा गुरफटून जातो, ह्याचे फार सुंदर वर्णन कान्तनी केलेले आहे.

कान्त यांच्या खंडकाव्याची रचना ग्रीक शोकान्तिकांच्या धर्तीवर केलेली आहे. पहिल्या काही सुरुवातीच्या कवितात ते कथेच्या पार्श्वभूमीचे वर्णन करतात व त्यामुळे वाचकाला पुढे ज्या घटना घडणार आहेत त्यांचे पूर्ण आकलन होऊ शकते, नंतर कथेचा प्रवाह उत्तरोत्तर चढत चढत सावकाश व स्थिरपणे अन्तिम क्षणाला (चरम सीमेला) जाऊन पोहोचतो. हा क्षण जवळ जवळ काव्याच्या मध्य-भागी येतो. नंतर कथेचा प्रवाह उतरणीला लागतो. त्या वेळी कवी चातुर्याने अशी परिस्थिती निर्माण करतो की, ज्यामुळे कथेच्या प्रवाहात खंड पडतो व वाचकाला अशी आशा वाटू लागते की, पुढे येणारे संकट दूर होण्याची शक्यता आहे; पण शेवटच्या काही पंक्तीत अचानक जणू काही एक हिमनदीचा जोरदार प्रवाह वाहू लागतो की ज्यामुळे सर्व आशा नष्ट होतात व कथानक अशा शेवटाला जाऊन पोहोचते की, जेथून परत येणे शक्यच होत नाही. कान्तचे कथानक तेथेच संपते कारण त्याच्या दृष्टीने त्यातील होणारी हानी किंवा अपघात हाच भाग महत्त्वाचा आहे. त्याच्यानंतर स्वाभाविक होणाऱ्या परिवर्तनाला त्यांच्या दृष्टीने काही महत्त्व नाही.

कान्तनी आपल्या खंडकाव्यात निसर्गाचा फार सुंदर उपयोग करून घेतला आहे. निसर्ग केव्हा केव्हा मानवी प्रकृतीला अनुकूल तर कधी अत्यंत प्रतिकूल तर केव्हा केव्हा त्या बाबतीत अत्यंत उदासीन असा चित्रित केला आहे.

पात्रांच्या बदलत्या मनोवृत्तीला व परिस्थितीला साजेल अशा प्रकारे निरनिराळ्या छंदांचा उपयोग करून व अल्प प्रमाणात; पण अत्यंत योग्य अलंकार वापरून कान्तनी आपले रचनाचातुर्य प्रगट केले आहे. कान्त ह्यांची काही ऊर्मिकाव्ये 'सागर अने शशी' आणि 'उपहार अने उद्‌गार' त्यांच्या कवित्वगुणांबद्दल योग्य रीतीने वाखाणली गेली आहेत.

## रमणभाई [ १८६८–१९२८ ]

रमणभाई महिपतराम नीलकंठ ह्यांचा जन्म अहमदाबाद येथे झाला. समाजसुधारणेच्या कार्यात व अहमदाबादच्या जाहीर जीवनात त्यांनी हिरिरीने भाग घेतला. रमणभाईनी थोड्या कविता रचल्या आहेत; पण काव्यनिर्मिती हे त्यांचे मुख्य कार्यक्षेत्र नव्हते. 'तत्कालमहिमा', 'तुं गई' आणि 'तुंगभिद्रा' ह्या त्यांच्या कवितांत शुद्ध शब्दावली व सुलभ शैली दिसून येते.

### राईनो पर्वत–

साहित्य क्षेत्रात श्रेष्ठ साहित्यसर्जक म्हणून त्यांचे नाव झाले ते त्यांच्या 'राईनो पर्वत' ह्या सात अंकी नाटकामुळेच झाले. ह्या नाटकाचे बाह्यांग पाहता त्यातील आदर्श पात्रे, अंक व प्रवेश असे विभाग, संवादात मध्ये मध्ये केलेला

छंदोबद्ध कवितांचा उपयोग, पताकास्थाने[२७], उपहारा व रंगभूमीबाबतच्या सूचना हे सर्व संस्कृत नाटचप्रणालीला अनुसरूनच रचलेले आहे; पण विशेषत: नाटकाचा नायक 'राई' ह्याच्या मनातील वैचारिक संघर्ष पाहून मात्र आपणास शेक्सपीअरच्या हॅम्लेटचे स्मरण झाल्याशिवाय रहात नाही.

नाटकाचे कथानक एका जुन्या गोष्टीवर आधारलेले आहे. एक नैतिक सिद्धान्त हे त्याचे ध्येय आहे. तो असा " जीवनातील सर्व गोष्टींचा कर्ता करविता ईश्वर आहे. 'मनुष्यमात्राला आपल्या सामर्थ्यावर काहीच करता येत नाही. सर्व शक्तिमान प्रभुच फक्त 'राईचा पर्वत' करू शकतो."[२८]

ह्या नाटकाचा नायक 'राई' हा एक प्रामाणिक, सरळ वृत्तीचा, ईश्वराला भिऊन वागणारा तरुण आहे. तो व त्याची विधवा आई जालका कनकपूर शहराच्या सीमेवर असलेल्या एका बागेत माळी म्हणून काम करत असतात. कनकपूरचा वृद्ध राजा पर्वतराय लीलावती नावाच्या एका तरुण मुलीशी लग्न करतो. त्याला असे कळते की, जालकाला वृद्ध व अशक्त माणसाना नवतरुण बनविण्याची विद्या अवगत आहे. आपणही पुन्हा नवतरुण होऊ ह्या आशेने तो एका रात्री त्या बागेत जातो. एका वठून गेलेल्या वृक्षाला जालका पुन्हा कसे नवजीवन देऊन पल्लवित करते ते त्याला पाहावयाचे असते. हा आपला फेरफटका करण्याचा बेत आपल्या राणी" पासून व कनकपूरच्या लोकांपासून त्याला अगदी गुप्त ठेवायचा असतो म्हणून पर्वतराय व त्याचा एक सेवक त्या बागेत मुख्य दरवाजाने प्रवेश न करता बागेच्या कुंपणातील एका मोकळ्या जागेतून प्रवेश करतात. राई रात्रीचा बागेत पहारा करीत असतो. काहीतरी आवाज ऐकून तो दचकतो व हा कोणी जनावराने कुंपण मोडून आत येण्याचा प्रयत्न करताना केलेला आवाज आहे, असे समजून आवाजाच्या दिशेने बाण मारतो. तो बाण पर्वतरायला लागून तो मरून पडतो. त्याला गुपचुप-पणे पुरून टाकतात व युक्तिबाज चतुर जालका आपला पुत्र राई ह्याला पर्वतराय बनवून त्याला कनकपूरच्या सिंहासनावर बसविण्याचा बेत करते. राई ह्या नाटकाला विरोध करतो; पण जालकाकडून त्याला असे समजते की जालका ही खरी अमृतदेवी असते व ती कनकपूरचा मृत राजा रत्नदीपदेव ह्याची राणी असते. त्याचे राज्य पर्वतरायने बळकावलेले असते व राई हा खरा राजाचा मुलगा जगदीप असून कनकपूरच्या गादीचा खरा वारस असतो. ही सर्व हकीकत समजल्यावर राई जालकाच्या बेताला संमती देतो. राजवाड्यात असा निरोप पाठविला जातो की पर्वतराय हा कायाकल्प करून घेण्यासाठी एका एकान्त गुंफेत गेला आहे व तेथून तो सहा महिन्यांनी नवतरुण होऊन बाहेर येईल. सहा महिन्यानंतर राई तरुण व निरोगी झालेला असा पर्वतराय बनून थाटामाटाने वाजतगाजत मिरवणूक काढून लिलावतीच्या महालापाशी जातो. तेव्हा त्याला जाणीव होते की पर्वतरायचे सोंग

करताना लीलावतीचा पती म्हणूनही त्याला सोंग करावे लागेल. हे प्रथम त्याच्या लक्षात आलेले नव्हते. त्याला ही वस्तुस्थिती मान्य नसते म्हणून तो सर्व गोष्टी मोकळ्या मनाने उघड करतो व तो १५ दिवसासाठी परत जातो. कनकपूरचे लोक त्याला राजा म्हणून स्वीकारायला कबूल आहेत की नाही त्याचा विचार करायला त्यांना अवधी देतो. तो पर्वतरायच्या लहानपणीच विधवा झालेल्या वीणावती नावाच्या कन्येला पाहतो. प्रथम दर्शनीच ती दोघे एकमेकांच्या प्रेमात पडतात. कनकपूरचे लोक राईला राजा म्हणून स्वीकारतात व राई वीणावतीशी लग्न करतो.

नाटकाचा नायक राई हा शुद्ध चारित्र्यावर भर देणारा असतो. ध्येयबुद्धी व साधनशुद्धी ही दोन्ही त्याला फार महत्त्वाची वाटतात; पण त्याची आई जालका ह्या नाटकातील फार महत्त्वाचे स्त्रीपात्र आहे. तिला मात्र आपले ध्येय सिद्ध करण्यासाठी बऱ्याबाईट कोणत्याही मार्गाचे–साधनाचे–अवलंबन करण्यास जराही दिक्कत वाटत नाही. आपल्या आयुष्यातील ह्या दोन मूळच्या व परस्पर विरोधी प्रवृत्तींच्या संघर्षात रमणभाईंनी फारच सामर्थ्याने व कलात्मकतेने राईची मनोवृत्तीच शेवटी यशस्वी होते, असे दाखविले आहे व असे सिद्ध केले आहे की, चांगली मनोवृत्ती हीच शेवटी खरी आहे. त्यावेळपर्यंतच्या महत्त्वाच्या अशा फक्त एकाच 'कांता' ह्या मणिलाल द्विवेदींच्या साहित्यिक नाटकाशी तुलना करताना 'राईनो पर्वत' हे नाटक अगदी जीवनाचा आदर्श नसले तरी ध्येयपूर्ण कलेच्या दृष्टीने पूर्ण संतोषकारक आहे.

**भद्रंभद्र–**

गुजराती साहित्यातील ही पहिली संपूर्ण हास्यप्रधान कादंबरी आहे. ह्या-मध्ये उपहास व विनोद ह्यांचा कलात्मक रीतीने उपयोग करून समाजसुधारणेच्या विरोधकांची जडता, क्षुद्र मनोवृत्ती, अहंकार व ढोंगीपणा इत्यादी दुर्गुण उघडे करण्यासाठी हास्यरसाचा सुन्दर अवलंब केला आहे.

कादंबरीचा नायक भद्रंभद्र हा जुनाट, रूढिग्रस्त, सनातनी विचारांचा व आचारांचा प्रतिनिधी आहे. जे जे अनार्य, असंस्कृत व अहिंदु आहे, रोजच्या आचारविचारांपेक्षा निराळे आहे किंवा रूढिग्रस्त आचारांपेक्षा वेगळे आहे, याचे त्याला पूर्ण वावडे आहे. नायक ह्याचमुळे आपले खरे नाव दोलतशंकर हे बदलून ' भद्रंभद्र ' हे नाव धारण करतो, कारण दोलत शब्द त्याला यावनी, असंस्कृत किंवा अधार्मिक वाटतो. नायकाची व त्याच्या सारख्या इतर लोकांची आत्मप्रौढी, विचित्रपणा व ढोंगीपणा हे दुर्गुण प्रखर टीका करण्याला योग्य आहेत, हा विषय रमणलालना सापडला. ह्यात विनोदाचे सर्व प्रकार–अगदी ढोबळ विनोदापासून ते अत्यंत मार्मिक विनोदापर्यंतचे–आपणांस पाहावयास सापडतात.

पण आता सामाजिक परिस्थिती खूपच बदलून गेली आहे. समाजातील ज्या वाईट गोष्टींवर व दूषणांवर रमणभाईनी हल्ला चढविला त्या आता जवळ जवळ अस्तित्वातच नाहीत अथवा आता त्या इतक्या भयंकर वाटत नाहीत. मनुष्य-स्वभावातील विरोधाभासाचे ठिकठिकाणी घडविलेले मार्मिक दर्शन ह्या बाबतीतच फक्त आता ते पुस्तक मनोरंजक वाटते; पण कादंबरीतील ज्या पात्रांच्या भाषणातील व वर्तनातील विचित्रपणा आणि ग्राम्यता ह्यावर रमणलालनी प्रखर हल्ला चढविला ती आता लोकांच्या स्मरणांतून कधीच लुप्त झाली आहेत व त्यात आता कोणाला रस उरलेला नाही.

आपली पत्नी विद्यागौरी हिच्या साहाय्याने रमणभाईनी कित्येक स्फुट विनोदी लेख लिहिले आहेत. ते 'हास्य मंदिर' ह्या पुस्तकात एकत्रित केलेले आहेत. त्यातील काही लेख सुंदर आहेत.

रमणभाई यांचे कार्य नाटककार किंवा विनोदी लेखक ह्यापेक्षाही समीक्षक ह्या नात्याने अधिक महत्त्वाचे आहे. इंग्रज कवी वर्डस्वर्थची काव्याची कल्पना अशी होती–

" कविता ही मनातील जबरदस्त भावनांचा उत्स्फूर्त आविष्कार होय. शांततेने एकत्रित झालेल्या ऊर्मीतूनच काव्याचा उगम होतो. " ती स्वीकारून संस्कृत काव्यशास्त्राच्या व पाश्चिमात्य काव्यशास्त्राच्या आणि समीक्षाशास्त्राच्या उत्तम सिद्धान्तांचा त्यांनी सुंदर समन्वय साधला आहे.

रमणभाईचे कवितावृत्त, करुण भावाभास, (Pathetic Fallacy) कवितेचे उगमस्थान, ऊर्मिकाव्याचे स्वरूप, आत्मलक्षी व परलक्षी कविता ह्या विषयांवरील लेख वाचले असता त्यात आपणांस त्यांची गाढ विद्वत्ता, विचारांची स्पष्टता व विचार व्यक्त करण्याची उत्तम शैली दिसून येते; पण काही ग्रंथांविषयीचे विशेषकरून नरसिंहराव व भीमराव (पृथ्वीराज रास ह्या संकल्पित महाकाव्याचा लेखक) ह्यांच्या ग्रंथाविषयींची त्यांची मते त्यांच्या समकालीनांनी ग्राह्य धरलेली नाहीत व त्यानंतरचे तर त्याबाबतीत त्यांच्याशी जवळजवळ मुळीच सहमत नाहीत.

रमणभाईचे अवसान झाल्यानंतर त्यांचे धर्मविषयक व सामाजिक समस्यांवरचे लेख ' धर्म अने समाज ' ह्या नावाने प्रसिद्ध झाले. ह्यांपैकी बऱ्याच लेखांत रमणभाईनी प्रार्थना समाजाचा एक पक्का अनुयायी व समाजसुधारक ह्या नात्याने धर्माच्या तत्त्वज्ञानविषयक सिद्धान्तांपेक्षा धर्माच्या नैतिक व सदाचारपूर्ण पैलूवर अधिक भर दिला आहे. ह्यातील बरेचसे लेख त्यांच्या समकालीन लेखकांच्या प्रतिपादन केलेल्या मतांचे–सिद्धान्तांचे खंडन करण्यासाठी लिहिलेले आहेत. त्यात तर्कशुद्ध बुद्धिवादाचा वकिली बाण्याने केलेला पुरस्कार दिसून येतो व ह्या प्रकारच्या गुजराती साहित्याला त्यांनी दिलेली ही फार मूल्यवान देणगी आहे.

## आनंदशंकर ध्रुव [ १८६९–१९४२ ]

आनंदशंकर बापूभाई ध्रुव. ते पहिल्याने संस्कृतचे प्रोफसर व नंतर बनारस हिंदू युनिव्हर्सिटीत, प्रो व्हाइस चॅन्सेलर होते. पंडित युगातील विद्वानात त्यांना एक विशिष्ट स्थान प्राप्त झालेले आहे.

त्यांनी श्रीभाष्याचे भाषान्तर केले आहे व 'हिंदू धर्मनी बालपोथी' ( हिंदू धर्माचे पहिले बालपुस्तक) आणि 'नीतिशिक्षण' हे ग्रंथ लिहिले आहेत. मणिलाल द्विवेदींच्या मृत्यूनंतर ते काही दिवस मणिलालच्या 'सुदर्शन' हृया मासिकाचे संपादक होते. नंतर १९०२ मध्ये त्यांनी 'वसंत' नावाचे आपले स्वत:चे मासिक सुरू केले व ते जवळ जवळ ३६ वर्षेपर्यन्त चालविले. 'वसंत' ह्या मासिकांतूनच आनंदशंकर ध्रुव हृयांनी बरेचसे महत्त्वाचे लेखन केले.

आनंदशंकर हृयांचे 'वसंत'मध्ये प्रसिद्ध झालेले लेख दोन प्रख्यात साहित्यिकांनी संपादित करून पाच खंडात प्रसिद्ध केले आहेत. हे दोन विद्वान साहित्यिक म्हणजे स्व. प्रा. रामनारायण विश्वनाथ पाठक व श्री. उमाशंकर जोशी. हृया पाच भागांपैकी 'अपनो धर्म'[२९] हृया भागात आनंदशंकर हृयांचे धर्म व तत्त्वज्ञान हृया विषयावरचे लेख आहेत. 'काव्य-तत्त्व-विचार' हृया खंडात काव्याची मूलभूत तत्त्वे हृयावरील लेख आहेत. 'साहित्यविचार' हृया भागात समीक्षा व शिक्षण हृयावरचे लेख आहेत. 'दिग्दर्शन' हृया भागात ऐतिहासिक विषयावरील लेख आहेत व 'विचार माधुरी'त विविध विषयांवरील लेख आहेत.

आनंदशंकर ध्रुव ह्यांचा पौर्वात्य व पाश्चिमात्य श्रेष्ठ लेखकांच्या धर्म, तत्त्वज्ञान, इतिहास, राज्यशास्त्र व शिक्षण ह्या विषयांवरील प्रमाणभूत आणि सर्वसामान्य ग्रंथांचा अभ्यास व वाचन इतके सखोल आणि विशाल होते की, पंडितयुगातील श्रेष्ठ लेखकातसुद्धा त्यांपैकी फक्त गोवर्धनरामांचेच नाव त्यांच्या बरोबरीने घेता येईल.

आनंदशंकरांच्या ठायी गोवर्धनरामांची कलात्मक सर्जकता मात्र तितक्या प्रमाणात नव्हती; पण गोवर्धनरामप्रमाणेच त्यांच्यातही उच्च नैतिक पातळीवरचे सुसंस्कृत जीवन व्यतीत करण्याची अभिलाषा होती. त्याबरोबरच स्वदेशाच्या उन्नतीची त्यांना सतत तीव्र तळमळ लागलेली होती. गोवर्धनरामाप्रमाणेच आनंदशंकरही जीवन हा मध्यबिंदू कल्पून सर्व विषयांचा विचार जीवनाचा प्रत्येक पैलू विचारात घेऊनच करीत असत व प्रत्येक समस्येचा विचार बुद्धिवादाच्या कसोटीवर पारखूनच करीत असत. गोवर्धनरामप्रमाणेच आनंदशंकरनीही आपले सर्व विचार व कल्पना पौर्वात्य प्राचीन पुस्तकांच्या परिभाषेतच प्रगट केले आहेत; पण गोवर्धनरामनी न्याय, योग, काम, नीती वगैरे शास्त्रे व वेदान्ताच्या परिभाषेत आपले विचार प्रगट केले आहेत, तर आनंदशंकर ह्यांनी मोठ्या प्रमाणात अद्वैत

वेदान्ताची परिभाषा वापरून मनुष्याची जीवनाकडे पाहण्याची दृष्टी कशी असावी ते विशद केले आहे. गोवर्धनराम ह्यांच्याप्रमाणेच आनंदशंकरही क्रियाशील आदर्शवादी लेखक होते. त्यांची मुख्य शिकवण अशी होती की, प्रत्येक व्यक्तीने जोपर्यंत आपण जिवंत आहोत तोपर्यंत उदात्त, सभ्यतेचे, सुसंस्कृत व जबाबदार मनुष्याला शोभेल असेच जीवन व्यतीत केले पाहिजे.

आनंदशंकर ह्यांच्या विचारांचा महत्त्वाचा दृष्टिबिंदू असा होता की, प्रत्येक सिद्धान्त अथवा मतप्रणाली ह्यांत जे जे काही चांगले व हितकारक आहे त्याचा पूर्णपणे स्वीकार करावयाचा आणि जे वाईट अहितकारक आहे त्याचा संपूर्णपणे त्याग करावयाचा. आनंदशंकर ह्यांनी परस्परविरोधी विचार, मते, तत्त्वे व सिद्धान्त ह्यांच्या चक्रव्यूहातून मार्ग काढत काढत जे जे त्यांच्या बुद्धीला चांगले व हितकारक वाटले ते घेतले आणि मनुष्याच्या आत्मिक उन्नतीला जे बाधक आहे असे त्यांना पटले, त्याचा त्यांनी त्याग केला.

आनंदशंकर ह्यांचे दुसरे एक वैशिष्टय म्हणजे ते प्रत्येक गोष्टीत मध्यममार्गाचा दृढनिश्चयाने अवलंब करीत असत. ते त्याला 'समता' असे म्हणत. त्यांच्या तत्त्वाप्रमाणे ते नेहमी आत्यंतिक मार्गांना टाकून मध्यम मार्ग दृढपणे चोखाळीत असत.

अर्थातच ह्याचा अर्थ असा नव्हे की, ते अनिश्चित बुद्धीचे अथवा निष्पक्षपाती होते. वादविवादात ते बहुतकरून मृदुता व नम्रता दाखवीत; पण जरूर पडेल तेव्हा ते सडेतोडपणे व स्पष्टपणे बोलत असत. हा त्यांचा गुण केशवलाल ध्रुव ह्यांचे काही शोध व रमणलाल भद्रंभद्र ह्यांवर टीका करताना दिसून येतो.

जरी त्यांनी आपल्या बुद्धीच्या आवाक्याला व तेजस्वी प्रतिभेला शोभेल आणि ज्यांत एखाद्या विषयाचा संपूर्णपणे अभ्यास केलेला असेल असा एकही महान् ग्रंथ लिहिला नसला आणि जरी त्यांचे सर्व विचार टीपा व लेखात विखुरलेले असले आणि जरी ते लेख फार दीर्घ नसले किंवा निरनिराळ्या प्रसंगी लिहिलेले असले तरी त्यांनी त्या वेळच्या प्रत्येक महत्त्वाच्या प्रश्नाचे ऐतिहासिक व तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने परीक्षण केलेले आहे आणि गुजरातपुढे त्यांनी अत्युच्च कोटीचे व अत्यंत शुद्ध असे धार्मिक आणि साहित्यिक आदर्श ठेवले आहेत.

## बळवंतराय ठाकोर [ १८६९–१९५२ ]

बळवंतराय कल्याणराय ठाकोर—त्यांनी आपल्या तरुणपणी 'सेहेनी' ह्या टोपण नावाखाली काही कविता लिहिल्या होत्या. त्यांचा जन्म भरुच येथे झाला. ते आपल्या समकालीन लेखकांपेक्षा अनेक बाबतीत अतुलनीय आहेत. कवी, समीक्षक विचारवंत आणि इतिहास व राजकारणाचा अभ्यासक म्हणून पहिल्याने एकांडा

शिलेदार असलेले बळवंतराय आपल्या वयाच्या ५०–६० व्या वर्षी फारच प्रभावशाली म्हणून गाजले. त्यांची कविता व त्यापेक्षाही त्यांच्या कवितेविषयीच्या कल्पनांनी त्यांच्यानंतरच्या पिढीतील अनेक कवींचे विचार व अभिरुची ह्यांना एक नवेच वळण लावले.

ठाकोर ह्यांच्या साहित्यकृती पुढीलप्रमाणे आहेत.

'भणकार' ह्या नावाचा कवितासंग्रह (१९५१)

'दर्शनियुं' हा कथांचा संग्रह व 'उगती जुवानी' व 'लग्नमां ब्रह्मचर्य' ही दोन नाटके.

त्यांच्या मुख्य समीक्षात्मक रचना – 'कविशिक्षण' 'लिरिक', 'आपनी कविता समृद्धि', 'नवीन कविता विशे व्याख्यानो', 'विविध व्याख्यानो' (३ भाग) व 'प्रवेशको' (२ भाग.)

त्याशिवाय त्यांनी कालिदासाच्या संस्कृत 'अभिज्ञानशाकुंतल' व 'मालविकाग्निमित्र' ह्यांची भाषान्तरे केली आहेत. रेहाना तैयबजी ह्यांच्या इंग्रजीमध्ये लिहिलेल्या *The Heart of a Gopi* (गोपी-हृदय) ह्या पुस्तकाचेही त्यांनी गुजरातीत भाषान्तर केले आहे. व्हॅलेण्टाइन काटॅयेव ह्यांच्या इंग्रजी *Squaring The Circle* (सोव्हिएट नवजुवानी) चेही त्यांनी गुजरातीत रूपान्तर केले आहे.

त्यांनी दिवाण बहादुर अंबालाल साकरलाल देसाई ह्यांचे चरित्र लिहिले आहे व काही पुस्तकांचे संपादनही केले आहे. महाराजा सयाजीराव युनिव्हर्सिटीने सांभाळून ठेवलेले त्यांचे बरेचसे साहित्य अजून प्रकाशित झालेले नाही. 'भणकार' (१९५१) हा त्यांच्या सर्व प्रकारच्या कवितांचा संग्रह आहे. काही कविता अगदी लहान आहेत. काही मध्यम आहेत व 'भणकार,' 'धारा' (१) व 'धारा' (२) (१९१७) व (१९२८) मध्ये प्रसिद्ध झालेली त्यांची 'सुनीते' ही त्यांत आहेत. त्यांचा प्रायोगिकतेबद्दलचा उत्साह व त्यांची सर्जक शक्ती ह्यांचे हे पुस्तक म्हणजे एक स्मारकच आहे.

**'भणकार' कविता-संग्रह (१९५१)–**

'भणकार'कडे पाहता कवितेचे स्वरूप, छंद, आशय ह्यांच्या प्रयोगांची ती एक प्रयोगशाळाच आहे, असे म्हणावे लागेल.

कवितेच्या सर्व अंगांत ठाकोरांची कविता क्रान्तिकारकच ठरली आहे. शब्दांचे पाल्हाळ व भावनांचे व्यर्थ पिंजण न करता त्यांनी चिंतनात्मक, बुद्धिप्रधान रचना केली आहे. अर्थकलक्षी कविता लिहिणे–भाषेच्या लालित्य किंवा माधुर्य आदि गुणांकडे आकृष्ट न होता, छंदाच्या गेयतेकडे न पाहता, गंभीर अर्थप्रवाह कसा काव्यमय करावा ह्याचे प्रत्यक्ष प्रयोग त्यांनी प्रभावी रीतीने केले आहेत.

त्यांनी छंदांच्या ओळींच्या लांबीरुंदीतही फेरफार केलेले आहेत. पंक्तिसंख्या–पृथ्वी व अनुष्टुप छंदाचे धावत्या पंक्तीत रूपान्तर केले आहे व ते फार प्रभावीपणे अर्थ ठसविण्यारा योग्य ठरले आहे.

साहित्यसर्जकतेच्या दृष्टीने पाहता 'भणकार' मध्ये पुढील काही उत्तम कविता आहेत. उदाहरणार्थ 'आरोहण', 'रेवा', 'भणकार' 'फोय सागर' (नंतर लेखकाने त्याचे नाव बदलून 'वर्षांनी एक सुंदर सांज' असे ठेवले), 'जूनुं पियर घर,' 'वधामणी', तसेच मित्रता व वृद्धत्व ह्यांवरच्या त्यांच्या सुनीतांत आपल्या लयबद्धता, कल्पनांचा सुंदर विलास, अद्भुत शब्दचित्रे व हृदयाला पाझर फोडण्याचे सामर्थ्य इत्यादी गुण दिसून येतात. दुर्दैवाने अशा कवितांची संख्या फार मोठी नाही.

ठाकोरांच्या अनेक कविता पुष्कळ वर्षांपर्यंत निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध होत असत व त्यांतील भावना, शैली व शब्दसौंदर्य हे गुण वाचकांना आपल्याकडे आकर्षित करीत असत; पण त्यांची किंमत समजण्यास व त्यांचे उष्मा-पूर्ण स्वागत करण्यात एका सबंध पिढीला वाट पहावी लागली. त्यांच्या कवितांचा संग्रह, 'भणकार-पहेली धारा' १९१७ मध्ये प्रसिद्ध झाला तेव्हा श्री. ठाकोर जवळ जवळ ५० वर्षांचे होते. त्यांच्या कवितांचा दुसरा भाग एवढेच नव्हे, तर त्यांच्या कथा व नाटके, भाषान्तरे, रूपान्तरे, संपादित केलेली पुस्तके, संशोधन व समीक्षा लेख हे तर त्याच्याही नंतर प्रसिद्ध झाले.[३•] अशा रीतीने ठाकोरांचे बरेच मोठ्या प्रमाणावरील साहित्य त्यांच्या आयुष्याच्या उत्तरार्धात प्रसिद्धी पावले.

१९१७ मध्ये ठाकोरांचा पहिला कविता संग्रह 'भणकार–पहेली धारा' हा प्रकाशात आला तेव्हा पहिल्या जागतिक युद्धाची शेवटची वर्षे चालू होती व त्यामुळे सर्व जगाचा नकाशाच जसा काही बदलून गेला होता. महात्मा गांधींचा भारतीय राजकारणात प्रवेश झाला होता व सर्व भारत देशात एका नवचैतन्याचा संचार झाला होता. जुन्या कल्पना व जुनी मूल्ये ह्यांचे आकर्षण फारच थोडे उरले होते.

गुजराती साहित्याबद्दल विचार करता असे दिसून येईल की, नरसिंहरावां-बद्दल फारसे आकर्षण लोकांना कधीच वाटले नव्हते व नानालालच्या कवितेतून मिळणारा आनंद आता उतरणीला लागला होता. त्यांचा आशय व शैलीचा तोच-तोचपणा ह्यामुळे कंटाळून लोक त्याकडे दुर्लक्ष करू लागले होते आणि वाचकांना काहीतरी नवे, काहीतरी प्रत्यक्ष व वास्तव, काहीतरी सामर्थ्यवान आणि मर्मग्राही लेखन हवे होते. हा परिणाम कदाचित देशाच्या प्रत्येक अंगोपांगात व मनोवृत्तीत झालेल्या परिवर्तनामुळे असावा आणि त्यामुळे वाचकांना जे काही हवेहवेसे वाटत होते ते त्यांना ठाकोरांच्या कवितेत – त्यापेक्षाही ठाकोरांच्या कविताविषयक दृष्टीत सापडेल अशी त्यांना आशा वाटू लागली.

ठाकोरांच्या कविताविषयक कल्पनात मृदुता किंवा भावनाविष्कारापेक्षा, सामर्थ्य व पुरुषार्थ ह्यांना; शब्दांचा पाल्हाळ व भपका ह्यापेक्षा संक्षेप व अभिव्यक्तीची सभरता ह्यांना आणि शब्दांच्या सुरापेक्षा आशयघनतेला अधिक महत्त्व होते.

ठाकोरांची कविताविषयक कल्पना त्याकाळच्या वृत्तीशी अगदी एकस्वरूप अशी असल्यामुळेच नव्या पिढीतील साहित्याच्या क्षितिजावर उदय पावणारे कवी व समीक्षक त्यांच्याकडे आकर्षित झाले आणि गांधीयुगातील बहुतेक सर्वच प्रमुख कवी त्यांच्या कारकीर्दीच्या सुरुवातीस तत्त्वनिष्ठेच्या बाबतीत जसे महात्मा गांधींच्या वर्चस्वाखाली आले तसे कवितेचे स्वरूप व शैली ह्याबाबतीत ते ठाकोरांचे चेले बनले.

असा एक काळ होता की, जेव्हा कवितेच्या बाबतीत ठाकोरांचा शब्द प्रमाण मानला जात होता. त्यांचे अनुष्टुप[31], त्यांची गुलबांकी आणि मिश्र जाति[31] व त्यांचा धावत्या ओळीचा पृथ्वीछंद, त्यांच्या सॉनेट्स व मुक्तछंद, आदी कवितांनी गांधी युगातील प्रत्येक चांगल्या, वाईट व साधारण प्रतीच्या कवीवर जशी काही जादूच केली होती. १९३० ते १९३९ ह्या काळातील कोणत्याही सामयिकाचा कोणताही अंक उघडून पाहिल्यास आपल्याला एकही कविता अशी सापडणार नाही की, जिच्यावर ठाकोरांचा प्रभाव पडलेला नसेल. गुजरातमध्ये ठाकोरांसारखा असा दुसरा कोणताही कवी अथवा समीक्षक नसेल की, ज्याने सबंध एका पिढीवर[32] आपला एवढा जोरदार प्रभाव पाडला.

ठाकोरांची नाटके किंवा लघुकथा यांबद्दल विशेष काही लिहिण्यासारखे नाही. संस्कृतमधून गुजरातीत केलेल्या भाषान्तरात मूळ पुस्तकाचा अर्थ बरोबर उतरला आहे; पण त्यात मूळ पुस्तकातील रस किंवा त्यांचे हृद्गत प्रगट झालेले दिसून येत नाही. आपल्या 'गोपी-हृदय' मध्ये ठाकोर ह्यांनी मूळ पुस्तकातील कथानकात फेरफार केला आहे. हा फेरफार त्यांनी आपल्या नास्तिकतेच्या व बुद्धिवादाच्या कल्पनांशी सुमेळ साधण्यासाठी केला असावा. कोणत्याही पुस्तकात अशा स्वतंत्रतेने फेरफार करणे योग्य आहे की नाही ही गोष्ट अलाहिदा; पण मूळ पुस्तक–एक सुंदर गद्यकाव्य– जे श्रीकृष्णविषयक भक्तिभावाने परिपूर्ण आहे–त्याची ह्या भाषान्तराने हानीच केली आहे, असे म्हणावे लागेल.

**लिरिक (१९२८)–**

पहिल्याने 'कौमुदी' ह्या विद्वत्तापूर्ण त्रैमासिकातून हप्त्याहप्त्याने प्रसिद्ध झाले व नंतर पुस्तकरूपाने प्रकट झाले. नरसिंहरावांनी आपल्या एका लेखात[33] 'लिरिक'च्या स्वरूपासंबंधी जी मते मांडली होती त्यांच्यावर चर्चा करण्यासाठी

व त्यांच्या मतांचे खंडन करण्यासाठीच हे पुस्तक लिहिले गेले. आपल्या ' लिरिक ' ह्या पुस्तकात ठाकोर मुख्य विचार असा प्रतिपादन करतात की, काव्य व संगीत ह्या दोन अगदी भिन्न कला आहेत. ह्या दोन कला एकमेकींवर अवलंबून नाहीत. म्हणून पहिल्याने 'लिरिक' म्हणजे 'लायर' ह्या वाद्याच्या साथीवर गाण्यास योग्य असे गीत असा मूळ अर्थ असला तरी ह्याचा अर्थ असा नव्हे की, ज्या कविता 'लायर'च्या मदतीने संगीतमय करून गाता येतील त्यांनाच लिरिक म्हणावे. काव्याचे बॅलड, ओड, हिम, (Hymn) सॉनेट वगैरे अनेक प्रकार आहेत. त्यांनासुद्धा 'लिरिक' म्हणणे योग्य आहे. ठाकोर ह्यांनी ह्या सर्व काव्यसमूहांच्या कवितांची प्रत्यक्ष उदाहरणे देऊन आपले विचार स्पष्ट केले आहेत. इंग्लिश साहित्यावरून त्यांनी ह्या प्रत्येक काव्यप्रकाराच्या कवितांची उदाहरणे देऊन आपला प्रबंध सजवला आहे. कवितेच्या अभिव्यक्तीचे साधन संगीत नव्हे, ह्यावर त्यांनी विशेष जोर दिलेला आहे.

**कविता - शिक्षण** (१९२४)–

ह्यात ठाकोरांनी कवीचे निरनिराळे प्रकार वर्णिले आहेत. श्रेष्ठ कवी, कनिष्ठ कवी, शीघ्र कवी वगैरे. ह्या अनुषंगाने ते आपले काव्याविषयींचे विचारही विशद करतात व कवितेला संगीताची गरज नाही असे प्रतिपादन करतात. साहित्याच्या इतिहासाच्या दृष्टीने ह्या वेळी नमूद करणे जरुरीचे आहे की, ठाकोरांचे संगीत व काव्य ह्या दोहोंचा एकमेकांशी असलेल्या संबंधाविषयीचे आत्यंतिक मत व काव्या-मध्ये विचार ह्या गोष्टीला एक आवश्यक बाब म्हणून त्यांनी केलेला स्वीकार आहे. ह्याचे मुख्य मूळ त्यांचे समकालीन प्रख्यात लेखक नानालाल व नरसिंहराव ह्यांच्या कवितांच्या विरोधातच दडलेले आहे. नानालाल व नरसिंहराव ह्यांच्या कवितांचे स्वरूप संगीतमय व भावनाप्रधान होते. एक गोष्ट आपल्याला स्पष्ट दिसून येते की, ठाकोरांचा कवितेतला संगीताचा विरोध व विचार ह्या गोष्टीवर दिलेला भर हा त्यांच्या प्रत्यक्ष काव्य-निर्मितीपेक्षा त्यांचा सिद्धान्त म्हणूनच प्रभावीपणाने दिसून येतो. कारण त्यांच्या काही श्रेष्ठ कवितात, तसेच त्यांनी ' आपनी कविता समृद्धि ' ह्या पुस्तकासाठी गुजराती कवितांतून निवडलेल्या कविता आणि ' कविता विशे विचारो ' मध्ये पसंत केलेल्या कविता संगीतप्रधानच आहेत. ( ह्यावेळी ते आपला सिद्धान्त विसरून गेलेले दिसतात. )

**आपणी कवितासमृद्धि** (१९३१–१९३९)–

ह्यामध्ये १८५० नंतरच्या ५७ कवींनी केलेल्या ८५ कवितांचा संग्रह आहे. त्याची रचना त्यांनी ९ भागांत विषयानुसार केली आहे. ह्यात 'कवी आणि काव्य' ह्या विषयावरील कवितापासून ते 'चिन्तनात्मक कविता'पर्यंतच्या कविता आहेत. ह्याचा हेतू असा होता की, काव्याची आवड असणाऱ्याना चांगल्या कविता

व वाईट कविता ह्यांतील भेद ओळखता यावा आणि मोठ्या प्रमाणात व गांधीयुगात लिहिलेल्या कवितांच्या सौंदर्याचे रसग्रहण करण्याची शक्ती त्यांच्यात यावी. ह्या प्रत्यक्ष कवितांपेक्षा त्यांची केलेली समीक्षा व त्यावरील विचार हे ठाकोरांच्या मते ह्या पुस्तकाचे मुख्य कार्य होते.

ह्यांतील निवडलेल्या काही कविता जरी गांधीयुगात लिहिलेल्या कवितांचे उत्कृष्ट नमुने असले तरी ह्यांत काही कविता अशा आहेत की, त्या त्या कविता ज्या त्या कवीच्या प्रतिभेला शोभतील किंवा त्यांचे प्रतिनिधित्व करतील अशा नसून ठाकोरांनीच अप्रत्यक्षपणे कबूल केल्याप्रमाणे त्या कविता देऊन त्या कवीवर त्यांनी अन्यायच केला आहे.

कवितांची समीक्षा-टीका करणे हा मुख्य मार्ग त्यांनी स्वीकारला असला तरी त्यामागील त्यांचा मुख्य हेतू हे कित्येक ठिकाणी, कवितेचा अंतर्भूत विचार स्पष्ट करणे व कुशाग्रबुद्धीने त्याचा विचार करणे हा होता; पण दुसऱ्या कित्येक ठिकाणी उदाहरणासहित[३४] मी हे सिद्ध करण्याची हिंमत दाखविली आहे की, कवितांचे महत्त्व वर्णन करताना व काही अलंकारांच्या स्वरूपाची व्याख्या करताना ठाकोरांनी चुका केल्या आहेत आणि कित्येक वेळी टीका करताना त्यांचे मन अनिर्णीत व अस्पष्ट असल्याचे दिसून येते.

तरीसुद्धा ह्याप्रकारचे हे पुस्तक म्हणजे पहिलेच श्रेष्ठ पुस्तक आहे, असे म्हणावे लागेल. कारण कवितेच्या खऱ्या मूलभूत तत्त्वांचा विचार करून कवितेचा दर्जा ठरवावा हा ह्याचा मुख्य उद्देश आहे. हा संग्रह म्हणजे फक्त अमुक एका समयाच्या कवितांचा संग्रह नाही अथवा अमुकच मतप्रणालीचा किंवा तत्त्वांचा पुरस्कार करणाऱ्या कवितांचाही संग्रह नाही. ठाकोर आपला हेतू पूर्णपणे साध्य करू शकले नसले तरी कवितेचा निकष ठरविण्यासाठी त्यांनी ह्यास समर्थपणे मार्गदर्शन केले आहे.

**नवीन कविता विशे व्याख्यानो** (१९४३)–

नव्या कवितेवरच्या ठाकोरांच्या चार व्याख्यानांचा हा संग्रह आहे. ह्यामध्ये ठाकोरांनी आपली कवितेविषयीची कल्पना सविस्तर वर्णिली आहे व गांधीयुगातील लिहिलेल्या कवितांची उदाहरणे देऊन ती कल्पना स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. आपले पुस्तक 'लिरिक' ह्याप्रमाणेच येथेही त्यांनी कवितांची वर्गवारी केली आहे. इंग्लिश लिरिकच्या निरनिराळ्या प्रकारची उदाहरणे देण्याऐवजी त्यांनी गुजराती कवितांची उदाहरणे दिली आहेत. गेयता व भावनाप्रधानता ही कवितेची मुख्य लक्षणे गांधीयुगापूर्वी समजली जात असत. ह्याविरुद्ध ठाकोरांनी असा सिद्धान्त मांडला की, लहानसहान गीतांशिवाय इतर कवितांना संगीताची जरूर नाही. कारण

संगीत व कविता ह्या एकमेकींपासून स्वतंत्र अशा अगदी भिन्न कला आहेत. ठाकोरांनी कवितेत भावनेपेक्षा 'विचाराला'[३५] जास्त महत्त्व दिले आहे. ठाकोरांनी वेळोवेळी आपल्या कवितेविषयींच्या दृष्टिबिंदूत नवी नवी मते मान्य करून त्यांत इतक्या वेळा भर घातली आहे की, 'नवीन कविता विशे व्याख्यानो'[३६] ह्यातील त्यांची कवितेची व्याख्या ही निश्चित व्याख्या अशी राहातच नाही. तरी ह्या पुस्तकात काही कवितांची त्यानी ठरविलेली मूल्ये व त्याविषयींच्या विचारावरून कवितेविषयींची ठाकोरांची मूळ मतेच स्पष्ट दिसून येतात.

**विविध व्याख्यानो**

निरनिराळ्या विषयांवर ठाकोरांनी दिलेल्या व्याख्यानांचा संग्रह तीन भागात केलेला आहे. १९४५ साली प्रसिद्ध झालेल्या पहिल्या भागात 'गोवर्धनराम व त्यांचे ग्रंथ' ह्या विषयावरील व्याख्याने आहेत. १९४८ साली प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या भागात प्रेमानंद, कलापी, नवलराम इत्यादी सात लेखकांविषयीची व्याख्याने आहेत व १९५६ साली लेखकाच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेल्या तिसऱ्या भागात विशिष्ट लेखकांविषयीची किंवा विशिष्ट पुस्तकासंबंधीची व्याख्याने नसून 'एक लिपि व एक भाषा', 'आधुनिक गुजराती साहित्य', 'प्रतिभेच्या अंकुराचे पोषण,' 'गुजराती लोक' व 'गुजराती भाषा' अशा निरनिराळ्या विषयांवर दिलेली व्याख्याने समाविष्ट केली आहेत.

'प्रवेशको' ( २ भाग ) हेसुद्धा ठाकोरांच्या निधनानंतरच प्रसिद्ध झाले' पहिला भाग १९६० व दुसरा भाग १९६१ मध्ये प्रसिद्ध झाला. ह्यात ठाकोरांनी कित्येक पुस्तकांच्या लिहिलेल्या आमुख व प्रस्तावना यांचा संग्रह केलेला आहे.

ब. क. ठाकोर ह्यांचे विवेचन त्यांचे विशिष्ट व्यक्तित्व दाखविते. ठाकोरांच्या निरनिराळ्या विषयांच्या विवेचनाचा पल्ला फार मोठा होता; पण त्यात नरसिंहरावांच्या लेखनातील अचूकपणा व सखोलता नाही व श्री. आनंदशंकर ह्यांचा उदार दृष्टिकोण व सर्वग्राहित्व नाही. ठाकोरांची वृत्ती स्वतंत्रच आहे. दुसऱ्यांच्या मतांना न अनुसरता ते प्रत्येक प्रश्नांतील गुणावगुणांचे स्वत: परीक्षण करून काय तो निर्णय घेतात. काही काही वेळा ते आपल्या इतर कल्पनापेक्षा काही वेगळीच कल्पना वाचकांच्या पुढे ठेवतात व ती जास्त विशद न करता तेथेच थांबतात.

ठाकोरांना कनिष्ठ दर्जाच्या व आंधळ्या अनुकरणात्मक लेखनाची फार चीड येत असे. गुजराती कवितेचे मधुर शब्दांच्या आडंबरापासून व रोगिष्ट भावनाविष्करापासून त्यांनी रक्षण केले आहे. त्यामुळे लोकांना त्यांचे नेहमीच स्मरण राहील.

## कलापी [ १८७४–१९०० ]

सूरसिंहजी तख्तसिंहजी गोहेल हे 'कलापी' ह्या नावाने प्रसिद्ध होते. सौराष्ट्रातील 'लाठी' ह्या लहान देशी संस्थानाचे ते संस्थानिक (राजे) होते. अगदी लहानपणीच त्यांचे माता-पिता निवर्तले. ते १६ वर्षांचे असताना त्यांचे रोहा-कच्छची राजकन्या राजबा व कोटडा सांगाणीची आनंदीबा ह्या दोघींशी लग्न झाले.

राजबा किंवा जिचा कलापी 'रमा' असा उल्लेख करतो ती आपल्या माहेरहून दासीच्या समूहाबरोबर मोंघी नावाच्या एका दासीला घेऊन येते. कलापी तिला 'शोभना' ह्या नावाने संबोधतात. तिच्या हुशारीने आकर्षित होऊन कलापींनी तिला शिक्षण देण्याचे ठरविले. काही समय गेल्यावर ते तिच्या प्रेमात पडले. त्यांच्या गुप्त गाठीभेटींनी, स्वभावाने रागीट असणाऱ्या रमाच्या मनात संशय उत्पन्न झाला व त्यामुळे कलापींनी शोभनाच्याच जातीच्या एका तरुणाशी तिचे लग्न लावून दिले; पण त्याला शोभनाच्या चांगल्या भावनांची मुळीच कदर नव्हती. शोभना आत्तापर्यंत सुसंस्कृत वातावरणात वाढली होती. तिचा नवरा तिचा छळ करू लागला. ज्या शोभनेवर कलापींचे गाढ प्रेम होते तिचा हा असह्य छळ पाहून ते फार चिंतेत पडले. त्यांनी तिला घटस्फोट देवविला व सर्व व्यक्तिगत धोके स्वीकारून त्यांनी १८९८ च्या जुलै महिन्यात तिच्याशी पुर्नविवाह केला. ह्या विवाहानंतर जवळजवळ दोन वर्षांनीच त्यांचे १०।६।१९०० ला अवसान झाले.

कलापी २१ वर्षांचे असतानाच त्यांना संस्थानच्या राजगादीवर बसविण्यात येऊन राज्याची सर्व सूत्रे १८९५ सालीच त्यांच्या हाती सोपविण्यात आली होती.

जरी त्यांना ते वयात येण्यापूर्वी त्यांच्या संस्थानाच्या अॅड्मिनिस्ट्रेटरनी राजकोट येथील राजकुमार कॉलेजात ९ वर्षे ठेवले होते तरी त्यांना फारसे व्यवस्थित असे शिक्षण मिळाले नव्हते. त्यांनी कॉलेजमधून बाहेर पडल्यावरच खूप वाचन केले. त्यांनी लिहिलेल्या पत्रांवरून असे स्पष्ट दिसून येते की, त्यांनी संस्कृत व इंग्लिश काव्यांचा आणि तत्त्वज्ञानाचा खूपच मन लावून अभ्यास केला होता व कवींपैकी वर्डस्वर्थ, टेनिसन व शेले हे त्यांचे आवडते इंग्लिश कवी व प्लेटो, इमर्सन व स्वीडनबर्ग हे त्यांचे आवडते तत्त्वज्ञानी होते. गुजराती साहित्य जुने व नवे त्यांनी जवळजवळ सर्वच वाचलेले होते आणि मणिलाल नभुभाई द्विवेदी, गोवर्धनराम त्रिपाठी, मणिशंकर भट्ट (कान्त), त्रिभुवन प्रेमशंकर, जन्मशंकर महाशंकर बुच–(ललित) ह्यांच्यासारखे प्रसिद्ध लेखक व दुसरे इतर गुजराती लेखक त्यांचे मित्र होते. ह्या लेखकांशी त्यांचा व्यवस्थित–नियमित–पत्रव्यवहार चालू होता व आपल्याम तांची ते त्यांच्याची चर्चा करीत असत.

ह्यांपैकी 'कान्त' ह्यांनी त्यांच्या कवितांचे संपादन करून त्या पुस्तकरूपाने

१९०७ मध्ये प्रसिद्ध केल्या. त्याचे नाव 'कलापीनो केकारव' (मोराचा केकारव) असे ठेवले. त्यात कलापीला उद्देशून [३७] त्यांनी 'कलापीने संबोधन' हृचा नावाची एक सुंदर कविता लिहिली. त्रिभुवन प्रेमशंकरनी 'कलापीनो विरह' हे काव्य लिहिले. गुजराती साहित्यातील उत्तम विलापिकांपैकी ही एक आहे असे, कविश्रेष्ठ नानालाल यांचे मत आहे.

'कलापीनो केकारव' हृयात संग्रहित केलेल्या कवितांशिवाय कलापींनी 'काश्मीरनो प्रवास', 'चार संवादो', व 'स्वीडनबर्गनो धर्मविचार' ही पुस्तके लिहिली. त्यांनी दोन इंग्रजी कादंबऱ्यांची भाषान्तरे केली आहेत. त्यांची नावे– 'माला अने मुद्रिका' व 'नारीहृदय' 'कलापीनी पत्रधारा' हृयांत त्यांच्या जवळ जवळ ५३५ पत्रांचा संग्रह आहे.

पण 'कलापी' हा कवी म्हणून अधिक प्रसिद्ध आहे. दलपतराम व काही प्रमाणात मेघाणी ( जे कवीपेक्षा लोकगीतांचे गायक व गद्यलेखक म्हणून जास्त लोकप्रिय होते.) हृया दोघा कवींव्यतिरिक्त कलापी हा गुजरातचा सर्वांत अधिक लोकप्रिय कवी होता. गुजरातच्या सबंध एका पिढीतील युवकांच्या मनावर कलापीचा जबरदस्त पगडा बसलेला होता व अजूनही कलापी खूपच लोकप्रिय आहे.

कलापी हा मुख्यत: आत्मलक्षी कवी आहे. त्यांच्या सर्व कवितांत त्यांच्या स्वत:च्या जीवनातील द्वंद्व व कारुण्य हृयांचे प्रतिबिंब पडलेले आहे. त्यांच्या मनावर ज्या एका भावनेचा जबरदस्त पगडा आहे. ती भावना म्हणजे 'प्रेम'–रमा व शोभना हृया दोघींबद्दलचे प्रेम.

त्या दोघींना एकत्र ठेवण्यासाठी व दोघींवर सारखेच प्रेम करण्यासाठी त्यांचे प्रयत्न चालू होते. त्यांच्यापुढे ही मोठीच समस्या होती. ही गोष्ट वस्तुत: अशक्य आहे, हे कळून आल्यामुळे त्यांनी 'हृदय त्रिपुटी' मध्ये ही वस्तुनिष्ठ व्यवहारात अशक्य असलेली गोष्ट कल्पना-विलासाने सिद्ध करून दाखविली आहे.

देहधर्माच्या-(वासनांच्या)-पलीकडे जाऊन प्रेमसिद्धी आत्मसात करणे अशक्य आहे, हे त्यांना कळून चुकले होते; पण दुसऱ्यासाठी जगणे, दुसऱ्या व्यक्तीच्या दृष्टिकोणातून पाहणे, दुसऱ्याच्या भावना जाणून घेण्याचा प्रयत्न करणे व तिला किंवा त्याला न्याय देणे, ही जी खऱ्या प्रेमाची व्याख्या आहे, ती कलापीच्या प्रेमाच्या कल्पनेत आपल्याला पूर्णपणे दिसून येते.

श्री. रमणभाई नीलकंठ ह्यांनी म्हटल्याप्रमाणे कलापीची प्रेमाची कल्पना ही मध्यकालीन सौराष्ट्रातील राजेरजवाड्यांची प्रेमाची कल्पना आहे. कलापीच्या मताप्रमाणे 'स्त्री' ही भोग्य वस्तू व पुरुष हा भोक्ता–उपभोग घेणारा आहे. आपल्याला ह्यापुढे जाऊन असेही म्हणता येईल की, कलापीची प्रेमाविषयीची वरील

कल्पना ही फक्त मध्यकालीन सौराष्ट्रातील राजांचीच प्रेमाची कल्पना नाही किंवा पुरुष व स्त्री ह्यांमधील प्रेमाची कल्पना फक्त मध्ययुगातीलच नाही तर आजच्या भारतातील स्त्री व पुरुष ह्यांच्यामधील प्रेमाचीही हीच कल्पना आहे. इतकेच नव्हे, तर साऱ्या जगाचीही हीच कल्पना आहे. कलापी राजा होता व तो शोभनाशी आपला चोरटा संबंध, सद्‌विवेकबुद्धीची जराही टोचणी न लागू देता सहज चालू ठेवू शकला असता आणि सुखाचे जीवन जगू शकला असता; पण कलापीने आपल्या जीवाच्या जोखमीनेही शोभनाला घटस्फोट घ्यायला लावला व मगच तिच्याशी लग्न केले.

कलापीच्या मनावर जीवनाच्या क्षणभंगुरतेच्या कल्पनेचे सतत फार मोठे दडपण असे म्हणूनच तो अतिशय उतावळा होता. तो जराही कसला विलंब सहन करू शकत नसे किंवा कोठल्याही प्रकारच्या मर्यादा तो स्वीकारू शकत नसे. नेमस्तपणा हा त्याच्या स्वभावातच नव्हता. तो नेहमी अतिरेकाला पोहोचत असे. मग ते पराकोटीचे प्रेम असो अथवा पराकोटीचा तिरस्कार असो.

पण कलापी अतिशय मृदु–कोमल–मनाचा पुरुष होता. म्हणून लहानातील लहान प्राण्यालाही दुःख देण्याच्या कल्पनेनेही त्याचे मन बंड करून उठत असे. त्याच्या दृष्टीने सबंध निसर्ग हा जिवंत होता. त्याच्या दृष्टीने सारे विश्व हे एखाद्या संताचा–ऋषीचा–आश्रम होता व सर्वशक्तिमान परमेश्वराला त्यांची प्रार्थना अशी होती की, "हे परमेश्वरा, माझ्या हृदयातील कोमल भावनांचा कधीही लोप न होवो व माझे हृदय कधीही कठोर होऊ देऊ नको."

कलापीची 'हृदय-त्रिपुटि', 'विश्वमंगल', 'सारसी', 'कन्या अने क्रौंच' ही खंडकाव्ये व 'हमारा राह', 'सनमने', 'आपनी यादी' हे गझल व इतर कविता ह्यांमुळे गुजरातच्या कविताप्रेमी लोकांना कलापी अतिशय प्रिय झालेला आहे.

कलापीने 'हमीर काव्य' हे काव्य संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर लिहिण्याची सुरुवात केली होती. त्याच्या संपादकाने त्याचे नाव 'हमीरजी गोहेल' असे ठेवले होते. त्याचे फक्त चार अध्याय उपलब्ध झालेले आहेत. कलापीने चार अध्याय लिहून काव्य अपूर्ण ठेवले होते की, ते पूर्ण केले व त्याचे बाकीचे अध्याय गहाळ झाले हे समजण्यास मार्ग नाही. हे काव्य १८९७ मध्ये लिहिलेले आहे. कलापीने आपला मित्र 'जटिल' (जीवनराम लक्ष्मीराम दवे) ह्याला लिहिलेल्या पत्रावरून असे स्पष्ट दिसून येते की, ह्या काव्यात सांगितल्या जाणाऱ्या प्रसंगाचे कथानक व आराखडा कलापीला जटिलने सुचवला होता.

'हमीर काव्या'चा नायक हमीरजी हा गोहेल वंशातील होता व कलापी त्याचा वंशज होता. सोमनाथवर महंमद गझनीचा हल्ला अगदी येऊन ठेपला होता व सर्व हिंदूंचे मन सोमनाथाचे रक्षण करण्याकडे केंद्रित झाले होते. हमीरजीची

वहिनी त्याला टोमणा मारते की, त्याने आता खरे म्हणजे प्रभासपाटणला जायला हवे होते त्याऐवजी तो घरीच बसून राहिला आहे. वहिनीचे शब्द त्याच्या जिव्हारी लागतात. तो एक लहानसे सैन्य एकत्र करून सोमनाथला जायला निघता. रस्त्यात त्याच्या मनात एक असा विचार येतो व त्याने तो इतका त्रस्त होतो की, जर रणक्षेत्रावर लढताना आपल्याला मरण आले तर आपला वंशच एकदम नष्ट होईल, म्हणून रणक्षेत्राच्या मार्गावरच तो एका भिल्ल सरदाराच्या मुलीशी लग्न करतो. एक रात्र तिच्याजवळ राहतो व दुसऱ्या दिवशी सकाळी आपल्या सासऱ्या-बरोबर सोमनाथला जाण्यासाठी निघतो. लढाईत हमीरजी व तो भिल्ल सरदार मारले जातात; पण हमीरजीच्या मृत्यूनंतर हमीरजीच्या पत्नीला झालेला त्याचा मुलगा हमीरजीचा वंश पुढे चालवितो.

: भिल्ल कन्येचे सौंदर्य व भिल्ल लोकांची साधी; पण आदरातिथ्याने परिपूर्ण अशी जीवनराहाटी ह्यांचे फार सुंदर वर्णन कलापीने केले आहे.

'हमीरकाव्य', 'हृदय त्रिपुटि' व कलापीची इतर बरीच खंडकाव्ये मनुष्याच्या सुंदर रूपाच्या व निसर्गाच्या सुंदर हुबेहूब वर्णनानी परिपूर्ण आहेत. त्याच्या समर्पक वर्णनामुळे त्याची वचने अनेक लेखकांनी उद्धृत केलेली आहेत. गझलांचा लेखक म्हणून तर त्यानी आपल्या बऱ्याचशा प्रतिस्पर्ध्यांना मागे टाकले आहे. त्यानी लिहिलेल्या गझलांच्या रचनापद्धतीत थोड्या उणीवा आहेत; पण त्याकडे कोणाचे लक्ष जाईल, असे वाटत नाही.

कलापींच्या कविता त्याच्या हृदयातून उत्स्फूर्तपणे सहज बाहेर पडतात; पण त्यात बुद्धिमत्तेची मर्यादा व कलात्मक मृदुतेची उणीव दिसून येते. म्हणूनच त्यांच्या कविता वाचताना वाचकाला त्यात वारंवार अपूर्ण अर्थाचे शब्द, पुनरुक्ति व पाल्हाळ आढळून येते. कलापीच्या सुरुवातीच्या कवितांवर इंग्लिश रंगदर्शी कवी शेली, कीटस्, बायरन व वर्डस्वर्थ ह्यांचा प्रभाव पडलेला दिसून येतो.

कलापींची आपल्या जवळच्या नातेवाईकांना व ओळखीच्या लोकांना लिहिलेली पत्रे '.कलापीनी पत्रधारा ' ह्या नावाखाली १९३१ मध्ये प्रसिद्ध झाली. ह्या पत्रांवरून आपल्याला त्याच्या जीवनाविषयी व कविताविषयी बरीच माहिती मिळते व त्यावरून त्यांच्या खऱ्या संनिष्ठ हृदयाची साक्ष पटते, तसेच राजदरबारा-तील पोकळ भपका व डामडौल ह्यांचा त्यांना तिटकारा होता आणि राज्याचा त्याग करून प्रेमपूर्ण जीवन व्यतीत करावे व गंभीर विषयांचे वाचन करीत राहावे अशा प्रकारच्या त्यांच्या मनातील भावना ह्या पत्रांतून प्रगट झाल्या आहेत.

कलापींचा प्रवासवृत्तान्त ' काश्मिरमां प्रवास ' हा पत्ररूपाने लिहिलेला आहे. ही पत्रे त्यांचे खाजगी शिक्षक एन. बी. जोशी ह्यांना उद्देशून लिहिलेली आहेत. ही पत्रे म्हणजे सुंदर गद्याचा एक नमुना आहे. ह्यात निसर्गाची वर्णने आणि सुंदर

निसर्गदृश्ये आहेत. त्यांच्या योगाने तरुण आदर्शवादी कवीच्या हृदयात उत्पन्न झालेल्या भावनातरंगाचे फार सुंदर चित्रण आपल्याला दिसून येते. काश्मीरचे नैसर्गिक सौंदर्य पाहून त्याची त्यांच्या मनावर इतकी पकड बसते की, त्याने आपल्या ह्या प्रवासवर्णनाला ' स्वर्गनुं स्वप्नु ' (Avision of Paradise) म्हणजे ' स्वर्गाचे स्वप्न' असे दुसरे एक नाव दिले आहे आणि खरोखरच जेव्हा त्याला काश्मीर सोडून निघावे लागते तेव्हा त्याला स्वर्गाचा त्याग करण्याइतक्या वेदना होतात. कलापी म्हणतात–" आता मी ह्या नंदनवनाला सोडून जात आहे. आता मला ह्या सुखाला मुकावे लागत आहे. आता तो आनंद लुप्त झाला आहे. आता ती अद्‌भुत कला-कारागिरी मला फक्त स्वप्नातच पहावयास मिळेल. आता फक्त निद्रेतच त्या पक्ष्यांची मधुर गीते माझ्या कानावर पडतील. झेलमचा खळखळाट आता फक्त स्वप्नातच ऐकायला मिळेल. स्वप्नातच आता ते ' दाल लेक', ते 'तख्ते सुलेमान' ते ' वुलर सरोवर ' त्या नद्या व झरे, ती फळे, फुले व वनस्पती पाहावयाला मिळतील. मी कितीही शोक केला तरी त्याचा काय उपयोग ?"[३८]

त्यांच्या 'चार संवादो' आणि गोपीचंद व मैनावतीचा संवाद त्यांतील वेधक व प्रभावी भाषेमुळे उल्लेखनीय आहे. बाकीचे अगदी सामान्य प्रतीचे आहेत.

## नानालाल [ १८७७ ते १९४६ ]

गुजरातच्या फार थोडच्या कवींना कवी नानालालइतकी मान्यता मिळाली असेल. त्यांच्या हयातीतच त्यांना गुजराती 'ऊर्मिकाव्यां'चा (भावकाव्यांचा) श्रेष्ठ कवी अशी ख्याती प्राप्त झालेली होती.

नानालाल दलपतराम कवी – ह्यांचा जन्म अहमदाबाद येथे झाला. अत्यंत साधेपणाच्या व अतिशय धार्मिक वृत्तीच्या वातावरणात वाढल्यामुळे पहिल्याने त्यांच्या मनावर त्यांचे वडील कवी दलपतराम आणि अत्यंत पवित्र वृत्तीचे व उत्तम शिक्षक काशिराम दवे ह्यांचा फार प्रभाव पडलेला होता. त्यांच्या हाताखाली नानालाल मोरवी व पुणे येथे अभ्यास करीत होते आणि नंतरच्या आयुष्यात नानालाल ह्यांच्यावर त्यांची पत्नी माणेकबा–भारताच्या स्त्रियांची योग्य प्रतिनिधी असे जिला म्हणता येईल–तिचा फार प्रभाव पडलेला होता.

एम. ए. पास होऊन सादरा येथील स्कॉट कॉलेजचे ते प्रिन्सिपॉल म्हणून काम करू लागले. त्यानंतर ते राजकोटच्या राजकुमार कॉलेजात शिक्षक होते आणि नंतर राजकोट संस्थानचे सर-न्यायाधीश व नंतर काठियावाड (महाराष्ट्र) एजन्सीत मुख्य शिक्षणाधिकारी म्हणून त्यांनी काम केले. १९२१ साली त्या जागेचा त्यांनी राजीनामा दिला व ते महात्मा गांधींना जाऊन मिळाले. त्यावेळी राष्ट्राच्या राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक जीवनावर गांधीजींचा फारच मोठा प्रभाव

पडलेला होता व बुद्धिमान आदर्शवादी युवक त्याने आकर्षित होऊन गांधीजींच्या चळवळीत भाग घेऊ लागले होते; पण काही काळानंतर गांधीजींशी मतभेद झाल्यामुळे नानालाल त्यांना सोडून गेले. त्यानंतर १९४६ पर्यंत म्हणजे मृत्यू होईपर्यंत त्यांनी आपले जीवन फक्त आपल्या लेखणीलाच समर्पित केले होते.

कवी दलपतराम ह्यात असतानाच नानालालनी आपले लेखनकार्य सुरू केले. १९०५ साली अहमदाबाद येथे गोवर्धनराम ह्यांच्या अध्यक्षतेखाली पहिली गुजराती साहित्य परिषद भरविण्यात आली, तेव्हा कवी कान्त ह्यांनी 'नवी गुजराती कविता' ह्या आपल्या भाषणात नानालाल ह्यांच्या 'वसंतोत्सव' (१९०५) ह्या काव्यातील काही भाग वाचून दाखविला व स्वत: नानालाल ह्यांची एक काव्यपंक्ती "वैभवशाली पूर्णचंद्र आपल्या अमृताचा वर्षाव करीत उगवला आहे."[३१] ही पंक्ती उद्धृत करून ती पंक्ती त्यांनाच लागू करून गुजरातच्या साहित्य क्षितिजावर नानालाल ह्या नव्या कवीचा उदय झाला आहे, असे जाहीर केले.

नानालाल ह्यांचे लेखन अतिशय विपुल–खरोखर प्रचंड–आहे. त्यांची मुख्य काव्ये पुढीलप्रमाणे आहेत–'केटलांक काव्यो'–३ भाग (१९०३, १९०८, १९३५), 'राजसूत्रोनी काव्यत्रिपुटि' (१९०३, १९०५, १९११), 'वसंतोत्सव' (१९०५), 'नाना नाना रास'–३ भाग (१९१०, १९२८, १९३७), 'चित्रदर्शनो' (१९२१), प्रेमभक्ति भजनावलि' (१९२४), 'कुरुक्षेत्र' (१९२६ ते १९४०), 'हरिदर्शन' व 'वेणुविहार' (१९४२), 'हरि संहिता' हे त्यांच्या मृत्यूनंतर १९५९ मध्ये प्रसिद्ध झाले.

नानालालनी ऊर्मिप्रधान म्हणजे भावकाव्यात्म नाटके व गद्यग्रंथही लिहिले आहेत. त्यांची नाटके पुढीलप्रमाणे आहेत 'इंदुकुमार' तीन भाग (१९०९, १९२७, १९३२) 'जया-जयन्त' (१९१४), 'राजर्षि भरत' (१९२२), 'विश्वगीता' (१९२७) 'जहाँगीर-नूरजहान' (१९२८) 'शहेनशाह अकबरशाह' (१९३०), 'संघमित्रा' (१९३१), आणि 'गोपिका' (१९३५). त्यांचे मुख्य गद्यग्रंथ पुढे दिल्याप्रमाणे आहेत. 'उषा' (१९१८), 'साहित्यमंथन' (१९२४), 'उद्बोधन' (१९२७), 'अर्धशताब्दीना अनुभव-बोल' (१९२७), 'संसार मंथन' (१९२७), 'कवीश्वर दलपतराम' [ ३ भाग ] (१९३३, १९३४–१९४०, १९४१), 'आपणां साक्षर रत्नो' [ २ भाग ] (१९३४, १९३५), आणि 'सारथी' (१९३८).

नानालालनी कालिदासाच्या संस्कृत 'अभिज्ञान शाकुन्तला'चे व 'मेघदूता'चे तसेच 'भगवद्गीता', 'शिक्षापत्री' व '५ उपनिषदे' ह्यांची गुजराती भाषान्तरे केली आहेत.

त्यांनी लहान मुलांसाठी काही पाठ्यपुस्तकेही लिहिली.

**काव्य–**

नानालालनी निरनिराळ्या अनेक दीर्घ व लघु कविता लिहिल्या आहेत.

त्यात ऊर्मिकाव्ये, भजने, खंडकाव्ये व एक महाकाव्य आहे. त्यांच्या लघुकाव्यात 'केटलांक काव्यो' व 'नाना नाना रास' ह्यांचे प्रत्येकी ३ भाग आहेत. 'चित्रदर्शनो' हे त्यांचे खंडकाव्य आहे व 'कुरुक्षेत्र' हे त्यांचे महाकाव्य आहे. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या वर्षात त्यांनी 'हरिसंहिता' हे विराट काव्य लिहावयास सुरुवात केली. ह्याला अर्वाचीन युगातील भागवत असे म्हणता येईल. हे अपूर्ण राहिलेले आहे. हेमचंद्राच्या 'सिद्ध हेमशब्दानुशासन' ह्या पुस्तकाप्रमाणे 'हरिसंहिता' हा ग्रंथ हत्तीच्या पाठीवर ठेवून अहमदाबादच्या मुख्य मुख्य रस्त्यावरून त्याची मिरवणूक काढून नोव्हेंबर २८, १९५९ रोजी वाजतगाजत तो गुजरात विद्यापीठात नेला होता व भारताचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांनी कवी नानालाल ह्यांचा त्यांच्या मृत्यूनंतर प्रतिष्ठात्मक बहुमान केला.

कवी नानालाल ह्यांच्या सर्व काव्यात त्यांची पदे व ऊर्मिकाव्ये ही त्यांनी गुजराती साहित्याला दिलेली मोठी देणगी आहे. ह्यांतील बऱ्याचशा कविता, त्यांचा राग, शब्दांचे संगीत व कल्पनेच्या उंच भराऱ्या, भावनांची कोमलता व उच्च प्रतीची सूचकता ह्यामुळे उल्लेखनीय आहेत व नानालालाच्या कवितातच त्या अतुलनीय आहेत असे नाही, तर त्यावेळपर्यंतच्या सर्वच गुजराती कवितांत त्या अतुलनीय आहेत. ह्यात भावनांचे सप्तसूर साठवलेले आहेत. एका युवतीच्या हृदयातील प्रेमाच्या अस्फुट प्रणयाच्या स्पंदनापासून ते ज्या मनुष्याने मानवी चंचलता, आसक्ती व महत्त्वाकांक्षा यांचा सर्वस्वी त्याग केला आहे, अशा मनुष्याच्या हृदयातील भावनांपर्यंतच्या सर्व प्रकारच्या भावनांच्या छटा आपणास ह्यात दिसून येतात. नानालालचा 'धूमकेतु' म्हणतो–

"ब्रह्माने व्यापलेले ब्रह्मांड हे खोल अशा आनंदाच्या कुंजासारखे आहे. तेथे मी एकटाच उडत आहे. मनुष्य, सारे जग, सूर्य, चंद्राचे सुंदर चांदणे हे सारे विश्व सुंदर आहे; पण मी एकटाच उडत आहे.

माझे देदीप्यमान पंख मी मिटून घेतले तेव्हाच 'आहालेक' असा प्रतिध्वनी उमटला आणि साधूंनी ऐकले 'भेख'. मी त्या शब्दाचा शोध हिमाने आच्छादिलेल्या हिमालयाच्या शिखरावर घेत आहे व मी एकटाच उडत आहे."[४]

नानालाल हा उदात्ततेचा कवी आहे. त्याने 'ब्रह्माला' पंख्याची उपमा दिली आहे. तो म्हणतो,

"हा नीलकमलाच्या रंगाचा पंखा– हो नंदलाल! चमकणारी रत्ने जडवलेला हा सुंदरपंखा– हो नंदलाल!

ब्रह्मा ब्रह्मांडाचा सर्जक– हा पंखा फिरवतो आहे, हो नंदलाल!

त्यात सोन्याचा सूर्य प्रकाशतो, हो नंदलाल!

रूपेरी चंद्राचे चांदणे त्यात पसरले आहे, हो नंदलाल!

ब्रह्मा–विश्वाचा स्रष्टा हा ब्रह्मरूपी पंखा फिरवीत आहे, हो नंदलाल !"[४१]

नानालालनी 'विराट' हा एका झोपाळ्यावर बसून इकडून तिकडे झोके घेत आहे अशी कल्पना केली आहे. ते म्हणतात,

"हा झगमग करणारा विराटाचा झोपाळा, त्याच्या दोऱ्या आकाशाला बांधल्या आहेत. त्रिलोक[४२] हा त्याचा खांब आहे. असा विराटाचा झोपाळा पुण्य[४३] व पाप[४४] ह्या त्याच्या दोऱ्या आहेत व त्याच्या चारी बाजूंना गोंडे झुलत आहेत."[४५]

नानालाल हे निःसंशय 'प्रेमाचे' कवी आहेत. त्यांच्या बऱ्याचशा कवितांचा व नाटकांचा केंद्रबिंदू 'स्नेहलग्न' (Love marriage) व 'लग्नस्नेह' (लग्नाच्या जोडीदारावरील प्रेम) हा आहे. ते म्हणतात,

"हे उज्ज्वल हृदयी प्रेमधर्मी पुत्रांनो व कन्यांनो, तुमचा कुलधर्म तुम्ही कधीही विसरू नका. तुमचे सर्व कल्याण स्नेहलग्नातच केंद्रित झालेले आहे व तुमच्या लग्नस्नेहातच स्वर्गीय आनंद भरून राहिलेला आहे."[४६]

नानालालनी काही भक्तिपर कविता लिहिल्या आहेत. त्यातील काही अत्युच्च प्रतीच्या आहेत. उदाहरणार्थ–

"अरे ! माझ्या डोळ्यांचा केवढा हा आळस ! त्यांनी जरासुद्धा हरिकडे पाहिले नाही. त्यांनी एक निमिषसुद्धा हरिकडे टक लावून पाहिले नाही. त्याचे ओझरते दर्शन घेऊन अनुभवावयाचे शांतिसुख त्यांनी जरासेही अनुभवले नाही."[४७]

**अथवा–**

"आपल्या शतशत पाकळ्यांनी हा वसंतऋतु विकसित झाला आहे. फुलला आहे. हे हरि ! तू लवकर ये. पृथ्वी आपले सुंदरात सुंदर व अत्युत्तम वस्त्र नेसून सजली आहे. आता तरी हे हरि ! कृपा करून लौकर ये."[४८]

नानालालनी काही देशभक्तिपर गीते लिहिली आहेत. त्यातील गुजरातवरचे– "धन्य, त्रिवार धन्य, हा आमचा पवित्र देश आमचा गुणवान गुर्जर देश"[४९] हे गीत उल्लेखनीय आहे.

नानालालची सर्वोत्तम ऊर्मिकाव्ये ही अभिजात संस्कृत साहित्यातील छंदांचा उपयोग करून अथवा लोकगीतातून सुंदर स्वररचना घेऊन अथवा विशिष्ट प्रसंगी गुजराती स्त्रियांनी गाईलेल्या रास, गरबी वगैरेंच्या रागांचा उपयोग करून रचलेली आहेत. ती अत्यंत मधुर व सुंदर भाषेत लिहिलेली आहेत. ती आपल्या सुरुवातीच्या पंक्तीबद्दल व सूचकतेबद्दल उल्लेखनीय आहेत.

अर्थातच नानालालची सर्वच ऊर्मिकाव्ये एकसारखीच फार उच्च कोटीची नाहीत. काही निरर्थक शब्दावडंबरांची तर काही दुर्बोध आहेत आणि काहींची

भाषा व्याकरणदृष्टचा चुकीची आहे, काहीत छंद व लय ह्यांची विसंगतता आहे.

**वसन्तोत्सव–**

ही एक डोलन शैलीत लिहिलेली दीर्घ कथनात्मक कविता आहे. त्यातील भावना, शैलीची नवीनता व शब्दसौंदर्यामुळे गुजरातच्या साहित्यिक जगतावर तिने फारच प्रभाव गाजविला होता. आपल्या कारकीर्दीच्या सुरुवातीला कवी नानालाल ह्यांना अशी महत्त्वाकांक्षा होती की आपणाला 'वसंता'चा कवी म्हणून ओळखण्यात यावे. हा वसंतऋतु म्हणजे पाश्चिमात्य संस्कृतीशी आपला संबंध आल्यानंतर सुरू झालेला वसंतऋतु होय. जे कार्य गोवर्धनरामनी गद्यद्वारे केले तेच कार्य पद्यद्वारे करण्याची नानालालना इच्छा होती. हे कार्य म्हणजे भूतकाळातील मृतप्राय झालेल्या अनेक गोष्टींचा त्याग करणे व भारतातील जीवनपद्धतीत नवचेतन आणणे व त्यासाठी पाश्चिमात्य संस्कृतीतील जे चांगले आहे त्याची त्यात भर घालून भारतीय जीवनपद्धती सुधारणे हे होय. 'वसन्तोत्सव' हे काव्य ह्याच दिशेने केलेला प्रयत्न होय. त्यात स्नेहलग्नाची तारीफ केलेली आहे व विधवेच्या पुनर्विवाहाची तरफदारी केली आहे; पण ती अशा विधवेसाठी केली आहे की, जिचे प्रेमलग्न झालेले नसून आई-बापांनी जिचे मन ज्याच्यावर जराही जडलेले नाही अशा अनोळखी वराशी तिचे लग्न लावून दिलेले आहे. त्यातील एक पात्र– ज्याच्या मुखातून कवी स्वतःच बोलत आहे--असे म्हणते–

" जिने प्रेमलग्न केले आहे अशा विधवेने जर पुनर्लग्न केले तर त्यासारखे दुसरे पाप नाही. जिचे फक्त शारीरिक दृष्टयाच लग्न झाले आहे अशा विधवेला पुनर्विवाहासारखी दुसरी मुक्तीच नाही."[५०]

ह्या काव्यात सांगितलेली कथा अगदी दुर्बळ व अशक्य कोटीतील आहे आणि त्यातील पात्रें ज्याचा उपदेश करतात त्याच्या अगदी विरुद्ध त्यांचे वर्तन आहे.

**चित्रदर्शनो–**

'चित्रदर्शनो' ह्या काव्यात सर्वच ठिकाणी कवीची उच्च प्रतिभा दिसून येत नाही; पण त्यांच्या 'शरत् पूर्णिमा' व 'चोरवाड' ह्यांसारख्या काही कवितांत निसर्गाची सुंदर वर्णने दिसून येतात. काहीं व्यक्तींना उद्देशून लिहिलेल्या पुढील कविता– उदाहरणार्थ : 'पितृतर्पण', 'गुरुदेवने' (गुरु प्रो. काशिराम दवे), 'सौराष्ट्रनो साधु' (अमृतलाल पढियार–देवाचा खरा भक्त), 'गुजरातनो तपस्वी' (महात्मा गांधीं) ह्या त्यातील भावनांची ऊब (उष्मा) व आलंकारिक भाषा ह्यामुळे प्रामुख्याने उल्लेखनीय झाल्या आहेत. ज्या व्यक्तींबद्दल कवीला अतिशय मान व आदर आहे त्यांना ह्या कवितांनी दिलेली मानवंदना पाहून असे वाटते की, गुजराती साहित्यात ह्या कवितांना तोड नाही. जाता जाता हे सांगितले पाहिजे की,

अशा प्रकारच्या कवितांत सर्वांत उत्तम अशी जी कविता– 'गुजरातनो तपस्वी' ती गांधीजींशी मतभेद झाल्यानंतर कवीने ह्यातून काढून टाकली आहे.

'चित्रदर्शनो'मधे ल इतर कविता वरील कवितांप्रमाणे संतोषकारक नाहीत.

### कुरुक्षेत्र–

ह्यात महाभारतात झालेल्या लढाईतील अनेक प्रसंगांचे वर्णन आहे. कवीने ह्या काव्याला महाकाव्य असे संबोधले आहे; पण ह्यात भव्य अशी शब्दयोजना व अत्युत्तम आलंकारिक भाषा असली (जी दोन नानालालची खास वैशिष्टये आहेत) तरी कित्येक जागी ह्या काव्यात रचना व अचूक दृष्टी ह्यांची एकता दिसून येत नाही. कारण नानालालची बुद्धिमत्ता ही 'ऊर्मिकाव्यां'च्या कवीची व आत्मलक्षी कवीची बुद्धिमत्ता होती.

### हरि-संहिता (१९४२–१९४६)–

'भागवता'च्या धर्तीवर एक महान (विराट) कविता लिहिण्याच्या महत्त्वाकांक्षेने प्रेरित होऊन केलेला हा एक प्रयत्न होय; पण ह्या काव्यात भावनाविष्कार, शैली व शब्दयोजना ह्यांची वारंवार झालेली पुनरुक्ती दिसून येते.

## भावप्रधान नाटके

### इन्दुकुमार–

हे तीन भागात लिहिलेले एक नाटक आहे. हयात 'वसंत'–धर्माचे 'वसंत'–ऋतूच्या वैशिष्टयांचे वर्णन आहे. 'वसंता'चे वर्णन हे नानालाल हयांना नेहमीच अति प्रिय होते. तसेच हयात प्रेम व देशभक्ती हयांच्या आदर्शाचे वर्णन आहे. कथानक फारच दुर्बळ व पराकोटीचे असंगत असे आहे.

नाटकाचा नायक इन्दुकुमार व नायिका कान्तिकुमारी अमृतपूर नावाच्या शहरात रहात असतात. इन्दुकुमार हा एका फार श्रीमंत माणसाचा मुलगा असतो. तो व कान्तिकुमारी ही दोघे बाळपणापासून एकमेकांचे मित्र असतात. त्यांची बाळपणची मैत्री प्रेमात परिणत होते. ते परस्परांशी लग्न करून जगापुढे आदर्श प्रेमलग्नाचे उदाहरण ठेवण्याचे ठरवितात; पण काही अतर्क्य अशा परिस्थितीमुळे इन्दुकुमारचे कुटुंब पांगते व इन्दुकुमार अमृतपूर सोडून जातो. 'कान्ति' त्याला अशी खात्री देते की, जोपर्यंत माझे लग्न होणार नाही तोपर्यंत मी एक दुकान काढीन व त्यात फुले ठेवून जो कोणी फुले मागायला येईल त्याला मी काहीही पैसे न घेता फुकट फुले विकीन.

अमृतपूर सोडून गेल्यावर इन्दुकुमारला एक गुरू भेटतो. तो इन्दुकुमारला सांगतो की, तू एक वर्षभर वेषान्तर करून रहा व जगाचे स्वस्थतेने व मोकळया

मनाने निरीक्षण कर. एक वर्षानंतर जगाचा त्याग करण्याची तुझी इच्छा जर तितकीच प्रबळ असली तर तू आपल्या आत्म्याची हाक ऐक व तसे कर. ह्याउलट, एक वर्षानंतर जर तुला अदम्य असे जगाविषयीचे आकर्षण वाटले तर तू जगाच्या व्यवहारात परत भाग घे. हे ऐकून इन्दुकुमार अमृततपुरला परत येतो व दररोज संध्याकाळी वेषान्तर करून कान्तिकुमारीच्या दुकानावर तिला कळू न देता जातो व तिच्याकडे थोडा वेळ पाहतो.

कान्तीचे आईबाप त्यांनी ठरविलेल्या एका वराशी लग्न करण्याचा तिला आग्रह करतात. उलटपक्षी कान्तीच्या हृदयात इन्दुकुमाराविषयीचे उत्कट प्रेम जागृत असते. ती रोज संध्याकाळी एक गाणे म्हणते व त्यात आपल्या हृदयेश्वराला परत येण्याविषयी आळविते. ही 'कान्ती'ची तळमळ पाहून एक व्यभिचारी स्त्री प्रमदा ही तिला आमोद-प्रमोदांच्या विश्वात घेऊन जाते.

पण कान्ती लगेच भानावर येते व ती एका महान व सुसंस्कृत नेपाळी जोगिणीसमवेत जगाच्या प्रवासाला निघते.

कान्ती निघून गेल्यावर इन्दुकुमाराला जगाच्या व्यवहारात काही रस उरत नाही व तो योग्याचा वेष घेऊन मानवजातीच्या सेवेला आपले सर्वस्व वाहून टाकतो.

ह्या काव्यात कवीने प्रतीकांचा अतिशय उपयोग केला आहे व आपले विचार वाचकांना बरोबर पोहोचविण्यासाठी नाटकातील दरेक पात्र हे एक प्रतीक आहे असे दाखविले आहे; पण ह्यातील अनेक प्रतीके अनेकदा असंगत आणि अयोग्य अशी आहेत. नाटकाच्या कथानकात असंगतता आहे व बरेच वेळा पात्रे जे बोलतात— किंवा उपदेश देतात व ती जे वर्तन करतात त्यात सुसंगती दिसून येत नाही.

**जया-जयंत—**

ह्या नाटकाची नायिका जया ही देवतात्मा नगाधिराज हिमालयातील एका काल्पनिक देशाच्या—गिरिदेशाच्या—राजाची कन्या असते. तो असा प्रदेश असतो की जेथे रात्र व दिवस सहा सहा महिने लांब असतात आणि एक पंधरवडा भर पहाट असते. राजाच्या प्रधानाचा मुलगा जयंत जयाचा संवगडी असतो व तो तिला मागणी घालतो; पण तिला लग्नाचा तिटकारा असल्याने ती, ती मागणी नाकारते. तिचे माता-पिता जबरदस्तीने काशीचा राजा काशीराज ह्याच्याशी तिचे लग्न करून देण्याचे ठरवितात, तेव्हा ती घरातून पळून जाते.

जयाच्या माता-पित्यांच्या सांगण्यावरून जयंत तिला शोधण्यासाठी घरातून निघतो व त्याचे तिला शोधण्याचे प्रयत्न निष्फळ झाल्यावर तो एका जागी येऊन वस्ती करतो. त्या जागेला तो 'हरि-कुंज' असे म्हणतो. तेथे तो एक आश्रम स्थापतो व अतिशय कठोर असे देहदमन करून आपल्या अविवाहित तरुण शिष्यांचे नैतिक वर्तन व व्यक्तित्व घडविण्याच्या कार्याला स्वतः वाहून घेतो.

गिरिदेश सोडल्यावर जया काही संकटातून मुक्त होते व ज्या पापाच्या मंदिरात तिला पकडून ठेवलेले असते त्याचा घुमट तोडून तो बाहेर निघते व गंगा नदीत उडी घेते. जयंतचे शिष्य तिला वाचवितात व आपला गुरू जयंत ह्याच्याकडे घेऊन येतात. तेथे काही चर्चा-विचारणांच्या अंती ते दोघे दोघांच्या आत्म्यांना लग्नग्रंथीने जोडावयाचे ठरवितात. ते दोघे आपली शरीरे एकमेकापासून दूर ठेवतात व एकमेकांना स्पर्शसुद्धा न करता दोघेंही गंगेच्या दोन तीरावर आपापले आश्रम स्थापतात आणि धर्माच्या, प्रेमाच्या व सेवेच्या कार्याला आपल्याला वाहून घेतात.

नानालालच्या इतर नाटकांप्रमाणेच जया-जयन्त ह्या नाटकातसुद्धा कल्पना व प्रयोग ह्याबाबतीत अनेक मूलभूत उणिवा आहेत. ह्या नाटकात नानालालचा देहाबद्दलचा तिरस्कार पराकोटीला जाऊन पोहोचलेला दिसतो. त्याला दैहिक प्रेमाची कल्पना तर असह्य वाटतेच; पण चुकून अथवा सहज झालेला शारीरिक स्पर्शसुद्धा त्याला अक्षम्य वाटतो. म्हणूनच त्याने जया-जयन्ताला एकाच होडीतून प्रवास करू दिलेला नाही किंवा ते दोघे निरनिराळ्या आश्रमात रहात असले तरी ते आश्रमसुद्धा नदीच्या एकाच किनाऱ्यावर स्थापलेले दाखविलेले नाहीत.

'जया-जयन्त' नाटकाच्या कथानकात अतिशय असंगती आहे. आदर्श सत्य, अलौकिक आणि स्वाभाविक ही असमान प्रमाणात एकमेकात मिसळलेली दिसून येतात. एका प्रवेशात देवर्षीच्या आज्ञेने भूत, वर्तमान व भविष्य हे तिन्ही काळ एकाच वेळी रंगभूमीवर येतात व आपला परिचय करून देतात. हा प्रवेश अतिशय सुंदर लिहिलेला आहे; पण हा प्रवेश म्हणजे काव्याचा एक प्रकार अथवा भाग आहे. मूळ नाटकाचा तो मूळचा भाग नाही. 'इन्दुकुमार'प्रमाणेच ह्या नाटकातसुद्धा पात्रांचे वर्तन व त्यांनी प्रगट केलेले विचार हे सुसंगत नाहीत. ह्या नाटकाचे श्री. उछरंगराय केशवलाल ओझा ह्यांनी इंग्लिशमध्ये भाषान्तर केले आहे.

'शहेनशाह अकबरशाह' व 'जहाँगीर-नूरजहाँ' ही नाटके इतर नाटकांपेक्षा थोडी निराळी आहेत. ही दोन ऐतिहासिक नाटके आहेत व ह्यात हिंदुस्तानच्या दोन मोगल बादशाहांच्या जीवनातील प्रसंग चित्रित केलेले आहेत. ह्या दोन नाटकांपैकी 'जहाँगीर-नूरजहाँ' हे अधिक चांगले आहे. कारण जहाँगीरच्या जीवनातील काही प्रसंग मूलतःच अकबराच्या जीवनातील प्रसंगांपेक्षा अधिक जादूमय आहेत. एक जहाँगीरचा न्याय व दुसरी 'सिकंदराची यात्रा' हे प्रसंग फार सुंदर रेखाटलेले आहेत.

**संघमित्रा—**

हे नाटक सम्राट अशोकाच्या अहिंसेच्या राजाज्ञेचा प्रचार करण्यासाठी लिहिलेले आहे. 'राजर्षि भरत' ह्या नाटकात आर्य-संस्कृतीच्या भव्यतेचे व सार्वभौमत्वाचे सुंदर चित्र आलेखिलेले आहे.

**विश्वगीता –**

ह्या नाटकात कवीने पाप म्हणजे काय, हे कोडे उलगडण्याचा प्रयत्न केला आहे. ह्या नाटकाचे तीन अंक आहेत व त्यात अनेक प्रवेश आहेत. पहिल्या अंकात पापाशी संबंधित अशा पाच सनातन समस्यांच्या अस्तित्वावर भर दिलेला आहे. दुसऱ्या अंकात संस्कृती व सुधारणा ह्यांचा उदय झाला तेव्हापासून पापविषयक समस्या सोडविण्याचे केलेले प्रयत्न चित्रित केले आहेत व तिसऱ्या अंकात सनातन मूल्यावर भर दिलेला आहे. ह्या नाटकात कथानक असे काही नाहीच. काही प्रवेशांचे कथानक 'रामायणा'तून उचललेले आहे, तर काहींचे 'महाभारता'तून व काहींचे 'भागवता'तून घेतलेले आहे. एक प्रवेश 'शंकर दिग्विजया'तून घेतला आहे आणि बाकीचे प्रवेश कवीने स्वतःच्या प्रतिभेने लिहिले आहेत. ह्यात कथानकाची एकसूत्रता सांभाळण्याचा प्रयत्न निरनिराळ्या प्रवेशातून करून त्यांना एकत्र आणण्याचाही हेतू साध्य केला आहे; पण पहिल्या अंकात उभ्या केलेल्या समस्या व दुसऱ्या अंकात त्या सोडविण्याचा केलेला प्रयत्न ह्यांचा काहीही तात्त्विक संबंध दिसून येत नाही. त्यामुळे ह्या नाटकाचा एकसंध असा प्रभाव मनावर पडत नाही; पण 'भरत-गोत्र-ना-लज्जाचीर' व 'ब्रह्मांडमंडळनो महारस' ह्यासारखे काही प्रवेश फारच सुंदर रीतीने लिहिले आहेत.

**गोपिका –**

हे नाटक ग्रामीण जीवनावर लिहिलेले आहे.

ह्यापूर्वी पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे नानालाल हे खास आत्मलक्षी व ऊर्मिकाव्यांचे कवी आहेत. काही काही प्रसंगी त्यांच्या बुद्धीची चमक दिसून येते; पण ज्या लेखनाला श्रेष्ठ प्रकारच्या कारागिरीच्या कौशल्याची जरूर असते अशा लेखनात नानालाल जरासे कमी पडतात.

## गद्य-ग्रंथ

नानालाल ह्यांच्या गद्यग्रंथांपैकी 'उषा' ह्या पुस्तकात एक कवी प्रेमी बनतो तेव्हाची त्याची गोष्ट आहे. 'सारथी' ह्या कादंबरीत ग्रंथकर्त्याने त्या वेळच्या राजकारणाची चर्चा केली आहे आणि असे भविष्य वर्तवले आहे की, भारत हा एक दिवस सर्व जगाचा 'सारथी' –'नेता' – होईल. 'कवीश्वर दलपतराम' हे ३ विभागात लिहिलेले पुस्तक बेसुमार अतिशयोक्तीने भरलेले आहे आणि ह्या विषयाला योग्य न्याय देताना जरी त्यात समतोलपणाचा पूर्ण अभाव उघड होत असला तरी हा ग्रंथ उल्लेखनीय आहे. कारण ह्या ग्रंथाने आपल्याला दलपतरामच्या पूर्वी व

दलपतरामच्या हृयातीत गुजरातचे जीवन कसे होते हृयाविषयीची अतिशय मूल्यवान माहिती प्राप्त होते.

**संसार-मंथन—**

काही सामाजिक प्रश्नांवर दिलेल्या व्याख्यानांचा संग्रह हृयात आहे. 'आपणा साक्षर रत्नो' व 'साहित्य-मंथन' हृया दोन ग्रंथांत काही महान लेखक व कवी हृयांना लेखकाने दिलेली मानवंदना, विशिष्ट साहित्यिक मेळाव्यात दिलेली व्याख्याने आणि छंद व कविता हृयांवरील एक लेख हृयांचा संग्रह केलेला आहे. 'उद्‌बोधन' व 'अर्ध शताब्दीना अनुभव बोल' हृयात लेखकाने दिलेली व्याख्याने समाविष्ट केली आहेत. दुसऱ्या ग्रंथातील भाषणे ही लेखकाच्या सुवर्ण जयंतीच्या उत्सवप्रसंगी त्यांचा ठिकठिकाणी जो सत्कार करण्यात आला व त्याचे जे अभिनंदन करण्यात आले त्या वेळी त्याना दिलेली आभारपूर्ण उत्तरे आहेत.

नानालालचे बरेचसे गद्यलेखन म्हणजे त्यांनी विशिष्ट प्रसंगी केलेली भाषणेच आहेत. त्यांना शीघ्र वक्तृत्वाची फारशी आवड नव्हती आणि जी व्याख्याने ते देत असत ती खूप वाचन व खूप मेहृनत करून मगच देत असत. त्यांची गद्यशैली अर्थहीन, शब्दविस्तारपूर्ण, भपकेबाज व आलंकारिक आहे; पण 'चित्रदर्शनो'मधील त्यांचे गद्यातील निबंध मात्र अति उत्तम आहेत.

## डोलन-शैली

महाकाव्यातील वैभवशाली व उदात्त कार्ये आणि भावना प्रकट करण्याकरिता जे साधन म्हणून उपयोगी पडेल असा नियंमक कवितेसारखा छंद शोधून काढण्याचे प्रयत्न नर्मदच्या काळापासून सुरू झाले होते. नर्मदने 'वीरवृत्त' उपयोगात आणले. नानालालने 'डोलन-शैली' शोधून काढली. तिला टीकाकार 'अपद्यागद्य' असे म्हणतात म्हणजे जी गद्यही नव्हे व पद्यही नव्हे अशी ही शैली आहे.

नानालालनी स्वत:च म्हटले आहे की डोलन-शैलीचे मुख्य तत्त्व 'डोलन' हृच आहे. हे 'डोलन' म्हणजे नव्हे ताल की नव्हे लय की नव्हे उच्चाराची ढब हृा पूर्णपणे आत्मलक्षी अनुभव आहे. जेथे 'क्ष' ला डोलन-शैलीचा प्रत्यय येणार नाही तेथे 'य' ला तो येईल व 'ज्ञ' ला ती शैली आणखीच कोठेतरी दुसरीकडे सापडेल आणि हे तिघेही बरोबर असू शकतील किंवा तिघेही चूक करीत असतील.

आपल्या काही समर्थ विद्वानांनी 'डोलन' शैलीत लिहिलेल्या काव्यपंक्तींचे बारकाईने निरीक्षण केले व त्याच्या मुळाशी काही विशिष्ट नियम आहे की काय त्याचा शोध केला; पण त्या बाबतीत व्याख्या करता येईल असे नक्की प्रमाण काहीच हाती आले नाही.

'डोलन-शैली' म्हणजे मुक्त-छंद-काव्यही नव्हे, नानालाल मात्र डोलन-शैलीलाच मुक्तछंद कविता म्हणतात. मुक्तछंद कविता तर आहेच; पण डोलन-शैलीला कोणत्याही कवितेसंबंधीच्या मर्यादा मान्य नाहीत. हे लक्षात ठेवले पाहिजे की रामनारायण पाठक ह्यांनी एकदा डोलन-शैलीचे बारकाईने निरीक्षण करण्याचा व त्याची व्याख्या अथवा त्याचे नियम शोधून काढण्याचा प्रयत्न केला; पण त्यांनी आपल्या 'बृहत्‌पिंगल' ह्या ग्रंथात तिचा समावेश केला नाही.

एकंदरीत विचार करता असे म्हणता येईल की, डोलन-शैली म्हणजे भावनोद्रेकाने परिपूर्ण असे गद्यच आहे. त्यात अर्थानुगामी असे वाक्याचे भाग करून त्या प्रत्येक भागासाठी एक एक निरनिराळी पंक्ती उपयोगात आणून ज्या शब्दावर भार द्यावयाचा असतो तो शब्द दरेक पंक्तीच्या सुरुवातीला ठेवलेला असतो.

## खबरदार [ १८८१-१९५३ ]

अरदेशर फरामजी खबरदार. त्यांनी आपले लेखन 'अदल' व 'मोटालाल' ह्या उपनामांनी केले. त्यांचा जन्म दमण येथे झाला. त्यांना फारसे शिक्षण मिळाले नव्हते व त्यांनी आपले बरेचसे जीवन व्यापार-धंद्यात व्यतीत केले होते.

खबरदारच्या कवितांचा पहिला संग्रह 'काव्यरसिका' ह्या नावाने १९०१ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्यांनी वीस पेक्षाही अधिक काव्यसंग्रह लिहिले; त्यात 'भारतनो टंकार', 'कलिका', 'भजनिका', 'दर्शनिका' ह्यांचा आणि 'प्रभातनो तपस्वी' व 'कुक्कुटदीक्षा' ह्या दोन विडंबन काव्यांचाही समावेश होतो. खबरदार ह्यांनी काही गद्यलेखनही केले आहे. त्यांनी इंग्लिशमध्ये ऊर्मिकाव्यांसारख्या काही कविताही लिहिल्या आहेत.

खबरदारच्या काव्यात खंडकाव्ये, सुनीते (Sonnets), दैनंदिन विषयांवरील कविता, निसर्गविषयक कविता, प्रेम व भक्तिपर कविता ह्यांचा समावेश होतो.

निर्यमक प्रवाही गुजराती कविता लिहिण्याचा त्यांनीही प्रयत्न केला आहे. त्याला ते प्रथम 'मुक्तधारा' व नंतर 'महाछंद' (अमीरी) असे म्हणत.

खबरदार ह्यांच्या काव्यग्रंथांपैकी 'कलिका' व 'दर्शनिका' हे ग्रंथ नमूद करण्यासारखे आहेत.

### कलिका (१९२६)—

हे ३७३ श्लोकांचे एक प्रेमकाव्य आहे. ते मुक्तधारा अथवा निर्यमक काव्य आहे. प्रत्येक श्लोक हे एक स्वतंत्र एकम् आहे व त्यांचा परस्परांशी तात्त्विक अथवा मानसशास्त्रीय संबंध नाही. प्रत्येक श्लोकात एकेक मनाची स्थिती अथवा एखादा प्रसंग अथवा कवीच्या प्रेमोद्रेकाचा प्रभावशाली भावनाविष्कार प्रकट ालेला आहे. ह्यातील काही काही श्लोक हे अनुपम असे प्रेमकाव्याचे नमुने आहेत.

**दर्शनिका (१९३१)–**

हे काव्य झुलणा छंदात लिहिलेले आहे. ह्या छंदाचा उपयोग नरसिंह मेहताने आपल्या 'प्रभातियाँ'त आणि आपल्या ज्ञान व वैराग्यविषयक जवळजवळ सर्वच कवितांत केला होता. ह्या काव्याचे ९ भाग पाडलेले आहेत आणि त्यात जवळजवळ ६००० पंक्ती आहेत.

कवीची मुलगी तेहेमिना हिच्या अकाली झालेल्या मृत्युप्रसंगी ही कविता लिहिण्याची कल्पना कवीला आली. अर्थात ही कविता म्हणजे विलापिका नव्हे कारण ह्या कवितेत स्वतःच्या दुःखाला कवीने कोठेही वाचा फोडलेली नाही. कवीने म्हटल्याप्रमाणे ह्या कवितेत कवीच्या जीवनाचे सर्व तत्त्वज्ञान साठविलेले आहे. ह्या कवितेत काव्य, तत्त्वज्ञान व विज्ञान ह्यांचे सारच ओतलेले आहे. कवीच्या मताप्रमाणे जगातील कोणताही धर्म स्वयंपूर्ण नाही, कारण जगातील सर्व धर्म ह्या एका खऱ्या धर्माच्या–सर्व विश्वाचा धर्म जो प्रेम, विश्वबंधुत्व–त्याच्या शाखा आहेत. कवीची अशी खात्री आहे की ज्ञानाची सर्वांगीण वृद्धी जसजशी होत जाईल तसतशी सर्व मानवजात ह्या प्रेमधर्माकडे आकर्षित होत जाईल.

ह्या कवितेत जागोजागी सुंदर रूपके दिसून येतात व कित्येक ठिकाणी कवी तत्त्वज्ञानाला सुंदर कवितेचे रूप देण्यात यशस्वी झाला आहे; पण काही काही ठिकाणी तार्किक चर्चा फार मोठ्या प्रमाणात दिसून येते व त्या पाल्हाळामुळे वाचकाला विचार करण्यासारखे काही राहातच नाही.

खबरदारच्या कवितांतून आपणास त्या काळच्या सामाजिक व राजकीय कल्पनांचे आणि त्याच्या काळात वेळोवेळी बदललेले कवितेचे स्वरूप ह्यांचे चित्र दिसून येते. खबरदार आपल्या स्वदेशाभिमानविषयक कवितांबद्दल प्रसिद्ध आहेत. त्यांच्या 'गुणवन्ती गुजरात', 'खप्पर भरो भरो हो', 'अमारो देश', 'हळदीघाटनुं युद्ध', 'शूरा बावीस हजार' ह्या कविता त्यातील ताल, लय व जोरदार भाषेमुळे प्रसिद्ध आहेत. 'प्रभातनो तपस्वी' हे नानालाल ह्यांच्या 'गुजरातनो तपस्वी' ह्याचे केलेले विडंबन काव्य आहे व 'कुक्कुटदीक्षा' हे नानालाल ह्यांच्या 'ब्रह्मदीक्षा' ह्या काव्याचे केलेले विडंबन काव्य आहे. ही विडंबन काव्ये त्यांनी 'मोटालाल' हे उपनाम धारण करून लिहिली. हे नावसुद्धा 'नानालाल'[५१] ह्या नावाचे विडंबनच आहे.

'खबरदार'नी लिहिलेल्या कवितांच्या काही पंक्ती सदैव स्मरणात राहतील अशा आहेत.

"एक गुजराती मनुष्य जेथे जेथे राहील ते ते स्थळ म्हणजे नित्य गुजरातच आहे."[५२] ही पंक्ती तर सर्वप्रसिद्ध आहे.

ह्या काळातील लक्षांत ठेवण्याजोगे आणखी लेखक पुढीलप्रमाणे आहेत.

## नारायण हेमचंद्र [ १८५५–१९०९ ]

नारायण हेमचंद्र ह्यांना प्रवास करण्याची अदम्य अभिलाषा होती. तसेच निरनिराळ्या भाषा शिकण्याचीही त्यांना तीव्र इच्छा होती. बंगाली साहित्य गुजराती वाचकांपुढे आणण्याचे श्रेय त्यांच्या बंगाली ग्रंथांच्या अनुवादांना सर्वांत प्रथम द्यावे लागेल; पण त्यांचे अनुवाद मात्र अव्यवस्थित, चुकीचे व ओबडधोबड आहेत.

## शिवलाल धनेश्वर [ १८५०–१८९९ ]

शिवलाल धनेश्वर हे त्यांनी केलेल्या 'रामायणा'च्या (१८७५) व 'मेघदूता'च्या (१८८६) भाषान्तरासाठी तसेच त्यांच्या 'प्रवासवर्णना'साठी (१८८६) प्रख्यात आहेत.

त्यांचे 'रामायण' हे तुलसीदासाच्या 'रामायणा'चे भाषान्तर आहे. हे भाषान्तर अत्युत्कृष्ट आहे व त्यामुळे शिवलाल ह्यांची फार ख्याती झाली. त्यांनी 'मेघदूता'चे भाषान्तर मूळ संस्कृत पुस्तकाप्रमाणे 'मन्दाक्रान्ता' वृत्तात न करता त्यात 'पृथ्वी' व 'स्रग्धरा' ह्या वृत्तांचाही उपयोग केला आहे. 'प्रवासवर्णनांत' त्यांनी कच्छ ते महाबळेश्वरपर्यंत केलेल्या प्रवासाचे वर्णन आहे. काही स्थळांची व शहरांची वर्णने फारच सुंदर आहेत.

## केशवलाल मोतीलाल परीख [ १८५३–१९०७ ]

केशवलालनी १९०७ साली 'स्वदेशी उद्योगनो संदेश' (देशी उद्योगांचा संदेश) हे मासिक सुरू केले व स्वदेशी कला, हस्तोद्योग व औद्योगिक साहसे ह्यांचा जोरदार पुरस्कार केला. केशवलालनी 'सामाजिक सुधारणा' ह्या विषयावरही लेखन केले आहे. फॉर्बसच्या मदतीने दलपतरामनी प्रकाशित केलेल्या 'गुजरात अने काठियावाड देशनी वार्ताओ' ह्या संग्रहासाठी केशवलालनी काही लघुकथाही लिहिल्या आहेत. डाह्याभाई देरासरीनी आपल्या 'साठीना साहित्यनुं दिग्दर्शन' मध्ये लिहिले आहे की, फ्रामजी बोमनजी ह्यांनी प्रकाशित केलेल्या लघुकथांच्या संग्रहात केशवलालनी बऱ्याच कथा लिहिल्या होत्या.

## हरिलाल नरसिंहराव व्यास [ १९६३– ? ]

संस्कृतमधील श्रेष्ठ ग्रंथ 'भगवद्गीता', 'अष्टावक्र-गीता', 'रघुवंश', 'किरातार्जुनीय' व 'शिशुपालवध' ह्यांचे गुजरातीतील भाषान्तरामुळे व्यास हे प्रसिद्ध आहेत.

ही भाषान्तरे त्यांनी १८९२ ते १९१० ह्या काळात केली. 'रघुवंश', 'किरातार्जुनीय' व 'शिशुपालवध' ह्या शेवटच्या तीन ग्रंथांचे भाषान्तर तर बहुतेक गुजरातीत पहिल्यानेच करण्यात आले.

## झवेरीलाल उमियाशंकर याज्ञिक

श्री. याज्ञिक हे कालिदासाच्या 'अभिज्ञान शाकुंतला'चे गुजरातीत भाषान्तर (१८६७) करणारे पहिलेच गुजराती लेखक होते.

## छगनलाल हरिलाल पंड्या

त्यांनी केलेल्या 'कादंबरी'च्या भाषान्तराबद्दल (१८८२) ते प्रसिद्ध आहेत.

## श्रीकृष्णशर्मा

हे 'मेघदूत' काव्याचे (१८८८) लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. कालीदासाच्या 'मेघदूता'च्या धर्तीवर लिहिलेले गुजरातीतील हे पहिलेच काव्य आहे. ह्या काव्याचे १२ सर्ग आहेत. त्यात नायक एका भ्रमरातर्फे आपल्या माहेरी गेलेल्या प्रियतमेला संदेश पाठवतो. ह्या कवितेला फक्त ऐतिहासिक महत्त्व आहे.

## बाई ॲस्टर खिमचंद

ॲस्टर ही एकच स्त्री व एकच कवयित्री आहे की जिने आपली 'बारमासी सद्बोध काव्य' (१८९५) ह्यात सर्व महिन्यांचे सौंदर्य, ग्रेगोरियन कॅलेंडरातील महिन्यांच्या अनुक्रमाने म्हणजे जानेवारी, फेब्रुवारी, मार्च ह्या क्रमाक्रमाने वर्णिले आहे. कवितेचे नाव 'इसवी वर्षना बार महिना' असे आहे. ही कविता वाचनीय आहे.

## भीमराव भोळानाथ दिवेटिया [ १८५१–१८९० ]

त्यांनी 'पृथुराज रासो' (१८९३) हे गद्य महाकाव्य लिहिण्याच्या केलेल्या प्रयत्नामुळे ते प्रसिद्ध झाले आहेत. कालीदासाच्या 'मेघदूता'चे त्यांनी केलेले समश्लोकी गुजराती भाषान्तर हे अशा प्रकारचे पहिलेच भाषान्तर आहे. 'पृथुराज' रासो'मधील त्यांनी केलेली काही वर्णनेही अतिसुंदर आहेत.

## केशवलाल हरिराम भट्ट [ १८५१–१८९६ ]

'केशवकीर्ति' (१९०९) ह्या आपल्या ग्रंथातील काही भजनांसाठी ते फार

प्रसिद्ध आहेत. त्या भजनात अतिशय नम्रता, विचारांची उदात्तता व शब्दांची शुद्धता दिसून येते. छंदाच्या दृष्टीने त्यांची काव्ये निर्दोष व परिपूर्ण आहेत.

## बेहेरामजी मेहेरबानजी मलबारी [ १८५३–१९१२ ]

मलबारी हे पत्रकार व एक महान समाजकर्ते म्हणून प्रख्यात होते. त्यांच्या-बद्दल सर्वांना इतका आदर होता आणि त्यांची महत्ता सर्वांना इतकी वाटत होती की ते सिमला येथे जेव्हा अचानक मृत्यू पावले त्या वेळी इंग्लंडचे राजे (बादशहा) ह्यांनी स्वतः दुखवटयाचा संदेश पाठवला होता. ते आपल्या समाज-सुधारणेवरील काही संस्मरणीय कवितांमुळे प्रख्यात आहेत. त्या कविता ह्या आहेत—' इतिहासनी आरसी', 'सुरती लाला सहेलानी', 'सुन गरवी गुजरात' वगैरे. विशेष म्हणजे त्यांतील काही पंक्तीमुळे त्याना फार प्रसिद्धी मिळाली. त्या पंक्ती अशा भावार्थाच्या—

" चक्रवर्ती महाराजेसुद्धा काळचक्राशी बांधले गेले आहेत व त्याच्याबरोबर फिरत आहेत आणि शाहआलमच्या[५५] नातेवाईकांना मी रस्त्यावर भीक मागताना पाहिले आहे."[५६]

## दोलतराम कृपाराम पंड्या [ १८५४–१९१६ ]

श्री. पंड्यानी ' इंद्रजित वध' (१८८७) हे महाकाव्य लिहिण्याचा प्रयत्न केला. त्याबद्दल ते प्रसिद्ध आहेत

## हरिलाल हर्षदराय ध्रुव [ १८५६–१८९६ ]

गुजराती काव्यात प्रथमतःच प्राचीन संस्कृत काव्य आणि पाश्चात्त्य आधुनिक शिक्षण ह्यांचा समन्वय साधण्याचा प्रयत्न कवी हरिलाल हर्षदराय ह्यांनी केला. कवी सुंदरम् म्हणतात, " इतर कोणत्याही गुजराती कवीपेक्षा अधिक प्रमाणात हरिलाल हर्षदरायनीच आधुनिक विचारधारा गुजराती काव्यात आणली." प्रकृतिवर्णन आणि देशभक्ती यांविषयीच्या कवितांमुळे हरिलाल विशेष ख्याती पावले. इतिहास-संशोधनासाठीही त्यांची प्रसिद्धी आहे.

## डाह्याभाई पीतांबरदास देरासरी [ १८५७–१९३७ ]

'बुलबुल' (१८९०) दुसरी आवृत्ती. ह्या आपल्या प्रेमकाव्याबद्दल ते प्रख्यात आहेत. ही कविता त्यातील आनंदोल्हास व घडण ह्यांबद्दल प्रसिद्ध आहे. ते ' साठीना साहित्यनुं दिग्दर्शन' (गुजराती साहित्याची साठ वर्षे) ह्या ग्रंथाबद्दलही प्रसिद्ध आहेत. ह्या ग्रंथात १८४८ ते १९०८ पर्यंतच्या गुजराती साहित्याच्या विकासाची रूपरेखा दिली आहे. १८४८ सालीच 'गुजरात व्हरनॅक्युलर सोसायटी'ची

स्थापना झाली. ह्या सोसायटीची स्थापना हे गुजरातमधील पुनरुत्थानाचे प्रतीकच होते.

पद्मनाभाच्या 'कान्हडदे प्रबंधा'चे संपादनही त्यांनी केले आहे.

## त्रिभुवन प्रेमशंकर [ १८६५–१९२३ ]

हे 'मस्तकवी' म्हणून प्रसिद्ध आहेत. ह्या शिवाय 'विभावरी स्वप्न' (१८९४) ही चिंतनात्मक प्रेमकविता व 'कलापीनो विरह' ही कलापींच्या मृत्युसंबंधीची विलापिका ह्या त्यांच्या दोन कवितांबद्दलही ते प्रसिद्ध आहेत.

## मूळशंकर हरिनंद मुलाणी [ १८६८–१९५७ ]

हे नाटककार होते. ह्यांनी पहिल्यानेच गुजरातमध्ये खरीखुरी गुजराती भाषा, अस्सल गुजराती रीतिरिवाज, चालीरीती व जीवनपद्धती ह्यांचे आपल्या 'राजबीज' ह्या नाटकात दर्शन घडविले. (अदमासे १८८८) मुलाणींच्या पूर्वी रंगमंचावरील स्त्रीपात्रे[५७] महाराष्ट्रीय पद्धतीचा वेश करीत असत. गद्य-संवाद गुजराती भाषेत बोलत असत व गाणी हिंदी भाषेत गात असत.

मुलाणींनी जवळजवळ ३० नाटके लिहिली व ती सर्व यशस्वी रीतीने रंगभूमीवर आणली. 'सौभाग्यसुंदरी' हे त्यांचे सर्वोत्तम व अपूर्व असे यशस्वी नाटक आहे. ह्या नाटकाने गुजराती रंगभूमीला एक महान नट मिळवून दिला. ह्या नट म्हणजे जयशंकर. तो स्त्रीपात्र बनून नायिकेचे काम करीत असे. त्यामुळे आपल्या संबंध जीवनभर तो 'सुंदरी' ह्या नावानेच ओळखला जात होता.

मुलाणींच्या सर्व नाटकांपैकी फक्त 'देवकन्या' हे एकच नाटक १९०९ मध्ये प्रकाशित झाले.

## छोटालाल जीवनराम मास्टर [ १८६२–१९१२ ]

हे 'विश्ववंद्य' ह्या नावाने प्रसिद्ध होते व 'मास्तरसाहेब' म्हणून सर्वांना परिचित होते. 'श्रेय साधक अधिकारी वर्ग' ह्या संस्थेचे संस्थापक श्री. नृसिंहाचार्यजी ह्यांचे ते एक अग्रणी शिष्य होते. भारतीय तत्त्वज्ञानाचे सर्वश्रेष्ठत्व पटवून देणे आणि योगशास्त्रातील रहस्ये बुद्धिवादाने समजाविणे हे ह्या संस्थेचे ध्येय होते. 'विश्ववंद्य' ह्यांनी 'योगिनीकुमारी' ही कादंबरी लिहिली व वरील संस्थेचे मुखपत्र 'महाकाल' ह्या मासिकात अनेक लेख लिहिले. हे लेख 'विश्ववंद्य किरणावली'च्या दोन भागात व 'विचार रत्नराशी' ह्यांत संग्रहित केलेले आहेत. ह्या लेखात मनुष्याने संसारातील आपली दैनंदिन कार्ये पार पाडत असतानाच

उच्च कोटीचे आध्यात्मिक जीवन कसे जगावे, ह्याचे विवेचन केले आहे. गोवर्धनराम व आनंदशंकर ध्रुव ह्यांच्या प्रमाणेच 'विश्ववंद्य' ह्यांनी आध्यात्मिक जीवन आणि तत्त्वज्ञानाची परिभाषा ह्याचे प्रत्यक्ष व्यावहारिक जीवनातील अर्थ स्पष्ट केले आहेत. त्यांची गद्यशैली साधी, निर्दोष व गौरवशाली आहे.

## मगनलाल नरोत्तमदास पटेल

पटेल हे आपल्या 'महाजन मंडळ' (१८९६) ह्या पुस्तकाबद्दल प्रसिद्ध आहेत. ह्यात १४२० पाने आहेत. ह्यात पटेल ह्यांनी थोर भारतीय स्त्री-पुरुषांची चरित्रे (who's who) दिली आहेत. तसेच प्राचीन व अर्वाचीन राजे, मुत्सद्दी, संत, धर्मोपदेशक, तत्त्वज्ञानी, विद्वान, कवी, देशभक्त, संगीततज्ज्ञ, वैद्य व डॉक्टर ह्यांची आणि अत्यंत सद्‌गुणी, पराक्रमी व विदुषी स्त्रियांची चरित्रे दिली आहेत.

## रायचंदभाई रावजीभाई मेहता [ १८६८–१९०१ ]

रायचंदभाई हे 'श्रीमद् राजचंद्र' ह्या नावाने अधिक ओळखले जातात. ते सिद्ध पुरुष आणि संत होते. गांधीजी म्हणतात, "मी राजचंद्रांच्या जीवनापासून जितके मिळविले आहे तितके दुसऱ्या कोणाकडूनही मिळविलेले नाही." राजचंद्रांचा मुख्य उपदेश आध्यात्मिक सिद्धी प्राप्त करणे हाच होता आणि साहित्य हे आत्मसिद्धीचे साधन म्हणूनच ते मानत होते. तरीही त्यांचे गद्य व पद्य लेखन ह्या दोन्हीत त्यांची अतिशय उच्च साहित्यिक गुणवत्ता दिसून येते. त्यांच्या एका कवितेच्या सुरुवातीची पंक्ती, "अरे! असा अपूर्व दिवस केव्हा बरे उजाडेल ? आपले बाह्य व आतील बंध केव्हा बरे गळून पडतील[५८]?" ही ह्या प्रकारची एक उत्तम कविता आहे. राजचंद्रांचे गद्य हे स्वतःच स्वतःशी प्रत्यक्ष केलेले स्वगत चिंतनच आहे. त्यांची गद्यशैली साधी, स्पष्ट, रोजच्या व्यवहारातील व विषयाला अनुरूप अशी आहे.

## कृष्णलाल मोहनलाल झवेरी [ १८६८–१९५७ ]

झवेरी ह्यांची दोन पुस्तके 'माइलस्टोन्स इन गुजराती लिटरेचर' (१९१४) व 'फर्दर माइलस्टोन्स इन गुजराती लिटरेचर' (१९२४) ही आहेत. गुजराती साहित्याचा इतिहास इंग्रजीत लिहिणारा हा पहिलाच लेखक आहे.

## नरभेशंकर प्राणजीवन दवे [ १८७१–१९५२ ]

दवे 'काठियावाडी' ह्या उपनावाने लेखन करीत असत. त्यांनी शेक्सपिअरच्या 'ज्यूलियस सीझर', 'ऑथेल्लो', 'मेझर फोर मेझर', 'दि मर्चंण्ट ऑफ

व्हेनिस,' 'ऑल्स वेल दॅट एण्ड्स वेल' व 'हॅमलेट' ह्या नाटकांच्या केलेल्या गुजराती अनुवादाबद्दल ते प्रसिद्ध आहेत.

## नर्मदाशंकर देवशंकर मेहता [ १८७१–१९३९ ]

हे धर्म व तत्त्वज्ञान ह्या विषयांचे गाढे अभ्यासू होते. त्यांच्या लेखनात सर्वग्राही व सखोल अभ्यास, विचारांची स्पष्टता, पूर्ण वैज्ञानिक व वस्तुनिष्ठ दृष्टिकोण आणि सरळ शैली दिसून येते. त्यांचा *Histary Indian Philosophy* (हिंद तत्त्वज्ञाननो इतिहास ) हा एक प्रचंड ग्रंथ आहे. ह्या विषयातील काही अधिकारी व्यक्तीच्या दृष्टीने ह्यात लेखकाने भारतीय 'दर्शनाचा ऐतिहासिक क्रम' विद्वद्वर्य दासगुप्ता आणि डॉ. राधाकृष्णन् यांच्यापेक्षा देखील अधिक अचूकपणे सांभाळला आहे. काही विद्वानांनी ज्याची दखल घेतलेली नाही अशा कित्येक ऐतिहासिक सत्य गोष्टी त्यांनी उजेडात आणल्या आहेत. नर्मदाशंकर ह्यांनी केलेला शाक्तपंथाचा अभ्यासही अजूनपर्यंत केवळ अजोडच राहिलेला आहे.

## भोगींद्रराव रतनलाल दिवेटिया [ १८७५–१९१७ ]

ह्यांनी लिहिलेल्या सामाजिक कादंबऱ्यांबद्दल ते प्रसिद्ध आहेत. त्या अशा 'उषाकांत', 'आसिस्टंट कलेक्टर', 'सॉलिसिटर' वगैरे. त्यांच्या बऱ्याचशा कादंबऱ्या रूपान्तरित आहेत व त्यात त्या काळच्या सामाजिक व राष्ट्रिय समस्यांची चर्चा केलेली आहे. गोवर्धनरामच्या नंतरच्या आणि कनैयालाल मुनशी व रमणलाल देसाई ह्यांच्या पूर्वीच्या कालखंडातील गुजराती वाचकात भोगींद्रराव हे फार लोकप्रिय होते. टॉलस्टॉयच्या काही कथांचे गुजरातीत भाषान्तर करून त्यांनीच बहुधा पहिल्यानेच गुजराती वाचकांना टॉलस्टॉयचे दर्शन घडविले. त्यांच्या अवसानामुळे त्यांची अपूर्ण राहिलेली 'अजामिळ' ही कादंबरी ताराचंद्र पोपटलाल अडालजा ह्या दुसऱ्या एका कादंबरीकाराने पूर्ण केली.

इतर अनेक लेखकांप्रमाणे प्रल्हाद पारेख ह्या गांधी-युगातील भावकवीवरही ह्या कादंबरीचा फार मोठा प्रभाव पडला होता.

## हिम्मतलाल गणेशजी अंजारिया [ १८७७–१९७२ ]

१९०३ साली 'काव्यमाधुर्य' ह्या कवितासंग्रहात पंडित युगातील कवितांचा संग्रह प्रसिद्ध करून आपले कविताविषयक प्रेम त्यांनी सिद्ध केले. अशा प्रकारचे काम करणारा हा पहिलाच लेखक होता. ह्या संग्रहाद्वारे त्यांनी कवितेच्या चाहत्यांच्या एका सबंध पिढीला कवितांचे सौंदर्य व मधुरता ह्यांचे रसग्रहण करविले. अंजारिया ह्यांनी गुजराती साहित्याचे प्रायमर (साहित्य-प्रवेशिका)

लिहिले व नंतर काही वर्षांनी 'काव्यसौरभ' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यात गांधी-युगाचे प्रतिनिधी ज्यांना म्हणता येईल, अशा कवींच्या कवितांचा संग्रह केलेला आहे.

## वाडीलाल मोतीलाल शाह [ १८७८-१९३१ ]

वाडीलाल हे स्वतंत्र वृत्तीचे विचारवंत होते. ते स्वतः जैन असून त्यांनी सडेतोडपणे व निर्भयतेने जैनांना प्रिय असणाऱ्या सिद्धान्तावर टीका केली. ते जैन व वेदान्त या मतांचे गाढे अभ्यासू होते. नीत्शे व शॉपेन हॉवर ह्यांच्या मतांचा त्यांच्यावर फार मोठा प्रभाव होता. खोटेपणा, अंधश्रद्धा व विचार केल्याशिवाय स्वीकारलेली मते ह्यांच्या जाळ्यात सापडलेल्या जगाला त्यांनी अंतर्मुख होण्याचा व चंचल मनावर ताबा ठेवून इच्छाशक्ती वाढविण्याचा नवा मार्ग दाखवून दिला. हे सर्व त्यांनी खूप छोटया छोटया गोष्टी, उदाहरणे, वाक्प्रचार व म्हणी वापरून समजावून दिले आहे. त्यांची भाषा कित्येक वेळा कटू, कटाक्षपूर्ण व वक्रोक्ती यांनी भरलेली असते; पण अतिशय प्रामाणिकपणा व निखालसता ह्या गुणांमुळे प्रख्यात गुजराती गद्यलेखकांत त्यांना फार मानाचे स्थान आहे. त्यांची पुस्तके पुढीलप्रमाणे आहेत. 'सुदर्शन' (कादंबरी), 'मस्त विलास', 'नग्न सत्य', 'प्रगतिनां पदचिन्हो', 'मृत्युना मोहमां' वगैरे.

## रणजितराम बावाभाई मेहता [ १८८२-१९१७ ]

रणजितराम हे एक निबंधकार व गुजरातचा इतिहास आणि गुजरातचे लोक-साहित्य ह्यांचे अभ्यासक होते. गुजरातची संस्कृती व गुजरातचे साहित्य ह्यांना भारताच्या राष्ट्रिय जीवनात पुन्हा मानाचे स्थान मिळवून देण्याचा त्यांना अमर्याद उत्साह होता. ते 'गुजरात साहित्य सभा'—अहमदाबाद व 'गुजराती साहित्य परिषद' (१९०५) ह्यांचे संस्थापक होते. कन्हैयालाल मुनशीसारखे लेखक आपल्या कारकीर्दीच्या सुरुवातीच्या काळात मार्गदर्शन व अभिप्रायासाठी त्यांच्या-कडे जात असत.

## तळटीपा [ भाग २ ]

१. बुद्धिधननो कारभार.
२. गुणसुंदरीनुं कुटुंबजाल.
३. रत्ननगरीनुं राज्यतंत्र.

४. सरस्वतीनुं मनोराज्य.

५. सरस्वतीचंद्र व कुमुद हे–बहुतेक कुमुद स्वत: विधवा असल्यामुळे–प्रथम लग्न न करण्याचे ठरवितात. खरे पाहिले असता लेखकाने जो काही प्रेमाचा आदर्श व तत्त्वज्ञान आपल्यापुढे मांडले आहे त्या दृष्टीने व देशाच्या कायद्याप्रमाणे त्या दोघांना लग्न करता आले असते; पण कुमुदने फारच आग्रह केल्यामुळे आणि त्यांच्यावर फारच दडपण आल्यामुळे सरस्वतीचंद्र व कुसुम हे विवाहबद्ध होतात.

६. 'सती' – या प्रथेमुळे पतीच्या मृत्यूनंतर हिंदू स्त्री स्वेच्छेने पतीच्या चितेवर बसून आपल्याला जाळून घेत असे अथवा तिला जाळले जात असे. ह्यामुळे तिची पतिभक्ती सिद्ध होते, असे मानले जाई.

७. वळी पणेशी सुंदर जाळी श्वेतमेघनी पडी रही छे । वळी अगाडी धीर समीरे सरवर उपर रम्य रचेली नाजुक लहरी वांकीचूंकी–एकबीजानी आगळपाछळ कंई संधाती, कंई त्रूटती धीमे धीमे प्रसरे तेवी ज पाडी मेघमां भात, शी दीसे ल्हेरियांनि आ । स्तम्भ समांतर म्होट म्होट बनी–व्योम–घुमटने धरी राखवापणे रह्या छे, पण ए पाछा गतिमान आ थया ज दीसता रवि–रजनी पासे आवे गजगतिथी गजचरण समान शुं ।

८. वस्ल, सनम, माशूक, कलाम, कतल वगैरे परिभाषा.

९. दगाबाजी करी कहिं तुं मने लइ जाय छे किस्मत ?

१०. कहिं लाखो निराशामां अमर आशा छुपाई छे.

११. शृंगार, वीर, करुण आणि बीभत्स.

१२. Further Milestones in Gujarati Literature.
दुसरी सुधारलेली आवृत्ती, पृष्ठ २०८–२०९.

१३. 'अर्वाचीन गुजराती साहित्यनी विकासरेखा' पृष्ठ ८४.

१४. वाह्याचार.

१५. 'अर्वाचीन कविता'–१९४६, पृष्ठे १६७–१६८.

१६. गुजारे जे शिरे तारे जगतनो नाथ ते सहेजे.

१७. जिगरनो यार जुदो तो बधो संसार जुदो छे.

१८. दिलदारना दर्शन विना बीजु मले गमतुं नथी.

१९. ३ डिसेंबर १९१५ पासून ११ फेब्रुवारी १९१६ पर्यंत.

२०. १९३० च्या सुरुवातीला.

२१. 'कल्पतरु'– इच्छित वस्तू देणारा स्वर्गातील वृक्ष.

२२. मंद मृदु हिमाळाना वाय उत्तरना वाया जशे रे,
शांति थशे रे,

रशे अमी झरता वरसाद भूमि भींजावशे रे,
क्यारडे कल्पतरुनो पाक कणना कळशी थशे रे.
माजी एवा मो माग्या वरसाद कुंदनना वरसशे रे,
आवती सागरियानी छोळ रतनचोक रेली जशे रे.

२३. 'अर्वाचीन कविता' पहिली आवृत्ती १९४५, पृष्ठे ४५२.

२४. पण ह्या कवितेच्या सुरुवातीच्या श्लोकावरून अशी कल्पना होते की, पंडू व माद्री एकाच कुटीत झोपत होते. एवढेच नाही, तर ते दोघे एकाच शय्येवर झोपत होते.

२५. हिंदू गूढवादी लोक व भक्त 'चक्रवाक' व 'चक्रवाकी' यांना 'जीवात्मा' व 'परमात्मा' ह्यांचे प्रतीक मानतात.

२६. कवीने पुढील ओळी लिहून ही कविता पूर्ण केली आहे.
" त्या विशाल पोकळीत
कोठेही एखादी जिवंत वस्तूही दिसत नाही."
(अमित ए अवकाश तणी महीं
क्यांहि य चेतन एक दीसे नहीं)
ह्याचा अर्थ असा की, ह्या अवकाशाच्या विशाल पोकळीत हे दोन पक्षीच फक्त जिवंत प्राणी होते आणि त्यांच्या मृत्यूनंतर कोणी जिवंत राहिले नाही. पुढे कवीने ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यानंतर कवीने शेवटच्या दोन ओळीत बदल केला व म्हटले आहे, "ह्या अवकाशाच्या विशाल पोकळीत कोठेही एकही निर्जीव प्राणी दिसत नाही."
(अमित ए अवकाशतणी मही
क्यांहि अचेतन एक दिसे नहीं)
ह्याचा अर्थ असा की, ते दोन पक्षी भौतिक बंधनातून मुक्त होऊन अमर झाल्याबरोबर समग्र अवकाशाची पोकळी सजीव झाली. पूर्वी होऊन गेलेल्या घटना त्याच आहेत व प्रत्येक प्रसंग, प्रत्येक संदर्भ, प्रत्येक शब्द हे सगळे वाचकाला निराशेच्या वातावरणात घेऊन जात आहेत आणि तशीच त्यांची योजना केलेली आहे; पण शेवटच्या पंक्तीतील एक अक्षर बदलून कवीने उभे केलेले दृश्य आधीच्या सर्व वर्णनाशी विसंगत व एकदम बदललेले वाटते.

२७. 'पताकास्थान' म्हणजे नाटकाच्या कथानकातील अशा एका प्रसंगाची सूचना केली जाते की, ज्या वेळी निर्धारित स्थितीत अपेक्षित पात्राचा प्रवेश न होता अचानकपणे वेगळ्या परिस्थितीत अनपेक्षित पात्राचा प्रवेश होतो; पण सूचना मात्र दोन्ही स्थितींशी सुसंबद्ध वाटते.

२८. " सांइआसे सब कुछ होता है, मुज बंदे से कुछ नाही,
राईकुं परबत करें'......

२९. फक्त स्व. प्रा. रामनारायण पाठक ह्यांनी एकट्यानी संपादित केलेले.

३०. त्यांच्या १९०६ मध्ये प्रकाशित झालेल्या शाकुंतलच्या भाषान्तराव्यतिरिक्त.

३१. विशिष्ट छंदांची नावे

३२. ह्याची नोंद घेतली पाहिजे की १९०९ सालात इन्दुकुमार भाग एकमध्ये कवी नानालालनी आपल्या छंद व कविता ह्या विषयावरच्या आपल्या टीपेत असे म्हटले आहे की–

(ए) गेयता अथवा गाणे हे काही कवितेचे अभेद्य अंग नव्हे.

(बी) कवितेतील अर्थसौंदर्य हे कवितेतील शब्दसौंदर्यापेक्षा अधिक महत्त्वाचे आहे. आणि

(सी) कवितेचा ताल हा कवितेतील विचारांच्या तालाला अनुरूप असा असला पाहिजे.

पण काही कारणांनी का असेना नानालालच्या या मताकडे गुजराती टीकाकारांनी दुर्लक्षच केले आहे. खरे पाहता काही वर्षांनंतर ठाकोरांनी ह्या विषयावरील प्रकट केलेल्या मतात नानालालच्या मताचेच सार साठविलेले आहे.

३३. गुजराती साहित्यमां संगीतकाव्य; कौमुदी.

३४. 'आपणी कविता समृद्धी' हा माझा एका प्रख्यात पुस्तकांच्या परीक्षणांना व समीक्षेलाच वाहिलेला ग्रंथ. ह्या गुजराती मासिकाच्या 'ठाकोर जन्मशताब्दि' ह्या अंकात आलेला लेख बळवंतराय ठाकोरावरच्या माझ्या लेखाच्या संग्रहात समाविष्ट झालेला आहे.

३५. गुजरातीत ह्याला 'विचार' असे म्हणावयाचे. ह्याला बऱ्याच वर्षांनी त्यांनी Dhyantha असे नाव दिले; कारण त्यात त्यांना 'कल्पना' (Idea) असा अर्थ अभिप्रेत होता.

३६. उच्च कोटीच्या व उत्तम प्रतीच्या कवितेचे पुढीलप्रमाणे श्रेष्ठ गुण वर्णिले आहेत. सुबोधता, सुस्पष्टता, संवेदनशीलता, कल्पकता, मूर्तता, चित्रात्मकता' प्रत्यक्षपणा, लयतालबद्धता, सुसंवादिता, सुबद्धता, तेजस्विता, भावात्मकता आणि गंभीरता.

३७. कोणी असे म्हटले आहे की, ही कविता मूळ स्वीडेनबर्गला उद्देशून लिहिली होती. १९५१ च्या फेब्रुवारीच्या 'बुद्धिप्रकाश'मध्ये रामनारायण वि. पाठक ह्यांनी असे लिहिले की, कवी नानालालनी आपल्याला असे सांगितलेले आठवते की, 'कलापीने संबोधन' ह्या नावाने प्रकाशित झालेली 'कांत'ची

कविता आपल्या स्वत:ला ( नानालालना ) उद्देशून लिहिली होती रामनारायण पाठक हे ह्या विधानाशी सहमत होते आणि ही कविता व विशेषकरून त्यातील गायत्री मंत्राबद्दलचे श्लोक नानालालना कसे लागू पडतात हे सिद्ध करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. रामनारायण पाठक ह्यांनी पुढे असेही सूचित करण्याचा प्रयत्न केला की, गायत्री मंत्राचा विशिष्ट श्लोक कलापीपेक्षा नानालालनाच अधिक लागू पडणारा आहे.

ही कविता मूळ नानालालना उद्देशूनच लिहिली आहे, असे मान्य केले तरी नानालाल ह्यात असताना ही कविता 'कान्त'नी स्वत: कलापीला उद्देशूनच लिहून प्रकाशित केली ही गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे. ह्याचा अर्थ असा की 'कांत'नी त्यात योग्य ते फेरफार करून ती कविता नि:संदिग्धपणे कलापीला संबोधूनच लिहिली गेली आहे. अशा रीतीने योग्य काळजी घेऊन लिहिली आहे.

मी ह्या कारणास्तव 'बुद्धिप्रकाश'च्या मार्च १९५१ च्या अंकात, लेख लिहून असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला, गायत्री मंत्राबद्दलच्या श्लोकासह ही संबंध कविता कलापीनाच उद्देशून लिहिलेली आहे.

अशा परिस्थितीत पुढे मागे काही कागदपत्रांतील पुरावा किंवा दुसरा एखादा महत्त्वाचा पुरावा पुढे आला व असे सिद्ध झाले की, ही कविता नानालाल किंवा स्वीडनबर्ग अथवा दुसऱ्या एखाद्या कवीला उद्देशून मुळात लिहिलेली होती तरी त्यामुळे आपल्याला असा आणखी एक पुरावा मिळेल की काही कवी आपल्या एखाद्या जुन्या कवितेत फेरफार करून ती नवीन विषयाला योग्य होईल अशी बनवीत असत. हे मात्र निश्चित आहे की ज्या स्वरूपात ही कविता सध्या उपलब्ध आहे ती नि:संदेहपणे कवीने कलापीला उद्देशूनच लिहिलेली आहे.

३८. हवे ते स्वर्ग छोडचुं । हवे ते सुख खोयुं । हवे ते आनंद गयो । ते खुबी स्वप्नमांज जोवानी । ते पक्षीओनां मधुर गीत तो हवे निद्रामांज काने पडशे । झेलम नदीनी ते गर्जना हवे स्वप्नामांज संभळाशे । स्वप्नमांज हवे ते दाल-लेक, ते तख्ते सुलेमान, ते वुलर लेक, ते नदीनाळां, ते फळफूल अने ते वनस्पती दर्शन देशे । रोउं तो पण शुं ?

३९. ऊग्यो प्रफुल्ल अमीवर्षण चंद्रराज.

४०. ब्रह्मांड ब्रह्मे पार्थयुं सुखकुंजसम उंडुं, त्यां एकलो उन्हुं. जन जगत सूर्य सुहागी ज्योत्स्ना, विश्व बहु रडुं, पण एकलो रडुं.
बीडचां प्रगटतां पिच्छ में, पडघो पडघो अहालेक,
सुण्युं साधुओअे भेख.

हिममाळकेरा शिखरशिखरे शब्द हुं ढूंढुं,
ने एकलो उडुं.

४१. नीलो कमलरंग वींझणो, हो नंदलाल ।
रढियाळो रतनजडाव, मोरा नंदलाल ।
ब्रह्मा वींझे ब्रह्मवींझणो हो नंदलाल ।
सोनानो सूरज शोभतो हो नंदलाल ।
रूपेरी चंदनी बिछाव, मोरा नंदलाल ।
ब्रह्मा वींझे ब्रह्म वींझणो हो नंदलाल ।

४२. 'त्रिभुवन'–स्वर्गलोक, मृत्युलोक आणि पाताळ.

४३. पुण्य

४४. पाप

४५. विराटनो हिंडोळो झाकमझोळ
के आभने मोभे बांध्या एना दोर, विराटनो.
पुण्य पाप दोर ने त्रिलोकनो हिंडोळो,
फरती फुर्मतडांनी फोर.

४६. ओ स्नहेनां हृदयउज्ज्वल पुत्रपुत्रि ।
मा भूलशो कदि तमे तम कुलधर्म,
संच्युं तमारुं सहु भद्र ज स्नेह लग्ने
ने लग्नस्नेहमहीं दिव्य विलासशोभा.

४७. मारां नयणांनी आळस रे न, नीरख्या
हरिने जरी.
एक मटकुं न मार्युं, न ठरियां
झांखी करी.

४८. आ वसंत खीली शतपांखडी, हरि आवो ने
आ धरतीए धर्या सोहाग, हवे तो हरि आवो ने.

४९. धन्य हो धन्य ज पुण्य प्रदेश,
आमारो गुणयल गुर्जर देश.

५०. प्रेमलग्ननी विधवाने
पुनर्लग्न समुं पाप नथी.
देहलग्ननी विधवाने
प्रेमलग्न समी मुक्ति नथी.

५१. 'मोटा' ह्याचा अर्थ 'मोठा' व 'नाना' ह्याचा अर्थ 'लहान'.

५२. ज्यां ज्यां वसे एक गुजराती त्यां त्यां सदाकाळ गुजरात.

५३. स्वदेशी उद्योगनो संदेश.

५४. "वाचकाना माझी पुढील विधाने वाचून आश्चर्य वाटेल की सरकारचे धोरण व तत्त्वे ह्यांना मलबारींचा पाठिंबा असतानासुद्धा त्यांच्या राजभक्तीबद्दल शंका घेण्यात आली. १८९८ मध्ये त्यांनी 'सांसारिक' ह्या नावाने गुजराती कवितांची एक माला प्रकाशित केली. डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन ह्यांनी हे पुस्तक राजद्रोहाने भरलेले आहे असे ठरविले आणि त्यांच्या पुस्तक-छपाईच्या ऑफिसची पोलिसांनी भेट घेऊन तपासणी केली. कित्येक महिनेपर्यंत ह्या विषयावर जोराची खडाजंगी चालू होती व शेवटी मंबई सरकारने सरकारबद्दल मलबारींच्या मनात कोणत्याही प्रकारची द्वेषबुद्धी नाही असा निर्णय करून त्यांना दोषमुक्त ठरविले. लॉर्ड नॉर्थब्रुक, लॉर्ड रिपन व लॉर्ड रे ह्यांनी हाऊस ऑफ लॉर्डस्‌मध्ये मलबारींच्या दृढ स्वामिभक्तीबद्दल निर्वाळा दिला. ह्या अप्रिय प्रसंगाबद्दल मलबारींनी स्वत: अधिक वाच्यता केली नाही. सरतेशेवटी ह्या घटनेवर पडदा पाडण्यात आला. 'सांसारिक' मध्ये मलबारींनी फक्त सामाजिक सुधारणेच्या तत्त्वाचा पुरस्कार केलेला होता. त्यांनी लोकांना फक्त जागृत होऊन कार्यशील होण्याचा उपदेश केला होता; पण त्यांच्या शब्दांचा विपर्यास करण्यात आला व जी गोष्ट त्यांच्या मनातही नव्हती ती त्यांच्यावर लादली गेली."

'बी. एम्. मलबारी', सरदार जोगेंद्रसिंग यांच्या त्या पुस्तकामध्ये (पृ. ६०-६१) स्व. कृ. मो. झवेरी ह्यांच्या 'फर्दर माइलस्टोन्स इन गुजराती लिटरेचर' (२ री आवृत्ती १९५६ पृ. १३८ एफ.) ह्यात उद्धृत केलेला उतारा.

५५. भारताचा सम्राट.

५६. चक्रवर्ती महाराज चालिया काळचक्रनी फेरीए,
सगां दीठां में शाह आलमनां भीख मांगता शेरीए.

५७. त्या वेळी स्त्रियांच्या भूमिका तरुण मुलगे करीत असत.

५८. अपूर्व अवसर एवो क्यारे आवशे ?
क्यारे थइशुं बाह्यांतर निर्ग्रंथ जो ।

५९. भारतीय तत्त्वज्ञाननो इतिहास

६०. साहित्य प्रवेशिका

प्रकरण दहावे

# विसावे शतक

## [ १ ]

### गांधी-युग [ १९१५–१९४५ ]

गोवर्धनराम ह्यांचे युग अथवा पंडित-युग १९१४ मध्ये संपले. त्या वेळी पहिले जागतिक युद्ध सुरू झाले होते. (१९१४–१९१८). ह्या लढाईचा परिणाम असा झाला की, त्यामुळे जगाचा नकाशाच पार बदलून त्याला नवा आकार आला. भारताचे भवितव्य इंग्लंडशी पूर्णपणे निगडित झालेले होते. त्या वेळी इंग्लंडमध्ये व्हिटोरिया राणीचा अंमल संपला होता व रशियामध्ये झालेल्या क्रांतीमुळे सबंध मानवजातीच्या मनात शोषण व असमानता ह्यांपासून मुक्त झालेल्या जगाची कल्पना आकार घेऊ लागली होती. मनुष्याच्या स्त्री, समाज, राज्यव्यवस्था व धर्म ह्यांच्याबद्दलच्या कल्पना पार बदलून गेल्या होत्या आणि जुन्या मतांचे उच्चाटन झाले होते. तसेच १९१४ हे वर्ष गुजराती साहित्याच्या दृष्टीनेही फार महत्त्वाचे ठरले. अस्त पावलेल्या युगातील शेवटच्या तीन महत्त्वाच्या रचना ' राईनो पर्वत ', ' जया-जयन्त ' आणि ' स्मरणसंहिता ' ह्याच वर्षी प्रकाशित झाल्या आणि त्याचवेळी आफ्रिका कायमची सोडून व आफ्रिकेत अजमावलेले आणि यशस्वी झालेले आपले सत्याग्रहाचे शस्त्र बरोबर घेऊन महात्मा गांधी भारतात येऊन राहिले. १९१५ च्या जानेवारीच्या सुरुवातीस ते भारतात आले. आपल्या तीक्ष्ण दूरदृष्टीने त्यांनी भारताच्या तत्कालीन सामाजिक, आर्थिक व राजकीय वर्तमान परिस्थितीचे आकलन करून घेतले आणि भारतीय जीवनाच्या प्रत्येक समस्येचा पूर्ण विचार केला. त्यांचे हृदय हे खऱ्या निःस्वार्थ समाजसेवकाचे हृदय होते. रस्किनच्या *Unto This Last* ह्या पुस्तकाने प्रभावित होऊन त्यांना ' सर्वोदया 'ची कल्पना स्फुरली आणि त्यांनी परदेशीयांच्या राजकीय, बौद्धिक, आर्थिक व सांस्कृतिक गुलामगिरीतून भारताला मुक्त करण्यासाठी आपले जीवन समर्पित करण्याचे ठरविले.

१९१९ मध्ये पंजाबमधल्या जालीयनवाला बागेत झालेल्या हत्याकांडाने अहिंसात्मक प्रतिकाराची म्हणजेच असहकाराची चळवळ एकदम सुरू झाली. गांधीजींनी जो कार्यक्रम जनतेपुढे ठेवला होता त्यात नवीन किंवा विशेष असे काहीच नव्हते. खरे पाहिले असता गांधीजींनी जनतेपुढे ठेवलेला प्रत्येक कार्यक्रम आपल्या देशात राजकीय जागृती, सामाजिक जबाबदारीची जाणीव व सांस्कृतिक नवजागृतीची सुरुवात झाली तेव्हापासून म्हणजे राजाराममोहन रॉय ह्यांच्या काळापासून (१७७२–१८३३) कोणीना कोणी, केव्हाना केव्हा, कोठेना कोठे लोकांच्यापुढे ठेवलेलाच होता; पण इतर कोणत्याही नेत्याला जी जाणीव झाली नव्हती ती प्रथम गांधीजींना झाली. ती जाणीव अशी "भारत म्हणजे मुंबई, कलकत्ता, मद्रास किंवा दिल्ली ह्यांसारखी काही मोठी शहरे नसून आपल्या देशातील ७ लक्ष खेडी हाच खरा भारत होय व जेव्हा ही ७ लाख खेडी आपल्या मूर्च्छेतून सावध होऊन वर उठतील तेव्हाच खरा भारत जागृत होऊन प्रगती करील." ही कल्पना लोकांपुढे मांडणारे गांधीजी हे पहिले नेते होते. गांधीजींकडे ओढले गेलेले शेकडो आदर्शवादी युवक गांधीजींच्या आदेशाप्रमाणे खेडेगावाकडे वळले. त्या वेळी आपला देश किती विशाल आहे ह्याची जाणीव पहिल्यानेच आपणाला झाली व आपले जीवनातील खरे कार्य काय आहे ह्याचे ज्ञान आपल्याला गांधीजीं-मुळेच झाले. आपले लेखकही खडबडून जागे झाले व आपल्या हस्तीदंती मनोऱ्यातून बाहेर पडून दीनदुबळ्या व अनाथ लोकांकडे त्यांनी आपले लक्ष वळविले.

गांधीजी भारताच्या राजकीय क्षेत्रात अवतरल्यानंतर ज्या गुजरातला त्यांनी आपल्या सामाजिक-राजकीय आंदोलनाचे क्षेत्र बनवले होते त्या गुजरातेतील साहित्यिक वातावरणात फार मोठा बदल द्रुतगतीने झाला. एका बाजूला गांधीजींनी आपले 'नवजीवन' हे साप्ताहिक सुरू करून चहूकडे आपल्या विचारांचा व नैतिक मूल्यांचा प्रसार केला. दुसऱ्या बाजूला श्री. अमृतलाल शेठ ह्यांनी झवेरचंद मेघाणी व दुसऱ्या अनेक स्वार्थत्यागी युवकांच्या मदतीने 'सौराष्ट्र' नावाचे एक अतिशय जबरदस्त नियतकालिक सुरू केले आणि त्यातून त्यांनी देशी संस्थानांतील एकमुखी सत्ता, जुलूम व भ्रष्टाचार ह्यांवर विदारक प्रकाश टाकला व लोककथा, इतिहास, नेत्यांची चरित्रे, क्रांतिकारक विचार नि जगातील क्रांती ह्यांविषयी पुस्तकांच्या अनेक मालिका काढून लोकांना धैर्याची, शौर्याची व त्यागाची कृत्ये करण्यास प्रवृत्त केले. त्याचवेळी कन्हैयालाल मुनशी ह्यांनी आपले 'गुजरात' नावाचे मासिक सुरू केले आणि ते गुजरातची अस्मिता व श्रेष्ठ प्रतिभा जागृत करण्यास पुढे आले. ह्याचवेळी जनजागृतीसाठी महान नेते व थोर साहित्यिक ह्यांच्या जयंती व पुण्यतिथी साजऱ्या होऊ लागल्या. वसंत, हेमंत व शरद ऋतूंत सांस्कृतिक समारोह, लोकसाहित्याचा आनंद लुटण्यासाठी 'डायरे' (संमेलने),

मोठमोठी चित्रे व शिल्पकृती ह्यांची प्रदर्शने भरविण्यात येऊ लागली आणि ह्याचवेळी हौशी रंगमंचाची सुरुवात झाली.

ह्या युगातील लेखक आधीच्या युगातील लेखकांप्रमाणेच साहित्याचा जीवनाशी समन्वय साधण्याचा प्रयत्न करीत होते; पण आधीच्या बऱ्याचशा प्रसिद्ध लेखकांच्या मते साहित्याचा मुख्य हेतू मनुष्याची आत्मिक उन्नती हा होता; पण गांधीयुगातील लेखक सामान्य जनतेपर्यंत पोहोचण्याचा आटोकाट प्रयत्न करू लागले. आर्थिक विषमतेमुळे उत्पन्न झालेल्या परिस्थितीने ते अस्वस्थ झाले. गरीब, शोषित व पददलित लोकांची दशा त्यांना पाहवेना. गांधीजींनी गरिबांची सेवा करण्यासाठी, खेड्यांची स्थिती सुधारण्यासाठी व अस्पृश्यतेचा समूळ नाश करण्यासाठी अनेक प्रवृत्ती सुरू केल्या होत्या. त्या पाहून त्या वेळचे लेखक अगदी भारावून गेले होते आणि त्यामुळे खालच्या स्तरातील साधेसुधे ग्रामीण लोक हे त्यांच्या लेखनाचे विषय बनले. श्रीमंत, शिक्षित व समाजाच्या उच्च स्तरातील लोक हा आता त्यांच्या लेखनाचा विषय राहिला नाही. कधी कधी मात्र लेखक एखाद्या खऱ्याखुऱ्या खेड्याचे खरेखुरे चित्र रंगविण्याच्या ऐवजी खेड्यातील जीवन कसे असले पाहिजे ह्याबद्दलच्या त्यांच्या ज्या आदर्श कल्पना होत्या त्याप्रमाणे ते खेडेगावचे चित्रण करीत. त्यामुळे कधी कधी त्यांनी उभे केलेले खेड्याचे चित्र खऱ्या खेड्यापेक्षा जास्त सुंदर असे.

गांधीयुगातील लेखकांची जीवनाबद्दलची दृष्टी गंभीर व प्रामाणिकपणाची होती. त्यामुळे त्यांच्या लेखनातून आपल्याला जीवनाचे गंभीर व चिन्तनात्मक प्रतिबिंब पाहावयास मिळते.

कादंबऱ्या व लघुकथा ह्यांसारख्या सर्जनात्मक साहित्यात मागच्या युगातील लेखकांपेक्षा ह्या युगातील लेखक आपले लेखन अधिकांत अधिक वाचकांना वाचता येईल व त्यांना ते आवडेल नि सहज समजेल अशा रीतीने करू लागले. त्यांना आपले साहित्य फक्त काही उच्चभ्रू अथवा वरच्या थरातील व खूप शिकलेल्या लोकांपुरतेच मर्यादित ठेवावयाचे नव्हते. ते जनसामान्यांपर्यंत पोहोचले पाहिजे हे त्यांचे ध्येय होते. म्हणून ह्या युगात लिहिलेल्या कादंबऱ्या त्यांची कथानके, त्यांची उभारणी व शैली ह्या बाबतीत मागील युगातील कादंबऱ्यांपेक्षा अगदी भिन्न आहेत. लघुकथा हा एक अगदी नवाच व स्वतंत्र असा साहित्यप्रकार ह्याच युगात उदयास आला असे म्हणता येईल. तसेच ललित निबंध, एकांकिका, एकपात्री संवाद, रोजनिशी, पत्रे हे साहित्यप्रकारही ह्याचवेळी अस्तित्वात आले. खेडेगाव व त्यातील लोक ह्यांच्याकडे लेखकांचे लक्ष अधिक वेधले गेल्यामुळे लेखकांची त्यांच्याबद्दलची व त्यांच्या संस्कृतीबद्दलची उदासीनता नष्ट झाली आणि लोकसाहित्याची आवड पुन्हा पुर्नजीवित करण्याची त्यांना चालना मिळाली. ह्या

प्रकारचे लोकसाहित्य पिढ्यान्‌पिढ्या मौखिक रीतीनेच मिळाले होते. ते कोठेही लिहून ठेवलेले नव्हते. त्यामुळे त्यातील किती साहित्य नष्ट झाले ह्याचाही काही पुरावा मिळत नव्हता. झवेरचंद मेघाणींसारखे लेखक पुढे सरसावले आणि त्यांनी अशा प्रकारच्या साहित्याचे संशोधन करणे व ते प्रकाशित करणे ह्या कार्याला वाहून घेतले. तसेच ह्या युगात बालसाहित्य व विज्ञान, अर्थशास्त्र, मानसशास्त्र, मनोविश्लेषणशास्त्र, शिक्षण, शेती, इत्यादी विषयांवरील साहित्याचाही विकास झाला.

गांधीयुगाच्या आधीच्या युगातील साहित्य हे शैलीच्या दृष्टीने गुंतागुंतीचे होते व खरे पाहता ते उच्चभ्रू लोकांसाठीच होते, असे म्हणता येईल. गांधीयुगात त्या काळाच्या गरजेप्रमाणे, गद्यशैली साधी, सरळ व संक्षिप्त, काहीही पाल्हाळाशिवायची झाली. त्यातील कृत्रिमता, पाल्हाळ, अतिशयोक्ती व आलंकारिकता लोप पावली.

पद्यातसुद्धा रास, सॉनेट, खंडकाव्य, भावकाव्य, विलापिका, पद्यात्मक संवाद, पद्यनाटक, मुक्तकाव्य, विडंबनकाव्य ह्या प्रकारचे साहित्य लिहिले गेले व त्याचा विकास होऊ लागला. मध्ययुगातील आख्यानांच्या धर्तीवर उपहासात्मक कविता लिहिल्या जाऊ लागल्या, हे ह्या काळचे एक वैशिष्ट्य आहे. सत्याग्रहाच्या चळवळीच्या दिवसांत–विशेषत: १९४० ते १९५० च्या काळात दुसऱ्या विश्वयुद्धामध्ये (१९३९–४५) इंग्लंड आपले अस्तित्व टिकवून ठेवण्यासाठी पराकाष्ठेचा प्रयत्न करीत होते. भारतातील स्वातंत्र्यवादी लोकप्रिय महान नेते गजाआड गेले होते.

भारतावर वटहुकमांचे राज्य चालू होते व नंतर जेव्हा वर्तमानपत्रांची खरीखुरी मुस्कटदाबी करण्यात आली तेव्हा त्या काळच्या कवींनी कविता लिहून ब्रिटिशांचा ढोंगीपणा उघडकीस आणला आणि त्यांच्या जी-हुजऱ्याचा नीचपणा व स्वार्थीपणा ह्यांच्यावर विदारक प्रकाश टाकून त्यांचे स्वरूप लोकांच्या निदर्शनास आणून दिले.

गांधीयुगातील कवी इतर कवींप्रमाणेच प्रेम, निसर्ग व ईश्वर ह्यांवर कविता करीत असत; पण ते त्याचबरोबर सत्याला सामोरे जात. लोकांनी आपल्याकडे कोणी एखादा प्रेषित किंवा भावी युगाचा द्रष्टा या दृष्टीने न पाहता एक मनुष्य व केवळ मनुष्य म्हणूनच पहावे अशी त्यांना इच्छा असे. त्या राष्ट्रिय जागृतीच्या दिवसात आपल्या कर्तव्याच्या हाकेला ओ देण्यासाठी त्या वेळचा कवी सदैव तत्पर असे व त्यासाठी त्याला वाटेल ते कष्ट सहन करून तुरुंगात जावे लागले तरी तो मुक्त कंठाने तेथेही विश्वप्रेमाची व विश्वशांतीची गाणी गात असे. त्याच्या दृष्टीने त्याचे खरे समाधान, दुसऱ्यांना शांती व सुख व्हावे म्हणून आपल्या सर्वस्वाचा होम करावयाचा ह्यात साठवलेले होते आणि मृत्यूच्या स्वाधीन होणे म्हणजे आईच्या मांडीवर शांतपणे झोपी जाणे, ही त्याची भावना होती. त्याला अशी

जाणीव होती की ह्या जगात कुरूपता, दुःख व भय ह्या गोष्टींना आनंदाच्या व सौंदर्याच्या गोष्टीइतकेच महत्त्व आहे.

१९१४ पर्यंत अशी मान्यता होती की, जे जे सुंदर, उच्च व उदात्त आहे, उदाहरणार्थ–मेघ, चंद्र, तारे, कमळ, कोकिळा, समुद्र, पर्वत वगैरे– हेच काव्याचे विषय होऊ शकतात; पण ह्या मताची प्रतिक्रिया म्हणून म्हणा किंवा त्यांची जाणीव व सहानुभूती यांचे क्षेत्र विस्तृत झाल्यामुळे म्हणा, गांधी-युगातील कवीला एक झाडूवाली, संडासातील माशी, उकिरडा किंवा आंब्याची वाळलेली कोय हे सुद्धा काव्याला योग्य असे विषय वाटू लागले. कनिष्ठ प्रतीच्या कवींचा तर असे विषय निवडणे हा एक छंदच होऊन बसला. त्यातील काहींना तर गद्यात किंवा पद्यात कुरूपता, हिडीस किंवा बीभत्स गोष्टी ह्यांचे चित्रण करणे हेच साहित्याचे मुख्य लक्षण वाटू लागले. ह्या प्रकारच्या विकृती सोडून दिल्या तर गांधीयुगात कवितेचे क्षेत्र खूप विशाल झाले व हे सिद्ध झाले की, कवितेचा मोठेपणा काव्य-विषयाच्या मोठेपणावर किंवा भव्यतेवर अवलंबून नसून तो कवीची विषया-बद्दलची दृष्टी व वृत्ती ह्यांवर अवलंबून आहे. कवीच्या दृष्टीला प्रेम हे दैवी किंवा अद्‌भुत असे वाटेनासे झाले. प्रियकर किंवा प्रेयसी हे देवदूत किंवा अप्सरेसारखे न भासता ते एकमेकांचे मित्र आहेत ही भावना उदयास आली. स्त्रियांच्या अंगोपांगाच्या सौंदर्याची उन्मादक वर्णने व्यर्थ वाटू लागली. कवींची अभिरुची अभिजात झाली. असा एक काळ होता की ज्या वेळी मनुष्य व निसर्ग हा स्वतंत्र, सुंदर व सुखमय वाटत होता आणि त्या उलट मनुष्य हा सर्व ठिकाणी बंधनानी जखडलेला व दुःखी वाटत होता. मनुष्याच्या जीवनातील विसंगतीमुळे विश्वातील सुसंवादी संगीत नाहीसे झाल्यासारखे वाटू लागले. गांधीयुगातील कवींनी निसर्ग व मनुष्य ह्यांच्यातील विसंवादाची कल्पना झुगारून दिली व मनुष्य हा जगापेक्षा वेगळाच आहे असे न मानता तो सबंध विश्वाचा एक घटकच आहे, असे ते मानू लागले. कवी सुंदरम्‌नी आपल्या 'काव्यप्रणाश' मध्ये म्हटल्याप्रमाणे, मनुष्याच्या रूढिप्रणीत कल्पना उदा०– आनंदी वृक्षराजी, मंद वाहणारे निर्झर व मधुर गाणारे पक्षी इ. प्रत्यक्ष वस्तुस्थितीच्या निरीक्षणामुळे बदलून गेल्या आणि निसर्ग हाही रक्तपिपासू व विध्वंसक आहे ह्याची कवींना प्रचीती आली व त्यामुळे कवींची वृत्ती अगदी बदलून गेली.

गांधीयुगातील कवींची ईश्वराविषयीची कल्पना मात्र अजूनही पंडित-युगातील कवींच्या सारखीच राहिली होती. ईश्वर म्हणजे "सत्य, शिव व सुंदर" ही कल्पना टिकून होती आणि कोणत्याही भौतिक उद्दिष्टासाठी त्याची याचना न करता त्याने आपल्याला मोहाशी झगडण्याचे व सुमार्गावर टिकून राहण्याचे सामर्थ्य द्यावे ह्यासाठी त्याला शरण गेले पाहिजे, हीच कल्पना चालू होती; पण

ईश्वराच्या नावाखाली अनेक वर्षांपासून रूढ झालेली सामाजिक व आर्थिक बाबतीतील विषमता पाहून कवींना केव्हा केव्हा ईश्वराच्या अस्तित्वाबद्दलच शंका वाटू लागली. गरीब व दीनदुबळ्यांवर झालेले अत्याचार पाहून ईश्वर हा श्रीमंत व स्वार्थी लोकांचा पक्षपाती आहे, असे वाटून काही कवितात ईश्वराची थट्टा होऊ लागली. उदाहरणार्थ, करसनदास माणिक ह्यांची ' जय जगन्नाथ ' ही कविता आणि सुंदरम् ह्यांचा ' कोया भगतनी कडवी वाणी ' हा काव्यसंग्रह ह्यातील काही कविता अशा प्रकारच्या आहेत.

गांधीयुगातील राष्ट्रिय भावना मात्र पंडित-युगातील राष्ट्रियत्वाच्या भावनेहून दोन बाबतीत भिन्न होती. गांधी युगातील लेखकांना हळूहळू अशी जाणीव होऊ लागली की ब्रिटिशांशी सहकार करणे ही भारताच्या हिताची गोष्ट नाही. भारताने आपल्या मानेवरचे परकीय सत्तेचे जूं फेकून देऊन स्वतंत्र होणे हेंच भारताच्या हिताचे आहे. दुसरी गोष्ट अशी की, ह्या युगातील राष्ट्रियत्वाच्या जाणीवेबरोबरच मानवतावाद व विश्वबंधुत्व यांचीही जाणीव असलीच पाहिजे अशी भावनाही तेथे होती.

थोडक्यात सांगावयाचे म्हणजे गांधीयुगातील कवितातील राष्ट्रियत्वाची भावना ही आंतरराष्ट्रीयत्वावर अवलंबून होती. अर्थातच, त्या वेळच्या राजकीय विचारांच्या प्रगतीबरोबरच ह्या भावनेची प्रगती होत गेली. गांधीयुगातील कवितात दिसून येणारी राष्ट्रियत्वाची भावना पंडित-युगातील कवितात दिसून येणाऱ्या कल्पनेपेक्षा निराळी आहे. कारण पंडित-युगातील राजकीय विचार गांधी-युगातील राजकीय विचारांपेक्षा वेगळे होते.

पारतंत्र्यात असलेल्या देशात जेव्हा राजकीय जागृती येते व स्वातंत्र्यासाठी धडपड सुरू होते त्या काळात असे होणे अगदी स्वाभाविक आहे; पण ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे की, आपल्या राष्ट्रियत्वाच्या भावनेने आपल्याला प्रति-स्पर्ध्याविषयी तिरस्काराची वृत्ती दाखविण्यास कधीही उद्युक्त केले नाही अथवा आपल्या राष्ट्रियत्वात वर्गभेद, वर्णभेद किंवा सांस्कृतिक भेदभाव ह्यांना आपण कधीही स्थान दिलेले नाही.

## महात्मा गांधी [ १८६९–१९४८ ]

सगळ्या जगाला महात्मा गांधी म्हणून परिचित असलेले मोहनदास करमचंद गांधी ह्यांचा जन्म सौराष्ट्रात पोरबंदर येथे झाला. त्यांचा लेखनाचा हेतू लेखनासाठी लेखन हा नसून आपल्या विचारांना वाचा देण्याचे साधन हा होता आणि जेव्हा ते आपली मते व विचार प्रकट करीत तेव्हा त्यांच्या दृष्टीपुढे फक्त गुजरातच नसून आपला सबंध देशच असे. तरीही त्यांनी गुजरातच्या आचार, विचार व कार्यावर

जो प्रभाव पाडला तसा प्रभाव कोणत्याही दुसऱ्या साहित्यिकाने, राजकीय नेत्याने अथवा धार्मिक नेत्याने पाडलेला नाही. केवळ गांधीजींच्या प्रेरणेनेच आपण कोण आहोत व आपले काय कर्तव्य आहे ह्याचे आपल्याला भान झाले आणि त्यांच्याच प्रेरणेने आपण कित्येक वर्षे ज्यांची उपेक्षा केली होती अशा आपल्या बंधुभगिनींकडे आपली दृष्टी वळविली गेली व त्यांच्याच प्रेरणेने आपण सत्य, अहिंसा, विश्वबंधुत्व व 'सर्वोदय' ह्या विषयीच्या विचारांना महत्त्व देण्यास शिकलो व त्यांची खरी किंमत आपणास समजली.

गांधीजींनी गुजराती, इंग्रजी व हिंदुस्तानी ह्या तिन्ही भाषांचा उपयोग आपल्या लेखनासाठी केला आहे. त्यांच्या साहित्यात त्यांचे आत्मवृत्त, सत्याचे प्रयोग, शेकडो पत्रे व लेख ह्यांचा समावेश होतो. हे सर्व साहित्य इंग्लिश भाषिकांनाही उपलब्ध करून देण्यासाठी *Collected Works of Mahatma Gandhi* ह्या नावाखाली प्रकाशित करण्यात आले आहे आणि गुजराती वाचकां-साठी 'गांधीजीनो अक्षरदेह' ह्या नावाने प्रकाशित केलेले आहे. त्यांच्या वरील साहित्यापैकी त्यांचे आत्मचरित्र *'An Outobiography or the story of my experiments with Truth'* ('सत्यना प्रयोगो') अथवा 'आत्मकथा' हे त्यांनी मुळात गुजराती भाषेत लिहिले. गुजराती साहित्याच्या दृष्टीने ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. गांधीजींच्या नवजीवन साप्ताहिकात ही आत्मकथा हप्त्या-हप्त्याने प्रसिद्ध झाली. गांधीजींच्या सर्व साहित्याचे इंग्लिश व भारताच्या सर्व मुख्य भाषांत भाषान्तर झाले असल्याने लाखो वाचकांना ते वाचण्याची संधी मिळाली आहे.

गांधीजींच्या 'आत्मकथेत' सत्याच्या शोधासाठी त्यांनी केलेल्या काही प्रयोगांचे वर्णन आहे. गांधीजी 'सत्यच परमेश्वर' असे मानीत होते.

गांधीजींच्या अद्‌भुत शक्तीचा खराखुरा प्रभाव भारताच्या राजकीय क्षेत्रात आपणास दिसून येतो.[२] हा प्रभाव केवळ अद्वितीय बुद्धिमत्ता अथवा व्यावहारिक कुशाग्रतेचा परिणाम नव्हता. तो त्यांच्या नैतिक व आध्यात्मिक शक्तीचा परिणाम होता. ही शक्ती म्हणजे काही आकस्मिक शक्ती अथवा विचित्र स्वभावाचा एखादा तरंग नव्हता. एका कर्तव्यतत्पर व सदैव जागृत माणसाने केलेल्या आत्मचिंतनाचा व आत्मसंयमनाचा तो परिणाम होता. त्यांच्या प्रयोगांचे क्षेत्र म्हणजे बाह्य जग नव्हते तर माणसाचे स्वतःचे मन व हृदय हे त्यांचे क्षेत्र होते. म्हणूनच गांधीजींचे ह्या क्षेत्रातील प्रयोग अधिक आकर्षक वाटतात, कारण बाहेरच्या संघर्षापेक्षा त्यांच्या आंतरिक संघर्षाचीच त्यात नोंद केलेली आपणास दिसून येते. एका संनिष्ठ—वईश्वरावर श्रद्धा असणाऱ्या व स्वतःस मनुष्याचा सेवक मात्र समजणाऱ्या व्यक्तीची ही आत्मकथा जगातील साहित्यातील अतिशय महान आत्मकथांपैकी एक आहे.

गांधीजींचा ' दक्षिण आफ्रिकाना सत्याग्रहनो इतिहास ' हा ग्रंथ म्हणजे सुद्धा एक आत्मकथाच आहे. गांधीजींनी ह्यात आफ्रिकेतील चळवळीचा वृत्तान्त दिला आहे. ह्याच आंदोलनात गांधीजींनी पहिल्याने ' सत्याग्रहा 'चे शस्त्र वापरले.

त्यांचे अनेक लेख मुख्यत्वे देशात राजकीय जागृती व्हावी ह्या हेतूने लिहिलेले आहेत; पण त्यातही गांधीजींनी इतर अनेक विषयांवरची धर्म, कला, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, शिक्षण, आरोग्य वगैरे जीवनाशी संबंधित असलेल्या विषयांवरची आपली मते प्रकट केली आहेत. त्यांना मानवी जीवनाच्या एकात्मतेचे स्पष्ट, निश्चित व सर्वव्यापी असे दर्शनच झालेले होते.

आपल्या व्यक्तिगत पत्रांनी गांधीजींनी भारतातील व परदेशातील हजारो परिचितांशी व नव्या लोकांशी संबंध प्रस्थापित करून तो शेवटपर्यंत टिकवला होता. गांधीजी कामात अतिशय मग्न असत—इतके की एका दिवसात ते २२–२३ तास काम करीत असत. त्यामुळे स्वाभाविकच त्यांनी लिहिलेली पत्रे त्रोटक व विषयाला अगदी धरून असत; पण ह्या पत्रावरून गांधीजींना रस असणाऱ्या विषयांची मोठी व्याप्ती, त्यांची कार्यकुशलता, मितव्यय व सहानुभूती ह्यांचे अचूक दर्शन आपणाला होते. तसेच प्रत्येक व्यक्तीत जे चांगले गुण आहेत ते शोधून काढून त्यांचा देशसेवेसाठी कसा उपयोग करून घेता येईल ह्याचे अचूक ज्ञान त्यांना होते हेही ह्या पत्रावरून दिसून येते. ह्या पत्राद्वारे त्यांनी अगणित व्यक्तींच्या जीवनात रस घेऊन त्यांच्याकडे लक्ष दिले. एवढेच नाही, तर त्यांनी त्यांच्या जीवनात प्रेम, विश्वास व आशा उत्पन्न केली आणि नेहमीचे निरामय व उपयोगी असे जीवन जगण्यास प्रवृत्त केले. त्यांनी अनेक व्यक्तींना परस्परांच्या जीवनात रस घेण्यास व त्यामुळे एका मोठ्या कुटुंबाचे घटक होण्यास शिकविले.

महात्मा गांधींचे बरेचसे गद्य लेखन हे साधे, स्पष्ट, सुलभ व संक्षिप्त अशा कथनाचा नमुनाच आहे. त्यांच्या विचारात गुंतागुंत, कृत्रिमता, अतिशयोक्ती किंवा भाषेचे अवडंबर मुळीच आढळणार नाही. अशा लेखनाने त्यांनी आपल्या लाखो देशबांधवांना गुलामी व अन्यायाशी झगडण्याची स्फूर्ती दिली व त्यांना अधिक चांगले व उदात्त आचरण करण्यास प्रवृत्त केले.

कलात्मक लेखनशक्तीचा जाणीवपूर्वक प्रयत्न न करताही त्यांचे ग्रंथ 'आत्मकथा' व 'दक्षिण आफ्रिकाना सत्याग्रहनो इतिहास' ह्यात आपल्याला जागोजागी सुंदर उपमा, सुंदर वर्णने व जिवंत व्यक्तिचित्रे पाहावयास मिळतात आणि त्यातून अनेक मूलभूत सिद्धान्तांवरची व जीवनातील आवश्यक प्रश्नांची स्पष्ट व सुसंबद्ध भाषेत मांडलेली मते व विचार आपणास पाहावयास मिळतात.

गांधीजी एवढेच करून थांबले असते तरीही गुजराती साहित्यात त्यांना फार फार मोठे मानाचे स्थान प्राप्त झाले असते ह्यात शंका नाही; पण ते एवढेच करून

थांबले नाहीत. त्यांनी ह्यापेक्षा कितीतरी अधिक व श्रेष्ठ कार्य करून दाखविले आहे. आपल्या लहानथोर अशा सर्व समकालीन साहित्यिकांवर त्यांच्या विचारांचा व जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा फार मोठा पगडा बसलेला होता. गांधींनीच आपल्या भाषणांनी व सर्वग्राही कार्यव्यापृतीने त्यांच्यावर फार प्रभाव पाडला होता. त्यांनीच साध्य व साधन ह्यांच्या शुचितेची कल्पना, तसेच स्वतंत्रता, धैर्य, समता, दया, मानवता, विश्वबंधुत्व व सर्वोदय इत्यादी तत्त्वांचा आपल्या ·लेखनातून व प्रत्यक्ष कार्य करून सर्वांत अधिक प्रचार केला व गांधीयुगातील जवळ जवळ प्रत्येक लेखकाने ह्यातील कुठल्या ना कुठल्या तत्त्वाचा, कोणत्या ना कोणत्या तरी रीतीने आपल्या लेखनात पुरस्कार केलेला दिसून येतो. असे काही लेखक होते की, ज्यांना साधन व साध्य ह्यांतील शुद्धतेची कल्पना मान्य नव्हती आणि कोणत्याही साधनांनी आपले कार्य सिद्धीस नेणे ह्यातच मनुष्याची शक्ती व हुशारी राहिलेली आहे असे ज्यांना वाटत होते, अशा गांधीजींशी सहमत नसणाऱ्या लेखकांनीही आपल्या लेखनात गांधीजींच्या ह्या तत्त्वांची फारच प्रशंसा केलेली आहे.

## दामोदर खुशालदास बोटादकर [ १८७०–१९२४ ]

सुंदर कुटुंबजीवन, सुंदर गृह, विलोभनीय ग्रामीण जीवन इत्यादी विषयांवरील आदर्श चित्रे कवी बोटादकरांनी आपल्या कवितांतून रंगविली आहेत. उत्कृष्ट छंदोबद्ध रचना हे त्यांच्या काव्याचे वैशिष्ट्य आहे.

## जन्मशंकर महाशंकर बुच [ १८७७–१९४७ ]

हे 'ललित' ह्या नावाने ओळखले जात. ह्यांच्या 'मढुली', 'विजोगण', 'वांसलडी' व 'एकलराम' ह्या आपल्या उत्कृष्ट ऊर्मिकाव्यांबद्दल ते प्रसिद्ध आहेत. 'ललित' हे एकटेच असे कवी होते की, ज्यांनी कृष्णाच्या मुरलीच्या विरहाने झालेल्या वेदना व सीता विरहाने झालेले रामाचे एकलेपणाचे दुःख ह्या दोहोंवर कविता रचल्या आहेत.

## नृसिंहप्रसाद कालीदास भट्ट [ १८८२–१९६१ ]

'नानाभाई' ह्या नावाने ओळखले जाणारे नृसिंहप्रसाद भट्ट हे एक शिक्षणतज्ज्ञ होते. भावनगरची 'दक्षिणामूर्ति' व भावनगर जिल्ह्यातील आंबळा येथील 'दक्षिणामूर्ति' ह्या संस्था म्हणजे नानाभाईंच्या दूरदृष्टीची व शैक्षणिक तत्त्वज्ञानाची स्मारकेच आहेत. त्यांच्या 'रामायणनां पात्रो' व 'महाभारतनां पात्रो' ह्या ग्रंथात भारताच्या त्या दोन महाकाव्यांतील काही महान पात्रांचे विवेचन केलेले आहे. ही पुस्तके निरनिराळ्या शैलीत सुंदर वर्णने, संवाद व एकपात्री संवाद वगैरेंचा

उपयोग करून लिहिली आहेत. ही पुस्तके म्हणजे सुंदर गद्याचा एक नमुना आहे. नानाभाईंची आत्मकथा 'घडतर अने चणतर' (घडण नि उभारणी) ह्यात प्रमाणबद्धता व सातत्याचा थोडा अभाव दिसून येतो; पण लेखकाची सत्यावरची श्रद्धा, प्रामाणिकता, दृढनिश्चय, सामाजिक कर्तव्याची जाणीव, मानवता व स्पष्टता ह्या गुणांमुळे ती उल्लेखनीय उत्तम कृती ठरते. त्यांचे उपर्युक्त गुण काही काही वेळा महात्मा गांधी व इंदुलाल याज्ञिक ह्यांची आठवण करून देतात. त्यांची काही व्यक्तिचित्रे– उदाहरणार्थ त्यांची पहिली पत्नी शिवलक्ष्मी व त्यांची मानलेली आई चंदु तसेच त्यांचे गुरू नथुराम शर्मा ह्यांची व्यक्तिचित्रे– फारच सुंदर रीतीने रेखाटलेली आहेत.

## काका कालेलकर [१८८६–१९८१]

दत्तात्रेय बालकृष्ण कालेलकर– 'काका कालेलकर' अथवा नुसत्या काकासाहेब ह्या नावाने हे गुजरातला जास्त परिचित. त्यांचा जन्म व शिक्षण महाराष्ट्रात झाले; पण त्यांचे बरेचसे साहित्यिक कार्य मात्र गुजरातेतच झाले.

रवीन्द्रनाथ टागोरांच्या शांतिनिकेतनात १९१५ साली त्यांची गांधीजींशी पहिली भेट झाली. तेव्हापासून त्यांचा क्रांतिकारकाच्या चळवळीवरचा विश्वास उडाला व त्यानंतर काही महिन्यांनी गांधीजींनी जेव्हा अहमदाबाद येथे आपला 'साबरमती आश्रम' स्थापन केला तेव्हा काकासाहेब गांधीजींना जाऊन मिळाले. तेव्हापासून त्यांनी शिक्षण व साहित्य यांच्याद्वारे देशाची सेवा करण्याच्या कार्यास आपल्याला वाहून घेतले होते.

काकासाहेबांनी बरीच पुस्तके लिहिली आहेत. त्यांतील मुख्य अशी– 'हिमालयनो प्रवास' 'ब्रह्मदेशनो प्रवास', 'पूर्व आफ्रिकामां' 'लोकमाता,' 'स्मरण यात्रा', ओतराती दिवालो,' 'जीवननो आनंद, 'जीवन-संस्कृति,' 'जीवन-भारती,' 'जीवन-विकास' आणि 'जीवनव्यवस्था'.

'हिमालयनो प्रवास' हा त्यांनी हिमालयाच्या केलेल्या प्रवासाचा वृत्तान्त आहे. बडोद्याच्या गंगानाथ विद्यालयात तरुणपणी काकासाहेब शिक्षक होते. काही राजकीय कारणामुळे १९११ साली ते विद्यालय बंद पडल्यावर काकासाहेब हिमालयावर गेले व जम्नोत्री, गंगोत्री, केदारनाथ व बद्रिनारायण ह्या तीर्थक्षेत्रांचा त्यांनी ४० दिवसांचा पायी प्रवास केला. त्या प्रसंगांचे यात वर्णन आहे. १९१९ मध्ये काकासाहेब गुजरात विद्यापीठात अध्यापक म्हणून काम करीत असता गुजरात विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांनी चालविलेल्या हस्तलिखित मासिकात ७ वर्षांपूर्वी केलेल्या ह्या प्रवासाचे वर्णन त्यांनी हप्त्या-हप्त्याने लिहिले. ही लेखमाला पूर्ण होण्यास १५ वर्षे लागली. हप्त्या-हप्त्यांनी लिहिलेली ही लेखमाला पुरी होण्यास

जरी वाजवीपेक्षा फारच अधिक समय लागला तरी ' हिमालयनो प्रवास ' हा एक अनुपम मनोहर वृत्तान्त आहे. वर्णनाचे सौंदर्य व सामर्थ्य, त्याची हातोटी आणि सर्वग्राही दृष्टी ह्या बाबतीत ह्या पुस्तकाची बरोबरी कोणीही करू शकणार नाही.

'ब्रह्मदेशनो प्रवास' ह्यात काकासाहेबांनी केलेल्या ब्रह्मदेशाच्या प्रवासाचे रसप्रद वर्णन आहे. 'पूर्व आफ्रिकामां' ह्यात काकासाहेबांनी पूर्व आफ्रिकेच्या केलेल्या प्रवासाचे वृत्त आहे; पण ह्यात 'हिमालयनो प्रवास' ह्याच्या वर्णनातील उत्साह, हौस, ताजेपणा व काव्यगुण यांचा अभाव दिसून येतो. तरी त्यातील काही उपमा व वर्णने ह्यांवर काकासाहेबांच्या बुद्धिमत्तेचा ठसा अचूकपणे उमटलेला आढळतो. 'लोकमाता' ह्या पुस्तकात भारतातील काही अतिशय मोठ्या नद्यांच्या ऐतिहासिक व सांस्कृतिक महानतेचे आणि वैभवाचे वर्णन अत्युत्कृष्ट गद्यात लिहिलेले आहे. 'स्मरणयात्रेत' लेखकाच्या बाळपणीच्या व तरुणपणीच्या आठवणींचा संग्रह केलेला आहे. ह्याची भाषा अतिशय चैतन्यमय आहे. 'ओतराती दिवालो' ह्या पुस्तकात सत्याग्रहात भाग घेतल्याबद्दल काकासाहेबांना ज्या तुरुंगात ठेवले होते त्या तुरुंगातील अनुभवांचा रसप्रद वृत्तान्त आहे. ह्यात लेखकाची सूक्ष्म निरीक्षणशक्ती व कल्पकता ह्यांचे उत्कृष्ट दर्शन आपणास होते.

'जीवननो आनंद', 'जीवनभारती', 'जीवनविकास' आणि 'जीवन-व्यवस्था' ह्यांत काकासाहेबांच्या निबंधांचा व लेखांचा संग्रह केलेला आहे. ह्यांपैकी 'जीवननो आनंद' ह्यात कला व निसर्ग ह्यांच्या सौंदर्याचे रसार्द्र वर्णन आहे. 'जीवन-संस्कृती'मध्ये संस्कृती व सभ्यता ह्यावर चर्चा केली आहे. 'जीवनभारती'मध्ये कला व साहित्याची चर्चा आहे आणि 'जीवनविकास'मध्ये शिक्षण, व्यवस्था, धर्म व त्याच्या आनुषंगिक विषयांची चर्चा आहे.

ह्या पुस्तकात व काकासाहेबांच्या सर्वच पुस्तकांतून आपल्याला एक देशभक्त, कवी, पंडित, निसर्गप्रेमी, शिक्षक आणि शुद्ध अभिरुची व शुद्ध संस्कृतिसंपन्न आणि चमकदार विनोदबुद्धी असलेला सव्यसाची साहित्यिक दिसून येतो. त्यांची सौंदर्याची अभिरुची संस्कृत व इंग्रजी यांमधील धुरंधरांच्या साहित्याच्या व महाराष्ट्रातील संतकवींच्या साहित्याच्या अभ्यासाने प्रगल्भ झालेली होती. त्यांची सौंदर्यदृष्टी विलक्षण होती व त्यांच्या सहानुभूतीचे आणि समजशक्तीचे क्षेत्र फारच विशाल होते.

'हिमालयनो प्रवास' ह्या त्यांच्या उत्कृष्ट पुस्तकाशिवाय त्यांनी गुजराती साहित्याला दिलेली दुसरी देणगी म्हणजे त्यांचे 'जीवननो आनंद' व विशेष करून ' जीवन-लीला' ह्यातील निबंध होत. ह्या निबंधांद्वारे लेखकाने वाचकांना निसर्गाचे गुप्त सौंदर्य खुले करून दाखविले आहे. हे सौंदर्य अगदी सामान्य वस्तूंत व व्यवहारातील गोष्टींत लपून राहिलेले असते. उदाहरणार्थ समुद्र-किनाऱ्यावरील

वाळूत उमटलेली पावले, दगड, टेकडीवरचे एकाकी खडक, उन्हाळ्यातील दुपार, चिखल वगैरेतही एक प्रकारचे सौंदर्य असते, असे त्यांनी वाचकांना पटविले. समुद्र, आकाश, नद्या, पर्वत व तारे ह्यांच्या दर्शनाने लेखकाला झालेल्या निर्भेळ आनंदाप्रमाणेच वरील क्षुल्लक गोष्टींतून मिळालेल्या आनंदातही वाचक लेखकाबरोबरच सहभागी होतो. ह्या निबंधात एका सुसंस्कृत व सुधारलेल्या देशभक्ताच्या कल्पनाविलासाचे एकंदर सर्वच रूप साठविलेले दिसते.

काकासाहेबांच्या धर्म तत्त्वज्ञान, कला, साहित्य, शिक्षण, इतिहास, राजकारण, वगैरे विषयांवरील चिंतनात्मक निबंधात गांधीजींच्या निबंधाप्रमाणे जीवनाला केंद्रबिंदू मानलेले आहे. गांधीजींप्रमाणेच काकासाहेबांनी ह्या बाबतीत केवळ तात्त्विक चर्चा केलेली नाही. व्यावहारिक दृष्टी ठेवून वरील सर्व गोष्टींचा दररोजचे जीवन समृद्ध करण्यास कसा उपयोग करून घेता येईल इकडे त्यांचे लक्ष असे. म्हणून त्यांनी प्रतिपादित केलेली काही तत्त्वे विवादास्पद वाटतात व हे निबंध वेगवेगळ्या वेळी निरनिराळ्या प्रसंगी, अनेक वर्षे लिहिले गेलेले असल्यामुळे त्यांतील काही विधाने एकमेकांशी विरोधी वाटतात आणि त्यात पुनरुक्तीही झालेली दिसून येते.

काकासाहेबांचे गद्य म्हणजे गुजराती साहित्यातील एक महत्त्वाची घटना किंवा सीमाचिन्ह (Landmark) आहे. ही गद्यशैली म्हणजे एका अभिरुचिसंपन्न, विद्वान, व्यावहारिक, आदर्शवादी, कवी व विनोदबुद्धियुक्त व्यक्तीची गद्यशैली आहे. ते सुंदर रूपके व शब्दचित्रे रेखाटतात. संस्कृत शब्द व रोजच्या व्यवहारातील शब्दांचा आणि वाक्प्रचारांचा उपयोग करून उदात्त मानवी भावनांचे चित्रीकरण करून ते वाचकाला उच्च कोटीच्या शिष्ट संस्कृत ग्रंथाच्या काळात नेऊन सोडतात. ह्या सर्व गोष्टींमुळे काकासाहेबांचे शुद्ध, प्रासादिक विविधरंगी गद्य बरेचदा उच्च कोटीचे काव्यच बनते, ते कधी कधी वाचकाच्या कल्पनाशक्तीला चालना देते, कधी कधी खोलवर जाऊन पोहोचलेल्या भावनांना हेलावून सोडते तर कधी कधी ते विचारांच्या उंच शिखरावर नेऊन ठेवते.

## कनैयालाल मा. मुनशी [ १८८७–१९७१ ]

कनैयालाल माणेकलाल मुनशी ह्यांनी आपल्या लेखनाची सुरुवात 'घनश्याम' ह्या उपनामाने केली. त्यांचा जन्म भरूचला झाला. ते पहिल्याने मुंबईला ज्यूनियर ॲडव्होकेट होते; पण पुढे देशाच्या सांस्कृतिक, साहित्यिक व राजकीय क्षेत्रात त्यांची खूप मोठमोठ्या हुद्द्यांवर नेमणूक झाली.

१९१५ मध्ये जेव्हा गांधीजी दक्षिण आफ्रिकेतून भारतात परत आले तेव्हा मुनशींनी आपली साहित्यिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रांतील कामगिरी सुरू केलेलीच होती.

ते 'नवजीवन अने सत्य'-हृया गुजराती वृत्तपत्राचे व 'यंग इण्डिया' ह्या इंग्रजी वृत्तपत्राचे सहसंपादक होते. पुढे ही दोन्ही वृत्तपत्रे गांधीजींना सोपविण्यात आली व त्यांच्या संपादकत्वाखाली ही दोन्ही वृत्तपत्रे राष्ट्राचा आवाज उठवणारी ठरली. हाजी महंमद अलारखियांच्या मृत्यूनंतर 'शिवजीनी स्ट्रॅण्ड' हृया इंग्रजी मासिकाच्या धर्तीवर 'वीसमी सदी' ह्या नावाचे सचित्र मासिक सुरू केले होते. त्या मासिकामुळेच मुनशी व धूमकेतू यांसारखे साहित्यिक व रविशंकर रावळ ह्यांच्या सारखे कलावंत उजेडात आले; पण 'वीसमी सदी' हे मासिक पुढे बंद पडले व मुनशींनी 'गुजरात' नावाचे मासिक सुरू केले. तसेच साहित्यिक व सांस्कृतिक चळवळी विकसित करण्यासाठी त्यांनी मुंबईला 'गुजराती साहित्य संसदे'ची सुरुवात केली. थोडे दिवस त्यांनी सामाजिक समस्यांची चर्चा व विचारणा करण्यासाठी 'सोशल वेलफेअर' नावाचे इंग्रजी साप्ताहिक सुरू केले आणि ते थोडे दिवस चालविले. त्यांनी आपल्या आयुष्याच्या शेवटी-शेवटी 'भारतीय विद्याभवन'ची स्थापना केली. त्याच्या शाखा भारताच्या महत्त्वाच्या मोठ्या शहरात व लंडन-मध्येही आहेत. भारतीय विद्या भवनाच्या 'बुक युनिव्हर्सिटी' तर्फे प्रसिद्ध होणाऱ्या प्रकाशनांच्या द्वारे प्राचीन भारताच्या सांस्कृतिक वारशाचे पुनरुज्जीवन करणे हा भारतीय विद्याभवन स्थापण्याचा मुख्य हेतू होता.

१९१३–१४ पासून मुनशींची पहिली कादंबरी 'वेरनी वसुलात' ही मणिलाल इच्छाराम देसाईंनी मुंबईला सुरू केलेल्या 'गुजराती' नावाच्या प्रमुख साप्ताहिकात हप्त्या-हप्त्याने प्रसिद्ध होऊ लागली. गुजराती वाचकांचे लक्ष तेव्हा-पासून मुनशींकडे वेधले गेले. त्यांच्या मृत्यूपर्यंत गुजराती वाचकांच्या हृदयातील त्यांचे हे स्थान अढळच आहे.

मुनशींनी कादंबऱ्या, लघुकथा, नाटके, फार्स, व्यक्तिचित्रे, चरित्रे, आत्मकथा, साहित्यसमीक्षा व संशोधन हृयांवरील लेख वगैरे सर्व प्रकारचे साहित्य लिहिले आहे. त्याशिवाय त्यांनी इंग्रजीत *Gujrat and its Literature* (गुजरात व त्याचे साहित्य) आणि युरोपच्या आपल्या प्रवासाचा वृत्तान्तही लिहिला आहे.

मुनशींच्या ऐतिहासिक कादंबऱ्या पुढीलप्रमाणे आहेत– 'पाटणनी प्रभुता', 'गुजरातनो नाथ', 'राजाधिराज', पृथ्वीवल्लभ', 'जय सोमनाथ', पौराणिक कादंबऱ्या– 'लोमहर्षिणी', 'भगवान परशुराम' शिवाय 'कृष्णावतार' (७ भाग असूनही ही अपुरीच राहिली आहे). सामाजिक कादंबऱ्या– 'वेरनी वसुलात', 'स्वप्नद्रष्टा', 'कोनो वांक' व 'तपस्विनी' (३ भाग). 'मारी कमला अने बीजी वातो' हा लघुकथांचा संग्रह आहे.

मुनशींची नाटके पुढीलप्रमाणे आहेत. त्यातली 'पौराणिक नाटको अने लोपामुद्रा' ही पौराणिक, 'काकानी शशी', 'ब्रह्मचर्याश्रम' आणि 'पीडाग्रस्त

प्रोफेसर' ही सामाजिक व ' ध्रुवस्वामिनी देवी' हे ऐतिहासिक नाटक आहे.

मुनशींचे निबंध तीन खंडांत संग्रहित केलेले आहेत. ते पुढीलप्रमाणे– ' केटलाक लेखो', ' थोडांक रसदर्शनो–साहित्यना अने भक्तीना' आणि ' आदिवचनो'. त्यांनी दोन चरित्रे लिहिली आहेत– ' नर्मद–अर्वाचीनोमां आद्य' आणि ' नरसैंयो–भक्त हरिनो'. त्यांचे आत्मचरित्र चार भागांत प्रकाशित झाले आहे. ते भाग असे– १) अडधे रस्ते २) सीधां चढाण ३) मध्यान्ह आणि ४) स्वप्नसिद्धीनी शोधमां. ' मारी बिन जबाबदार कहाणी' हा त्यांच्या प्रवासाचा वृत्तान्त आहे.

मुनशी अशा प्रकारे साहित्याचे अनेक प्रकार हाताळत होते; पण मुनशींची ख्यातीमात्र कादंबरीकार म्हणूनच अधिक आहे.

गोवर्धनरामांच्या ' सरस्वतीचंद्रा'चा चौथा व शेवटचा भाग १९०१ मध्ये प्रकाशित झाला. त्या वेळीच पुढील कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या– इच्छाराम सूर्यराम देसाईंची ' गंगा-एक गुर्जर वार्ता', चुनीलाल वर्धमान शाह ह्यांची ' गुजराती-जुनी वार्ता ' मणीराम छबाराम भट्ट ह्यांची ' पृथ्वीराज अने चांद बरदाई ' नारायण वसनजी ठक्कर ह्यांची ' पद्मिनी ' आणि मोतीलाल त्रिभुवनदास सट्टावाला ह्यांची ' विक्रमनी वीसमी सदी'. ह्या सर्व कादंबऱ्या त्या वेळी प्रसिद्ध होत्या. शिवाय दुसऱ्याही काही लोकप्रिय कादंबऱ्या होत्या. उदाहरणार्थ भोगींद्रराव रतनलाल दिवेटिया ह्यांच्या ' उषाकान्त ' आणि ' असिस्टंट कलेक्टर ' व अमृत केशव नायक ह्यांची ' एम. ए. बनके क्यों मेरी मिट्टी खराब की ?' ह्या सरस्वतीचंद्रानंतरच्या काळात प्रसिद्ध झाल्या होत्या; पण या सर्वांपैकी कोणतीही कादंबरी 'सरस्वतीचंद्र'ची बरोबरी करू शकली नाही किंवा त्यांपैकी कोणीही लेखक आपल्या कादंबरीला काही नवे स्वरूप देऊ शकला नाही.

मात्र ह्या बाबत एक गोष्ट निश्चित आहे. १९१३–१९१४ मध्ये फक्त मुनशींनी आपल्या कादंबऱ्यांनी कादंबरीचे नवे दालन उघडले. त्यांनी आपल्या कादंबऱ्यांत नवी कथानके, नव्या प्रकारची पात्रे, नव्या प्रकारचे संवाद आणून एक नवी मोहिनी निर्माण केली. त्यांनी स्वतःच म्हटल्याप्रमाणे कादंबऱ्या लिहिण्यात त्यांचा मुख्य हेतू हा होता की आपली कथा सजीव पात्रे, नाट्यात्मक घटना व नाट्यमय संवादांनी रसप्रद बनावी म्हणूनच त्यांनी त्यातील नैतिकता किंवा अनैतिकता ह्याकडे विशेष लक्ष न देता, आपल्यावरील विचारांना अनुसरून कादंबऱ्या लिहिल्या.

त्यानंतर बऱ्याच वर्षांनी असे कळून आले की, त्यांच्या ' वेरनी वसुलात ' व त्यापूर्वीच्या ज्या कादंबऱ्यानी गुजरातचे डोळे दिपवून टाकले होते, त्यांतील काही तत्त्वे व दुसऱ्याना काही गोष्टी त्यांनी 'अॅलेक्झांडर ड्यूमा' ह्याच्या कादंबऱ्यावरून घेतलेल्या होत्या; पण ही तत्त्वे त्या वेळी अगदी नवी व वेगळ्याच प्रकारची

असल्यामुळे गुजरातवर त्यांची अतिशय मोहिनी पडलेली होती. ' कोनो वांक ' ह्या कादंबरीनंतर मुनशींची 'पाटणनी प्रभुता' ही ऐतिहासिक कादंबरी प्रकाशित झाली. त्या कादंबरीत गुजरातमधील सोलंकी वंशाच्या वैभवाचे वैभवशाली वर्णन केले आहे. त्यानंतर ह्याच कादंबरीचा पुढचा भाग ' गुजरातनो नाथ ' प्रसिद्ध झाला व त्यामुळे तर मुनशींची कीर्ती शिखराला पाहोचली. नरसिंहरावसारख्या डोळस समीक्षकाने त्याची तुलना ' सरस्वतीचंद्रा 'शी केली आहे. मुनशींच्या वाचकांनी गुजरातमध्ये आतापर्यंत झालेल्या सर्व कादंबरीलेखकात मुनशींना सर्वात श्रेष्ठ कादंबरीकार मानले आहे.

सर्जनशील साहित्य तसेच इतर प्रकारचे साहित्य ह्या दोन्हीं क्षेत्रातील मुनशींची कामगिरी जास्त-जास्त पूर्णावस्थेस पोहोचत चालली य ती अतिशीघ्र गतीने विकसित होत गेली. गुजरातमधील आदर्शवादी युवक त्यांच्या कादंबऱ्यांची स्तुती करू लागले व त्यांचे ते निःसीम चाहते बनले. राष्ट्राच्या राजकीय व सांस्कृतिक देहात जसा नव्या जीवनाचा संचार झाला होता तसाच नव्या जीवनाचा संचार मुनशींच्या साहित्यात होऊ लागला. अनिर्बंध व्यक्तिगत स्वातंत्र्य, स्वाभिमानी व आत्मगौरवान्वित स्त्रिया, वर्णभेद व पूर्वग्रह ह्यांचा विरोध, शोषण व गुलामी ह्यांचे समूळ उच्चाटन, ह्या प्रकारचे नवे विचार व मतप्रणाली ह्यांचे चित्रण मुनशींच्या कादंबऱ्यात दिसून येऊ लागले. त्यांनी प्राचीन भारताच्या वैभवाचे एक भव्य चित्र रेखाटले. त्यांच्या कादंबऱ्या व नाटके यांमधून अनेक सर्वशक्तिमान, सर्वज्ञ आणि वाचकांच्या मनात आदरयुक्त भय उत्पन्न करणारे अलौकिक पुरुष व चतुर आणि कार्यक्षम कार्यकर्ते आपणास पाहावयास मिळतात. मुनशींनी आपल्या कादंबऱ्यांमधून व नाटकांतून रंगविलेले जगाचे चित्र, जीवनाबद्दलचा अदम्य उत्साह व अद्‌भुत प्रेमाचे दुर्दम्य तरंग ह्यांनी परिपूर्ण आहे. शिवाय त्यात दुबळेपणाचा तिरस्कार केलेला आहे. त्यामधल्या भाषणातील व वर्तनातील (नकली अभिजात) ( ह्या गोष्टी तर त्यांच्या ) व्यंग्याचे व उपहासाचे स्वाभाविक लक्ष्यच बनल्या होत्या.

मुनशींनी गुजरातमध्ये कादंबरी लेखनाचे नवे तंत्र सुरू केले. नीटपणे गुंफलेले कथानक, सजीव पात्रे, चमकदार संवाद, गतिशील कृतिमयता व वाचनीयता ही चांगल्या कादंबरीची लक्षणे ठरली आणि कला ही नीतिनिरपेक्ष असली तरी चालेल; पण ज्या कलेतून आनंद मिळतो त्याच कलेचा पुरस्कार केला पाहिजे असे पावले जाऊ लागल. अतिविशालता, भव्यता व द्रष्टेपणा वगैरे गुणांचा अविष्कार जो जो ' सरस्वतीचंद्रा 'मध्ये दिसून येतो तो आता संपुष्टात आला होता.

मुनशींच्या कादंबऱ्यांत व नाटकांत दिसून आलेली सर्जनशक्ती पाहता त्यात काही ठळक वैशिष्ट्ये दिसून येतात.

मुनशींनी बऱ्याच वेळा वर्तमान समयाची उपेक्षा व चेष्टा केली आहे. त्यांना भूतकाळातच भव्यता, महानता, त्याग, शौर्य वगैरे भावना दिसून येतात आणि ह्या गोष्टींनी त्यांच्या कल्पनाशक्तीवर पुरा पगडा बसविलेला दिसून येतो. दुसऱ्या शब्दात सांगावयाचे म्हणजे वर्तमानकाळ त्यांच्या व्यंग्योक्तीला, उपहासाला वाव देणारे क्षेत्र आहे व त्यांच्या आदर्शवादाला भूतकाळ ह्याच योग्य वाटतो. दुसरा विचार करता असे दिसून येते की, मुनशींचे जीवनाबद्दलचे तत्त्वज्ञान हे अतिशय दुर्बळ व खालच्या प्रतीचे आहे. त्यांच्या मान्यतेनुसार जगात ज्यासाठी काही प्रयत्न करायचे ते कार्य फक्त जय मिळविणे हेच होय. दरवेळी व दरेक क्षेत्रात विजयच मिळविला पाहिजे व त्यासाठी कोणतेही साधन वापरले तरी हरकत नाही. यश प्राप्त करणे हे त्यांचे साध्य होते आणि म्हणूनच त्यांच्या भव्यता, महानता, उदात्तता, शक्ती व चातुर्य ह्या गुणांबद्दलच्या कल्पनांत काहीतरी स्वाभाविक असा दोष असलेला दिसून येतो. ह्या कारणानेच त्यांची अत्यंत महान व प्रत्यक्ष जीवनातील मनुष्यापेक्षाही श्रेष्ठ अशी पात्रे केव्हा केव्हा असे वर्तन करतात की जे मुनशींनीच पुरस्कारलेल्या गोष्टींशी व त्यांच्या व्यक्तिमत्त्वाशीही अगदी विसंगत वाटावे. त्यांच्या घोषणेशी त्यांचे वर्तन अगदी विरोधी दिसून येते. ह्या दोष मुख्यत्वे त्यांच्या स्त्रियांच्या व ऋषींच्या वर्णनातून दिसून येतो. मुनशींनी बऱ्याच बुद्धिमान व उदात्त स्त्रियांची पात्रे रंगविलेली आहेत; पण त्यांची बुद्धिमत्ता व उज्ज्वलता ही केव्हा केव्हा फक्त पोकळ अभिमान, घमेंड आडंबरच असते. मुनशींनी एकही अशी महान स्त्री रंगवलेली नाही की जिची बुद्धिमत्ता व महानता हे गुण स्वाभाविकपणेच टिकून राहिले आहेत. मुनशींची 'आर्यत्वा'ची—श्रेष्ठत्वाची व उदात्ततेची—कल्पना त्यांना त्यांच्या आदर्श अशा प्राचीन ऋषींमध्येच दिसून आली; पण मुनशींच्या ऋषींनीही ज्ञान, तप व उदात्त नैतिक आचरण ह्या बाबतीतही अपूर्व यश मिळवलेले दिसून येत नाही. ते ऋषि खावे, प्यावे, सौंदर्याचे निरीक्षण व पान करावे, कधी कधी काव्ये रचावी व जरूरच पडेल तेव्हा लढाईत भाग घ्यावा, अशा वृत्तीचे दिसतात. ह्या ऋषींना उच्च व उदात्त जीवन-दृष्टी आहे, असे वाटत नाही. त्यांचे ध्येय साध्य करण्यासाठी त्यांना साधनांच्या शुचितेबद्दल जराही दिक्कत वाटत नाही. कार्यसिद्धीसाठी कोणत्याही मार्गाचा अवलंब करण्यास त्यांना लाज वाटत नाही. खोटे बोलून कार्यसिद्धी होत असल्यास तसे करायला ते जराही कचरत नाहीत. त्यांना आपल्या 'आर्यत्वा'चा फाजील अभिमान असतो; पण उदात्तता व सुसंस्कृतता ही जी आर्यत्वाची मुख्य लक्षणे ती त्यांच्यात जराही दिसत नाहीत. मुनशींचे काही महान ऋषी तर द्वेष व वैर या भावनांचे मूर्तिमंत अवतारच वाटतात. त्यांच्यात तिळमात्र दया, करुणा व क्षमाशीलता आढळून येत नाही.

मुनशींच्या साहित्यसर्जक बुद्धिमत्तेचे आणखी एक वैशिष्ट्य असे की, त्यांच्या कल्पनाशक्तीला फार मर्यादा आहेत. त्यांची बरीचशी पात्रे एकाच साच्याची वाटतात. त्यांचे सर्व नायक व नायिका एकाच ठशाचे वाटतात व कधी कधी तर त्यांना एकसारख्याच परिस्थितीतून पसार व्हावे लागते. अर्थातच त्यांची नावे व वेष निरनिराळे असतात. त्यांच्या कादंबऱ्यांत किंवा नाटकांत पात्रांची विविधता मुळीच दिसून येत नाही. मोठमोठ्या नाटककारांच्या व कथालेखकांच्या पात्रांत जशी विविधता दिसून येते व प्रत्येक पात्रांचे व्यक्तित्व जसे उठून दिसते, तसे मुनशींच्या पात्रांत आढळून येत नाही; पण मुनशींनी आपल्या ह्या दूरदृष्टीच्या व कल्पनाशक्तीच्या मर्यादांवर नाट्यमय प्रसंग, आलंकारिक भाषा व काव्यात्मक शैली ह्यांच्या मदतीने पांघरूण घालून त्या न दिसू देण्याचा प्रयत्न केला आहे.

मुनशींनी ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिताना पात्रांच्या चित्रणात जी सूट घेतली आहे व जे बदल केले आहेत त्यांबद्दल काही काळ वाद माजला होता. ऐतिहासिक पात्रांच्या चित्रणात बदल करण्यामागच्या आपल्या हेतूविषयी त्यांनी स्वतः खुलासा केलेला आहे. असे मात्र म्हणता येईल की, त्यांनी आपल्या काही काल्पनिक पात्रांना दिलेल्या भूमिका इतक्या मध्यवर्ती व केंद्रस्थानी ठेवलेल्या आहेत की ते काल्पनिक पात्र जर त्या कादंबरीत नसते तर ज्या रीतीने ती कादंबरी लिहिली गेली आहे तशी ती लिहिलीच गेली नसती, असे कबूल करणे आपणाला भाग पडते.

मुनशींनी काही खऱ्याखुऱ्या ऐतिहासिक पात्रांचे चित्रण अशा रीतीने केले आहे की, त्या पात्रांबद्दलच्या आपल्या रूढ कल्पनांना धक्काच पोहोचतो; पण ह्याचा अर्थ असा नव्हे की आपल्या रूढ मान्यता लेखकाने अगदी तंतोतंत व आदराने पाळल्याच पाहिजेत; पण आपल्या इतिहासाच्या संशोधनाने जर पात्रांच्या जीवनातील काही नवीन घटना सापडल्या तरच त्यांच्या भूमिका बदलाव्या असे आपणास वाटते. तसेच त्यांनी आपल्या वेळच्या काही सामाजिक व राजकीय समस्या आपल्या ऐतिहासिक किंवा पौराणिक कादंबऱ्यांच्या व नाटकांच्या कथानकात आणल्या आहेत आणि त्यांत कालविपर्यास झालेला आहे.

सर्जनक्षेत्राव्यतिरिक्त मुनशींच्या लेखनाविषयी विचार करता असे दिसून येते की, त्यांनी मांडलेले सिद्धान्त अथवा निर्णय व्यवस्थित आणि सर्व बाजूंचा निष्पक्षपातीपणाने विचार करून ठरविलेले नाहीत. त्यांच्यामध्ये दृढमूल झालेल्या पूर्वग्रहावरच ते आधारित झालेले दिसतात. मुनशी हे एक समर्थ आणि यशस्वी वकील असल्यामुळे आपली बाजू पसंत करून ती इतक्या जोरदार रीतीने व तडफदारपणे मांडतात की त्याचा प्रभाव पडल्याशिवाय राहातच नाही; पण खऱ्या बहुश्रुत व त्या विषयांतील अधिकारी व्यक्तींना मुनशींचे निर्णय एकतर्फी व उतावळेपणाने मांडलेले दिसून येतात.

एक स्वप्नद्रष्टा ह्या नात्याने मुनशींचे विचारक्षितिज सतत विस्तारतच गेले. मुंबईच्या लहानशा मर्यादित साहित्य सोसायटी–'गुजरात साहित्य संसद' या संस्थेपासून ते मुंबईतील 'भारतीय विद्याभवन' ह्या विशाल-संस्थेपर्यंत त्याचा विस्तार झालेला आहे. भारतीय विद्याभवन हे एक भारतीय संस्कृतीचे पुनरुज्जीवन करण्याचे प्रमुख केंद्र आहे. अनेक दीर्घव्यासंगी व अधिकारी पंडितांच्या विद्वत्तेचे संकलन करून जगापुढे भारताची प्राचीन संस्कृती, कला व इतिहास ह्यांचा साक्षेपाने प्रचार करणारी ही असामान्य संस्था मुनशींचे मुख्य व ज्वलंत स्मारकच झाली आहे. व्यक्तिगत गुजराती अस्मितेपासून भारताच्या एकता व अखंडिततेपर्यंत, प्रणालिकाभंगापासून ( रूढ कल्पनांना डावलून देण्यापासून ) भारताच्या प्राचीन संस्कृतीच्या वैभवाचे स्तोत्रगान करण्यापर्यंत, सुरसता (मनोरंजकता) व सचोटी (सयुक्तिकता) ह्या दोन गोष्टी साहित्याचा आत्माच आहेत ह्या कल्पनेपासून ते मंत्रदर्शनापर्यंत म्हणजे एकदम झालेल्या सत्याच्या दर्शनापर्यंत गाठलेला प्रचंड लांबीचा पल्ला एवढे विस्तृत त्यांचे साकार झालेले स्वप्नद्रष्टेपण आहे.

हा मुनशींचा सांस्कृतिक प्रवास व त्यांनी स्थापलेली भारतीय 'विद्याभवना'ची 'ग्रंथ युनिव्हर्सिटी' व 'भवन'मधील शिक्षणसंस्था ही सर्व मुनशींची असामान्य सिद्धी आहे, हे मान्य करावेच लागेल.

## चुनीलाल वर्धमान शाह [ १८८७–१९६६ ]

चुनीलाल शाह बरीच वर्षेपर्यंत अहमदाबादला प्रकाशित होणाऱ्या 'प्रजाबंधु' ह्या नावाच्या प्रख्यात साप्ताहिकाचे उपसंपादक म्हणून काम करत होते. चुनीलाल 'साहित्यप्रिय' ह्या उपनावाने त्या साप्ताहिकात एक साहित्यविषयक स्तंभ (Column) लिहीत असत व लोकांना त्या स्तंभाबद्दल फार आदर वाटत असे.

चुनीलाल हे कादंबरीकार म्हणूनही प्रसिद्ध होते. त्यांची 'प्रमोद' अथवा 'दिलेर आराम' ही पहिली कादंबरी १९०७ मध्ये प्रकाशित झाली. ती 'हीरबाई' ह्या हिंदी कादंबरीवर आधारित होती. तेव्हापासून त्यांनी हिन्दी, मराठी व इंग्रजी कादंबऱ्यांची भाषान्तरे व रूपान्तरे करण्यास सुरुवात केली व त्याचवेळी ते स्वतःच्या स्वतंत्र कादंबऱ्याही लिहू लागले. त्यांच्या पन्नासहून अधिक अशा कादंबऱ्यांत 'कर्मयोगी राजेश्वर', 'रूपमती' आणि 'जिगर अने अमी' ह्या उल्लेखनीय आहेत.

त्यांची 'कंटक-छायो पंथ' ही कादंबरी चार भागात लिहिलेली असून त्यात लेखकाची जबरदस्त महत्त्वाकांक्षा दिसून येते. ही एका गुजराती कुटुंबाची कहाणी आहे. ती १८१३ ते १९४७ ह्या कालखंडाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली आहे. १८१३ साली गुजरातच्या इतिहासातल्या नोंदल्या गेलेल्या सर्व दुष्काळांपेक्षा अत्यंत भयंकर अशा दुष्काळाला गुजरातला तोंड द्यावे लागले. तेथपासून ते ३ जुलै १९४७

सालो माउंटबॅटनच्या सूचना नेहरूंनी स्वीकारल्याचे जाहीर केले, त्या दिवसापर्यंतचा काळ, ही ह्या कादंबरीची पार्श्वभूमिका आहे.

ह्याप्रमाणे ह्या कादंबरीत दोन मोठे दुष्काळ, दोन जागतिक युद्धे व दोन मोठी राज्यसत्तान्तरे–एक, ईस्ट इंडिया कंपनीकडून ब्रिटिश राज्यकर्त्यांकडे व दुसरे ब्रिटिश राज्यकर्त्यांपासून भारतातील लोकांच्या प्रतिनिधीकडे झालेले–ह्या घटनांचा समावेश झालेला आहे.

ह्या कादंबरीतील काही पात्रे ऐतिहासिक दृष्टया खरी तर काही पात्रे काल्पनिक आहेत. तसेच त्यात निर्देश केलेली काही स्थळे खरी आहेत तर काही काल्पनिक आहेत.

ह्या कादंबरीचा आधार बऱ्याच खऱ्या ऐतिहासिक घटनांवर असला तरी एका कादंबरीचे कथानक म्हणून सुसंगत रीतीने त्यांचे संकलन करणे लेखकास जमलेले नाही. कदाचित लेखकात खरीखुरी साहित्य-सर्जनाची चमक नसल्यामुळे त्याला झालेल्या घटनांची फक्त हकीकत सांगण्यापेक्षा अधिक काहीही करता आलेले नाही. ह्या कादंबरीत एकही असे प्रभावी पात्र नाही, की जे वाचकांना आपल्याकडे आकर्षित करील अथवा बऱ्याच काळपर्यंत वाचकांच्या मनावर ज्याचा ठसा उमटलेला राहील. देशी संस्थाने, ब्रिटिशांचा कारभार, विविध व्यवसाय, सामाजिक व धार्मिक रीतिरिवाज, आंदोलने ह्यांचा त्यातल्या संविधानकांत सुसूत्रपणे समन्वय झालेला दिसून येत नाही. ह्या सर्व घटना व हकीकती त्यांनी संवादरूपाने लिहिल्या असल्या तरी त्या कादंबरीच्या कथानकात चपखलपणे बसल्यासारखे आपणास वाटत नाही.

चुनीलाल शाह हे एक स्वस्थ व धीम्या वृत्तीचे लेखक होते. त्यांच्या एतिहासिक कादंबऱ्यांमध्ये इतिहासाच्या घटनांत फारसे फेरफार करण्याचे स्वातंत्र्य त्यांनी कधीही घेतले नाही अथवा वाचकांच्या मनात खळबळ उडवून देण्याच्या हेतूने त्यांनी आपल्या लेखनात कोठल्याही गोष्टी ओढून-ताणून आणल्या नाहीत; पण जरी ते उच्च वा भव्य कोटीपर्यंत कधी पोहोचले नसले तरी ते अत्यंत कनिष्ठ प्रतीच्या कोटीपर्यंतही कधी उतरले नाहीत.

## रामनारायण पाठक [ १८८७–१९५५ ]

रामनारायण विश्वनाथ पाठक ह्यांनी आपल्या कविता 'शेष' ह्या टोपण नावाने, लघुकथा 'द्विरेफ' ह्या टोपण नावाने व ललित-निबंध 'स्वैरविहारी' ह्या टोपण नावाने लिहिले. त्यांचा जन्म गणोल येथे झाला. ते पहिल्याने साद्रा ह्या गावी ॲडव्होकेट म्हणून काम करीत होते. तेथून ते अहमदाबादला गेले व एका स्थानिक शाळेत हेडमास्तर झाले. नंतर गांधीजींनी स्थापन केलेल्या गुजरात विद्यापीठात ते

प्रोफेसर म्हणून काम करू लागले. विद्यापीठ बंद झाल्यावर ते अहमदाबाद व मुंबई येथील कॉलेजांतून गुजराती साहित्याचे प्रोफेसर म्हणून काम करू लागले.

पाठक ह्यांचे काव्यग्रंथ–' शेषनां काव्यो ' आणि ' विशेष काव्यो '. लघुकथा 'द्विरेफनी वातो ' (३ भाग), साहित्य-समीक्षा ' काव्यनी शक्ती', 'साहित्य-विमर्श', ' आलोचना ', ' अर्वाचीन गुजराती काव्य-साहित्यना वहेणो ', 'अर्वाचीन गुजराती काव्य साहित्य ', ' नर्मद–अर्वाचीन गद्यपद्यनो प्रणेता ', छंदःशास्त्र ' प्राचीन गुजराती छंदो ' (ऐतिहासिक समालोचना) आणि ' बृहत्पिंगल ', ललित-निबंध– ' स्वैरविहार ' याचे २ भाग, एकांकिका ' कुलांगार अने बीजी कृतीओ ' एवढे त्यांचे साहित्य आहे.

त्यांनी काही पुस्तके संपादितही केली आहेत. त्यातील मुख्य कांत ह्यांचे ' पूर्वालाप ' हे आहे. त्यांनी रसिकलाल परीख ह्यांच्या सहयोगाने मम्मटाच्या ' काव्यप्रकाशा'च्या पहिल्या सहा प्रकरणांचे भाषान्तर व धर्मानंद कोसांबींच्या सहयोगाने ' धम्मपदा'चे भाषान्तर केले आहे. ' प्रस्थान ' ह्या नावाच्या प्रख्यात मासिकाचे ते संपादकही होते.

प्रो. रामनारायणभाई पाठक हे साहित्यातील तज्ज्ञ, एक सर्जक लेखक आणि तर्कशास्त्र व तत्त्वज्ञानाचे अभ्यासक असून त्यांनी कवी, लघुकथालेखक, आत्मचिंतक, ललित-निबंधकार, विनोदी लेखक व सर्वात अधिक समीक्षक म्हणून नाव कमवले आहे.

प्रो. पाठकांची काव्ये रचनावैविध्याने नटलेली आहेत. ते एक वैचारिक कलावन्त आहेत. त्यांच्या काव्यात भावनांवर पुरुषार्थपूर्वक ठेवलेले नियंत्रण, जीवनाविषयीची पूर्वग्रह-रहित-दृष्टी असून त्यांची विश्वाच्या रचनेतील विधात्याच्या अंतिम चांगुलपणावर अढळ श्रद्धा असलेली दिसून येते.

पाठक ह्यांच्या कवितात अगदी टाकाऊ असे काहीच नाही; पण त्यांच्या पहिल्या पत्नीच्या मृत्यूनंतर दुःखाच्या उद्रेकाने प्रेरित होऊन त्यांनी जी काव्ये लिहिली ती अप्रतिम आहेत. दुःखाचे जाहीर प्रदर्शन करणे ह्याबद्दल कवीने जाणून-बुजून केलेल्या प्रयत्नामुळे ह्या कवितांतील दुःख थोडे दबले गेले असले तरीसुद्धा ते एखाद्या दगडी व लोखंडी हृदयालाही पाझर फोडण्याइतके प्रभावी आहे.

प्रिय पत्नीचे शव (अंतिम) दहनक्रिया करण्यासाठी बाहेर काढण्याच्या वेळचे दृश्य पाहून कवी म्हणतो–

" हळू ! कृपा करून गडबड करू नका. हे डोळ्यांनो अश्रू वाहवू नका. आता तुमच्यासाठी फक्त एकदोन क्षणच बाकी आहेत. म्हणून अश्रूनो, तुमचा प्रवाह जरा थांबवा. माझ्या नयनांनो, कृतार्थ व्हा. आपल्या मंगल स्मिताने जिने सर्व जग भरून टाकले ते स्मित आता पुन्हा तुम्हाला केव्हाही पहायला मिळणार नाही. "[३]

ह्या अंतःकरणातल्या अगदी आतल्या गाभाऱ्यातील शोक आणि जीवन-सहचरीच्या निधनाने उत्पन्न झालेली कधीही भरून न येणारी पोकळी ह्या दुःखाच्या सर्व भावना कवीच्या मुखातून केव्हा केव्हा व्यंग्योक्तीच्या रूपाने प्रकट होतात. उदाहरणार्थ–

" हे प्रिये, मी तुला तुझे सहवाससुख उपभोगण्यासाठी बोलावीत नाही. तसेच माझ्या बिकट अडचणीतून बाहेर पडण्यासाठी तू सल्ला द्यावास म्हणूनही मी तुला बोलावीत नाही किंवा तुझ्या दर्शनाने माझ्या नयनांची तृष्णा शांत करण्यासाठीही मी तुला ये असे म्हणत नाही. मी तुला बोलावतो आहे ते, तुझ्या विरहाने उत्पन्न झालेल्या माझ्या शोकाची गीते फक्त तुझ्यापुढे गाऊन दाखविण्याठी."[४]

केव्हा केव्हा कवीच्या हृदयातील दुःख व निराशा इतकी प्रबळ होतात की तो त्यावर जराही ताबा ठेवू शकत नाही. तो म्हणतो– " हे प्रिये, जर तू येत नसशील तर काहीही करून मला तुझ्या अमृत-प्राशनात सहभागी होण्यासाठी तरी तू आपल्याजवळ बोलावून घे."[५]

ह्या करुणरसपूर्ण कवितांशिवाय पाठकांनी इतर अनेक विषयांवर कविता लिहिल्या आहेत. त्यात काही विनोदी कविताही आहेत. ह्यांपैकी काही कवितांत भावनांची उदात्तता व भाषेचे वैभव ही दिसून येतात.

'द्विरेफनी वातो' (३ भाग) ह्यांतील सर्वच कथा सारख्याच प्रतीच्या नाहीत. विशेषतः तिसऱ्या भागातील लैंगिक विषयासंबंधीच्या काही कथा फार कनिष्ठ दर्जाच्या आहेत; पण ह्यात बऱ्याच कथा फार सुंदर रीतीने रचल्या गेल्या आहेत.

'मुकुन्दराय' आणि 'खेमी' ह्या गुजराती साहित्यातील दोन उत्कृष्ट लघुकथा आहेत.

पाठक ह्यांचे मानवी स्वभावाचे निरीक्षण फार सूक्ष्म व पहिल्या प्रतीचे होते. आपल्या तीक्ष्ण अंतर्दृष्टीने ते कोणत्याही गोष्टीतील दडून राहिलेला भाव शोधून काढतात व आपले समकालीन लेखक धूमकेतू ह्यांच्याप्रमाणे भावनांच्या प्रवाहात वाहून न जाता दृढ बुद्धिवादाचे नियंत्रण भावनांवर ठेवून मगच लघुकथेची रचना करतात. पाठकांच्या लघुकथांत आपल्याला व्यंग्य, विनोद व उपहास भरपूर प्रमाणात पहावयास मिळतात. कथानकाची घडण उत्तम करून त्या द्वारे ते जीवनाची महत्ता बरोबर पटवितात व त्या कथा ते निरनिराळ्या रसप्रद-रीतीने कथन करतात.

त्यांच्या 'स्वैरविहारा'च्या दोन भागातील ललित-निबंधातूनसुद्धा आपल्याला अतिशय सुसंस्कृत व बुद्धिमान मनुष्याचे दर्शन घडते आणि त्याबरोबरच तत्त्वज्ञानाकडे झुकणारी त्यांची मनोवृत्ती व उच्च प्रकारची विनोदवृत्तीही दृग्गोचर

होते. ह्या निबंधात पाठकांनी त्या काळच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीतील मनुष्य-स्वभावातील विसंगतीवर चांगला प्रकाश टाकला आहे. ज्या परिस्थितीला रामनारायणभाई पाठकांनी आपल्या व्यंग्य व उपहासाचे लक्ष्य बनविले होते, ती परिस्थितीच आता बदलून गेल्यामुळे ह्यातील बऱ्याच निबंधांचे महत्त्व कमी झाले आहे.

पाठक समीक्षक म्हणून फार प्रख्यात होते. जरी त्यांच्यात नरसिंहरावांइतकी विद्वत्ता व आनंदशंकर ह्यांच्याइतका अनेक विषयांतील रस नव्हता तरी त्यांची साहित्याच्या तत्त्वांविषयीची ग्रहणशक्ती तीक्ष्ण होती. त्यांच्यात सूक्ष्म दृष्टी, संवेदनशक्ती, तर्कनिष्ठ विचारशक्ती व मार्मिक निरूपणशैली होती. त्यामुळे त्यांच्या समीक्षेला एक उच्च प्रतिष्ठा लाभली होती. त्यांची गद्यशैली प्रासादिक, सयुक्तिक, साधी, सरळ व आल्हादक आहे. संस्कृतमधील सौंदर्यशास्त्राचा गाढ अभ्यास व त्याच्या जोडीला पाश्चिमात्य साहित्यसमीक्षेच्या तत्त्वांची जोड, ह्या दोन गोष्टी त्यांच्या समीक्षेला आधारभूत होत्या. तरीही त्यांची प्रतिभा स्वयंसिद्ध होती. त्यांच्या मतांच्या पुष्टीसाठी ते क्वचितच दुसऱ्याची मते उचलीत अथवा दुसऱ्यांच्या लेखनांतून क्वचितच काही घेत. ते केव्हाही आपल्या ज्ञानाचे प्रदर्शन करण्याचा प्रयत्न करीत नसत व प्रस्तुत विषयाची मर्यादा ओलांडून ते दूर जात नसत. समीक्षेच्या विषयाचा मात्र काहीही तपशील न सोडता ते 'तलस्पर्शी' अभ्यास करीत असत व विशिष्ट प्रकारच्या सहजतेने साध्या; पण निर्दोष व प्रतिष्ठित भाषेत आपले विचार व्यक्त करीत.

पुस्तकांचे परीक्षण करताना पाठक कधी कधी फक्त त्या पुस्तकाचे व्यवस्थित सार देऊन समापन करतात; पण कधी कधी, प्रेमानंदांच्या नलाख्यानाच्या समीक्षे-प्रमाणे, लेखकाच्या सरळ अर्थाच्या पलीकडे जाऊन अनेक ध्वनी अथवा सूचित अर्थ दाखवितात. त्यांनी सुचविलेला अर्थ वर्ण्य व्यक्ती अथवा परिस्थिती अथवा संदर्भ ह्यांच्याशी नेहमी संबंधित असतोच असे नाही; पण मूळ लेखकाला जे काही सांगावयाचे आहे त्यातील एकही मुद्दा अथवा त्या त्या ग्रंथातील एकही सौंदर्यस्थळ त्यांच्या नजरेतून सुटत नाही. एखादी कविता किंवा कलात्मक सर्जनाची एखादी कृती ह्यांचे आकलन किंवा मूल्यांकन करताना ते कधी चुकले आहेत, असे क्वचितच आढळून येते.

पाठक ह्यांच्या 'नर्मद अर्वाचीन गद्यपद्यनो प्रणेता' या ग्रंथात दोन प्रकारच्या अभ्यासांचा संग्रह आहे– १) 'नर्मदाशंकर कवी' व २) 'कवी नर्मदनुं गद्य'. त्यांपैकी पहिले 'नर्मदाशंकर कवी' हे १९३५ साली सुरतमध्ये 'के. पी. त्रिवेदी' ग्रंथमालेत दिलेले व्याख्यान आहे. दुसरे 'कवी नर्मदनुं गद्य' हे 'फार्बस गुजराती सभा' ह्या संस्थेच्या वतीने लेखकाने मुंबईत १९३८ साली दिलेल्या व्याख्यानांच्या मुद्द्यांवर

आधारित आहे. पहिल्या व्याख्यानात नर्मदचे कवी ह्या नात्याने मूल्यांकन केले आहे. दुसऱ्यात कवी नर्मदचे गद्यलेखक म्हणून केलेले मूल्यमापन आहे.

**अर्वाचीन गुजराती काव्यसाहित्य–**

'गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी'त-(आताची 'गुजरात विद्यासभा')-तर्फे रामनारायणभाईनी दिलेल्या ३ व्याख्यानांचा ह्यात संग्रह आहे. ह्या व्याख्यानांमध्ये कवितेच्या सामान्य स्वरूपाची बरीचशी चर्चा असून अर्वाचीन कवितेत व छंदात कोणते बदल झाले त्याचाही ऊहापोह आहे.

'अर्वाचीन काव्यसाहित्यनां वहेणो'– मुंबई युनिव्हर्सिटी द्वारा १९३८ साली प्रा. पाठकानी दिलेल्या ठक्कर वसनजी माधवजी व्याख्यानमालेतील ही व्याख्याने आहेत. ह्या पाच व्याख्यानांत लेखकाने अर्वाचीन कवितांचे आशय, शैली व स्वरूप ह्यांवर चर्चा केली आहे.

पाठक कोणतेही विधान करतात तेव्हा भरपूर उदाहरणे देऊन व कागदपत्रांचा पुरावा देऊन ते सिद्ध करतात. ज्या विधानाबाबत मतभेद असतो त्या बाबतीत तर फारच काळजीपूर्वक अभ्यास करून उदाहरणे व कागदपत्रे नमूद करून ते आपले विधान पटवून देतात. जो विषय मांडावयाचा त्याचा ते संपूर्णपणे व खोल अभ्यास करतात आणि त्यासाठी जी जी साधने उपलब्ध होऊ शकतात त्यांचा ते पूर्ण उपयोग करतात. ह्या सर्व व्याख्यानात आपल्याला पाठकांची वस्तुनिष्ठता, सूक्ष्मदृष्टी, मौलिक दृष्टिकोण, विचारांची स्पष्टता व ते व्यक्त करण्याची सहजता ह्या गुणांचे दर्शन घडते.

'प्राचीन गुजराती छंदो–ऐतिहासिक समालोचना' ह्या प्रबंधात प्रत्येक छंदाच्या रचनेच्या नियमांचे परीक्षण करून अपभ्रंश भाषेतील 'दोहा'पासून दयारामाच्या 'देशी' पर्यंतच्या जुन्या व मध्यकालीन गुजराती साहित्यातील छंदांची उत्क्रान्ती दाखविलेली आहे.

'बृहत्-पिंगल' हा गुजराती छंदःशास्त्रावरील श्रेष्ठ ग्रंथ आहे. कवी दलपतराम ह्यांनी आपल्या 'गुजराती पिंगल'[६] मध्ये रणछोडभाई उदयराम ह्यांनी आपल्या 'रण-पिंगल' आणि केशवलाल ध्रुव ह्यांनी आपल्या 'पद्यरचनाना प्रकार' आणि 'पद्यरचनानी ऐतिहासिक समालोचना' ह्या ग्रंथांत आपापल्या परीने गुजराती छंदःशास्त्राची चर्चा केलेली आहे; पण ती बहुतांशी जुन्या परंपरेवर आधारित आहे. ह्याच्या उलट रामनारायणभाई पाठक ह्यांनी आपल्या पुस्तकाच्या १५ प्रकरणात आपले स्वतःचे त्या विषयावरचे संबंधित व सुसंगत विचार मांडले आहेत आणि प्रत्येक प्रकरणाच्या शेवटी पुरवणीमध्ये त्यांच्या मताबद्दल उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक प्रश्नाची अथवा मताशी दूरान्वयाने संबंध असणाऱ्या मतांचीसुद्धा छाननी केली आहे. ह्या प्रकारचा दृष्टिकोण अगदी नवा असल्यामुळे व भारतातील

मुख्य मुख्य भाषांत उपयोगात आणलेल्या छंदांचाही विचार त्यात केलेला असल्याने; पाठकांनी आपला हा ग्रंथ देवनागरी लिपीत छापवून घेतला आहे. त्यामुळे भारताच्या इतर भाषांतील छंद:शास्त्राच्या विद्वानांना समजण्यास आणि त्यांच्या प्रगत सिद्धान्तांचे व पद्धतीचे मूल्यांकन करण्यास तो सहजसाध्य असा मानदंड झाला आहे.

श्री. पाठक ह्यांच्या पत्नी हिराबेन ह्याही कवयित्री आहेत. त्यांच्या कविता, 'परलोके पत्र' (दुसऱ्या जगातील व्यक्तीला लिहिलेली पत्रे) ह्या जरी बऱ्याचवेळा जुन्या पाल्हाळिक शैलीत लिहिलेल्या असल्या तरी एका विरहिणीच्या हृदयातील हृदयद्रावक वेदना त्यात फार सुंदर रीतीने प्रकट झाल्या आहेत. दुसऱ्या आणखी एका कवयित्रीने–गीता परीखने–आपल्या काव्यात पहिल्यावहिल्या अपत्याच्या दर्शनाने मातेच्या हृदयाला झालेला अद्‌भुत आनंद व प्रगाढ प्रेमाच्या भावना सुरेख चित्रित केल्या आहेत. पन्ना नायक या कवयित्रीने आपल्या कवितेत अपत्यहीन व विजोडपणाच्या दु:खाने व्यथित झालेल्या स्त्रीच्या हृदयामध्ये खोलवर रुजलेल्या वेदनांचे वर्णन केले आहे.

## स्वामी आनंद [ १८८७-१९७६ ]

संन्यास घेण्यापूर्वी त्यांचे नाव हिंमतलाल रामचंद्र दवे असे होते. ते गांधीजींचे निकटवर्ती सहकारी होते. त्यांनी गांधीजींचे 'नवजीवन' वृत्तपत्र बरीच वर्षे चालविले. त्यांनी प्रथमच साधी, व्यवस्थित, सुंदर छपाईची व उच्च गुणवत्तेची गुजराती पुस्तके स्वस्त किंमतीत देण्याचे फार मोठे काम अंगावर घेतले.

त्यांनी मराठीत आपल्या हिमालयाच्या प्रवासाचे वर्णन लिहिले आहे. त्यांच्या गुजराती ग्रंथांपैकी काही ग्रंथ पुढे दिल्याप्रमाणे आहेत– 'इशुनुं बलिदान', 'कुल-कथाओ', 'धरतीनुं लू', 'बरफरस्ते बदरीनाथ', 'नवलां दर्शन'.

**इशुनुं बलिदान–**

जसे काही प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीच पाहिल्याप्रमाणे इशुच्या शेवटच्या दिवसांचे यात केलेले वर्णन अत्यंत हृदयद्रावक आहे. त्यांनी 'कुल-कथाओ' आणि 'धरतीनुं लू' ह्या पुस्तकांत रेखाटलेली काही व्यक्तिचित्रे – उदाहरणार्थ : 'दादू-गवळी', 'मोनजी रूदर', 'महादेवथी मोटेरा' व खास म्हणजे 'धनीमा' ही अप्रतिम आहेत. त्यांची गद्यशैली पाहून स्वामी आनंद हे गुजराती गद्यशैलीचे फार मोठे अधिकारी लेखक होते, याची खात्री पटते.

## मुनि जिनविजयजी [ १८८८–१९७६ ]

ह्यांचा जन्म मेवाडमध्ये रूपाहेली येथे झाला. त्यांनी संसाराचा त्याग केला व ते जैन साधु झाले; पण नंतर जैन मठातील रूढिग्रस्त जीवनप्रणालीला

कंटाळून ते तेथून बाहेर पडले व संसारात येऊन शिक्षक व लेखकाचे काम करू लागले.

प्राचीन साहित्य, इतिहास व धार्मिक ग्रंथ यांचा त्यांनी गाढा अभ्यास केला व नंतर ते महात्मा गांधींच्या गुजरात विद्यापीठात दाखल झाले आणि गुजरात पुरातत्त्व मंदिरात कार्य करू लागले. सत्याग्रहाच्या चळवळीत ते मंदिर बंद होई-पर्यंत तेथे काम करीत होते.

कवी रवीन्द्रनाथ टागोरांच्या शांतिनिकेतनातही ते जैन साहित्य व इतिहासाचे प्रोफेसर होते आणि त्यानंतर कनैयालाल मुनशींच्या भारतीय विद्या भवनमध्येही प्रोफेसर म्हणून काम करीत होते.

मुनीजींचे पहिले पुस्तक १९१५ मध्ये प्रकाशित झाले. त्यानंतर त्यांनी जवळ जवळ वीस ग्रंथ लिहिले. त्यातले काही असे–'प्राचीन जैनलेखसंग्रह' २ भाग, 'जैन ऐतिहासिक गुर्जर काव्य संचय', 'प्राचीन गुजराती गद्य संदर्भ', 'प्रबंध-चिन्तामणि' (संस्कृत), 'पुरातन-प्रबंध-संग्रह', (संस्कृत) इ. ह्याशिवाय मुनीजींनी अंदाजे शंभर ग्रंथांचे संशोधन, संपादन व अनुवाद केले आहेत. त्यांचा पौर्वात्य विद्येचा अभ्यास व त्याबाबतचे संशोधन ह्यांबद्दल जर्मन ओरिएंटल सोसायटीने त्यांना आपले 'मानद' (मानार्ह) सभासद म्हणून निवडले.

## त्रिभुवन गौरीशंकर व्यास [ १८८८–१९७५ ]

श्री. व्यासांचे नाव त्यांच्या 'रतनबानो गरबो' ह्या काव्याबद्दल प्रसिद्ध आहे. लोकगीताच्या धर्तीवर त्यांनी ह्यांत 'जालियनवाला बागे'चे आख्यान वर्णिले आहे. त्याचा आरंभ अशा तऱ्हेचा आहे– 'अंग्रेजी राज्य तो आव्युं, आवीने फाव्युं, रतनबा' (ब्रिटिशांचे राज्य आले, राज्य आले व ते चांगले फोफावले–रतनबा)[७] हे गांधीजींच्या 'नवजीवन'मध्ये प्रकाशित होताच फार लोकप्रिय झाले. ह्याशिवाय व्यासांचे नाव, 'धन्य हो धन्य सौराष्ट्र धरणी'[८], ह्या काव्यामुळे फार गाजले. त्यांनी निरनिराळ्या ऋतूंचे सौंदर्य व वैभव ह्यांचे आणि सौराष्ट्रातील गीर जंगलाचे वर्णन करणाऱ्या फार सुंदर कविता लिहिल्या आहेत. त्यांनी लहान बालकांसाठी थोड्या; पण फारच सुंदर कविता व काही सुंदर उपहासात्मक कविताही लिहिल्या आहेत. त्यांनी कालीदासाच्या 'मेघदूता'चे आणि 'ऋतुसंहारा'चे गुजरातीत भाषान्तर केले आहे.

## किशोरलाल मश्रूवाला [१८७०–१९५२]

किशोरलाल घनश्यामलाल मश्रूवाला यांचा जन्म मुंबईला झाला. ते गांधीजींचे फार जवळचे घनिष्ट सहकार्यकर्ते व काही दिवस त्यांचे पर्सनल सेक्रेटरी

गांधीजींच्या हयातीतच त्यांनी गांधीजींच्या सर्व महत्त्वाच्या विषयांवरच्या विचारांचे सार एकत्र करून ते 'गांधी-विचार-दोहन' ( १४ भाग ) ह्या ग्रंथात प्रकाशित केले. त्यांनी गांधीजींच्या वधानंतर साडेचार वर्षे 'हरिजन' हे वृत्तपत्र चालविले. गांधीजींच्या विचारावरचे मश्रूवालानी केलेले भाष्य हे अगदी साधार व मुळास धरून असल्याचे सर्वांकडून मान्य करण्यात आले आहे.

किशोरलाल याना त्यांच्या लहानपणी एक फार मोठा अपघात झाला; पण त्यातून ते अद्भुत रीतीने बचावले. त्यांचे वडील इच्छाराम हे स्वामिनारायण संप्रदायाचे कट्टे अनुयायी असल्यामुळे त्यांनी किशोरलालना स्वामिनारायणास समर्पित केले. तेव्हापासून किशोरलाल आपल्या वडिलांच्या नावाच्या जागी घनश्यामलाल म्हणजे (सहजानंदस्वामी अथवा स्वामिनाराण यांचे मूळनाव) असे लावू लागले. त्यांच्यावर सहजानंदस्वामींच्या जीवनाचा व उपदेशाचा खोल ठसा उमटला होता. तसेच महात्मा गांधींवर त्यांची दृढ श्रद्धा होती. त्यांचे गुरू केदारनाथजी ज्यांनी त्याना आध्यात्मिक उपासना व आत्मशांतीचा मार्ग दाखविला. त्यांचाही त्यांच्यावर फार मोठा प्रभाव होता.

किशोरलालनी चार चरित्र-ग्रंथ लिहिले आहेत. १) 'राम अने कृष्ण' २) 'बुद्ध अने महावीर' ३) 'सहजानंदस्वामी' आणि ४) 'इशु खिस्त'

शिक्षणशास्त्रावरील ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत — 'केळवणीना पाया', 'केळवणी विवेक' व 'केळवणी विकास' ( यातील 'केळवणी म्हणजे शिक्षण' ) त्यांचे तत्त्वज्ञान-विषयक सहा ग्रंथ आहेत. 'जीवन शोधन', 'अहिंसा विवेचन', 'गीता मंथन', सत्यमय जीवन याने सत्यासत्य विचार', 'समूळी क्रांति', आणि 'संसार अने धर्म' (२ भाग). त्यांनी भगवद्गीतेचा छंदोबद्ध अनुवादही केला आहे.

किशोरलाल आपल्या चरित्रनायकांना अतिमानव ·अवतारी पुरुष समजत नाहीत. म्हणून नायकांच्या जीवनातील चमत्कार व अद्भुत गोष्टी वगळून त्यांनी त्यांच्या जीवनाचे परीक्षण 'मानव' ह्या दृष्टीने केले आणि ते महापुरुष व मानवांना पूज्य कसे झाले. ते दाखविले आहे. ही चरित्रे बुद्धिवाद व तार्किक विश्लेषण ह्यांवर आधारित आहेत.

किशोरलालांच्या शिक्षणशास्त्रावरील पुस्तकात शिक्षणशास्त्राच्या मूलभूत समस्यांची चर्चा केली आहे. महात्मा गांधी अथवा इतर शिक्षणतज्ज्ञ ह्यांनी मांडलेल्या सिद्धान्तांचे अथवा दृष्टिकोणाचे अनुकरण न करता ते प्रत्येक गोष्टीचा स्वतः स्वतंत्रपणे विचार करतात. ते असे गृहीत धरतात की, शिक्षणाचा खरा हेतू मनुष्याची विवेकशक्ती जागृत करून तिचा विकास करणे हा आहे. खऱ्या शिक्षणतज्ज्ञाने व्यक्ती-व्यक्तीमध्ये ऐक्याची भावना उत्पन्न करून ती वाढविण्यास इतरांना शिकविले पाहिजे आणि त्यासाठी प्रत्येक व्यक्तीने अहंतेवर व ममत्वावर

ताबा ठेवून समष्टीच्या सुखाचा व विकासाचा प्रयत्न केला पाहिजे, असे त्यांचे मत होते.

नि:स्वार्थ भावनेने व परोपकारी वृत्तीने दुसऱ्यासाठी झटणे म्हणजेच आपण स्वत: सिद्धी प्राप्त करणे आहे, हा किशोरलालांच्या विचारांचा मुख्य पाया आहे. त्यांच्या दृष्टीने 'ज्ञान' हाच चौथा व अंतिम पुरुषार्थ[१] आहे, 'मोक्ष' हा नव्हे. ते असेही म्हणतात की, मनुष्याला स्वत:ची अशी कोणतीही मातृभाषा अथवा पितृभाषा जन्मापासून नसते तर बाळापणापासून जी भाषा त्याच्या कानावर पडते—तो ज्या भाषेच्या संपर्कात येतो, तीच त्याची भाषा होते. ह्याच दृष्टीने शिक्षणाचे माध्यम मातृभाषा असावे, ह्या समस्येचा विचार करताना राष्ट्रिय एकतेच्या दृष्टीने विचार करून त्यांनी असे भारपूर्वक प्रतिपादन केले आहे की, मातृभाषा ही शिक्षणाचे माध्यम असण्यापेक्षा सगळ्या राष्ट्रांची कोणतीही एकच भाषा माध्यम म्हणून मानली जावी. लिपी ही त्यांच्या दृष्टीने फक्त एक साधन आहे, त्याबद्दल आग्रह धरू नये. निरनिराळ्या राज्यांतील लोकांमध्ये व निरनिराळ्या जातींमध्ये सलोखा स्थापन करण्यासाठी आपण भाषा अथवा लिपीचा आग्रह न धरता तिचा त्याग करण्याची आपली तयारी असली पाहिजे आणि किशोरलालांच्या मतांप्रमाणे तर भाषेपेक्षा लिपीचा आग्रह न धरणे हे अधिक योग्य आहे. किशोरलाल हे इतिहासाच्या अभ्यासास दुय्यम महत्त्व देतात, कारण त्यांच्या मते संपूर्ण भूतकाळाचा इतिहास संभाळून ठेवणे फार अवघड आहे आणि इतिहासाचे असे अपुरे संभाळून ठेवलेले काही भाग हे निरनिराळ्या देशांच्या लोकांच्या मार्गात आडवे येतात व त्यांच्यात दुरावा उत्पन्न होतो. आजपर्यंत कोणाही व्यक्तीने अथवा राष्ट्राने इतिहासाचे ज्ञान प्राप्त करून त्यापासून धडा घेतलेला नाही.

किशोरलाल ह्यांचे विचार असे क्रान्तिकारक आहेत; पण ते बुद्धिवादावर अधिष्ठित आहेत. किशोरलाल हे एक असे गृहस्थ आहेत की, ज्यांचे ध्येय केवळ भारताची भक्कम स्थिरता व प्रगती एवढेच नव्हे तर त्याचबरोबर सर्व जगाची शांती व एकता ही त्यांना तितकीच महत्त्वाची वाटते. म्हणूनच त्यांची मते आपल्याला पुन्हा पुन्हा विचार करण्यास प्रवृत्त करतात.

किशोरलालनी तत्त्वज्ञानविषयक क्षेत्रात फार मोठी कामगिरी केलेली आहे. ह्या विषयावरच्या त्यांच्या सहा पुस्तकांत आपली जीवनदृष्टी व आचार चिकित्सकपणे व निष्पक्षपातीपणाने तपासण्यास त्यांनी वाचकांस प्रवृत्त केले आहे. ते बुद्धिवादी विचारक असल्यामुळे असे म्हणतात की, सर्व जीवनविषयक संशोधनाच्या अंती असेच आढळून येईल. जे समाज किंवा कुटुंबे आळस झाडून, पैसा व स्त्री ह्यांच्या बाबतीत संयम पाळून, खाणे-पिणे व व्यक्तिगत आरोग्य ह्या बाबतीतले नियम बरोबर पाळतील आणि एकंदरीत संपूर्ण विचारपूर्वक आपले वर्तन ठेवतील, तेच

समाज व कुटुंबे सुखी होतील आणि पिढ्यान् पिढ्या त्यांची प्रगती होत राहील.[१०] अर्थातच हा विचार खरा आहे की नाही, हे त्यांनी आपली दरेक श्रद्धा, कल्पना अथवा वृत्ती ह्यांची नीट पारख करून ठरविलेला आहे, असे म्हणता येणार नाही.

किशोरलाल प्रथम पंक्तीचे असे एक विचारक आहेत की, ज्यांनी सतत बुद्धी जागृत ठेवून, स्वतंत्रपणे विचार करून आचरण करण्याची तपश्चर्या अंगीकारिली होती.

आदर्शवाद आणि व्यावहारिकता ह्यांचा समन्वय किशोरलाल ह्यांच्या विचारसरणीत आहे. धर्मातील मूलभूत तत्त्वांचा विचार ते अवश्य करतात; पण जन्माआधीच्या व मृत्यूनंतरच्या परलोकातील जीवनाबद्दलच्या गूढ चिंतनात ते पडत नाहीत. ह्या जगातील मनुष्याचे जीवन शांतिमय व्हावे, ह्यासाठी त्यांच्या आंतरिक व बाह्य जगात कसा सुसंवाद असावा ह्याच एका विषयावर त्यांचे सर्व विचार व तत्त्वज्ञान केंद्रित झाले होते, ह्या दृष्टीने पाहिले असता पंडित-युगातील गोवर्धनराम व आनंदशंकर ह्यांच्यासारख्या व्यवहारी व आदर्शवादी लेखकांतच किशोरलाल यांची गणना करावी लागेल.

पंडित-युगातील विचारकांप्रमाणेच किशोरलाल समाजसुधारक व व्यवहारी आदर्शवादी आहेत; पण इतर विचारक मनुष्यमात्राचे केवळ सामाजिक समस्यांबद्दलचे कर्तव्य काय आहे ह्याचा विचार करतात तर किशोरलाल हे भारताच्या राजकीय समस्यांबाबतही मनुष्याचे कर्तव्य काय आहे, ह्याचा मुख्यत्वे विचार करतात. १९४७ साली झालेल्या भारताच्या फाळणीने त्यांच्यावर तीव्र आघात झाला. त्यांच्या ' समूळी क्रांति ' ह्या प्रबंधात त्यांनी भारताच्या उरलेल्या भागात एकता कशी टिकवून धरता येईल, ह्याची चर्चा केली आहे. निधर्मी भारतात हिंदू बहुसंख्य असल्यामुळे त्यांची वृत्ती व वर्तन ह्यावरच शेवटी भारताची लोकशाही टिकून राहील अथवा तिचा लोप होईल, असे ते मानीत. त्यांच्या दृष्टीने लोकशाही राज्यपद्धती ही सर्वश्रेष्ठ राज्यपद्धती आहे, म्हणून त्यांनी आपल्या प्रबंधात हिंदूंच्या मूलभूत धार्मिक श्रद्धांचा सखोल विचार केला आहे. हिंदूंच्या ह्या शेकडो वर्षे चालत आलेल्या धार्मिक रूढी व श्रद्धांनी हिंदू लोकांचे मन आणि त्यांची जीवनाकडे पाहण्याची दृष्टी संकुचित झालेली आहे, असे त्यांना वाटे. म्हणून त्यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, ह्यांत आमूलाग्र परिवर्तन घडवून आणलेच पाहिजे आणि ते कसे साधता येईल, ह्याचाही विचार त्यांनी ह्या प्रबंधात विशदपणे केला आहे.

गोवर्धनराम व आनंदशंकर ह्या पंडित-युगातील लेखकांप्रमाणेच किशोरलालनीसुद्धा फक्त व्यावहारिक समस्यांचाच विचार केलेला नाही, तर शुद्ध बुद्धिवादावर आधारित अशा तत्त्वज्ञानावरील प्रश्नांचाही ते शुद्ध बुद्धिवादाने विचार करतात. पंडित-युगातील इतर लेखकांनी त्यांच्या वेळच्या जुन्या विचार-

सरणीच्या लोकांत व जहालमतवादी लोकांत जितकी एकता साधता येईल तितकी साधून हिंदू समाजात नवजीवन आणण्यासाठी व्यक्ती व समाज ह्यांचा अन्योन्य संबंध कसा असावा, ह्या बाबतीत आपले विचार पुरातन धर्मग्रंथांच्या परिभाषेत प्रकट केले आहेत; पण किशोरलालनी जुन्या धर्मशास्त्राच्या परिभाषेचे असे समर्थन करणे व त्यांचा अर्थ स्पष्ट करणे हे सर्व झुगारून देऊन पहिल्यापासून शेवटपर्यंत स्वतंत्र विचारक म्हणूनच आपल्या रूढी व रीतिरिवाजांचे मुळापासून परीक्षण केले आहे आणि तसे करताना कोणाची मने दुखविली जातील किंवा कोणाच्या स्वाभिमानाला धक्का लागेल ह्याची जराही फिकिर न करता त्यांनी स्पष्ट व नि:संदिग्ध भाषेत आपल्याला काय योग्य वाटले ते लिहिले आहे. असे करताना त्यांच्या हातून गांधीजी किंवा काकासाहेब कालेलकरही सुटलेले नाहीत.

गोवर्धनराम व किशोरलाल ह्या दोघांनाही आपले आदर्श आचरणात आणण्याची उत्कंठा होती. फक्त गोवर्धनराम आपल्या वाचकांना कुशलतेने व सामोपचाराने आपल्याकडे वळवून घेत, तर क्रांतिकारक किशोरलाल आपले खरे मत स्पष्टपणे व सडेतोडपणे वाचकांपुढे मांडत. गोवर्धनराम सनातनी व समाज-सुधारक ह्या दोघांनाही आपल्या बाजूला आणू पाहत, तर किशोरलाल समाजातील सनातनी लोकांच्या विरोधाला उघडपणे तोंड देत असत.

किशोरलाल ह्यांच्यात मूलगामी दृष्टी आणि स्पष्ट व तर्कसंगत विचारशक्ती होती. त्यांची लेखनशैली साधी, अचूक, सरळ व उदात्त अशी होती. फक्त गुजरातच्याच नव्हे तर साऱ्या भारताच्या वास्तववादी विचारवंतांमध्ये त्यांची गणना करावी लागेल.

## धनसुखलाल महेता [ १९८०–१९७४ ]

धनसुखलाल कृष्णलाल महेता ह्यांचा जन्म सुरत येथे झाला. त्यांना गुजरातेतील आद्य लघुकथाकार असे म्हणता येईल. कथेतील पात्रांचा मनोविश्ले-षणात्मक संघर्ष रंगविणारे ते एक पहिल्या प्रतीचे लेखक आहेत.

धनसुखलालनी नाटके, कलासमीक्षा, पुस्तक-परीक्षण, आत्मकथा व विनोदी निबंध असे अनेक प्रकारचे लेखन केले आहे. त्यांनी ज्योतींद्र दवे ह्यांच्या सहयोगाने 'अमे बधां' ही विनोद-प्रचुर कादंबरी लिहिली. 'भद्रंभद्र' नंतरची ही पहिलीच विनोदी कादंबरी होय. तसेच त्यांनी गुलाबदास ब्रोकर ह्यांच्या सहयोगाने 'धूम्रसेर' ह्या गुलाबदास ब्रोकर ह्यांच्या एका गोष्टीचे नाटयरूपान्तर केले.

धनसुखलाल महेता जीवनातील करुण व विनोदी प्रसंग सारखेच समर्थपणे टिपण्यात कुशल आहेत. त्यांची लेखनशैली साधी व सरळ आहे. त्यांची विनोद-बुद्धी सूक्ष्म, मार्मिक, सुसंस्कृत व द्वेषबुद्धीपासून अलिप्त आहे.

## महादेव हरीभाई देसाई [ १८९२–१९४२ ]

ह्यांनी आपले जीवन महात्मा गांधीना संपूर्णपणे समर्पित केले होते. ते एक उत्तम प्रतीचे अनुवादकार होते. नरहरि परीख यांच्या सहयोगाने त्यांनी रवीन्द्रनाथ टागोरांच्या 'चित्रांगदा', 'विद्या अने अभिशाप' आणि 'प्राचीन साहित्य' ह्या पुस्तकांचे गुजराती रूपान्तर केले. त्याचप्रमाणे महादेव देसाईनी शरच्चंद्र चतर्जींच्या 'विराज वहू' व दुसऱ्या काही बंगाली कथांचे गुजरातीत भाषान्तर केले. तसेच मोर्लेचे 'ऑन कॉम्प्रोमाइज' व नेहरूंचे 'दि ऑटोबॉयोग्राफी ऑफ जवाहरलाल नेहरू' ह्या दोन इंग्लिश पुस्तकांचे गुजरातीत भाषान्तर केले. त्यांनी बारडोली सत्याग्रहाचा इतिहासही लिहिला. त्यांनी 'वीर वल्लभभाई' आणि 'बे खुदाई खिदमतगारो' ही दोन लहान चरित्रे लिहिली व गांधीजींच्या अनेक गुजराती लेखांचा आणि 'सत्यना प्रयोगो' ह्या गांधीजींच्या आत्मकथेचा इंग्लिशमध्ये अनुवाद केला; पण त्यांनी गुजराती भाषेला दिलेली मोलाची देणगी म्हणजे त्यांची 'डायरी' होय. तिचे १३ भाग आहेत. भारताच्या इतिहासाच्या दृष्टीने महादेवभाईंची 'डायरी' (रोजनिशी) फार महत्त्वाची आहेच; पण त्याशिवाय ह्या सुंदर पुस्तकात आपल्याला तीन मोठ्या विभूतींची उत्कृष्ट व्यक्तिचित्रे पाहावयास मिळतात. ह्यातील पहिली विभूती म्हणजे ह्या शतकातील अद्वितीय व्यक्ती महात्मा गांधी, दुसरी विभूती म्हणजे निष्ठावान, निष्कपट व चतुर असे वल्लभभाई पटेल व तिसरी विभूती म्हणजे मृदुभाषी, निरभिमानी व अत्यंत सुसंस्कृत असे ह्या डायरीचे लेखक स्वतः महादेवभाई.

## इन्दुलाल कनैयालाल याज्ञिक [ १८९२–१९७२ ]

हे आपल्या दोन अत्यंत उत्तम मासिकांबद्दल प्रख्यात आहेत. ती अशी— 'नवजीवन अने सत्य' (१९१५) आणि 'युगधर्म' (१९२२). त्यांच्या 'कुमारना स्त्रीरत्नो' या ग्रंथाची गद्यशैली वाखाणण्यासारखी आहे आणि त्यांची पाच भागात लिहिलेली 'आत्मकथा' (१९५५–१९७१) जरी उत्तम साहित्यिक शैलीचा नमुना नसली तरी त्यात १८९२–१९२१ ह्या काळातील गुजरातच्या इतिहासाचा सुंदर आलेख आपल्याला पाहावयास मिळतो. इंदुलाल हे स्वतः त्या वेळच्या सर्व प्रमुख चळवळींशी निगडित असल्यामुळे असे पुस्तक लिहिण्याला त्यांच्या इतकी योग्य अधिकारी व्यक्ती सापडणेच कठीण. त्यांनी लिहिलेली काही व्यक्तिगत संस्मरणेही फार उत्कृष्ट आहेत. आपल्या पत्नीचे-कुमुदचे-त्यांनी लिहिलेले संस्मरण म्हणजे त्यांनी आपल्याच स्वभावाचे केलेले अत्युत्कृष्ट पृथक्करण आहे.

## रमणलाल देसाई [ १८९२–१९५४ ]

रमणलाल वसंतलाल देसाई ह्यांचा जन्म जुन्या बडोदे संस्थानात सिनोर

येथे झाला. बाल्यकाळात व तरुणवयात त्यांना कुस्ती खेळण्याचा आणि नाटकात कामे करण्याचा नाद होता. काव्यमाधुर्य, फारशी भाषा आणि बडोद्याचा श्रेयसाधक अधिकारी वर्ग ह्या तीन गोष्टींचा त्यांच्यावर फार प्रभाव पडला होता.

रमणलालनी कादंबऱ्या, लघुकथा, कविता, नाटके, निबंध आणि आत्मकथा असे अनेक प्रकारचे साहित्य निर्माण केले; पण ते कादंबरीकार म्हणून सर्वात अधिक प्रख्यात आहेत.

त्यांनी आपल्या लेखनाच्या कारकीर्दीच्या सुरुवातीला 'महाराणा प्रतापनुं चरित्र' आणि कालिका देवीचे पीठ म्हणून ऐतिहासिक दृष्टीने अतिशय महत्त्वाच्या अशा पावागढ किल्ल्याचे वर्णन करणारे पुस्तक अशी दोन पुस्तके लिहिली; पण त्यांचे साहित्यक्षेत्रातील पहिले पदार्पण म्हणजे १९२० मध्ये त्यांनी लिहिलेले 'संयुक्ता' हे नाटक. पाच वर्षांनंतर त्यांनी आपले दुसरे नाटक 'शंकित हृदय' प्रकाशित केले; पण त्यांनी गुजराती साहित्यरसिकांचे लक्ष आपल्याकडे खरे वेधून घेतले ते पुढील तीन कादंबऱ्यांनीच होय–' जयंत ' (१९२५) ' शिरीष ' (१९२७) आणि ' कोकिला ' (१९२९). ' सयाजी विजय ' ह्या बडोद्याहून प्रकाशित होणाऱ्या दैनिकातून वाचकांना ह्या कादंबऱ्या वार्षिक भेट म्हणून प्रकाशित झाल्या त्या वेळी त्यांच्याकडे फारसे कोणाचे लक्ष गेलेच नाही; पण मूळशंकर सोमनाथ भट्ट ह्यांनी नंतर त्या कादंबऱ्या जेव्हा पुन्हा सुबकरीतीने छापून व त्यांना सुबकबांधणी आणि नवे स्वरूप देऊन प्रसिद्ध केल्या तेव्हा रमणलाल हे मुनशींच्या नंतरचे पहिलेच श्रेष्ठ कादंबरीकार म्हणून ओळखले जाऊ लागले. मूळशंकर सोमनाथ भट्ट ह्यांनी सुंदर स्वरूपात कादंबऱ्या व कवितासंग्रह प्रसिद्ध करण्याचे काम सर्वात प्रथम सुरू केले.

त्या नंतरच्या दशकात एकामागून एक कादंबऱ्या लिहून रमणलाल लोकप्रियतेच्या शिखरावर पोहोचले. मुनशींनी आपल्या कादंबऱ्यांनी लोकांना दिपवून टाकले होते; पण रमणलाल ह्यांचे नाव घरोघरी पोहोचून प्रशंसेला पात्र झाले व त्यांच्या पुस्तकांनी विक्रीचा उच्चांक गाठला.

रमणलालांच्या कादंबऱ्यात सुखी, उत्साही आणि समाधानी वैवाहिक जीवन, उदात्त आदर्शवाद, दररोजचे सामान्य जीवन, उत्तम प्रतीचा विनोद आणि प्रवाही, निर्दोष व प्रासादिक गद्यशैली ह्यांचे आपल्याला उत्तम दर्शन घडते.

मुनशींनी मुख्यत: ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या तर रमणलालनी मुख्यत: सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या.

मुनशी बुद्धिवैभवाने व भाषेने आपणाला दिपवून टाकतात, तर रमणलाल माधुर्याने व नम्रतेने वाचकाला आपलेसे करतात. मुनशींची पात्रे भव्य व शक्तिशाली भूतकाळातील आहेत, तर रमणलालांची पात्रे त्या काळच्या उच्च पातळीवरील मध्यमवर्गातील आहेत. मुनशींच्या नायिका गर्विष्ठ व स्वतंत्र वृत्तीच्या

आहेत, तर रमणलालांच्या नायिका ह्या नाजूक व सुंदर असून मधुरता व चारुतेच्या मूर्तीच आहेत. मुनशी गुर्जर देशाचे एक वेळचे वैभव पुन्हा स्थापित करू पाहतात, तर रमणलाल हे गांधीयुगातील गुजरातच्या मुख्य राजकीय व सांस्कृतिक प्रवाहाची पार्श्वभूमी निर्माण करतात. रमणलाल आपल्या कादंबऱ्यांत काही दिव्य, भव्य, अप्रतिम, अद्‌भुत असे आणण्याची अभिलाषा धरीत नाहीत. त्यांची कादंबरी एखाद्या सुशिक्षित सामान्य गुजराती मनुष्याच्या जीवनाभोवती गुंफलेली असते. त्यांच्या कादंबऱ्यांचे मुख्य लक्षण म्हणजे समकालीनता आणि त्यांचे मुख्य गुण म्हणजे साधेपणा व वाचनीयता हे होत.

मुनशींच्या कादंबऱ्यांत त्यांच्या कल्पनाशक्तीला जशा काही मर्यादा आहेत तशाच रमणलाल ह्यांच्या कल्पनाशक्तीलाही मर्यादा आहेत. मुनशींप्रमाणेच रमणलाल ह्यांचे नायक व नायिका ह्यांच्यात तोच-तो-पणा आढळून येतो. रमणलाल ह्यांच्या कथा अनेकदा गूढार्थाने भरलेल्या असतात व त्यामुळे त्या सत्यकथा वाटत नाहीत. रमणलाल ह्यांच्या वर्णनाचा प्रवाह सरळपणे व सहजपणे वाहणारा आहे; पण केव्हा केव्हा तो प्रवाह फारच मंदपणे वाहतो किंवा लेखकाच्या विचारांनी, निरीक्षणाने किंवा त्यांच्या योग्य अथवा अयोग्य वेळी केलेल्या टीकेने अनेक वेळा अडवला जातो. त्यांच्या कादंबऱ्यांची कथानके सुंदर रीतीने गुंफलेली असली तरी कधी कधी अविश्वसनीय व असंभवनीय वाटतात.

विश्वनाथ भट्ट ह्यांनी रमणलालना 'युगमूर्ति वार्ताकार' असे संबोधले आहे. ह्याचा अर्थ 'आपल्या युगाची शक्ती–तेज–आपल्या कादंबऱ्यांत प्रत्यक्ष प्रतीत करणारा कादंबरीकार.' रमणलालच्या कादंबऱ्यांत त्या काळच्या विचारांचे व आदर्शांचे प्रतिबिंब पडलेले दिसून येते. गांधीयुगात त्यांनी आपल्या 'दिव्यचक्षु', 'ग्रामलक्ष्मी' व 'भारेलो अग्नी' ह्या कादंबऱ्यांत शरीरस्वास्थ्य (Physical culture), अहिंसाधिष्ठित असहकार, अस्पृश्यता-निवारण, हिंदू-मुसलमान-एकता, ग्राम-सुधारणा व दहशतवादाची निष्फळता इत्यादी त्या काळच्या चळवळींचे सुंदर चित्र रेखाटले आहे. भारत स्वतंत्र झाल्यानंतरच्या त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या 'झंझा-वात' व 'प्रलय' ह्या कादंबऱ्यांत त्यांनी जातीय दंगली, काळा बाजार, भ्रष्टाचार, सत्तेसाठी चाललेली धडपड, खोटा अभिमान, ढोंगीपणा व अनीती वगैरे गोष्टींनी लोकांच्या मनात उत्पन्न झालेली घोर निराशा आणि त्यांचा झालेला भ्रमनिरास व मोहनिरास ह्यांचे सुंदर चित्र रेखाटले आहे.

ह्या दोन कादंबऱ्यांपैकी 'प्रलय' ह्या कादंबरीच्या कथानकाचा विस्तार फार मोठा आहे. ह्या कादंबरीच्या कथानकाची रचना फार सुंदर आहे. बुद्धिनिष्ठ विज्ञानाची कास न सोडता एक सुंदर संभवनीय कथानक ह्यात निरूपिले आहे.

तसेच विज्ञान व राजकारण जर नालायक लोकांच्या हाती गेले तर अनेक गटात विभागल्या गेलेल्या ह्या जगात सरतेशेवटी मनुष्याचे पृथ्वीवरून समूळ उच्चाटन होईल व त्याचे नावनिशाणही उरणार नाही, असे त्यांनी विशद करून दाखविले आहे. ह्याचे कथानक इ. स. २००६ पर्यंत विस्तारलेले आहे. त्या कथानकाचे घटनास्थळ प्रत्यक्ष हे जगच आहे. रमणलाल ह्यांची मीराबाईंच्या जीवनावरील 'बाला जोगण' ही कादंबरीसुद्धा उल्लेखनीय आहे.

रमणलाल ह्यांची नाटके 'संयुक्ता' व 'शंकित हृदय' ही रंगमंचावर चांगलीच प्रभावी व लोकप्रिय ठरली. त्यांनी अनेक एकांकिका व लघुकथाही लिहिल्या आहेत; पण त्यात काही विशेषसे उच्च प्रतीचे गुण अथवा वैशिष्टचे नाहीत.

'निहारिका' हा रमणलाल ह्यांचा कविता-संग्रह आहे. ह्यात काही सुंदर गीते आहेत. ह्या कवितात भाषा व भावना ह्यांचा सुंदर संगम झालेला आहे; पण ह्यात कवी नानालाल ह्यांचे अनुकरण केलेले आहे. रमणलाल ह्यांची आत्मकथा 'गईकाल' ह्यामध्ये त्यांच्या जीवनातील पहिल्या सोळा वर्षांमधल्या घटनांचे वर्णन आहे. त्यावरून आपल्याला त्या काळातील बरीच मनोरंजक माहिती मिळते. 'मध्याह्नना मृगजळ' हीसुद्धा एक आत्मकथाच आहे.

'तेजचित्रो' ही भूतकाळातील व त्या वेळच्या वर्तमान काळातील काही व्यक्तींची सुंदर शब्दचित्रे आहेत.

## धुमकेतू [ १८९२–१९६५ ]

गौरीशंकर गोवर्धनराम जोशी—'धुमकेतू' ह्या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांचा जन्म सौराष्ट्रातील वीरपूर नावाच्या लहानशा खेडेगावात झाला. लहान पायावर लेखनाची सुरुवात करून ते पुढे यशस्वी लेखक झाले व त्यांनी जीवनाची बरीच वर्षे आपल्या लेखन व्यवसायावरच आपली उपजीविका चालविली.

धुमकेतूनी लघुकथा, कादंबऱ्या, ललित चिन्तनात्मक निबंध, एकांकिका, जीवनचरित्रे व आत्मकथा हे साहित्यप्रकार लिहिले आहेत; पण ते उत्तम लघुकथा-लेखक म्हणून अधिक प्रख्यात आहेत. एकंदर गुजराती लघुकथांचा विस्तारच असा आहे. गुजरातेत रणछोडभाई उदयराम ह्यांनी १८६६ मध्ये 'प्रास्ताविक कथा समाज' प्रकाशित केले. कवी दलपतरामनी १८७० मध्ये बोधपर कथांचा-एक संग्रह 'तार्किक बोध' ह्या नावाने प्रकाशित केला होता. काही वर्षांनी फ्रामजी बोमनजी पटेल ह्यांनी 'गुजरात जनवार्ता', 'गुजरात अने काठियावाड देशनी वार्ता', 'राजबीर कथा' आणि 'स्त्री चरित्र' हे चार कथासंग्रह प्रकाशित केले.[११]

नारायण हेमचंद्र व अमृतलाल पढियार ह्यांनीही लघुकथा लिहिल्या. तसेच

राममोहनराय जसवंतराय, रणजितराम बावाभाई, शिवुभाई पंडित, डाह्याभाई पी. पटेल व दुसऱ्या कित्येक लेखकांनी कथा लिहिल्या. त्यांच्या कथा 'चंद्र', 'सुंदरी सुबोध', 'वार्तावारिधि', 'साहित्य' आणि 'समालोचक' ह्या मासिकांतून प्रकाशित केल्या जात होत्या.

वीसाव्या शतकाच्या सुमारास राममोहनराय यांच्या कथांचा संग्रह 'रसीली वार्ताओ'–भाग २ प्रसिद्ध झाला होता. मणिलाल छबाराम भट्ट ह्यांनीही 'काठियावाडनी जुनी वातो' हा कथासंग्रह प्रकाशित केला होता. भोगींद्रराव रतनलाल दिवेटिया ह्यांनीही 'त्रण फकीर' आणि 'नामदार सर खेडूत' ह्या कथा लिहिल्या होत्या व टॉलस्टॉयच्या तीन कथांची रूपान्तरे केली होती.

पण ह्या सर्व कथा अगदी प्राथमिक स्वरूपाच्या होत्या. त्यांची शैली अतिशय ओबडधोबड होती. ह्या गोष्टी म्हणजे घडलेल्या घटनांची नुसती नोंदच होती व जवळ जवळ प्रत्येक कथेतून कोणत्या ना कोणत्या प्रकारचे तरी नीतितत्त्व वाचकांपर्यंत पोहोचविलेले होते.

१९१३ मध्ये 'मलयानिल' – कंचनलाल वासुदेव महेता (१८९२–१९१९) ह्यांनी लघुकथा लिहिण्यास सुरुवात केली आणि त्याच वर्षी धनसुखलाल महेतांची लघुकथा 'प्रतिबिंब अने छाया' प्रकाशित झाली. त्याच सुमारास 'नारद' – मटुभाई कांटावाला आपल्या लघुकथा लिहू लागले व तेव्हापासून गुजराती लघुकथेला स्वतःचे असे खरे स्वरूप प्राप्त झाले.

लघुकथा म्हणजे संक्षिप्त कादंबरी नव्हे किंवा एखाद्या प्रसंगाचे फुगवलेले स्वरूप नव्हे किंवा नुसते रेखाचित्रही नव्हे. उलट लघुकथा हा साहित्यातील एक स्वतंत्र प्रकारचा कलेचा आविष्कार आहे. त्याला एक स्पष्ट आरंभ, मध्य व अंत असतो. हे सर्वप्रथम मलयानिल ह्यांनी १९१८ मध्ये लिहिलेल्या 'गोवालनी' (गवळण) ह्या आपल्या परिपूर्ण लघुकथेच्या द्वारे सिद्ध करून दाखविले.

'मलयानिल' ह्यांच्या समकालीन लघुकथालेखकांमध्ये धनसुखलाल कृष्णलाल महेता व कनैयालाल मुनशींचे नाव, मलयानिल ह्यांच्याबरोबर घेतलेच पाहिजे. इतिहासाच्या कालानुक्रमाने पाहता धनसुखलाल ह्यांची 'प्रतिबिंब अने छाया' (१९१३) ही कथा 'गोवालनी' (१९१८) ह्या कथेच्या फार पूर्वी प्रसिद्ध झाली होती, तसेच धनसुखलाल ह्यांच्या कथांची संख्याही बरीच मोठी आहे; पण त्यांपैकी बऱ्याच कथा भाषान्तरे अथवा रूपान्तरे आहेत.

मुनशींच्या लघुकथांत सामान्य मध्यमवर्गातील लोकांचे जीवन चितारलेले आहे. त्या कथांच्या द्वारे त्यांनी त्यांच्या काळच्या समाजातील अज्ञान, जुनेपणा, रूढिग्रस्तपणा ह्यांच्यावर व्यंगपूर्ण टीका केली आहे; पण पुढे मुनशी कादंबरी व नाट्य-लेखनाकडे वळल्यामुळे त्यांनी लघुकथा लिहिण्याचे सोडून दिले. त्यांच्या

'शामळशानो विवाह', 'अग्निहोत्री', 'गोमती दादानुं गौरव' आणि 'मारी कामचलाऊ धर्मपत्नी' ह्या कथांद्वारे मुनशींची लघुकथा-लेखक म्हणून विशिष्ट कला प्रकट झाली आहे.

**धुमकेतूचे वैशिष्ट्य—**

गांधी-युगात गुजराती लेखक जेव्हा ग्रामीण जीवनाचे चित्रण करण्याकडे वळले तेव्हाच धुमकेतूनी १९२६ मध्ये आपल्या 'तणखा मंडळ'चा पहिला भाग प्रसिद्ध केला. गुजराती साहित्याला त्यांनी पहिल्यानेच आपली लघुकथारूपी रत्ने खूप मोठ्या प्रमाणात अर्पण केली. त्यांनी आपल्या लघुकथांच्या वीस खंडांत ग्रामीण जीवनाचे सुंदर चित्र व सखोल जाणीव खऱ्याखुऱ्या सहानुभूतीने रंगविले आहे. कित्येक वेळा त्यांनी ग्रामीण जीवनाच्या चित्रणात अद्‌भुतरम्यताही आणली आहे. गुजराती लघुकथेला मध्यम वर्गाच्या वर्णनाच्या क्षेत्रातून मुक्त करून तिला समाजातील अगदी खालच्या स्तरावरील लोकांपर्यंत त्यांनी पोहोचविली. धुमकेतू-प्रमाणे अद्यापि कोणत्याही लेखकाने समय, स्थळे, पात्रे व परिस्थिती ह्यांच्या बाबतीत इतकी विविधता आणली नव्हती. त्यांच्या कथांत शिकारी, रेल्वे कर्मचारी, भाजीवाले, डोंगराळ प्रदेशातील लाकूडतोडे, वेश्या, चांभार, पाणी भरणारे ह्या पात्रांपासून ते साधे, ;सभ्य उदात्त मनाचे ब्राह्मण व उच्चभ्रू लोकांपर्यंतची पात्रे रंगविलेली आहेत. तसेच धुमकेतूनी मध्ययुगातून, इतिहासातून, पौराणिक कथांतून आणि आपल्या स्वतःच्या भोवतालच्या समाजातून आपली पात्रे निवडली आहेत. त्यांना आपल्या लघुकथांचे बीज शहराच्या चौकात, खेडेगावाच्या सीमेवर, पर्वतांच्या उतरणीवर आणि नदीकिनाऱ्यावर सापडले. गुजराती लेखकांत धूमकेतूनींच पहिल्याने ग्रामीण जीवनाची सुंदरता व त्यातील काव्य लोकांच्या नजरेस आणले आणि ग्रामीण लोकांच्यात असलेले धैर्य, उदारता, नैतिक शक्ती, एकता इत्यादी व त्यांचे निरनिराळे छंद ह्यांचे दर्शन घडविले.

जीवनाच्या ह्या उच्च आदर्शवादी व काव्यमय चित्रणाव्यतिरिक्त धूमकेतूनी समाजसुधारणेकडे लक्ष ठेवून वास्तववादी चित्रेही रंगविली आहेत.

धुमकेतू कथेची रचना फार सुंदर करतात; पण मनाने ते ऊर्मिशील कवी असल्याने त्यांच्या कथा भावनोत्कटतेने भरलेल्या असतात. कधी कधी धुमकेतूंच्या कथेतील पात्रे फार भावनावश होतात व त्यामुळे त्यांच्यात मनाची दुर्बलता दिसून येते. कधी कधी कथासूत्र इतके सामान्य असते की त्यामुळे ज्या भावना त्यांना रंगवून दाखवायच्या असतात त्या ते रंगवूच शकत नाहीत. धुमकेतूंचे मुख्य गुण-विशेष म्हणजे कोमल भावनांचे सुंदर चित्रण, हुबेहूब वर्णने व निर्दोष आणि तेजस्वी शब्दसंपत्ती हे आहेत.

'धुमकेतू' व 'द्विरेफ' (रामनारायण पाठक) हे दोघेही आपापल्या परीने एकमेकांना पूरक आहेत. 'धुमकेतू' भावनाप्रधान होते. 'द्विरेफ' बुद्धिवादी व तर्कनिष्ठ होते. धुमकेतूंचा काव्यात्मक वर्णन करण्यात हातखंडा होता तर 'द्विरेफ' हे मानवी मनाच्या गुन्तागुन्तीचे विश्लेषण करण्यात सिद्धहस्त होते. धुमकेतूंचे लक्ष मुख्यत्वे कथेतील कथानकाकडे असे तर 'द्विरेफ' हे कथेला घासूनपुसून सुन्दर स्वरूप देण्यात प्रवीण होते. धुमकेतूंची पात्रे कधी कधी भावनावेगाने हतबल होऊन विचित्र वर्तन करतात तर द्विरेफांच्या पात्रांत कधी कधी जिवंतपणाचा अभाव दिसून येतो.

**कादंबरीकार धुमकेतू–**

धुमकेतूंनी जवळ जवळ १७ कादंबऱ्या लिहिल्या आहेत. ते गद्यलेखक असले तरी त्यांची वृत्ती भावनाप्रधान कवीची आहे. त्यामुळे पात्रे उत्तम रंगविणे किंवा कथानकाची उत्तम मांडणी करणे याकडे विशेष लक्ष न देता ते भावनावेगाने भरलेले विचार व्यक्त करण्यात आणि भव्य व वैभवशाली वर्णने करण्यात आणि दृश्ये उभी करण्यात अतिशय रंगून जातात. त्यांच्या कादंबऱ्यांची कित्येक प्रकरणे म्हणजे अतिशय सुन्दर अशा लघुकथाच वाटतात. ते एका मोठ्या कादंबरीचे अविच्छेद्य असे भाग वाटत नाहीत. ज्या दृश्यात त्यांच्या भावनोत्कटतेला व द्रष्टेपणाला भरपूर वाव मिळतो अशी दृश्ये आणि घटना उत्कृष्टपणे रंगविणे हे धुमकेतुना अगदी सहज साध्य होते. ऐतिहासिक सत्यावर पूर्णपणे आधारित अशा घटना किंवा दृश्ये ते इतक्या उत्तम रीतीने वर्णू शकत नाहीत.

जेव्हा आपण ऐतिहासिक कादंबऱ्यांविषयी विचार करतो तेव्हा मुनशींची आठवण केल्याशिवाय राहणे शक्यच नाही. मुनशी व धुमकेतू दोघांनी सोलंकी राजवंशाच्या कारकीर्दीतील गुजरातचे वैभव व महत्त्व आपल्या कादंबऱ्यांतून दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे. दोघांच्या प्रख्यात कादंबऱ्यांत केन्द्रस्थानी असलेली पात्रे हे गुजरातचे राजे नसून त्यांचे मुख्यमंत्री[१२] हे आहेत. दोघांनी रंगविलेले मुख्यमंत्री सामर्थ्यशाली व अतिशय बुद्धिमान आहेत. ते गुजरातचे निःसीम भक्त व सर्वज्ञ, सर्वशक्तिमान आहेत. त्यांचे शौर्य प्रेमपूर्ती न झाल्यामुळे उफाळून येते. प्रत्येक कार्यात यश मिळविणे हे त्यांच्या जीवनाचे मुख्य सूत्र आहे. त्यामुळे यश मिळवून देणाऱ्या साधनांच्या शुचितेविषयी ते जराही विचार करीत नाहीत.

अशा रीतीने धुमकेतू प्रत्येक वेळी वाचकांना मुनशींची आठवण करून देतात; पण मुनशींचा ऐतिहासिक पात्रांचे स्वभावविशेष वर्णन करण्यावर अधिक भर आहे, तर धुमकेतू त्यांच्या भावनांचे व सुन्दर दृश्यांचे वर्णन करण्यात कुशल आहेत. धुमकेतू मुनशींच्या प्रमाणे इतिहासाला सोडून दूर जात नाहीत. मुनशी मात्र अनेक

वेळा इतिहासाला चिकटून राहत नाहीत. ते आपल्या मनाने स्वतंत्रपणेच काही चित्रे रंगवतात; पण मुनशींच्या कादंबऱ्यांतील भव्य, आपल्या प्रभावाने दिपवून टाकणारी व जीवनरसाने परिपूर्ण भरलेली पात्रे आपल्याला धुमकेतूंच्या कादंबऱ्यांत दिसत नाहीत. मुनशींच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांत अतिशय उच्च कोटीच्या पात्रांच्या जीवनातील महत्त्वाच्या व अलौकिक प्रसंगांच्या कथा वर्णिल्या आहेत. धुमकेतूंच्या ऐतिहासिक कादंबऱ्या रहस्यमय हेरकथांसारख्याच वाटतात. धुमकेतू कधी कधी गुजरातचे गौरवगीत गाण्याच्या उत्साहाच्या भरात असे प्रसंग वर्णितात की, ज्यामुळे त्यांचा मूळ हेतू साध्य न होता बाजूलाच राहतो.

धुमकेतूंची आत्मकथात्मक पुस्तके 'जीवनपंथ' व 'जीवनरंग' ही आहेत. त्यात त्यांच्या बाळपणीच्या व पौगंडावस्थेतील काळाचे वर्णन आहे आणि त्यात त्यांनी आपल्या वेळच्या ओळखीच्या स्त्री-पुरुषांना सजीव करून आपल्यापुढे उभे केले आहेत. ह्या आत्मकथा म्हणजे मनोरंजक संस्मरणे व लघुकथाच आहेत. आपले सबंध आत्मचरित्र वाचकांपुढे मांडण्याचा प्रयत्न त्यांनी केलेला नाही.

धूमकेतूंच्या 'पगदंडी' ह्या पुस्तकात त्यांनी भारतातील अनेक निसर्गनिर्मित अथवा मानवनिर्मित सुन्दर अद्‌भुत स्थळांच्या केलेल्या प्रवासांच्या वर्णनांचा संग्रह आहे, तसेच त्यांच्या 'पानगोष्ठी' ह्या पुस्तकात त्यांच्या विनोदी लेखांचा संग्रह आहे.

## देशळजी परमार [ १८९४–१९६६ ]

देशळजी कानजी परमार ह्यांनी गांधीयुगातील काही पहिल्या थोड्याशा साहित्यिकांप्रमाणेच विशेषत: तरुणांना आपल्या लेखनाने धैर्याची व शौर्याची कृत्ये करण्यास प्रवृत्त केले. राष्ट्रिय दृष्टचा अनेक महत्त्वाच्या प्रसंगांविषयी व व्यक्तींविषयी त्यांनी लिहिले आहे. उदाहरणार्थ बारडोली[१३], दांडी[१४] आणि धारासणा[१५], मोतीलाल नेहरू[१६], जतिनदास[१७] आणि रमणभाई नीलकंठ[१८] वगैरे. त्यांनी आपल्या कवितांत त्या वेळच्या तरुणांच्या मनातील आकांक्षा प्रकट केल्या आहेत. ही आकांक्षा म्हणजे देशाची महानता वाढविण्यासाठी जो पाया घातला जात होता त्यातील एक आधारभूत शिला बनून देशाच्या अमर इतिहासात मिसळून एकरूप होणे ही होती.[१९] त्यांनी लहान मुलांसाठी सुद्धा कविता लिहिल्या आहेत. ह्या सर्व कविता 'उत्तरायण' ह्या संग्रहात एकत्रित केल्या आहेत.

## रामप्रसाद बक्षी [ १८९४ ]

रामप्रसाद प्रेमशंकर बक्षी हे संस्कृतचे गाढे विद्वान आहेत. त्यांच्या 'नाट्यरस' ह्या पुस्तकात त्यांनी रसनिष्पत्ती कशी होईल ह्याचे प्रासादिक भाषेत वर्णन करून भारतीय नाट्यशास्त्राच्या नियमांप्रमाणे नाटकाच्या अंगोपांगांचे सविस्तर

विवेचन केले आहे. त्याच्या 'करुणरस' ह्या ग्रंथात त्यांनी करुणरसाचे सविस्तर विवेचन केले आहे. त्यांच्या 'वाङमय विमर्श' ह्या पुस्तकात त्यांचे साहित्य-समीक्षाविषयक लेख एकत्रित केलेले आहेत. हे लेख काव्यशास्त्र, सौंदर्यशास्त्र व नाटयशास्त्र ह्यांतील काही अंगांवर लिहिलेले आहेत. ह्या लेखांचा मुख्य आधार म्हणजे त्यांचा भारतीय सौंदर्यशास्त्राचा सखोल अभ्यास, त्यांची सूक्ष्म दृष्टी व त्यांची ग्रहणशक्ती हा आहे.

रामभाईनी (ह्या नावाने ते जास्त ओळखले जात) नरसिंहरावांच्या विल्सन फायलॉजिकल लेक्चर्स–'गुजराती भाषा आणि साहित्य' ह्या व्याख्यानाच्या दोन्ही खंडांचे गुजरातीत भाषान्तर केले. त्यांनी धनसुखलाल महेतांच्या सहयोगाने नरसिंहरावांच्या रोजनिशीचेही संपादन केले आहे.

बहुश्रुतपणा आणि गाढ विद्वत्ता ह्या गुणांमुळे रामभाईंना पंडितयुगाचा प्रतिनिधी म्हणणे योग्य ठरेल; पण त्यांचे बरेचसे साहित्य १९५५ नंतरच लिहिले गेले आहे.

त्यांच्या संस्कृतच्या गाढ विद्वत्तेमुळे व ते नव्या लेखकांबद्दल जी सहानुभूती दाखवीत आणि त्यांना मुक्त मनाने व उदारतेने मदत करीत त्यामुळेही रामभाईंना गुजराती लेखकांनी फार मानाचे स्थान दिले आहे.

## झवेरचंद मेघाणी [ १८९७-१९४७ ]

झवेरचंद कालीदास मेघाणी ह्यांचा जन्म सौराष्ट्रात चोटीला येथे झाला. १९१६ मध्ये ग्रॅज्युएट होऊन त्यांनी थोडे दिवस भावनगर येथील एका हायस्कूलमध्ये शिक्षकाचे काम केले. नंतर त्यांनी कलकत्त्याच्या एका औद्योगिक कंपनीत काही वर्षे काम केले. नंतर सौराष्ट्रातील राणपूर येथून प्रकाशित होणाऱ्या 'सौराष्ट्र' ह्या साप्ताहिकाच्या संपादकमंडळात ते दाखल झाले. त्यानंतर त्यांनी आपल्या जवळ जवळ सर्व जीवनभर पत्रकार म्हणूनच कामगिरी केली.

मेघाणींनी काव्य, कादंबऱ्या, लघुकथा, नाटके, समीक्षा, निबंध, जीवनचरित्रे, व्यंग्यलेख व प्रवासवृत्तान्त लिहिले आहे. त्यांनी कित्येक पुस्तकांची भाषान्तरे व रूपान्तरे केली आहेत आणि काठियावाडच्या लोकसाहित्याचे संशोधन करून त्याचे संपादनही केले आहे. मेघाणींच्या कविता तीन खंडात एकत्रित केलेल्या आहेत. ' युगवंदना ', एकतारो,' आणि ' रवीन्द्रवीणा ' हे तीन खंड होत. ह्यांपैकी रवीन्द्र-वीणा ह्यात नोबेल प्राइझ प्राप्त करणारे महान भारतीय कवी रवीन्द्रनाथ टागोर ह्यांच्या काही कवितांची केलेली रूपान्तरे आहेत. 'एकतारो' हा त्यांच्या भजनाच्या धर्तीवर लिहिलेल्या गीतांचा संग्रह आहे. ' युगवंदना ' हा गांधीयुगाचे प्रतिबिंब ज्यात पडले आहे अशा कवितांचा संग्रह आहे. ह्यात पुढील भावना प्रकट झाल्य

आहेत. स्वातंत्र्य, त्यागाबद्दलची तळमळ व मागासलेल्या लोकांबद्दलची कणव. ह्यांतील कित्येक कविता भाषान्तरित अथवा रूपान्तरित आहेत.

मेघाणी हे नि:संशय सर्वसामान्य जनतेचे प्रतिनिधी होते. जुन्या काळातील भाट, चारण आदी लोकगायकांप्रमाणे त्यांनी आपल्या प्रभावशाली काव्यगायनाने हजारो लोकांना ढळढळा रडायला लावले आहे अणि हजारो लोकांना अशक्यप्राय वाटणारी शौर्याची कृत्ये करण्यास प्रोत्साहन दिले आहे. जो गुन्हा त्यांनी केलाच नव्हता[२०] त्याबद्दल ज्या न्यायाधीशाने त्यांना दोन वर्षांची तुरुंगवासाची सजा फर्मावली त्या न्यायाधीशाच्या डोळ्यात सुद्धा त्यांनी अश्रू आणले होते. कारण त्यांनी त्या वेळी न्यायाधीशाच्या परवानगीने धंधुका येथील कोर्टात त्यांची ' छेल्ली प्रार्थना ' (शेवटची प्रार्थना) ही कविता गाऊन दाखविली. ह्या कवितेची स्फूर्ती मेघाणींना आयर्लंडचा वीर मॅक्स्विनी ह्यांच्या एका उक्तीवरून ( ती उक्ती कोणती मेघाणींनी सांगितलेले नाही ) मिळाली होती.

मेघाणी हे त्या वेळच्या राष्ट्रिय वातावरणाशी इतके एकरूप झाले होते की, त्यांची ' छेल्लो कटोरा ' ( विषाचा शेवटचा प्याला ) ही कविता—जी मेघाणींनी गांधीजी १९३१ मध्ये पहिल्या गोलमेज परिषदेसाठी इंग्लंला जायला निघाले होते त्या प्रसंगासाठी खास रचली होती. ती—वाचून गांधीजींनी असे उद्गार काढले की, माझ्या मनात काय चालले आहे, कसे विचार-मंथन चालू आहे, त्याचे मेघाणींनी ह्या कवितेद्वारे अगदी हुबेहूब वर्णन केले आहे.

आपल्या उत्कृष्ट काव्यगायनाने व अमोघ वक्तृत्वाने सामान्य जनसमूहाची तसेच बहुश्रुत उच्चभ्रू समाजातील बहुतेक सर्व लोकांची हृदये हेलावून सोडण्याची इतकी अद्भुत शक्ती मेघाणींच्यात होती की, त्या वेळच्या कोणत्याही इतर गुजराती लेखकाला त्यांच्या इतकी लोकप्रियता प्राप्त झाली नाही.

स्वत: रचलेल्या काव्यापेक्षाही त्यांनी रूपान्तरे केलेल्या कवितांत त्यांची सहजसिद्ध कला अधिक दिसून येते. ह्याचा अर्थ असा नव्हे की त्यांची काव्य-प्रतिभा कमी प्रतीची होती. उलट त्यांनी स्वत: रचलेल्या पुढील भावार्थाच्या ओळी असलेल्या कविता कोणत्याही मापाने मोजल्या तरी जराही कमी पडणार नाहीत. उदाहरणार्थ—

१) " माझी मध्यरात्रीची स्वप्ने–ती चमकतात—चमकतात व एकदम हवेत विरून जातात." (झंखना)[२१]

२) " घण तो बोलतो आणि ऐरण ऐकते " (घण रे बोलेने)[२२]

३) " माझे बन्धु हो ! पाच नद्यांच्या प्रदेशातील[२३] स्मशानात तीन रोपटी लावली आहेत. " (फूलमाल)[२४]

पण ह्या काही कविता वगळल्यास त्यांनी स्वत: रचलेल्या कवितांत कलाकुसरीचा काहीसा अभावच दिसून येतो.

ह्याउलट मेघाणींच्या रूपान्तरित कवितांत एक प्रकारच्या निश्चित मार्गपद्धतीचे दर्शन घडते. जरी ते बऱ्याच वेळा मूळ कवितेत स्वत:ची भर टाकतात किंवा त्यातील काही भाग वगळून टाकतात, तरीही त्या कवितात एक प्रकारची एकसूत्रता दिसून येते.

मेघाणींच्या कवितांत भावनांची प्रखरता भरपूर प्रमाणात असते. रोजच्या व्यवहारी भाषेवर त्यांचे फार मोठे प्रभुत्व होते. सौराष्ट्रातील लोकगीतांचे–मनाचा ताबा घेणारे–सूर व शब्द, त्यांच्या जिभेवर नाचत असत. त्या काळच्या राष्ट्रिय विचारांचे व भावनांचे उमटलेले जोरदार प्रतिध्वनी ह्यांनी मेघाणींना शक्ती व त्याबरोबरच थोडी दुर्बलताही बहाल केली आहे.

मेघाणींच्या लघुकथा ' मेघाणींनी नवलिकाओ ' या नावाने दोन भागात संग्रहित केलेल्या आहेत. त्या सर्व कथा एकाच प्रकारच्या नाहीत. बऱ्याचशा कथांत स्त्रियांची दुर्दशा, श्रमजीवी कामगारांची व दलितांची दु:स्थिती ह्यांचे करुण चित्र रेखाटलेले आहे; पण ह्या पुस्तकाच्या पहिल्या भागातील कथा ज्या बऱ्याच दिवसांनंतर लिहिल्या गेल्या त्यात मात्र समाजातील असभ्यता व कुरूपता ह्यांवर कठोर प्रहार केलेले आहेत. समाजाच्या नव्या अथवा जुन्या दोन्ही घडणींबद्दल मेघाणींच्या मनात असंतोष आहे. दोन्ही प्रकारच्या समाजव्यवस्थांत त्यांना ढोंगीपणा, स्वार्थवृत्ती, भित्रेपणा व बढाई हे दुर्गुण दिसून येतात. ह्या समाजव्यवस्थेत मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वाला, साहसाला किंवा सेवावृत्तीला वाव मिळत नाही. ह्या आखून दिलेल्या समाजव्यवस्थेत जी गोष्ट बसत नाही तिचा पूर्ण चुराडा करण्यास समाजाचा बुलडोझर नेहमी तयारच असतो, असे त्यांचे मत होते.

मेघाणींनी पुढील ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत– ' समरांगण ', ' सोरठ तारां वहेतां पाणी ', ' रा-गंगाजळियो ' आणि 'गुजरातनो जय'– २ भाग आणि ' तुलसी-क्यारो ', ' वेविशाळ ' आणि ' निरंजन ' ह्या त्यांच्या सामाजिक कादंबऱ्या आहेत.

दुसऱ्या अनेक कार्यांच्या दडपणामुळे मेघाणींना आपल्या कादंबऱ्या हप्त्याहप्त्याने लिहाव्या लागल्या व त्यामुळे त्यांच्यात प्रमाणबद्धता दिसत नाही; पण पात्रलेखनात व मानवी हृदयात खोलवर जाऊन त्यांचे अंतरंग जाणण्यात ते अतिशय तरबेज होते. त्यांची सर्व स्त्रीपात्रे–विशेषत: ' वेविशाळ ' मधील भाभू, ' तुलसीक्यारो ' तील भद्रा व ' गुजरातनो जय ' मधील अनुपमा ही त्यांनी निर्मिलेली अति उत्तम स्त्रीपात्रे आहेत. मुनशींची मुख्य स्त्रीपात्रे ह्या फार लाडावलेल्या, यौवनात पदार्पण केलेल्या अशा कन्या आहेत. रमणलालच्या स्त्री-

पात्रांमध्ये सुंदर प्रेयसी आहेत, तर मेघाणींची मुख्य मुख्य स्त्रीपात्रे म्हणजे भारतीय मातृत्वाचा आदर्श आहेत. मेघाणींची कौटुंबिक जीवनातील चित्रे अत्युत्तम आहेत.

गुजराती गद्य लिहिण्यात मेघाणींचा हातखंडा आहे. ते असे लेखक आहेत की ज्यांनी कोणत्याही इतर लेखकांपेक्षा परिणामकारक रीतीने व यशस्वीपणे आपल्या गुजरातभूमीची भाषा किती सामर्थ्यशाली आहे ते सिद्ध करून दाखविले आहे व गुजराती साहित्याला त्यांनी इतर कोणत्याही लेखकापेक्षा विविध प्रकारच्या अगदी नव्या व सुंदर उपमांची देणगी दिलेली आहे. कधी कधी निर्झराप्रमाणे नृत्यक्रीडा करणाऱ्या, कधी कधी वर्षाऋतूनंतर मैदानातून दिमाखाने व वैभवाने गंगानदीप्रमाणे वाहणाऱ्या त्यांच्या गद्यशैलीतून सुंदर व सुस्पष्ट व्यक्तिचित्रे रेखाटली जातात व अत्यंत योग्य असे वातावरण उत्पन्न होते. लहान लहान घरगुती वातावरणातील वाक्प्रचारांनी व म्हणींनी युक्त अशा संभाषणातून–संवादातून त्यांच्या पात्रांचे अंतरंग व वैशिष्टचे ते आपणापुढे प्रगट करतात आणि आपल्या नादमधुर गद्याने ते वाचकांची मने काबीज करतात. अर्थात गंभीर चिन्तनात्मक अथवा तत्त्वज्ञानविषयक विचार प्रकट करण्याच्या कार्याशी वरील कार्याची तुलना होऊ शकणार नाही.

मेघाणींची लोकसाहित्याच्या क्षेत्रातील कामगिरी सर्वात मोठी आहे. अर्थात मेघाणी हे ह्या साहित्य-क्षेत्रात पाऊल टाकणारे सर्वप्रथम साहित्यिक नाहीत. मेघाणी ह्या साहित्य-क्षेत्रात अवतीर्ण होण्याआधी बरीच वर्षे फ्रामजी बोमनजी पटेल व मणिलाल छबाराम भट्ट ह्या दोघांनी गुजरात व काठियावाडच्या काही कथा एकत्रित केल्या होत्या आणि रणजितराम बाबाभाई महेता ह्यांनीही ह्या क्षेत्रात थोडे प्राथमिक काम केले होते; पण ह्या क्षेत्रातील मेघाणींची कामगिरी गुणवत्ता व परिणाम ह्या दोन्ही दृष्टींनी अभूतपूर्व आहे. मेघाणींनी सौराष्ट्रात गावोगावी–खेडोपाडी फिरून अतिशय नम्रतेने, गोडीगुलाबीने व आदराने गावातील लोकांशी–स्त्रीपुरुषांशी–बोलून त्यांना आपलेसे करून घेतले आणि त्यांना जे लोक-साहित्य तोंडपाठ होते ते आपल्याला कथन करण्यास प्रवृत्त केले. अशा रीतीने त्यांनी अनेक अंगाई-गीते, बालगीते, काम करताना व खेळताना खेड्यातील लोकांनी गायिलेली गीते, निरनिराळ्या ऋतूंप्रमाणे व धार्मिक प्रसंगी गायिलेली गीते, लग्नगीते, ' फटाणा ' म्हणजे लग्नप्रसंगी गायली जाणारी विनोदी, उपहास-पूर्ण गाणी, पोवाडे, शोकगीते, भजने व दोहे इत्यादींप्रमाणेच डाकूंच्या शौर्यकथा व संतपुरुषांच्या प्रेमळ कथाही जमविल्या. ह्या सर्व साहित्याचा बारकाईने अभ्यास करून, त्यातील पाठभेद पाहून व अतिशय मेहनत करून त्यांचे संशोधन केले आणि आपल्या दृष्टीने शक्य तेवढे खरे साहित्य लोकांपुढे ठेवले. त्यांनी गुजरातच्या मोठमोठ्या शहरांत व मुंबईत 'डायरे' म्हणजे लोकसाहित्यातील आनंद

उपभोगण्यासाठी केलेले मेळावे भरविले व लोकगीतांच्या आवेशपूर्ण गायनाने आणि आपल्या कथाकथनाच्या कौशल्याने त्यांनी उच्चभ्रू लोकांनाही लोकसाहित्यातील समृद्धी, विविधता व सौंदर्य ह्यांचे दर्शन घडविले.

इतकेच करून न थांबता मेघाणींनी गुजराती लोकसाहित्याची भारतातील इतर भाषा व जगातील काही भाषा ह्यांच्या लोकसाहित्याची तुलना करून सर्व लोकसाहित्यातील एक सारखीच असणारी लक्षणे शोधून काढली. तसेच त्यांनी लोकसाहित्य व वरच्या स्तरातील लोकांचे साहित्य ह्या दोन्ही साहित्यांतील प्रकट झालेल्या भावनांचा सारखेपणा लोकांच्या नजरेस आणला. परदेशातील काही ठिकाणच्या लोकसाहित्याचा अभ्यास करून त्यांनी असे दाखवून दिले की, सर्व जगातील भाषांत मूलगामी भावभावना व त्या प्रकट करण्याची रीत एकसारखीच आहे. हे सर्व काम मेघाणींनी एखाद्या मिशनऱ्याप्रमाणे सर्वस्व पणाला लावून पूर्ण केले.

मेघाणी मुंबईहून प्रसिद्ध होणाऱ्या 'जन्मभूमि' ह्या दैनिकात दर आठवड्याला 'कलम अने किताब' असे एक पान लिहीत व त्यात ते पुस्तक-परीक्षण व साहित्यिक चटकदार प्रसंग लिहीत असत. अशा रीतीचे पान मेघाणीच पहिल्याने साप्ताहिकात लिहू लागले असे नाही; पण त्यांनी हे 'पान' अतिशय लोकप्रिय केले.

मेघाणींनी केलेल्या पुस्तकपरीक्षणात स्वाभाविक सहानुभूती, प्रामाणिकपणा व स्पष्टवक्तेपणा हे गुण दिसून येतात. जरूर पडेल तेव्हा बळवंतराय ठाकोर, नरसिंहराव व कवी नानालालसारख्या साहित्याच्या अतिरथी महारथींवर टीका करण्यासही ते कचरत नसत. तसेच एखाद्या अज्ञात व नवोदित लेखकाची त्याच्या योग्यतेप्रमाणे वाखाणणी करण्यास ते मागेपुढे पाहात नसत.

प्रथमदर्शनी एखाद्या पुस्तकाचा जो तात्कालिक प्रभाव मेघाणींवर पडे त्यावर बहुतेक मेघाणी आपले अभिप्राय प्रकट करीत व बऱ्याच वेळा त्यांचे अभिप्राय परस्पर विरोधी असत; पण जेथे जेथे त्यांना सुन्दरता प्रतीत होई तेथे तेथे त्यांची प्रशंसा केल्याशिवाय ते राहात नसत. आपणास जरी असे दिसले की दुसऱ्या अनेक वृत्तपत्रांतही मेघाणी लिहीत तशा प्रकारचे साहित्यावरील पान (स्तंभ) लिहिण्याचे सुरू झाले होते, तरी सामान्य वाचकांत मेघाणींनी जी साहित्याची आवड आपल्या 'कलम अने किताब' ह्या पानाने उत्पन्न केली ती आजही काही अंशी टिकून राहिलेली आपणास आढळते. ह्यावरून मेघाणींचे हे कार्य अतिशय महत्त्वाचे व योग्य वेळी सुरू केलेले असे होते, एवढे तरी आपणास निश्चित पटावे.

'लिखितांग स्नेहाधीन झवेरचंद' (लिहिणार आपला स्नेहाधीन झवेरचंद) ह्या नावाने प्रकाशित झालेली मेघाणींची पत्रे हा गुजरातीमधील पत्रात्मक साहित्यप्रकाराचा एक अतिशय उत्तम नमुना आहे. ह्या पत्रांतील प्रत्येक शब्द

त्यांच्या अकृत्रिम, प्रेमळ, स्नेहपूर्ण व कोमल हृदयाच्या गाभ्यातून बाहेर पडलेला आहे. ह्या पत्रातून उठून दिसणारी व्यक्ती ही केवळ एक साहित्यिक, विद्वान, विद्याभ्यासू, मार्गदर्शक, आश्रयदाता अशी व्यक्ती नसून, त्यातून एक उत्कृष्ट गुणसंपन्न हृदय असलेला खराखुरा मानव प्रकट झालेला आहे. साहित्यात त्याच-प्रमाणे खऱ्या जीवनात मेघाणींनी धैर्य, चारित्र्य, नेकी, नम्रता व स्वाभिमान ह्या गुणांचे सदैव अवलंबन केले. ही मूल्ये आता वेगाने नाश पावणाऱ्या ह्या युगा-बरोबरच नष्ट होत चालली आहेत.

## विजयराय कल्याणराय वैद्य [ १८९७–१९७४ ]

विजयरायनी कविता, ललित-निबंध, प्रवासवृत्तान्त, जीवनचरित्रे, रोजनिशी वगैरे साहित्य लिहिले आहे; पण ते रोमँटिक स्कूलचे म्हणजे रसलक्षी विवेचक व केवळ साहित्यिक नियतकालिकांचे संपादक म्हणून अधिक प्रख्यात होते.

१९२४ मध्ये त्यांनी 'कौमुदी' नावाचे त्रैमासिक सुरू करून साहित्यिक पत्रकारित्वाच्या क्षेत्रात एक नवे पर्व सुरू केले. त्यातील काही लेखांत विचारांची सखोलता व विद्वत्ता आणि बुद्धीची चमक व कलापूर्ण शैली ह्यांचा संगम दिसून येतो. स्वतःची मते खात्रीपूर्वक मांडण्याचे धैर्य त्यांच्यात होते त्यामुळे त्यांनी मुनशींचे व खबरदार ह्यांचे वाङमय-चौर्य उघडकीस आणले आणि त्यामुळे 'कौमुदी' ह्या त्रैमासिकाला कुठल्याही नियतकालिकाला न लाभलेले तेजोवलय प्राप्त झाले; पण काही अंशी वाचकांकडून हवा होता तसा प्रतिसाद न मिळाल्यामुळे आणि काही अंशी संपादक, प्रकाशक व मालक ह्यांना आपल्या साधनांच्या मर्यादेत राहून ते त्रैमासिक चालविणे शक्य न झाल्यामुळे 'कौमुदी'चे स्वरूप व आशय उतरणीला लागले आणि पुढे ते कायमचे बंद पडले.

थोड्या दिवसांनी विजयरायनी पुन्हा 'मानसी' हे मासिक सुरू केले; पण 'कौमुदी'त पहिल्या एकदोन वर्षांत त्यांनी जो उत्साह व तेज दाखविले तसे तेज, उत्साह व जोम ह्या मासिकातून ते प्रकट करू शकले नाहीत.

विजयराज यांची टीका (समीक्षा) ही उत्तम दर्जाच्या पत्रकाराची आहे. त्यांची टीका चातुर्यपूर्ण व प्रभावी असे; पण कालान्तराने विजयरायांची टीका गुंतागुंतीची व जटिल अशी होत गेली.

## विश्वनाथ मगनलाल भट्ट [ १८९९–१९६८ ]

विश्वनाथ भट्ट हे सुद्धा 'रोमँटिक स्कूल' चे समीक्षक होते. ते पद्धतशीर पृथक्करण करून लेखकाच्या कृतीचे अभ्यासपूर्ण सर्वग्राही विवेचन करण्यात तरबेज होते. त्यांची गद्यशैली निर्दोष, स्पष्ट व असंदिग्ध आहे. ते मुद्देसूद, स्पष्ट व सरळ

बोलणारे होते; पण रामनारायण पाठक अथवा विष्णुप्रसाद त्रिवेदींसारखी त्यांची दृष्टी स्वतंत्र व भेदक नाही. आयुष्याच्या शेवटी शेवटी त्यांची टीका काही वेळा पूर्व-ग्रहदूषित अशी दिसू लागली व त्यांना दुसऱ्यांच्या लेखनात नुसते दोषच दिसू लागले.

## विष्णुप्रसाद त्रिवेदी [ १८९९ ]

विष्णुप्रसाद रणछोडलाल त्रिवेदी ह्यांचा जन्म खेडा जिल्ह्यात उमरेठ येथे झाला. त्यांनी १९२४ मध्ये 'भावना सृष्टि' हा अतिशय भावनापूर्ण असा निर-निराळ्या साहित्यविषयक विषयांवरील स्फुट लेखांचा संग्रह प्रसिद्ध केला तरी समीक्षक (टीकाकार) म्हणून त्यांची योग्यता फार मोठी आहे. त्यांनी साहित्या-वरील टीकालेखांचे पाच संग्रह प्रकाशित केले आहेत. त्यांची नावे– 'विवेचना', 'परिशीलन', 'अर्वाचीन चिन्तनात्मक गद्य', 'उपायन' आणि 'गोवर्धनराम–चिंतक ने सर्जक' अशी आहेत.

ह्या पुस्तकांपैकी 'विवेचना' व 'परिशीलन' ह्या संग्रहात निरनिराळ्या विषयांवरील टीकालेख आहेत. त्यांत एखाद्या सामान्य लेखकाच्या पुस्तकावरच्या चांगल्या अभिप्रायापासून व मूल्यांकनापासून साहित्याच्या मूलगामी तत्त्वांच्या आणि व्युत्पत्तिशास्त्राच्या काही समस्यांच्या चर्चेपर्यंतचे सर्व विषय आलेले आहेत.

**अर्वाचीन चिन्तनात्मक गद्य–**

ह्यात मुंबई युनिव्हर्सिटी-प्रेरित ठक्कर बसनजी माधवजी व्याख्यानमालेत लेखकाने १९४६ साली दिलेल्या पाच व्याख्यानांचा संग्रह आहे. ह्या मालेतील ह्या पाच व्याख्यानांशिवाय ह्या पुस्तकाला एक महत्त्वाची पुरवणी जोडलेली आहे व त्या पुरवणीत अर्वाचीन गुजराती साहित्यातील अद्‌भुतरम्य (रोमँटिक) प्रवृत्तींची चर्चा केली आहे. ह्या व्याख्यानात इ. स. १८४४ ते १९०५ च्या काळात लिहिल्या गेलेल्या गुजराती गद्यातील आत्मलक्षी विचारांच्या मुख्य तत्त्वांचे मूल्यमापन करण्यात आले आहे. अर्थातच चालू असलेल्या एखाद्या विचाराच्या चर्चेला अशा तऱ्हेची कडक समय-मर्यादा घालणे हे अयोग्यच आहे. म्हणूनच १९०५ नंतर अथवा १९२० नंतर ज्या काही साहित्यप्रवृत्ती बळावत चालल्या त्यांच्यावर सुद्धा ह्या पुस्तकात विस्तृत चर्चा करण्यात आली आहे. ह्या व्याख्यानात लेखकाने दुर्गाराम मह्रेताजींपासून आनंदशंकर ध्रुव ह्यांच्यापर्यंतच्या सर्व मुख्य गुजराती विचार-वन्तांचे विचार व्यवस्थितपणे एकत्र करून त्यावर चर्चा केली आहे.

**उपायन–**

'उपायन' हा एक अभिनंदनपर ग्रंथ आहे. ह्यात दुसऱ्या अनेक गोष्टीं-बरोबर काव्याच्या मुख्य तत्त्वांची चर्चा केलेली आहे. ह्यात काही लेख 'विवेचना'

'परिशीलन' यांमधून समाविष्ट केले आहेत. बाकीचे लेख नव्यानेच संग्रहित करण्यात आले आहेत.

**गोवर्धनराम–चिंतक ने सर्जक–**

ह्या ग्रंथात १९६० मध्ये गुजरात युनिव्हर्सिटीद्वारा आयोजित 'गोवर्धनराम माधवराम त्रिपाठी' ह्या व्याख्यानमालेत लेखकाने दिलेल्या पाच व्याख्यानांचा संग्रह आहे. ह्या व्याख्यानात विष्णुप्रसाद ह्यांनी असा दावा केला आहे की, गोवर्धनरामांनी उच्च प्रकारच्या चिन्तनात्मक विचारसरणीबरोबरच समयपरत्वे मनुष्याची व्यक्तिविषयक व समाजासंबंधीची कर्तव्ये काय आहेत, ह्याचे सुंदर विवेचन केले आहे आणि तेणेकरून उच्च नैतिक तत्त्वांवर अधिष्ठित अशा आचरणाकडे त्याला वळविण्याचा प्रयत्न केला आहे; पण गोवर्धनरामांचा पिंड हा चिन्तकापेक्षा सर्जकाचा जास्त आहे. ह्या आपल्या मताचे समर्थन करण्यासाठी त्यांनी गोवर्धन-रामांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान काय होते ह्याची त्यांनी सखोल चर्चा तर केली आहेच; पण त्याशिवाय गोवर्धनरामांची खऱ्या साहित्यकारासंबंधीची कल्पना, त्यांच्या 'स्नेहमुद्रा' व इतर कविता, 'सरस्वतीचंद्रा'तील काही ठळक विशेष, त्यांचे स्वभावरेखन व त्यांची गद्यशैली ह्या सर्व गोष्टींचे परीक्षण व चर्चाही केली आहे. ही व्याख्याने म्हणजे गोवर्धनरामविषयक साहित्यात त्यांनी घातलेली एक मोलाची भरच आहे.

पौर्वात्य व पाश्चिमात्य साहित्यातील सर्जक व टीकात्मक दोन्ही तऱ्हेच्या साहित्यातील श्रेष्ठ कृतींचा विष्णुप्रसादांनी फार खोल अभ्यास केला होता आणि त्यांचा त्या ग्रंथांशी गाढ परिचय होता. तसेच त्यांची सौंदर्यदृष्टी, बौद्धिक साधन-संपन्नता व भावनांची शुचिता फार उच्च दर्जाची होती. त्यांनी यापूर्वी केलेली कवी खबरदार, 'ललित' अथवा 'कुसुमाकर' ह्यांच्या काव्यांची मूल्यांकने विवाद्य आहेत. तरी त्यांची मूल्यमापने केव्हाही अर्थहीन अथवा उथळ असत नाहीत. बिनमहत्त्वाच्या बाबींकडे दुर्लक्ष करून ते विषयाच्या मुख्य मुद्द्यांकडे लक्ष देतात आणि तसे करताना त्यांच्या दृष्टीतून एकही महत्त्वाची बाब सुटत नाही. त्यांच्या दृष्टीने प्रत्यक्ष घटनांपेक्षा त्या घटनांमागे जी पायाभूत तत्त्वे असतात त्यांचे महत्त्व अधिक आहे. तत्त्वज्ञानविषयक सत्याच्या ध्रुवताऱ्याकडे त्यांची नजर सदैव लागलेली असे. या बाबतीत विष्णुप्रसाद हे दुसऱ्या कोणत्याही गुजराती टीकाकारा-पेक्षा आनंदशंकर ध्रुव ह्यांना अधिक जवळचे आहेत.

## प्रभुदास छगनलाल गांधी

प्रभुदास छगनलाल गांधींनी लिहिलेली आत्मकथा 'जीवननुं परोढ' ही अनेक दृष्टींनी फार महत्त्वाची आहे. त्यावरून आपल्याला त्यांचे जीवन कसे होते व

त्यांचा कसा विकास होत गेला हे तर समजतेच; पण त्याचबरोबर फिनिक्स आश्रमात गांधीजींची घडवणूक कशी होत होती याचे एक सुंदर चित्रही प्रभुदासनी आपल्यापुढे ठेवले आहे.

स्वत: गांधीजींनी आपल्या दक्षिण आफ्रिकेतल्या सत्याग्रहाच्या चळवळीचा इतिहास लिहिला आहे. तसेच त्यांनी आपल्या आत्मकथेतही ह्या चळवळी-विषयी लिहिले आहे. फिनिक्स आश्रमात गांधीजींच्या बरोबर राहात असलेले त्यांचे मित्र रावजीभाई पटेल ह्यांनी आपल्या 'गांधीजीनी साधना' आणि 'जीवननां झरणां' ह्या पुस्तकांत गांधीजींचे आफ्रिकेतील जीवन व कार्य ह्यांविषयी बरीच माहिती समाविष्ट आहे; पण प्रभुदास गांधींच्या 'जीवननुं परोढ' मध्ये त्यांनी गांधीजींबद्दल जसे लिहिलेले आहे तशा प्रकारचे लेखन त्यांच्याशिवाय दुसरा कोणीही करू शकलेला नाही.

'जीवननुं परोढ'मध्ये गांधीजी फिनिक्स आश्रमातील ज्या काळात आपले सत्याचे व अहिंसेचे प्रयोग करीत होते त्या काळाचे दर्शन आपल्याला घडते ह्या प्रयोगानीच गांधीजींना पुढे विस्मयकारक विभूतिमत्त्व प्राप्त करून दिले. ह्या पुस्तकावरून आपल्याला गांधीजींचा सत्याविषयीचा चाललेला अविरत शोध व सेवेच्या मार्गाने आत्मप्रतीती करून घेण्याचा प्रयत्न, ह्यांविषयी खूपच माहिती मिळते. गांधीजींविषयीच्या चरित्रात्मक साहित्यामध्ये हे पुस्तक म्हणजे एक महत्त्वाचा मार्गस्तंभच झाले आहे.

वरील विशिष्ट घटनेचा यथा तथा अहवाल ह्या दृष्टीने ह्या पुस्तकाचा उपयोग फार मोठा आहेच; पण त्याशिवाय ह्या पुस्तकात दुसरी एक महत्त्वाची गोष्टही साधलेली आहे. बालमनाचा कसा विकास होत जातो व बालकाच्या मनावर काही गोष्टींचे कसे विपरीत परिणाम होतात ह्याबाबत ह्या पुस्तकात उत्कृष्ट प्रतीचे विवेचन केलेले आहे. प्रामाणिकपणे केलेल्या अशा स्पष्ट विवेचनाच्या योगाने हे पुस्तक म्हणजे शिक्षणशास्त्रज्ञांना व बालकांच्या मातापित्यांना एक अतिशय मोलाचे मार्गदर्शक साधनच उपलब्ध झाले आहे.

बालपणापासून प्रभुदासांचा आत्मविश्वास कमी होऊ लागल्याने ते वाजवीपेक्षा अधिक विनयी व खचलेले असे वाटतात; पण त्यांनी केलेले सुंदर निसर्गवर्णन व लहानपणी ते ज्या स्त्रीपुरुषांच्या सहवासात आले त्यांची त्यांनी रंगविलेली हुबेहूब स्वभाववर्णने, तसेच ज्या प्रसंगांनी व घटनांनी त्यांच्या मनावर खोल असा परिणाम केला त्यांची वर्णने आणि मानवी मनाची त्यांना असलेली समज, हे सर्व इतके प्रभावी आहे की, ते कोणत्याही बुद्धिमान लेखकाच्या कीर्तीत भर घालील असेच आहे.

## बटुभाई उमरवाडिया [ १८९९-१९५० ]

बटुभाई लालभाई उमरवाडिया. ह्यांनी केव्हा केव्हा 'कमल' ह्या उपनामाने लखन केले आहे. कविता 'रास अंजलि', लघुकथा-'वातोनुं वन' समीक्षात्मक शब्दचित्रें-'कीर्तिदा ने कमलनां पत्रो' व एकांकिका 'मत्स्यगंधा अने गांगेय अने बीजां नाटको' (१९२५) आणि 'मालादेवी अने बीजां नाटको' (१९२७) अशी एकंदर त्यांची साहित्यनिर्मिती आहे.

ह्यांपैकी बटुभाईंच्या एकांकिका हे गुजराती साहित्याला त्यांचे प्रदान आहे. 'चेतन' ह्या मासिकाचे ते संपादक होते. त्यात त्यांनी आपली एकांकिका 'लग्न' ही १९२२ मध्ये प्रकाशित केली. त्याच वर्षी त्यांनी आपली दुसरी एकांकिका 'लोमहर्षिणी' ही लिहिली. त्यांची शेवटची एकांकिका 'शिवालिनी' ही १९२७ मध्ये प्रकाशित झाली.

बटुभाईंची सर्वच नाटके उत्तम दर्जाची आहेत असे नाही. त्यांतील काही नाटके म्हणजे नुसते संवादच आहेत आणि फारच थोडी साहित्यगुणांच्या कसोटीला उतरतील व प्रयोगक्षम होतील अशी आहेत.

पण एकांकिका ह्या नाट्यप्रकाराची गुजरातला ओळख करून देणारे ते आद्य एकांकिकाकार आहेत.

बटुभाईंनी 'एकांकी नाटक' ह्या विषयाचा अतिशय काळजीपूर्वक विचार केलेला होता व त्यांनी गुजरातला अशा काही गंभीर प्रकारच्या एकांकिका दिल्या की ज्यामध्ये चातुर्यपूर्ण संवाद आहेत आणि गुंतागुंतीच्या मनोविश्लेषणात्मक समस्यांचे चित्रण केलेले आहे.

## यशवंत सवाईलाल पंड्या [ १९०५-१९५५ ]

हे बटुभाईंचे समकालीन होते. त्यांनी १९२३ ते १९३३ ह्या वर्षांत लिहिलेल्या एकांकिका ह्या बटुभाईंच्या एकांकिकांना पूरक अशाच आहेत.

रंगमंचासाठी आवश्यक असे कौशल्य त्यांच्यात खूपच दिसून येते. बटुभाईंच्यात त्याचा अभाव दिसून येतो; पण यशवंत पंड्या ह्यांच्यामध्ये विनोद-बुद्धी होती व तिचा उपयोग करून समाजाचे धुरीण मानलेल्या लोकांची ढोंगे ते उघड करीत असत. तसेच त्यांना हिंदू पुराणातील देवतारूप महान विभूति कृष्ण[२५], शिव[२५], ब्रह्मा[२५] ह्यांचीही थट्टा करण्यात आनंद होत असे. बटुभाई हे जास्त गंभीर प्रकृतीचे आहेत आणि ते चतुर व हजरजबाबी असले तरी प्रचलित विचारांचे खंडन करणारे नाहीत.

यशवंत पंड्यांच्या एकांकिकांचे स्वरूप अधिक चांगले व व्यवस्थित आहे.

यशवंतांनी 'मदन मंदिर', 'अ. सौ. कुमारी' व 'शरतना घोडा' ही परिपूर्ण नाटके सुद्धा लिहिली आहेत.

## ज्योतींद्र दवे [ १९०१ ]

ज्योतींद्र हरिशंकर दवे हे गुजरातचे सर्वात महान विनोदी लेखक आहेत. त्यांनी अनेक लेख व काही विनोदी कविता लिहिल्या आहेत. त्यांनी आत्मकथेच्या धर्तीवर ' अमे बधां' ही विनोदी कादंबरी लिहिली आहे. ही लिहिण्यात धनसुखलाल महेता ह्यांनी त्यांना हातभार लावला होता. ज्योतींद्र दवे हे हास्य, कटाक्ष, उपहास, व्यंग्य इ. विनोद-प्रकारांचे निपुण लेखक आहेत. हे विनोदप्रकार त्यांच्या पात्रलेखनात व प्रसंगांचे वर्णन करण्यात फार उठून दिसतात. त्यांचा विनोद हा अगदी हलक्या कोटीपासून अगदी उच्चतम सूक्ष्म विनोदापर्यंत जाऊन पोहोचतो. त्यांचा विनोद हा खूप वाचन व मानवी स्वभावाचे आणि आचार-विचारांचे सूक्ष्म अवलोकन ह्यावर पोसला गेला आहे.

ज्योतींद्रांचा विनोद हा नेहमी एकसारख्या उच्च प्रतीचा अथवा एकसारख्या सदभिरुचीचा असतो असे नाही. त्यांच्या ' रंगतरंग' (६ भाग), 'मारी नोंधपोथी' आणि 'अल्पात्मानुं आत्मपुराण' ह्या पुस्तकात आपल्याला त्यांचे सर्वात उत्तम व उच्च कोटीचे विनोददर्शन घडते. त्यांचे बाकीचे लेखन हे ओढूनताणून मेहनत करून लिहिलेले, पाल्हाळिक व पुनरुक्तिदूषित वाटते.

ज्योतींद्रांचे उत्तम निबंध हे तीव्र बुद्धी, मानवी स्वभावातील विरोधी वृत्तींचे विलक्षण सूक्ष्म निरीक्षण, गदभिरुची व हुशारी या गुणांचे उत्तम नमुनेच आहेत. श्लेष, वक्रोक्ति, बाह्यतः गंभीर वाटणारी उत्प्रेक्षा व एखाद्या विचित्र अर्थहीन विधानाचे केलेले तार्कसंगत विश्लेषण ही ज्योतींद्रांच्या शस्त्रागारातील मुख्य शस्त्रे आहेत.

गुजराती साहित्यात ज्योतींद्रांच्या विनोदी कवितांना जोड मिळणे फार कठीण आहे. ज्योतींद्रांनी रचलेले 'मंगलाष्टका'तील[२६] काही श्लोक व अहमदाबादच्या 'गुजरात साहित्य सभे'ने त्यांना ' रणजितराम सुवर्ण चंद्रक '—पदक अर्पण केले त्या प्रसंगी त्यांनी रचलेली स्वतःचा परिचय करून देणारी 'आत्मपरिचय' ही कविता हे ज्योतींद्रांच्या चमकदार श्लेषांचे व संस्कारी विनोदांचे सर्वोत्कृष्ट नमुने आहेत.

ज्योतींद्र दवे ह्यांनी काका कालेलकर, मुनशी, बळवंतराय ठाकोर व इतर काही प्रसिद्ध साहित्यिकांची गद्यशैलीत रेखाटलेली चित्रे फार उत्तम आहेत. जरी ह्या लेखनात सखोल साहित्यिक गुणवत्ता फारशी दिसून येत नसली तरी त्यावरून

मनुष्याचे अंतरंग जाणण्याची व त्याचे मूल्यांकन करण्याची त्यांची शक्ती दिसून येतेच. ज्योतींद्रांनी नवलराम ह्यांच्यासारखे काही लेखक, नाटक व एकांकीकेचे स्वरूप आणि साहित्याची मूलतत्त्वे ह्यांचाही सखोल अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. हे अभ्यासपूर्ण विवेचन रसमय, रुचकर व वाचनीय असे आहे; पण ती विवेचने वाचून आपल्या मनावर गाढ विद्वत्ता किंवा त्या विषयांकडे पाहण्याची स्वतंत्र बुद्धी ह्यांचा ठसा उमटत नाही.

## चंद्रवदन महेता [ १९०१ ]

चंद्रवदन चिमणलाल महेता ह्यांचा जन्म सुरत येथे झाला. त्यांनी कविता, कादंबरी, नाटके, साहित्यिक टीका, प्रवासवृत्तान्त व आत्मकथा इतके साहित्य-प्रकार हाताळले आहेत. गेली कित्येक वर्षे मात्र ते विशेषकरून नाटके व प्रवास ह्या विषयीच जास्त लिहीत आहेत.

चंद्रवदन महेता प्रथम प्रसिद्धीस आले ते त्यांनी बळवंतराय ठाकोर ह्यांचे अनुकरण करून संस्कृत साहित्यातील पृथ्वी छंदात लिहिलेल्या सुनीतांमुळे. त्यांनी 'यमल' नावाचा १४ सुनीतांचा एक गुच्छ प्रसिद्ध केला. भावाच्या आपल्या बहिणीवरील प्रेमाचा एक सूक्ष्म धागा त्यात गुंफलेला आहे. चंद्रवदन ह्यांची 'इलाकाव्यो' (कवितासंग्रह) आणि 'रतन' (एक दीर्घ वर्णनात्मक कविता) ह्यांतही भावाबहिणींच्या प्रेमाचेच वर्णन केलेले आहे. त्यांच्या काही कवितांत बालकाच्या मनाची निर्व्याजता, निर्दोषता व स्वैर कल्पनाशक्ती हे भाव फार सुंदर रीतीने चित्रिलेले दिसून येतात; पण अशा बऱ्याचशा कवितांत भावाने प्रकट केलेल्या भावना प्रियकराने आपल्या प्रेयसीसाठी प्रकट केलेल्या भावनांसारख्या वाटतात. चंद्रवदन महेता ह्यांच्या कवितात भावनांची अतिशयोक्ती, रचनेचा ढिलेपणा, विचारांची अस्पष्टता व अपरिपक्व कल्पना आणि शब्दावडंबर असले दोष आढळून येतात.

चंद्रवदन महेता नाटककार म्हणून फार प्रख्यात आहेत. तसेच ते एक चांगले नट, यशस्वी नाट्य-दिग्दर्शक आणि नाटकाचे स्वरूप व नाट्यतंत्र ह्यांचे एक महान अभ्यासक आहेत. जरी रणछोडभाई उदयराम ह्यांची नाटके रंगमंचावर संपूर्णपणे यशस्वी झाली व मणिलाल नभुभाई ह्यांचे 'कान्ता' हे नाटक रंगभूमीवर आणून मुंबई गुजराती नाटक कंपनीने आपल्या मंडळाचे उद्घाटन केले, तरी त्या वेळी साहित्यिक नाटके व रंगमंचावर दाखविली गेलेली नाटके ह्यांचा एकमेकांशी काही संबंध नव्हता. धंदेवाईक नाटक कंपन्यांना त्यांचे स्वतःचे स्वतंत्र नाटककार असत. त्यांच्या दृष्टीने रंगमंचावर यशस्वी होणे हेच नाटकाचे मुख्य लक्षण होते आणि त्याच प्रकारचे त्यांचे प्रेक्षकही होते; पण गांधीयुगात जसजसा शिक्षणाचा प्रसार

होऊ लागला व सांस्कृतिक जागृती होऊ लागली, तसतसा एक वर्ग असा निर्माण झाला की त्याला नाटकात साहित्यिक गुणवत्ता असलीच पाहिजे असे वाटू लागले. अशा प्रकारची साहित्यिक गुणवत्ता धंदेवाईक नाटककंपन्यांच्या नाटकात बिलकुल नसे. ह्यामुळे हौशी, अवेतन नाटक मंडळींना वाव मिळाला आणि चंद्रवदन महेता व कनैयालाल मुनशींनी आपापल्या परीने पण स्वतंत्रपणे त्यांना आपापली नाटके पुरवून आणि मार्गदर्शन करून ती नाटके लोकप्रिय होण्यास मदत केली. अशा प्रकारे हौशी रंगभूमीची नाटके सुशिक्षित उच्च वर्गातील लोकांमध्ये लोकप्रिय करण्यात ते यशस्वी झाले; पण नाटक हे एक मनोरंजनाचे साधन आहे ह्याहून अधिक काही ह्या बाबतीत ते करू शकले नाहीत. जी नाटके ते रंगमंचावर आणू शकले ती एकतर सवंग भावनांनी भरलेली अथवा अर्थहीन प्रहसना-(फार्स)-सारखी होऊ लागली.

पण हौशी नाटकमंडळी मात्र टिकून राहिली. जी नाटके प्रवीण जोशी, कांती मडिया, उपेंद्र त्रिवेदी, चंद्रवदन भट्ट, लालू शाह, विष्णुकुमार व्यास व इतर काहीजणांनी निर्माण करून त्यांचे दिग्दर्शन केले. (त्या नाटकांपैकी बरीच नाटके जरी रूपांतरित असली तरी) ती नाटके उत्तम प्रतीची आहेत व धंद्याच्या दृष्टीनेही ती अतिशय यशस्वी झाली आहेत. प्रेक्षकांची अभिरुचीही बदलली व नाटककारांनी आपल्याला ह्या बाबतीत अगदी अज्ञ आणि अपरिपक्व मानावे ह्या वृत्तीचा ते निषेध करू लागले.

चंद्रवदन महेता ह्यांची नाटके विविध प्रकारची आहेत. त्यात 'आराधना'-सारखी आदर्शवादी नाटके, 'आगगाडी' आणि 'नागाबावा' यांसारखी वास्तव-वादी नाटके, 'अखो' आणि 'नर्मद' ही चरित्रपर नाटके, 'किस्मत'सारखी मूकाभिनयाची नाटके, 'मूंगी स्त्री' सारखे फार्स, 'आनल दे' सारखी अद्‌भुत नाटके 'प्रेमनुं मोती' सारखी ग्रामीण नाटके 'देडकानी पांचशेरी' सारखी उपरोधपूर्ण नाटके, 'संध्याकाळ' सारखी ऐतिहासिक नाटके, 'कल्याण' सारख्या संगितिका, व भवाईच्या धर्तीवर लिहिलेले 'होी-होलिका' हे लोकनाट्य—इतकी नाटके आहेत. भिकारी-फेरीवालेपासून स्वतः लेखकापर्यन्त त्यांचा पात्रविस्तार आहे आणि इहलौकिकापासून स्वर्गीय वातावरणांपर्यंतचा नाटकीय प्रवासही त्यात आहे. ह्या नाटकांपैकी बहुतेक सर्व नाटके हौशी नटमंडळाने रंगमंचावर करून दाखविली आहेत आणि ती सर्व कमी अधिक प्रमाणात यशस्वी झाली आहेत.

चंद्रवदन ह्यांच्या नाटकांची कथानके नावीन्यपूर्ण असतात आणि पात्रांची भाषा व संवाद त्यांच्या सांस्कृतिक पातळीला शोभतील अशी असतात. त्यांच्या नाटकातील ह्या दोन गोष्टी फार उल्लेखनीय आहेत; पण एकूण ह्या नाटकात प्रमाणबद्धता व सुसंवादिता ह्यांचा अभावच दिसून येतो. चंद्रवदन महेता ह्यांची हलकी-फुलकी नाटके म्हणजे असंस्कारी फार्स वाटतात व त्यांचा गंभीर विषयां-

वरील नाटके म्हणजे बऱ्याच वेळा अव्यवस्थितपणे गुंफलेल्या भावनांनी भरलेली व शब्दावडंबराने व्यापलेली अशी संवादांची मालिकाच वाटते.

चंद्रवदन महेता ह्यांची नाटचविषयक बुद्धिमत्ता त्यांच्या नाटकात परा-कोटीला पोहोचलेली दिसून येत नसली, तरी ती त्यांच्या आत्मकथेत व प्रवास-वृत्तान्तात उच्चकोटीला पोहोचलेली दिसते. ह्या पुस्तकातही शब्दावडंबर व अतिशयोक्ती हे दोष असले तरी ही पुस्तके त्यातील आकर्षक गद्यशैलीमुळे व वैशिष्टचपूर्ण आशयामुळे आगळी वाटतात. जेव्हा ते वर्णने करीत असतात किंवा निवेदन करीत असतात तेव्हा तर ही आशयघन गद्यशैली फारच सुंदर प्रतीत होते. ही गद्यशैली निरनिराळी स्थळे, स्त्रिया व पुरुष ह्यांची हुबेहूब चित्रे वाचकांपुढे उभी करते आणि त्यातून दृग्गोचर होणारे लेखकाचे व्यक्तित्व जरी लेखक केव्हा केव्हा त्यात प्रमाणाधिक कटुता व लहरीपणा व्यक्त करीत असला तरी आपल्याला फार प्रिय होते.

## गुणवंतराय पोपटभाई आचार्य [ १९०२–१९६५ ]

गुणवंतराय पोपटभाई आचार्य हे एक प्रख्यात पत्रकार होते. आपल्या सामाजिक कादंबऱ्या 'दरिद्रनारायण', 'कोरी किताब' वगैरे बद्दल व ऐतिहासिक-कादंबऱ्या 'देशदीवान', 'कृष्णाजी नायक', 'राय बुक्काराय', 'महा-अमात्य माधव' इत्यादींबद्दल ते फार प्रख्यात आहेत; पण त्या सर्वांपेक्षा समुद्रसफरीच्या त्यांच्या साहसकथा—उदाहरणार्थ—'सक्करबार', 'जलसमाधी', 'हरारी', 'सरफरोश' व त्याच प्रकारच्या इतर काही कादंबऱ्या यांमुळे त्यांचे नाव फार गाजले.

गुणवंतराय ह्यांचा गोष्टी सांगण्यात अगदी हातखंडा होता व कोणतीही कथा उत्तम तऱ्हेने कथन करणे हे त्यांचे मुख्य ध्येय असे. त्यांनी आपल्या कादंबऱ्यां-तून काही अतिशय भव्य ऐतिहासिक प्रसंग व उदात्त, महान पात्रे रंगविली आहेत. ही त्यांची पात्रे काही महान व विशिष्ट ध्येयसिद्धीसाठी प्रयत्न करीत असतात. पात्रलेखनात त्यांच्यावर मुनशींचा प्रभाव पडलेला दिसून येतो आणि त्यांच्या लेखनशैलीवर व भूतकाळाच्या भव्य चित्रीकरणावर मेघाणींची छाप पडलेली दिसून येते. त्यांनी दिलेल्या ऐतिहासिक सामग्रीची सत्यताही अनेकदा विवादास्पद असते.

## चंद्रशंकर अमृतलाल बुच 'सुकानी' [ १८९६–१९५८ ]

'सुकानीं'नी आपल्या कथा— 'हडकीवारी आई', 'धुडाकियो बाण', 'सागवाननुं हेयुं' आणि 'आझाद आरमार' (बंगाल) व कादंबरी 'देवो धाधल' ह्या त्यांच्या कृती पुराव्यावर आधारलेल्या असून, त्यातले विश्व त्यांनी फार

समर्थपणे वाचकांपुढे उभे केले आहे. बुच हे मोठे विद्वान व सागरपर्यटनाच्या बाबतीत तर एक नावाजलेले तज्ज्ञ म्हणून ओळखले जात. म्हणून त्यांच्या 'देवो धाधल' ह्या कादंबरीत आपल्याला सागरावरील व बंदरातील जीवन ह्याविषयी बरीचशी अधिकृत हकीकत वाचावयास मिळते. कच्छी लोकभाषा व खलाशांची परिभाषा आणि बोलभाषा यांचा चपखल उपयोग ह्या कादंबरीत केलेला असल्या-मुळे त्यातली शब्दचित्रे आपल्यापुढे हुबेहूब उभी करण्यात ते फार यशस्वी झाले आहेत; पण ह्याबाबतीत केव्हा केव्हा अतिरंजकता आली आहे आणि लेखकाची सर्जनशक्तीही सातत्याने एकाच पातळीवरील उच्च कोटीची वाटत नाही.

## करसनदास माणेक [ १९०२–१९७८ ]

करसनदास नरसिंह माणेक ह्यांनी 'वैशंपायन' ह्या टोपण नावाखाली विडंबनात्मक कविता लिहिल्या आहेत. त्यांचा जन्म कराचीला झाला.

त्यांच्या कविता–'आलबेल', 'मध्यान्ह', 'वैशंपायननी वाणी'–२ भाग, 'महोबतने मांडवे', 'राम तारो दीवडो', 'अहो रावजी सुनिये', 'शताब्दीनां स्मितो अने अश्रूओ', 'कल्याण यात्री' ह्या आहेत. कादंबऱ्या– 'दर्पण अने समर्पण', 'सिंधुनुं स्वप्न' वगैरे आहेत. लघुकथा– 'मालिनी', प्रकाशनुं पगलां' वगैरे. पद्यात्मक नाटके– 'प्रतिज्ञा पुरुषोत्तम', 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे'. चिन्तनशील गद्य-लेख– 'वाटना दीवडा', 'गीता विचार', 'कळीओ अने कुसुमो', 'आझादीनी यज्ञज्वाला'. कथनात्मक गद्य-ग्रंथ–'महाभारत कथा'–३ भाग असे सर्व प्रकारचे त्यांचे साहित्य आहे. त्याशिवाय करसनदास माणेक यांनी 'मुक्तधारा' आणि 'शरदुत्सव' ह्यांच्यासारख्या बंगाली पुस्तकांचे, 'ऑथेल्लो' ह्या इंग्रजी नाटकाचे आणि संस्कृत भगवद्‌गीतेचे गुजरातीत भाषान्तर केले आहे.

ह्यांपैकी ' आलबेल ' आणि ' मध्यान्ह ' हे करसनदास माणेक यांच्या स्फुट कवितांचे संग्रह आहेत. ' आलबेल ' मध्ये एक उत्तम शोकगीतही आहे. त्याचे नाव , खाखनां पोयणां '. ' महोबतने मांडवे ' ही एक प्रेमविषयक दीर्घ कविता आहे. ' वैशंपायननी वाणी ' चे २ भाग व ' अहो रावजी सुनिये ' ह्यांमध्ये मध्ययुगीन आख्यानांच्या धर्तीवर लिहिलेल्या उपहासात्मक कविता आहेत. 'राम तारो दीवडो' हा सहा भक्तिगीतांचा संग्रह आहे. गांधी-शताब्दीला प्रकाशित झालेले ' शताब्दीना स्मितो अने अश्रुओ ' ह्यात राष्ट्रिय भावनांचे चित्रण करणाऱ्या कविता संग्रहित केलेल्या आहेत आणि ' कल्याण यात्री ' यात महात्मा गांधींना सादर केलेले वक्तृत्वपूर्ण प्रशस्तिकाव्य आहे.

'प्रतिज्ञा पुरुषोत्तम' हे एकांकी नाटक आहे. हे पद्यात लिहिलेले आहे. ह्यात श्रीकृष्णाच्या जीवनाच्या ह्या पृथ्वीवरील अंतिम समयाचे वर्णन आहे व त्याच्या

अवतार कार्याचे मूल्यांकन केलेले आहे. 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे' हा सात पद्यनाटिकांचा संग्रह आहे. ह्यात गीतेचा भावार्थ विशद केलेला आहे.

गद्यलेखनात ' वाटना दीवडा ' (रस्त्यावरील दिवे) हा ४२ स्फुट निबंधांचा संग्रह आहे. भारतीय तत्त्वज्ञानविषयक महान ग्रंथातील काही महान सूक्तींचे ह्यात विवेचन केलेले आहे. ' गीता विचार ' भगवद्गीतेचे मर्म उकलून दाखविणाऱ्या ५० निबंधांचा संग्रह आहे. ह्या दोन्ही ग्रंथात केलेले विवेचन आधुनिक काळाला अनुसरून केलेले आहे. हे निबंध फार कल्पकतेने लिहिलेले आहेत.

' महाभारत कथा ' ह्या ग्रंथात महाभारत ह्या महाकाव्याची कलात्मक व प्रासादिक शैलीत कथन केलेली कथा आहे. ह्यांत स्वातंत्र्योत्तर काळातील भारताच्या परिस्थितीबद्दल केलेले सूचक संदर्भ दिसून येतात.

मेघाणींप्रमाणेच माणेक हेही सामान्य जनसमूहात मिसळून जाणारे आहेत. संस्कृत, फारशी, पर्शियन व रोजच्या व्यवहारातील गुजराती भाषेतील शब्दांचा उपयोग करून त्यांच्या भाषेचा प्रवाह संथपणे आणि सरळतेने वाहताना दिसतो. त्यांच्या भाषेत यमके अगदी सहजतेने येतात व छंदावर त्यांचे पूर्ण प्रभुत्व आहे. माणेकनी गीते, भजने, सुनीते, गझल व दीर्घ कथनात्मक कविता लिहिल्या आहेत. उत्तम वृत्तपत्रीय लेखनशैलीत लिहिलेल्या त्यांच्या काही कवितांत महान राष्ट्रिय घटनांच्या योगाने हेलावलेल्या भावनांचे सुंदर चित्रण केलेले आहे आणि काही कवितांत स्वातंत्र्यानंतर झालेल्या भ्रमनिरासाचे व दारुण निराशेचे चित्र अतिशय सुंदर रंगविले आहे. ह्या दोन्ही प्रकारच्या कवितांना गुजराती साहित्यात जोड मिळणे फार कठीण आहे.

माणेक ह्यांची प्रेमकाव्ये अभिजात संस्कृत छंदात लिहिलेली असली तरी ती अनेक वेळा आपल्याला उर्दू गझलातील उत्साह व मस्तपणा ह्यांची आठवण करून देतात.

त्यांच्या ' खाखनां पोयणां ' आणि ' कल्याणयात्री ' ह्या कवितांशिवाय त्यांची ' व्यास ' ही महाभारतकार महर्षी व्यास ह्यांना उद्देशून लिहिलेली प्रशस्तिरूप कविता व त्यांच्या ' हरीना लोचनियां ', ' ज्योतिर्धाम, ' आणि ' जय जगन्नाथ ' ह्या लहान कविता त्यांच्या सर्व कवितांतील उत्तम कविता आहेत.

माणेक हे नेहमीच आपल्या प्रतिभेच्या उच्चस्तरावर असतात. त्यांचे पद्यमय लेखन व बरेचसे गद्यमय लेखन भावनांचा उष्मा, मस्तपणा, प्रभावशाली भाषा व सुबोध शैली ह्या गुणांनी युक्त आहे.

उपहासात्मक कविता ही माणेक ह्यांची गुजराती साहित्याला दिलेली मोठी देणगी आहे. ह्या कविता मध्ययुगीन आख्यानांच्या शैलीत लिहिलेल्या आहेत.

त्यातील चमकदार श्लेष व उपहास ह्यांमुळे दुसऱ्या जागतिक युद्धाच्या वेळी लोकांच्या मनावरला ताण दूर होऊन त्यांना दिलासा मिळाला. माणेक हे बुद्धिमान देशभक्त व जनसमूहाचे मित्र होते. त्यांची विनोदबुद्धी फार सुंदर होती. ह्या वरील कवितांत त्यांचे हे सर्व गुण फार प्रकर्षाने व उत्तम रीतीने प्रकट झालेले दिसून येतात. मुंबईच्या व गुजरातच्या इतर जवळ जवळ सर्व वृत्तपत्रांत माणेक ह्यांच्या धर्तीवर स्तंभ-लेखन चालू झाले व अजूनही काही वृत्तपत्रात चालू आहे. ह्यातच माणेक ह्यांनी सुरू केलेल्या ह्या उपक्रमाचे यश दिसून येते; पण ह्या उपहासात्मक कवितांचे विषय मात्र फक्त त्या काळाला अनुरूप असे मर्यादित असल्यामुळे त्यांना कायमचे साहित्यिक महत्त्व लाभलेले नाही; पण साहित्याच्या इतिहासाला मात्र ह्या कवितांकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

## डोलरराय रंगीलदास मांकड [ १९०२–१९७० ]

ह्यांनी वीस पुस्तके लिहिली आहेत. त्यांपैकी काहींची नावे– 'स्टडीज इन धनंजयाज् दशरूपकम्', 'टाइप्स ऑफ संस्कृत ड्रामा', 'अेन्शण्ट इंडियन थिएटर', 'पुराणिक क्रॉनॉलॉजी', 'डेट ऑफ दि ऋग्वेद अॅण्ड कालीदास' आणि ' दी गुप्ताज्' ही पुस्तके इंग्रजीत व 'काव्य विवेचन', 'गुजराती काव्यप्रकारो' आणि 'साहित्य मीमांसाना बे प्रश्नो' ही पुस्तके गुजरातीत लिहिली. ह्या पुस्तकांवरून हे सिद्ध होते की डोलरराय हे नाटयशास्त्र, काव्यशास्त्र, सौंदर्यशास्त्र व भारतविषयक विद्या (Indology) ह्या विषयांतील एक निष्णात पंडित होते. मांकडनी 'भगवाननी लीला' ह्या नावाची एक दीर्घ कथनात्मक कविता लिहिली आहे. त्यांनी 'भगवदज्जुकीय', 'रुद्राध्याय', 'शक्रादिस्तुति' व 'ध्वन्यालोक' ह्या संस्कृत ग्रंथांची गुजरातीत भाषान्तरे केली आहेत. मांकड ह्यांनी इंग्रजीत लिहिलेले लेख भारताच्या मुख्य विद्वत्तापूर्ण सामयिकातून प्रसिद्ध झालेले आहेत.

मांकड 'नागरिक' ह्या विद्वत्तापूर्ण विषयावरील मासिकाचे संपादक होते. चंद्रशंकर बुच हे त्याचे सहसंपादक होते. हे मासिक मांकडांनी सात वर्षे चालविले. कराचीहून प्रसिद्ध होणाऱ्या 'ऊर्मि' ह्या साहित्यविषयक मासिकाचे सहसंपादक म्हणून त्यांनी इंदुलाल गांधी, भवानीशंकर व्यास आणि चमनलाल ह्यांच्या सहयोगाने काम केले आहे. त्या मासिकाचे दोन काव्यांक १९३५ आणि १९३६ मध्ये प्रकाशित झाले. त्यातील कवितांवर प्रकाश टाकणारे संक्षिप्त भाष्य श्री. मांकड ह्यांनी लिहिले होते. त्यामुळे गुजरातेत साहित्यिक सदभिरुचीचा व परीक्षणाचा पायाच घातला गेला.

स्वतःशी प्रामाणिक राहून मांकड ह्यांनी प्रांजल वस्तुनिष्ठ साहित्यिक टीकाकार म्हणून फार उच्च स्थान प्राप्त केले आहे. कोणालाही न भीता किंवा

कोणाच्याही कृपेची अपेक्षा न करता, स्वतःला विचारपूर्वक जे पटले व खरे वाटले तेच त्यांनी लोकांपुढे मांडले आहे.

## स्नेहरश्मि [ १९०३ ]

झीणाभाई रतनजी देसाई हे 'स्नेहरश्मि' ह्या टोपण नावाने लेखन करतात. त्यांचा जन्म बलसाड जिल्ह्यात चिखली येथे झाला. त्यांची काव्ये– 'अर्घ्य', 'पनघट', 'सोनेरी चांद अने रुपेरी सूर्य', 'अतीतनी पांखमांथी. लघुकथा– 'तूटेला तार', 'गाता आसोपालव', 'स्वर्ग अने पृथ्वी', 'हीरानां लटकणियां'. कादंबरी– 'अंतरपाट' आणि आत्मकथा– 'मारी दुनिया' असे त्यांचे साहित्य आहे.

नर्मद व दलपतराम ह्यांच्या काळापासून स्वदेशाभिमानाच्या कविता लिहिण्यास सुरुवात झाली होती आणि गांधीजी दक्षिण आफ्रिकेतून परत येण्याच्या फार पूर्वीपासून हरिलाल हर्षदराय ध्रुव आणि ललित (जन्मशंकर महाशंकर बुच) ह्यांनी देशभक्तिपर कविता लिहिल्या होत्या. त्या कवितांची सुरुवात अशा आशयाची होती.

" ही भूमि आमची आहे–ही आमची माता आहे [२७]
तिला दुसरा कोण आपली म्हणायला धजेल ?"

आणि– " चला, आपल्या प्रिय जन्मभूमीचा मंगल विजय गाजवू "[२८] पण गांधीजी भारतात आल्यावर स्वातंत्र्याची चळवळ मोठ्या पायावर सुरू झाली आणि देश-भक्तीची एक नवी लाट आली. अशा वेळी देशभक्तिपर कविता लिहिणारे पहिले कवी म्हणून ' स्नेहरश्मि ' पुढे आले. त्यांनी देशाभिमानविषयक कविता, तसेच गरीब व दलितांच्या चाललेल्या शोषणाचा धिक्कार करणाऱ्या कविता, दीर्घ चिंतनात्मक कविता, प्रेमकाव्ये आणि ऊर्मिकाव्ये सुनीते व मुक्तके लिहिली आहेत.

स्नेहरश्मि हे आदर्शवादी आहेत व त्यांचा लोकांच्या स्वाभाविक शक्तीवर व मानवी संस्कृतीची अंतिम प्रगती यांवर दृढश्रद्धा आहे. त्यांच्या समकालीन कवींच्या कवितांत प्रामुख्याने आढळून येणारे उदासीनतेचे वास्तव दर्शन स्नेहरश्मींच्या कवितांत अभावानेच आढळून येते.

स्नेहरश्मींच्या ' एकोऽहं बहुस्याम् ' सारखी दीर्घ चिंतनपर काव्ये आशय-घनता व शब्दरचनेचे वैभव ह्या दृष्टीने श्रेष्ठ दर्जाची आहेत. त्यात भावनांचे चित्रण ते फार प्रकर्षाने करतात.

स्नेहरश्मींच्या ११ कविता आहेत. त्यांपैकी १० सुनीते प्रस्थान ह्या मासिकात 'स्मरणसंहिता'[२९] ह्या नावाखाली प्रसिद्ध झाली. ही सुनीते त्यांनी आपल्या एका जिवलग मित्राच्या अवसानप्रसंगी लिहिली. ह्या सुनीतांत भावना व चिन्तन

ह्यांचा सुंदर संगम झालेला दिसून येतो. त्यांच्या मधुर भावकाव्यांवर टागोरांच्या रहस्यवादाची थोडीशी छाप पडलेली दिसते. ही त्यांची काव्ये अत्युत्कृष्ट आहेत.

'सोनेरी चांद अने रुपेरी सूरज' हा स्नेहरश्मींच्या 'हायकू'चा संग्रह आहे. हा जपानी कवितेचा प्रकार गुजरातीत आणणारे स्नेहरश्मि हे पहिले कवी आहेत व त्यांच्या मागून थोडेच दिवसात आणखीही काही लेखक 'हायकू' लिहू लागले; पण प्रत्येक देशातील अथवा मानववंशातील लोकांवर बाह्य गोष्टींचा प्रभाव आपापल्या मनोवृत्तीप्रमाणे पडतो (ज्याला लिटन स्ट्रॅची विचारांच्या व रुचींच्या सवयी असे म्हणतो) ते लोक आपल्याला पचेल अथवा रुचेल तेवढेच त्यातून घेतात. ह्या दृष्टीने पाहता 'हायकू' हा काव्यप्रकार गुजराती काव्यात रुचेल की नाही ते फक्त काळच ठरवू शकेल. लघुकथा व एकांकिका हा इंग्लिश भाषेतून घेतलेला साहित्यप्रकार गुजराती साहित्यात बरोबर रुजला तसे 'हायकू'च्या बाबतीत होईल की इंग्लिशमधून घेतलेल्या निर्यमक कवितेचे किंवा जवळच्याच मराठी भाषेतील ओवी, लावणी, अभंग व दिंडी ह्या छंदांचे आणि बोलभाषेत लिहिलेल्या एकांकिकांचे भाग्य त्याला प्राप्त होईल, हे आता सांगता येत नाही.

सुनीत हा काव्यप्रकार बऱ्याच बुद्धिमान लेखकांनी उपयोगात आणला आहे व गुजरातीतील काही उत्तम कविता त्याच प्रकारात लिहिल्या गेल्या आहेत. ह्या दृष्टीने पाहता पद्यात्मक प्रकारच्या साहित्यात बाहेरून उचललेला सॉनेट हा काव्यप्रकारच गुजरातीत बऱ्याच अंशी स्थिर झाला आहे, असे म्हणता येईल. फक्त इंग्लिश सॉनेटमध्ये असलेली प्रास-यमक ह्यांची गुंतागुंतीची रेलचेल गुजराती सॉनेटमध्ये काढून टाकण्यात आली आहे.

'निजलीला' हा 'अतीतनी पांखमांथी' यांमधून घेतलेल्या आठ कवितांचा गुच्छ आहे. ह्यात स्नेहरश्मींनी नव्या क्षेत्रात पाऊल टाकण्याचा प्रयत्न केला आहे. काही आधुनिक कवितांची शैली त्यात आढळते; पण ह्या कवितांत प्रास व लय हे बाह्यगुण असले तरी आशय किंवा विचारांच्या दृष्टीने ह्यात विशेष काही नाही.

स्नेहरश्मींच्या लघुकथांमध्येही कवीची कलाकुसर डोकावते. त्या भावनात्मकतेवर आधारित आहेत व 'रोमँटिक' (Romantic) अद्भुतरम्य शैलीत लिहिलेल्या आहेत. त्यात 'मृत्यु' ही एक वारंवार भेटणारी व्यक्ती आहे.

त्यांच्या 'अंतरपट' ह्या कादंबरीच्या कथानकात नेहमीचा 'प्रेमाचा त्रिकोण' आहे. पानी, केशु आणि नरहरी ही त्या त्रिकोणाची तीन टोके. पानीचे केशू आणि नरहरी यांच्याबद्दलचे प्रेम हा कथानकाचा केंद्रबिंदू आहे. तिचे नरहरीबद्दलचे प्रेम हे सहजस्फूर्त व स्वाभाविक आहे. हे प्रेम तिच्या व केशूच्या हृदयमीलनात अंतरपटासारखे आड उभे राहते; पण तरी ती केशूवर भक्तिपूर्ण प्रेम करते.

पहिल्या जागतिक युद्धाच्या वेळी गुजरातच्या एका खेडेगावात ही कथा

घडलेली दाखविली आहे. त्या वेळच्या बऱ्याच राजकीय, सामाजिक आणि शैक्षणिक समस्यांची चर्चा व पृथक्करण ह्या पुस्तकात केले आहे; पण खरे पाहता, ह्या चर्चेचा कथानकाच्या विकासाशी जवळचा वा महत्त्वाचा असा काही संबंध दिसून येत नाही किंवा पानी, केशू आणि नरहरी ह्यांचा एकमेकांशी असलेल्या संबंधावरही ह्या चर्चेचा काहीच परिणाम होत नाही.

पात्रलेखनात लेखकाची कुशाग्रबुद्धी दिसून येत नाही किंवा विनोदबुद्धीचा एखादा विशेष ह्यात दिसून येत नाही; पण त्यांची वर्णने आणि कथाकथन ही फार सामर्थ्यशाली आहेत व त्यांची पात्रे–जी त्यांनी आधीच आदर्शवादी वृत्तीची रंगविली आहेत– त्यांना अधिकाधिक उच्च आदर्शाकडे नेण्याची त्यांची वृत्ती यात दिसून येते.

स्नेहरश्मींची आत्मकथा 'मारी दुनिया' ह्यामध्ये ते लहानपणी ज्या खेडेगावात रहात होते व जेथील जीवनाशी ते एकरूप झाले होते त्या जीवनातील निरनिराळी चित्रे आपल्याला पहावयास मिळतात. तसेच नंतरच्या काळात मुंबईस अभ्यास करीत असतानाच्या त्यांच्या तेथल्या विद्यार्थी जीवनाचीही चित्रे ह्यात आपणास आढळतात. अद्यापि ह्या पुस्तकाचा फक्त पहिला भागच प्रकाशित झाला आहे.

## नगीनदास नारणदास पारेख [ १९०३ ]

हे भाषान्तरकार व समीक्षक ( टीकाकार ) म्हणून प्रसिद्ध आहेत. त्यांनी 'गीतांजली', 'घरेबाहिरे', 'वसर्जन', 'राजा', 'पुजारिनी' आणि 'डाकघर' ह्या रवींद्रनाथ टागोरांच्या, 'परिणीता', 'पल्ली समाज' आणि 'चंद्रनाथ' ह्या शरच्चंद्र चतर्जींच्या, 'काव्यविचार' ह्या सुरेंद्रनाथ बॅनर्जींच्या–बंगाली पुस्तकांची गुजरातीत भाषान्तरे केली आहेत व त्यांनी काही इंग्रजी पुस्तकांचीही गुजरातीत भाषान्तरे केली आहेत. त्यात 'अमंग द ग्रेट' (तीर्थसलील) हे दिलीपकुमार रॉय ह्यांचे पुस्तक व 'कल्की' हे डॉ. एस्. राधाकृष्णन् ह्यांचे पुस्तक ह्यांचा समावेश होतो. नगीनदासांनी भाषान्तरे फार काळजीपूर्वक व जाणीवपूर्वक केलेली आहेत. ही भाषान्तरे मूळ पुस्तकाला अगदी धरून केलेली आहेत. मात्र ती पुस्तके मुळात सर्जनात्मक साहित्याची असली तरी त्यातील मूळ काव्यात्मकतेचा अंश काहीसा कमी प्रमाणात त्यात उतरलेला दिसून येतो.

टीकाकार ह्या दृष्टीने नगीनदास हे ठाम मताचे, सर्वग्राही वृत्तीचे व स्पष्टवक्ते आहेत. त्यांचा साहित्याच्या तात्त्विक सिद्धान्तांच्या विशिष्ट विषयांचा अभ्यास परिपूर्ण आहे.

# सुंदरजी बेटाई [ १९०४ ]

सुदरजी गोकुळदास बेटाई ह्यांचा जन्म बेटद्वारका येथे झाला. बेटाईंनी कविता व साहित्यटीका लिहिल्या आहेत. त्यांनी 'भगवद्‌गीता', 'धम्मपद', 'महाभारता'चे काही अध्याय ह्यांचे व हेन्‍री डेवीड थोरो ह्यांच्या 'वॉल्डेन' ह्या पुस्तकांचे गुजरातीत भाषान्तर केले आहे.

बेटाईच्या कविता सात खंडांत संग्रहित केलेल्या आहेत. खंडशः त्यांची नावे—'ज्योतिरेखा', 'इंद्रधनु', 'विशेषांजलि', 'तुलसीदल', 'व्यंजना', 'अनुव्यंजना' आणि 'शिशिरे वसंत' अशी आहेत. ह्याशिवाय त्यांनी 'सद्‌गत चंद्रशीलाने' ही कविता लिहिली आहे. त्यांचे साहित्यटीकाविषयक लेख 'सुवर्णमेघ' ह्या नावाने एकत्रित केलेले आहेत.

ह्यांपैकी 'ज्योतिरेखा' ह्या खंडांत पाच खंडकाव्ये संग्रहित आहेत. बेटाईंनी दोन 'विलापिका' लिहिल्या आहेत—एक, 'इन्द्रधनु' व दुसरी 'सद्‌गत चंद्रशीलाने'. 'इंद्रधनू' ह्या खंडातील 'इंद्रधनु' ही कविता त्यांच्या सुपुत्राच्या मृत्युप्रसंगी लिहिलेली आहे. 'सद्‌गत चंद्रशीलाने' ही त्यांच्या पत्नीच्या मरणसमयी लिहिली गेली व नतर ती 'तुलसीदल' ह्या खंडात समाविष्ट करण्यात आली.

विशेषकरून बेटाईच्या खंडकाव्यावर व साधारणपणे पूर्वकाळात रचलेल्या कवितांमध्ये नरसिंहरावांच्या शोकगीतातील विचारांची उदात्तता आणि अभिजात शब्दरचना दिसून येते.

उच्च प्रकारची गंभीरता, भावनांवरचा ताबा, सौम्यता, चिंतनाची परिपक्वता व ईश्वर (व्यक्तिगत देव नव्हे)—म्हणजे अंतिम सत्य— ज्यापासून दरेक वस्तू उत्पन्न होते व दरेक वस्तू ज्यांत विलीन होते— त्या ईश्वराच्या नियंत्रक शक्तीवर असलेली दृढ श्रद्धा हे बेटाईच्या कवितांचे काही ठळक विशेष आहेत.

बेटाईंचे पहिले पुस्तक 'ज्योतिरेखा' हे १९३४ मध्ये प्रकाशित झाले व त्यांचे सर्वांत शेवटचे पुस्तक 'शिशिरे वसंत' (कविता संग्रह) १९७६ मध्ये प्रकाशित झाले. बेटाईंचा भावनांच्या उद्रेकावर ताबा आहे तरी त्यांच्या कविता आपल्यापुढे— ह्या पन्नास वर्षांच्या काळात कवीला काय काय सहन करावे लागले व त्यांच्या मनावर काय परिणाम झाला त्याविषयीच्या भावनांचा आलेखच उभा करतात. तसेच त्या वेळी ज्या काही महत्त्वाच्या घटना घडल्यामुळे भारताला एवढेच नव्हे, साऱ्या जगाला जो धक्का बसला व इतिहासाचे रूपच बदलून गेले त्यावरची कवीची प्रतिक्रियाही आपल्याला त्यांच्या कवितांतून कळून येते. त्यामुळे कवीच्या भावनाशीलतेचे आपणांस दर्शन घडते. त्यांच्या कवितांत मधून मधून प्रफुल्लता व आनंद भरलेला दिसून येत असला तरी त्या कवितांत त्यांचा भ्रमनिरासही होताना स्पष्टपणे दिसून येतो. अशा रीतीने मानवी मनातील भावनांबद्दल त्यांना निराशा

व खिन्नता वाटली की ते निसर्गसौंदर्याकडे वळतात व निसर्गाच्या निरनिराळ्या रूपात रंगून जातात. त्यांच्या नंतरच्या कवितांत आपणांस असे दिसून येते की ते बऱ्याच वेळा आपल्या बाळपणीच्या आठवणी काढण्यात रंगून जातात. मात्र त्यांच्या बाळपणीच्या आठवणींच्या दिवसात एक वेदनेचा सूर उमटलेला दिसून येतो.

बेटाईंनी पूर्वायुष्यात लिहिलेल्या भावकाव्यात व भजनांत उत्कृष्ट प्रकारची काव्यात्मकता व कौशल्यपूर्ण कारागिरी दिसून येते. नंतर लिहिलेली ऊर्मिकाव्ये बऱ्याच वेळा पाल्हाळिक व शब्दांच्या कसरतीने भरलेली वाटतात. 'सुवर्णमेघ' ह्या संग्रहात एकत्रित केलेल्या लेखात त्यांची सूक्ष्म दृष्टी व साहित्यातील समज फार मोठ्या प्रमाणात दिसून येते. त्यांचे निर्णय अगदी पक्के असतात व त्यांच्या मतप्रदर्शनात आपणास मृदुता व संयम दिसून येतात. बेटाईंनी केलेले 'वाल्डेन'चे भाषान्तर साहित्य अकादमीने प्रकाशित केले आहे.

## केशवराम शास्त्री [ १९०५ ]

केशवराम काशीराम शास्त्री हे व्याकरण, भाषाशास्त्र, अपभ्रंश, जुनी व मध्ययुगीन गुजराती कविता आणि इंडॉलॉजी ह्या विषयांचे गाढे विद्वान आहेत. वल्लभाचार्यांच्या पुष्टिमार्गावरील साहित्याचा त्यांनी सखोल अभ्यास केलेला आहे.

शास्त्रींनी अनेक मध्ययुगीन कवी व त्यांचे ग्रंथ उजेडात आणले. त्यांनी अनेक विषयांवरील जुन्या सिद्धान्तांवर आक्षेप घेतले. ह्यात शब्दानुलेखन व शब्दउच्चारण ह्या शास्त्रापासून तो नरसिंह, मीराबाई, प्रेमानंद व इतर काही लेखकांच्या नक्की केलेल्या समयापर्यंतचे विषय आहेत. अशा रीतीने जुन्या सिद्धान्तांवर आक्षेप घेऊन त्यांनी आपले नवे सिद्धान्त मांडले. मध्ययुगीन साहित्यातील एकही विषय असा नसेल की ज्याला केशवराम शास्त्रींनी स्पर्श केला नसेल. तसेच त्यांतील आधीच्या मूल्यांकनांचे त्यांनी पुन्हा परीक्षण करून त्यात सुधारणा केली आहे.

शास्त्रींची ग्रंथसंपत्ती विशाल आहे. त्यांनी व्याकरणशास्त्र, छंदःशास्त्र, भाषाशास्त्र, साहित्याचा इतिहास इ. विषयांवर पुस्तके लिहिली आहेत. त्यांनी दोन भागांत 'कविचरित' लिहिले आहे. भविष्यातील इतिहासकाराला मध्ययुगीन साहित्याचा सविस्तर इतिहास लिहिण्यास हे पुस्तक अतिशय अमूल्य माहिती पुरविते.

शास्त्रींनी अनेक पुस्तके संपादित केली आहेत. त्यात 'भालणच्या कादंबरी'चाही समावेश होतो. शास्त्रींनी 'सिद्ध-हेम' ह्या ग्रंथातील अपभ्रंश-व्याकरण ह्या विषयावरील प्रकरणांचेही गुजरातीत भाषान्तर केले आहे; पण काही ठिकाणी यांचे भाषान्तर चुकीचे आहे, असे तज्ज्ञांचे मत आहे.

शास्त्रींनी कालीदासाच्या 'अभिज्ञान शाकुन्तल', 'मालविकाग्निमित्र' व 'विक्रमोर्वशीय' ह्या संस्कृत नाटकांचे गुजरातीत भाषान्तर केले आहे; पण कालीदासाच्या ज्या गुणांमुळे तो भारतातील सर्वांत श्रेष्ठ कवी मानला गेला ते काव्यगुण अथवा बुद्धिमत्ता ह्या भाषान्तरित नाटकात जराही दिसून येत नाही. शास्त्रींनी भासकवीच्या काही नाटकांचेही गुजरातीत भाषान्तर केले आहे.

शास्त्रींच्या लेखनात त्यांची अथक परिश्रम करण्याची शक्ती व उत्साह दिसून येतात. त्यांचे शिक्षण पूर्ण झालेले नव्हते व त्यांना प्राप्त झालेल्या साधन-सामग्रीत कमतरता होती तरी केशवराम शास्त्री हे एकमेव असे लेखक आहेत की ज्यांनी जुन्या व नव्या मध्ययुगीन गुजराती साहित्याच्या निरनिराळ्या क्षेत्रात खूपच अमूल्य कामगिरी केली आहे.

## मनसुखलाल झवेरी [ १९०७ ]

मनसुखलाल मगनलाल झवेरींचा जन्म जामनगरला झाला.

त्यांची काव्ये– 'चन्द्रदूत', 'फूलडोल', 'आराधना', 'अनुभूति', 'काव्य-सुषमा', 'डूमो ओगाळयो'. टीकाग्रंथ– 'थोडा विवेचन लेखो', 'पर्येषणा', 'काव्य-विमर्श', 'अभिगम', 'गोवर्धनराम', 'नानालाल', 'कनैयालाल मुनशी', 'उमाशंकर जोशी', 'बळवंतराय ठाकोर', 'गुजराती भाषासाहित्य', 'गांधीयुगनुं साहित्य', 'नानालाल–जीवन अने कवन', 'आपणां ऊर्मिकाव्यो', 'आपणो कवितावैभव'– २ भाग. इतिहास–डॉ. रमणलाल सी. शाह ह्यांच्या सहयोगाने लिहिलेले 'गुजराती साहित्यनुं रेखादर्शन,' 'गुजराती व्याकरण', 'गुजराती भाषाव्याकरण अने लेखन', 'भाषापरिचय–' ४ भाग. प्रवासवृत्तान्त– 'अमेरिका–मारी दृष्टिअे', व्यक्तिरेखा– 'चित्रांकन' असे त्यांचे साहित्य आहे. 'गुजराती टूंकी वार्ता' वगैरे अनेक पुस्तकांचे मनसुखलालनी संपादनही केले आहे. त्यांनी कालिदासाच्या संस्कृत 'अभिज्ञान शाकुंतला'चे व 'भगवद्‌गीते'चे गुजरातीत भाषान्तर केले आहे. तसेच इंग्लिश 'हॅम्लेट' व 'ऑथेल्लो' यांचे जॉर्ज ऑरवेलच्या 'ॲनिमल फार्म'चे व जवाहरलाल नेहरूंच्या 'इण्डिया टुडे ॲण्ड टुमॉरो' यांचे गुजरातीत भाषान्तर केले आहे.

'चंद्रदूत' हे काव्य कालीदासाच्या 'मेघदूता'ची नक्कल आहे. त्यांची 'डूमो ओगाळयो' ह्याशिवाय इतरही अनेक काव्यपुस्तके आहेत. भावकाव्ये, सॉनेटस्, वर्णनात्मक व कथनात्मक कविता, खंडकाव्ये, शोकगीते व दीर्घ कथनात्मक कविता ह्यांचे ते संग्रह आहेत. त्यात 'महाभारत' ह्या काव्याचाही समावेश होतो. 'महाभारता'त कुरुक्षेत्रावर झालेल्या महाभारतीय युद्धातले काही प्रसंग वर्णिलेले आहेत. 'डूमो ओगाळयो' (१९७५) हा मनसुखलाल ह्यांचा सर्वांत शेवटचा

कवितासंग्रह आहे. ह्यात वृद्धपणी हृदयाला व्यापून टाकणाऱ्या दुःखाच्या व निराशेच्या भावनांचे वर्णन केले आहे.

टीकात्मक पुस्तकांपैकी 'काव्यविमर्श' ह्या पुस्तकात साहित्य काव्य कसे असावे ह्यासंबंधीचे मनसुखलाल ह्यांचे विचार प्रकट झालेले आहेत. गोवर्धनराम, नानालाल, कनैयालाल मुनशी, उमाशंकर जोशी व बळवंतराय ठाकोर ह्या पुस्तकांत ज्या त्या लेखकाच्या मुख्य मुख्य पुस्तकांसंबंधीचे मनसुखलाल ह्यांचे लेख व अभ्यास संग्रहित केलेले आहेत.

'गुजराती भाषा साहित्य' हा ग्रंथ म्हणजे दक्षिण गुजरात युनिव्हर्सिटीने आयोजित केलेल्या 'कमलाशंकर प्राणशंकर त्रिवेदी' व्याख्यानमालेत मनसुखलालनी दिलेल्या तीन व्याख्यानांचा संग्रह आहे. 'गांधी युगनुं साहित्य' हा मुंबई युनिव्हर्सिटीने आयोजित केलेल्या 'ठक्कर वसनजी माधवजी' व्याख्यानमालेत दिलेल्या पाच व्याख्यानांचा संग्रह आहे आणि 'नानालाल-जीवन अने कवन' हा सौराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या आयोजनाखाली मनसुखलालनी दिलेल्या तीन व्याख्यानांचा संग्रह आहे. 'थोडा विवेचनलेखो', 'पर्येषणा' आणि 'अभिगम' ह्या पुस्तकात मनसुखलाल ह्यांचे साहित्याची तत्त्वे, पुस्तके आणि काही लेखक व काही साहित्यप्रकारांचा ऐतिहासिक विकास वगैरे विषयांवरील लेख संग्रहित केलेले आहेत.

'आपणां ऊर्मिकाव्यो' आणि 'आपणो कवितावैभव' २ भाग ह्या पुस्तकातील लेख 'मुंबई समाचार' ह्या प्रख्यात दैनिक वृत्तपत्रातून प्रसिद्ध झालेले आहेत. 'आपणो कवितावैभव'च्या दोन भागात १५० कवींच्या एक एक कवितेवर विवेचन केले आहे. त्यात गोवर्धनरामांपासून ते आजच्या कवींपर्यंतच्या कविता आहेत. 'आपणां ऊर्मिकाव्यो'मध्ये नरसिंह महेता ते नर्मद-दलपतराम-पर्यंतच्या कवींच्या ५० कवितांवर विवेचन केलेले आहे. 'आपणो कवितावैभव'प्रमाणेच 'आपणां ऊर्मिकाव्यो' ह्या कविताही पहिल्याने वृत्तपत्रातून ओळीने प्रसिद्ध झाल्या; पण ह्या संग्रहात एका कवीची एक कविता असा नियम पाळलेला नाही.

मनसुखलाल ह्यांची व्याकरण-विषयाची पुस्तके ही संस्कृत व इंग्रजी व्याकरणाच्या पायावर रचलेली आहेत. त्या पुस्तकात लेखनाच्या विषयांचीही चर्चा केलेली आहे.

'अमेरिका—मारी दृष्टिए' हा प्रवासवृत्तान्त आहे. 'अमेरिकाना पत्रो' ह्या नावाखाली हा वृत्तान्त 'मुंबई समाचार' ह्या पत्रातून मालारूपाने प्रसिद्ध झाला होता.

'चित्रांकन'मध्ये कित्येक साहित्यिकांची व मनसुखलाल ह्यांच्या नातलग व्यक्तींची रेखाचित्रे रेखाटलेली आहेत.

'गुजराती टूंकी वार्ता' ह्यात १६ गुजराती लघुकथा आहेत. हे पुस्तक व

हॅम्लेटचे केलेले भाषान्तर ही दोन्ही साहित्य अकादमीने प्रकाशित केली आणि 'भारत–आज अने आवतीकाल' हे नॅशनल बुक ट्रस्टतर्फे प्रकाशित झाले आहे.

'गुजराती टूंकी वार्ता' ह्याचे तामिळ भाषेत भाषान्तर झाले आहे.

कै. प्रो. मनसुखलाल झवेरी यांच्या कार्याबद्दल प्रो. विष्णुप्रसाद त्रिवेदी म्हणतात–" मोठे नामांकित टीकाकार असे मानतात की काव्य, भाषान्तर व टीका ह्या क्षेत्रांतील मनसुखलाल ह्यांची कामगिरी फार मोठी आहे. त्यांच्या मताप्रमाणे मनसुखलाल ह्यांची काव्यातील रुचि अभिजात आहे. टीका करण्याची त्यांची रीत न्यायाची व प्रखर आहे आणि त्यांच्या अभिरुचीचे व सहानुभूतीचे क्षेत्र फार विस्तृत आहे. त्यांनी केलेले 'हॅम्लेट'चे भाषान्तर ही एक फार मोठी सिद्धी आहे. त्यांचे हृदय उष्मापूर्ण व भावनापूर्ण आहे; पण काव्यात किंवा टीकात्मक लेखनात ते कधीही प्रमाण व सत्याच्या कक्षेबाहेर जात नाहीत."

## सुंदरम् [ १९०८ ]

त्रिभुवनदास पुरुषोत्तम लुहार हे 'सुंदरम्' ह्या नावाने प्रसिद्ध आहेत. त्यांचा जन्म भडोच जवळ मियांमातर येथे झाला. गुजरात विद्यापीठातून स्नातक होऊन त्यांनी थोडे दिवस अहमदाबादच्या शाळेत शिक्षक म्हणून काम केले. १९४५ पासून ते साधक म्हणून पाँडिचेरी येथील श्रीअरविंद आश्रमात वास्तव्य करून राहिले आहेत.

सुंदरम् ह्यांची काव्ये– 'कोया भगतनी कडवी वाणी', 'काव्यमंगला', 'रंग रंग वादळियां', 'वसुधा', 'यात्रा' ही आहेत. लघुकथा– 'हीराकणी अने बीजी वातो', 'उन्नयन'. टीकाग्रंथ– 'अर्वाचीन कविता', 'अवलोकना', 'चिदम्बर'. प्रवास-वृत्तान्त– 'दक्षिणायन'. त्यांनी संस्कृतमधील शूद्रकाच्या 'मृच्छकटिक' नाटकाचे आणि 'भगवदज्जुकीयम्' ह्या बोधायनाच्या फार्सचे गुजरातीत भाषान्तर केले आहे. तसेच इंग्लीशमधील *Ernst Toller* च्या *Transfiguration of Masses and Men* ह्याचे व श्रीअरविंदांच्या 'सावित्री'च्या काही भागाचे व त्यांच्या इतर काही महान ग्रंथांचे गुजरातीत भाषान्तर केले आहे. १९४७ पासून सुंदरम् 'दक्षिणा' ह्या त्रैमासिकाचे संपादन करीत आहेत.

'कोया[३०] भगतनी कडवी वाणी अने गरिबोनां गीतो" (१९३३) हा सुंदरम् यांच्या कवितांचा संग्रह आहे. गरीबांची निर्दयतेने पिळवणूक चालली आहे व श्रीमंत लोक चैनीत, श्रीमंतीत लोळत पडले आहेत अशी समाजाची स्थिती पाहून ज्याच्या मनाचा पूर्णपणे भ्रमनिरास झालेला आहे, अशा संवेदनशील कवीचे हृदय या कवितांत प्रकट झाले आहे. कवीला पूर्णपणे कळून चुकते की, हे बुद्धिहीन व अन्यायाने भरलेले जातिभेद ईश्वरानेच केलेले नियम आहेत, असे मानून लोक

निमूटपणे त्याचे पालन करतात. म्हणून त्यांनी देवाला विचारले आहे, "रागाने डोळे वटारून व धमकी देऊन कोया भगत तुला विचारतो आहे की आम्ही युगे युगे तुला सांभाळले. आता तुझे येथे काय काम आहे ?[३१]"

ह्या कवितांतील विषयांवर १९३० ते १९३५ सालच्या काळातील उद्दाम-वादी विचार व मतप्रणालींचा फार मोठा प्रभाव पडलेला दिसून येतो; पण त्यातील भाषा, शैली व त्यांची जडणघडण पाहून मात्र सुंदरम् ह्यांच्या अस्सल कवितांबद्दल आपली खात्री झाल्याशिवाय राहात नाही.

**काव्यमंगला (१९३३)–**

हे पुस्तक 'कोया भगतनी कडवी वाणी' ज्या वर्षी प्रकाशित झाले त्याच वर्षी प्रकाशित झाले; पण गुणांच्या दृष्टीने ते कोया भगतपेक्षा निराळे आहे. 'कडवी वाणी'त ईश्वराला निघून जाण्याची केलेली आज्ञा अथवा हुकूम कोणी निरीश्वर-वादी व्यक्तीने केलेला हुकूम नसून अशा व्यक्तीने केलेला हुकूम आहे, ज्याला पक्के कळून चुकलेले आहे की ईश्वर व त्याची इच्छा ह्याचे खरे स्वरूप समजून घेण्यात मानवजातीने फार मोठी चूक केली आहे. सुंदरम् कवीची स्वतःची ईश्वरा-बद्दलची कल्पना म्हणजे सत्य, शिव व सुंदर ह्यांची सर्वव्यापी त्रिपुटी ही आहे. ते असे मानतात की, ईश्वराने जगाची स्थापना सत्यावर केली आहे. (म्हणजे जग हे माया नसून सत्य आहे). तो हृदयात मांगल्य (शिव) ठेवून त्याचे पोषण करतो व त्याला सौंदर्याची जोड देऊन मनुष्याला त्यात राहायला आवडेल असे बनवितो. अशा ईश्वराच्या न्यायबुद्धीवर दृढ श्रद्धा ठेवून कवी आपली नाव जीवनाच्या सागरात सोडून देतो. कडवी वाणीतील, 'त्रण पाडोशी', 'भंगडी', 'टिटोडी अने सागर' व इतर काही कवितांचा ह्यांत समावेश केला आहे. ह्या कवितांत सामाजिक अन्यायाविरुद्ध त्वेषाने उफाळून आलेले सरळ उद्गार नाहीत; पण अनेक गोष्टी व प्रसंगाद्वारे त्यांनी सामाजिक अन्यायाकडे वाचकांचे लक्ष वेधले आहे.

ज्यांत गांधीयुगाचे सत्त्व पूर्ण स्वरूपात प्रकट झाले आहे असा काव्यमंगला हा पहिला काव्यसंग्रह आहे. भाव, चिंतन, नवी दृष्टी व त्याप्रमाणे कृती ह्या चार विशेषांनी 'काव्यमंगला' हा संग्रह सर्वांना प्रफुल्ल मारुत-लहरींप्रमाणे सुखद—चैतन्यमय—वाटतो.

**वसुधा (पृथ्वी) १९३९–**

ह्या संग्रहात कवी काव्य कल्पनेच्या उच्च परिसरातून खाली पृथ्वीवर उतरलेला दिसतो. खरे पाहता 'काव्यमंगला'तील 'काव्यप्रणाश' (काव्याचा नाश) ह्या काव्यापासूनच कवी पृथ्वीवर उतरू लागलेला आहे. 'वसुधा'त गुजराती भाषेतील प्रणयभंगाविषयीच्या काही अत्युत्कृष्ट कविता आढळून येतात.

तसेच ह्या संग्रहात काही अतिसुंदर वास्तवदर्शी कविताही आहेत. उदाहरणार्थ– '१३.७ नी लोकल' आणि 'ईटाळा' मानवजातीविषयी मनात करुणा उत्पन्न होऊन ह्या कविता रागाने लिहिलेल्या नसून दुःखाने लिहिलेल्या आहेत. '१३.७ नी लोकल' ह्या कवितेत एका अगदी लहानशा रेल्वे स्टेशनचे चित्र रेखाटले आहे. दुपारची वेळ असते व एक लोकलगाडी प्रत्येक स्टेशनवर थांबत थांबत ह्या स्टेशनवर पोहोचायची वेळ झालेली असते. ह्यातील शब्दचित्र फारच सुंदर आहे.

**यात्रा (१९५१)–**

एका यात्रिकाच्या अध्यात्म मार्गावरील यात्रेचे वर्णन करणाऱ्या कवितांचा ह्यात संग्रह केलेला आहे. 'काव्यमंगला'तील "पृथ्वी मातेच्या मांडीवर मोठा झालेल्या मला–एका मनुष्याला–मनुष्य होता आले तरी पुरे आहे."[३३] ह्या त्यांच्या कवितेच्या पहिल्या टप्प्यापासून ते 'यात्रा' या संग्रहातील "हे माझ्या देहा, तुझ्या दाही अग्रातून चैतन्य उसळत आहे व दशजिव्ह अग्नीप्रमाणे पसरत आहे आणि विखुरले आहे त्या चैतन्याला–अग्नीच्या ज्वालांना तू आपल्या ओंजळीत भरून घे. अशा प्रकारे गोळा केलेली व एकत्र आलेली ही दृढ ज्वाला तुझ्या अहंपणाच्या वनाला भस्म करील व अगम्यात आरोहण करायला ती तुला एखाद्या पर्वतशिखराप्रमाणे उपयोगी पडेल."[३४] ह्या कवितेपर्यंतचा हा शेवटचा टप्पा फार दूरवरचा वाटतो. विषय तर बदललाच आहे; पण शैलीही बदलली आहे. 'काव्यमंगला' व 'वसुधा' ह्यात दिसून येणारी छंदांची विविधता व संयोग ह्यात दिसून येत नाहीत. शब्दयोजना स्पष्ट असली तरी जरा बोजड आहे. मात्र ह्यात कवीची सर्वांगीण कुशलता संपूर्ण रीतीने प्रकट झालेली दिसून येते व त्याच्या तल्लख तत्परतेचेही दर्शन त्यात होते. कवीच्या 'यात्रे'ची सुरुवात आहे शेवट नव्हे. कवीच्या अंतर्मनात चाललेला संघर्ष व प्रेमाची परिपूर्ती न झाल्यामुळे होणारी असह्य व्यथा हे भाव 'राघवनुं हृदय' आणि 'फूल दीधुं' ह्या कवितेत मूर्तिमंत झालेले आपल्याला दिसून येतात आणि म्हणूनच आपल्याला आरनोल्डच्या पुढील पंक्तींची आठवण करून देतात–

> These things, Ulysses,
> The wise bards also
> Behold and sing.
> But O, What labour !
> O Prince, What Pain !

सुंदरम्‌च्या सहानुभूतीचे क्षेत्र फार विशाल आहे. भावना, मनोभाव, चिंतन व विचार ह्या क्षेत्रात त्यांच्या कवितेची एकसारखी सहज गती दिसून येते. त्यांची

लेखनशैली औचित्य, संनिष्ठता, स्पष्टवक्तेपणा व सरलता ह्या गुणांनी परिपूर्ण आहे.

सुंदरम्च्या लघुकथा वास्तवलक्षी आहेत; पण काही कथात कलादृष्टीची परिपूर्णता दिसून येत नाही. त्यांच्या 'खोलकी' (एक लहान गाढवी) ह्या कथेवर गुजरातमध्ये काही काळ फार खळबळ माजली होती व सोवळ्या वृत्तीच्या लोकांनी तिच्यावर अश्लीलतेचा शिक्का मारला होता; पण गुजरातच्या उत्तम वास्तववादी लघुकथांपैकी ती कथा आहे.

**दक्षिणायन–**

'सुंदरम्' ह्यांचा प्रवासवृत्तान्त 'दक्षिणायन' ह्यात त्यांनी केलेल्या दक्षिण हिंदुस्थानच्या प्रवासाचे वर्णन आहे. काही काही ठिकाणी ह्यातील भाषा बोजड वाटते व काकासाहेबांच्या 'हिमालयनो प्रवास' ह्यात जो आनंद मिळतो तो ह्यात मिळत नाही; पण त्यातील अनेक उपमा, हुबेहूब वर्णने, त्याचा डौल, त्यातील लालित्य, गंभीर चिंतन व शुद्ध स्वदेशाभिमान ह्या गुणांमुळे त्यावर सुंदरम्च्या बुद्धिमत्तेचा स्पष्ट ठसा उमटलेला दिसून येतो.

**अर्वाचीन कविता–**

सुंदरम्च्या ह्या पुस्तकात अर्वाचीन गुजराती कवितेच्या इतिहासाची रूप-रेखा दिलेली आहे. १८४५ ते १९४५ ह्या शतकातील एकूणएक गुजराती कविता सुंदरम्नी सहानुभूतिपूर्वक अभ्यासिली आहे. ह्या काळात जी जी काव्ये निर्माण झाली व जेथे जेथे प्रकाशित झाली त्यांचा बारकाईने शोध करून त्यासाठी जुनी नवी, बंद पडलेली सामयिके व शालेय पाठ्यपुस्तके धुंडाळून १९३० पर्यंतच्या सर्व कवितांचे आणि त्या काळापर्यंतच्या सर्व मुख्य लेखकांच्या कृतींचे निरूपण व मूल्यांकन त्यांनी केले आहे आणि १९३० नंतरच्या काळातील फक्त नव्या काव्य-प्रवाहांचे निरूपण केले आहे. हा ग्रंथ गुजराती साहित्यातील एक अजोड व अतुलनीय कलाकृती आहे.

**अवलोकना–**

हा सुंदरम्नी लिहिलेल्या काही आमुख व प्रस्तावनांचा संग्रह आहे. ह्या प्रस्तावना त्यांनी काही उदयोन्मुख लेखकांच्या पुस्तकांना लिहिल्या होत्या. तसेच ह्यात गुजरात साहित्य सभेकरता १९४१ मध्ये प्रकाशित झालेल्या पुस्तकांचे परीक्षणही आहे व ते स्वतः विद्यार्थी असताना त्यांचे कॉलेजचे मॅगेझिन 'साबरमती' ह्यात त्यांनी लिहिलेल्या नोटिसा (सूचना) व पुस्तकांचे केलेले परीक्षण ह्यांचाही अवलोकनात समावेश केला आहे. अवलोकनात खऱ्या अर्थाने ज्याला अमुक

विषयाचा अभ्यास असे म्हणता येईल असे फारच थोडे लेख आहेत. सुंदरम्‌ची बळवंतराय ठाकोर, नानालाल, मेघाणी, स्नेहरश्मि आणि रमणलाल देसाई ह्या लेखकांविषयींची मते विवादास्पद आहेत. तरी त्यात सुन्दरम् ह्यांची तटस्थता, स्पष्टवक्तेपणा, निर्भयता व सरळ निःसंदिग्धपणे मत प्रकट करण्याची वृत्ती दिसून आल्यामुळे ह्या लेखनात सुन्दरम् ह्यांचे स्पष्ट रूप उमटलेले दिसून येते.

'चिदम्बर' हा सुन्दरम् ह्यांच्या गंभीर विषयांवरील ललित लेखांचा संग्रह आहे.

## गुलाबदास ब्रोकर [ १९०९ ]

गुलाबदास हरजीवनदास ब्रोकर ह्यांचा जन्म पोरबंदरला झाला. ब्रोकर ह्यांचे साहित्य, लघुकथा– 'लता अने बीजी वातो', 'वसुन्धरा अने बीजी वातो', 'उभी वाटे', 'सूर्य', 'प्रकाशनुं स्मित', 'माणसनां मन', 'जीवननां अमृत', 'भीतरनां जीवन', 'प्रेमपदारथ'.

सत्य घटनांवरील कथा– 'पुण्य परवार्यु नथी', 'हरिनो मारग', 'अमृत दीक्षा'; नाटके– 'धूम्रसेर', 'मननां भूत'; एकांकिका– 'ज्वलन्त अग्नी', काव्य– 'वसंते'; टीका– 'रूपसृष्टिमां', 'अभिव्यक्ति'; प्रवास वर्णन– 'गगननी नीचे'.

ह्याशिवाय त्यांनी बऱ्याच इंग्रजी व हिंदी कथांची गुजरातीत भाषान्तरे केली आहेत. साहित्य अकादमीसाठी त्यांनी इब्सेनच्या *Ghosts* (भुतावळ) चेही भाषान्तर केले आहे व 'गुजरातीनां एकांकी' ह्या पुस्तकाचे व इतर अनेक दुसऱ्या पुस्तकांचे संपादनही केले आहे.

साहित्य अकादमीसाठी संपादिलेल्या 'गुजरातीनां एकांकी' ह्या पुस्तकाचे हिंदी, सिंधी व तामिळ भाषेत त्यांनी भाषान्तर केले आहे. ब्रोकर ह्यांच्या कित्येक कथांची हिंदी, मराठी, मल्याळम, सिंधी, इंग्रजी व दुसऱ्या युरोपच्या भाषात भाषान्तरे झाली आहेत.

ब्रोकर हे उमाशंकर, सुन्दरम् आणि पन्नालाल पटेल ह्यांचे समकालीन असले तरी त्यांनी ह्या तिघांप्रमाणे आपली दृष्टी खेडेगावांकडे अथवा समाजातील खालच्या थरातील लोकांकडे वळविली नाही; पण त्यांनी मोठ्या शहरात राहणाऱ्या उच्च मध्यम स्थितीतील कुटुंबातील सुखोपभोग लोलुप तरुण स्त्री-पुरुषांची चित्रे रेखाटली आहेत. मानवाचे मनोव्यापार जाणण्याची विलक्षण बुद्धी ब्रोकर ह्यांच्यात असल्यामुळे त्यांनी आपल्या कथात ज्यावर मनुष्याचे बाह्य आचरण अवलंबून असते त्याच्या अंतरंगातील प्रवाहांचे व विरोधी प्रवाहांचे फार खोलवर जाऊन सुंदर चित्र रेखाटले आहे. आपल्या सभोवतालचे जीवन गुलाबदासनी अगदी पूर्वग्रहरहित मनाने व सहानुभूतीने पाहिले आहे. त्याचा अगदी मुळापर्यंत जाऊन

अभ्यास करण्याचा व त्यातील गुंतागुंतीचे कार्य समजून घेण्याचा प्रयत्न केला आहे आणि त्याला कथारूपाने एक सुंदर आकार दिला आहे.

ब्रोकर हे कथाकथनात फार निपुण आहेत व त्यांच्या कथात भरपूर नाटच असते; पण त्यांची कथनाची गती बहुतेककरून संथ असते.

ब्रोकर ह्यांची सुरुवातीची 'लता शुं बोले' ही एक सुंदर कथा आहे. ही कथा सुरेश आणि निरंजन ह्या दोन पुरुषांची व लता ह्या एका स्त्रीची आहे. लता ही सुरेशची पत्नी असते. ती त्या दोघांचा मित्र निरंजन ह्याला व्यभिचार करण्यास प्रवृत्त करते. आपला चोरटा प्रेमसंबंध चालू ठेवून आपल्या मित्राचा विश्वासघात करणे हे निरंजनला सहन होत नाही व सुरेशला सर्व काही खरी हकीकत मोकळ्या मनाने सांगून लतेच्या आयुष्याचा नाश करणे, हेही त्याला पटत नाही म्हणून तो ते गाव सोडून निघून जातो.

रामनारायण पाठकांसारख्या महान लेखकाने संपादित केलेल्या 'प्रस्थान'-सारख्या उच्च अभिरुचिच्या मासिकात अशी व्यभिचारावरील एक कथा प्रकाशित व्हावी हा १९३० सालच्या [३६] काळात अत्यंत प्रखर कटु टीकेचा विषय झाला. ब्रोकर ह्यांनी ह्या कथेचा जेथे शेवट केला होता तेथून सुंदरम् ह्यांनी ती कथा उत्साहाने पुढे चालू केली आणि नंतर यशवंत पंड्या, रमणलाल सोनी, जेठालाल त्रिवेदी, चंद्रवदन मेहता आणि भोगीलाल गांधी ह्यांनी एकत्र येऊन प्रत्येकाने एक एक प्रकरण लिहून ती कथा पुढे चालवून पुरी केली. रमणलाल देसाईंना त्या कथेचे शेवटचे प्रकरण लिहून कथेचा शेवट करण्याचे सांगण्यात आले व ही ८ प्रकरणे 'लता' ह्या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली व त्या पुस्तकाला उमाशंकर जोशी ह्यांनी जी प्रस्तावना लिहिली आहे ती म्हणजे कुशल व चमकदार लेखनाचा सुंदर नमुनाच आहे.

अनेक लेखकांनी मिळून एक कथा लिहून ती पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्याचा हा प्रयोग गुजरातमध्ये पहिलाच नव्हता. मुनशींच्या 'गुजरात' मध्ये अशा तऱ्हेची एक कथा प्रकाशित झाली होती व बंगाली भाषेत अशा प्रकारच्या झालेल्या प्रयोगाचे ते गुजरातीमधले अनुकरणच होते.

ब्रोकर ह्यांच्या एकांकिका सुबक रीतीने रचलेल्या आहेत. त्यांच्या लघुकथां-प्रमाणेच त्यांच्या एकांकिका उच्च मध्यम स्थितीतील स्त्रिया व पुरुष ह्यांच्या जीवनातील वर वर सामान्य वाटणाऱ्या प्रसंगांवर आधारित असतात व लघुकथां-प्रमाणेच अशा सामान्य प्रसंगातून आपणाला त्यातील पात्रांच्या मनातील विचारांचे फार नाटयमय रीतीने सूक्ष्म दर्शन घडून येते आणि त्यामुळे ह्या सामान्य प्रसंगालाही एक नवेच रूप प्राप्त होऊन वाचकाला मानवी जीवनाच्या गुंतागुंतीची एक झलक पाहावयास मिळते

'धूम्ररेख' हे नाटक म्हणजे त्यांनी स्वतःच लिहिलेल्या त्याच नावाच्या कथेचे, धनसुखलाल महेता ह्यांच्या सहयोगाने केलेले नाटयरूपान्तर आहे. हे नाटक लिहिण्यामागचे अनेक हेतू स्पष्टपणे दिसून येतात. त्यांपैकी काही फार उदात्त आहेत. काही तितकेसे उदात्त नाहीत व काही केव्हा केव्हा एकमेकांचे अगदी विरोधी असे आहेत. ह्या आन्तरिक संघर्षामुळे ते मनुष्याला महान त्यागाची व शौर्याची कृत्ये करण्यास प्रवृत्त करतात. कमलनयन हा पिता जाणीवपूर्वक आपला एकुलता एक मुलगा बिपीन ह्याच्या मनात देशभक्तीची भावना प्रज्वलित करतो. परिणामी तो दहशतवादी चळवळीत सामील होतो व शेवटी ब्रिटिशांच्या एका तुरुंगात त्याला फाशी दिले जाते. हे कमलनयनचे पात्र व कमलनयनची पत्नी नीलिमा–जी मातृत्वाची मूर्तीच आहे–तिचे पात्र. ही दोन्ही पात्रे फार सुंदर रीतीने रंगविली आहेत.

'मननां भूत' ह्या नाटकाचा मूळ विषय ईर्षा हा आहे. येथे मानवाची बुद्धी व हृदय ह्यांच्यातील संघर्ष दाखविला आहे. बुद्धी–पत्नीचे पाप–अपराध विसरून तिला क्षमा करण्यास सांगत असते; पण स्वामित्वाच्या भावनेने भरलेले त्याचे हृदय विश्वासघात व पराभव ह्याला समत्व भावनेने तोंड देण्याचे नाकारते. शेवटी ह्या दोहोंच्या संघर्षात हृदयाची सरशी होते. ह्यातील अतिशय प्रबळ भावना व जोरदार मनोविकारांचा उद्रेक यथातथा चित्रित करण्यात गुलाबदास ह्यांची भाषाशैली अपुरी व असमर्थ वाटते. उलट स्वस्थ चित्ताने व विचारपूर्वक केलेले तर्क, दुसऱ्याला आपल्याकडे वळवून घेण्याची कला आणि विश्लेषण ह्याला मात्र ती अगदी योग्य अशी आहे.

ब्रोकर ह्यांच्या साहित्यिक टीकात साहित्यविषयक सिद्धान्तांच्या काही मूळ तत्त्वांची प्रामुख्याने चर्चा केली आहे. त्यात कवितेचे स्वरूप व आशय ही मुख्य आहेत. तसेच चिरंतन साहित्य व अल्पजीवी साहित्य ह्यांचीही मीमांसा त्यात केलेली आहे. ब्रोकर हे बहुश्रुत आहेत. त्यांचे वाचन फार दांडगे असून ते नेहमी गुजराती भाषेतील व पाश्चिमात्य साहित्यातील अगदी नवीनातील नवीन कथा-वाङमयाशी आपला परिचय कायम ठेवतात. कथेतील आवश्यक बाबींवरील त्यांची पकड जबरदस्त आहे. त्यांची निर्णय करण्याची शक्ती अगदी बिनतोड आहे व त्यांची शैली थोडीशी पाल्हाळिक आहे. त्यांनी केलेली मनुष्याच्या बुद्धिमत्तेची परीक्षा अगदी अचूक आहे. त्यांनी परिचय करून दिलेल्या कित्येक लेखकांनी आज साहित्यात नाव कमावले आहे.

'नवा गगननी नीचे' ह्यात गुलाबदास ब्रोकर ह्यांनी १९५९ मध्ये केलेल्या युरोपच्या सफरीचा वृत्तान्त आहे. नेहमीप्रमाणे स्थळांचे वर्णन करण्याऐवजी त्यांनी निरनिराळ्या लोकांच्या भेटी घेतल्या आहेत आणि त्यांच्याशी व त्यांच्या जीवनाशी परिचय करून घेतलेला आहे. त्यामुळे युरोपच्या प्रवासावरील इतर पुस्तकांपेक्षा

ओकर ह्यांचे हे पुस्तक आपल्या वेगळेपणाने फार उठून दिसते. ह्या पुस्तकात ठिकठिकाणी त्यांचे व्यक्तित्व प्रकट झालेले दिसून येते. एक हुशार व व्यवहार-कुशल व्यापारी, बुद्धिशाली निरीक्षक, मनमिळाऊ मित्र, संभाषणचतुर व्यक्ती आणि आवडण्याजोगा लघुकथा लेखक अशी ओकर ह्यांची निरनिराळी रूपे ह्यात आपल्याला पाहावयास मिळतात.

'अमृत दीक्षा' हा गुलाबदास ब्रोकरांच्या लेखांचा संग्रह आहे. ह्यातील त्यांची आई, रावसाहेब पटवर्धन, सरोजिनी नायडू, बळवंतराय ठाकोर, भीमो आणि यशवंत पंड्या ह्यांच्याविषयींच्या त्यांच्या आठवणी फार वेधक व रसप्रद आहेत.

त्यांच्या सत्य घटनात्मक कथा–' पुण्य परवार्यु नथी ' ह्यात ब्रोकर ह्यांनी आपल्या अत्यंत परिचित लोकांकडून ऐकलेल्या जीवनातील सत्य घटनांचे कथन केलेले आहे. ह्या प्रसंगातून आपल्याला जीवनाची उज्ज्वल बाजू दिसून येते व ते वाचून वाचकाला अशी खात्री पटते की हताश होण्याचे काही कारण नाही. ह्या पुस्तकात तसेच ' अमृत दीक्षा ' ह्यात आपल्याला ब्रोकर ह्यांच्या लघुकथालेखन पटुत्वाची साक्ष पटते.

' पुण्य परवार्यु नथी ' ह्या प्रकारची आणखीही काही पुस्तके गुजरातीत दुसऱ्या लेखकांनी लिहिलेली आहेत. किसनसिंग चावडा ह्यांच्या 'अमासना तारा' मध्ये लेखकाने त्यांना माहीत असलेल्या व्यक्तीविषयी व जीवनातील प्रसंगाविषयी लिहिले आहे. गणेश वासुदेव मावलंकर ह्यांनी लिहिलेले 'मानवतानां झरणा' ह्यात डाकू व खुनी ह्यांच्यासारख्या गुन्हेगारात त्यांना प्रत्यक्ष दिसून आलेल्या उदात्ततेचे व काही उच्च प्रतीच्या मानवी गुणांचे त्यांनी वर्णन केले आहे. झवेरचंद मेघाणी ह्यांचे ' माणसाईनां दीवा ' हे असेच आहे. गुजरातेत जन्मलेल्या महान व्यक्तींपैकी एक म्हणजे रविशंकर महाराज ह्यांनी गुन्हेगार असा शिक्का मारला गेलेल्या जाती-जमातींबद्दलचे आपले स्वतःचे अनुभव झवेरचंद मेघाणींना सांगितले व ते मेघाणींनी आपल्या स्वतःच्या प्रतिभेने यामध्ये साकार केले आहेत. कवी मुकुंद पाराशर्यांच्या ' सत्य कथाओ ' या पुस्तकात जे जीवन आहे, तशा प्रकारचे जीवन कंठणारे लोक असतील आणि हे लोक असे असतात की, जे प्रामाणिकता, आपण होऊन स्वीकारलेली गरिबी, स्वार्थ-त्याग, स्वाभिमान व उदारता ह्या गुणांकडे नुसते आदर्श म्हणून पहात नाही तर असे गुण हे जीवनाचे एक आवश्यक अंगच आहे, असे मानतात.

## जयंती दलाल [ १९०९–१९७९ ]

जयंती घेलाभाई दलाल ह्यांनी पुढील पुस्तके लिहिली आहेत. एकांकिका– 'जवनिका' 'प्रवेश बीजो' 'त्रीजो प्रवेश' आणि 'चोथो प्रवेश'; कादंबऱ्या– 'पादरनां

तीरथ', 'धीमुं अने विभा'; लघुकथा— 'जूजवा', 'आ घेर पेले घेर', 'अडखे-पडखे'.

दलालानीं दुसऱ्या अनेक पुस्तकांप्रमाणेच जॉर्ज ऑरवेल ह्यांच्या 'ॲनिमल फार्म' ह्याचे व टॉलस्टॉय ह्यांच्या 'वॉर ॲण्ड पीस'चे गुजरातीत भाषान्तर केले आहे. 'वॉर ॲण्ड पीस' चे भाषान्तर ही त्यांची एक महान सिद्धी आहे, असे म्हणावे लागेल.

एकांकी नाटकाच्या स्वरूपात सर्वात अधिक प्रयोग करू पाहणारे जयंती दलाल हे कदाचित एकटेच लेखक असतील. हे प्रयोग करण्यास त्यांचा रंगभूमीचा परिचय त्यांना फार उपयोगी पडला.

दलालांनी लघुकथेच्या स्वरूपात फेरफार करण्याचेही अनेक प्रयोग केले आहेत. १९५५ नंतरच्या अनेक लघुकथांचे मूळ दलालांच्या लघुकथात आपणास सापडेल.

दलालांची 'धीमुं अने विभा' (१९४३) ह्या कादंबरीत आपल्याला संज्ञा-प्रवाहांचे 'Stream of Consciousness'चे चित्रण गुजराती कादंबरीत पहिल्या-नेच आलेले दिसते. ह्या प्रकारात कथानक व घटना अभावानेच असतात. ह्या कादंबरीची नायिका विभा हिचा स्वाभिमान व प्रतिष्ठा ह्या कादंबरीत फार उठून दिसतात. तिला जेव्हा कळून चुकते की, धीमूच्या जीवनविषयक मूल्यांचा क्रम आपल्या स्वतःच्या मूल्यांच्या क्रमाहून अगदी भिन्न आहे व आपल्या हृदयात धीमूचे जे स्थान आहे तसे धीमूच्या हृदयात आपले स्थान नाही, तेव्हा धीमूने केलेली लग्नाची मागणी—धीमूवर तिचे मनापासून प्रेम असते तरीही ती नाकारते.

दलालांच्या लेखनात बुद्धिमत्ता, साहसिक प्रयोग, चमकदार श्लेष, उपहास व चातुर्यपूर्ण संवाद हे गुण प्रकर्षाने आढळतात. कधी कधी ते इतके संक्षिप्त-पणे लिहितात की, त्यांनी केलेले उपरोधात्मक कटाक्ष वाचकांच्या ध्यानातही येत नाहीत.

## जयंत खत्री [ १९०९–१९६८ ]

जयंत हिरजीभाई खत्री ह्यांचा जन्म कच्छमध्ये मुंद्रा येथे झाला. त्यांनी 'फोरम', 'वहेतां झरणां' आणि 'खरा बपोर' हे तीन लघुकथासंग्रह लिहिले. खत्री हे मनुष्यांबद्दलची अतीव सहानुभूती व प्रगत दृष्टिकोण ह्यांबद्दल प्रसिद्ध आहेत. त्यांनी केलेल्या निसर्गाच्या अनुपम वैभवाची वर्णने आणि त्यांच्या काही उत्तम लघुकथांची कथानके व शैली फार प्रसिद्ध आहेत. त्यांची पात्रे बहुतांशी अशिक्षित ग्रामीण समाजातील लोक आणि समाजाच्या खालच्या स्तरातील स्त्री व पुरुष ही आहेत. मानवी मनातील मूलभूत विकार आणि त्यातून उत्पन्न झालेल्या संघर्षाचे

चित्रण करण्यात खत्री फार तरबेज आहेत. ते आपल्या कथांतील प्रसंग फार कुशलतेने हाताळतात व अंतिम क्षणापर्यंत आणून पोहोचवितात. त्यांच्या 'ओहीनुं टीपुं' ह्या कथेत एक पिता जेव्हा साडेपाच वर्षांची शिक्षा भोगून तुरुंगातून परत येतो तेव्हा त्याला असे दिसून येते की, आपल्या तरुण मुलाने त्याच्यासारखाच नव्हे त्याच्यापेक्षाही जास्त प्रमाणात–नैतिक अधःपाताचा मार्ग स्वीकारलेला आहे. हे बघून त्याला मोठा धक्का बसतो. ह्या कथेत जयंत खत्री ह्यांची साहित्यिक कलात्मकता उठून दिसते.

## उमाशंकर जोशी [ १९११ ]

उमाशंकर जेठालाल जोशी ह्यांचा जन्म ईडर जवळ बामणा येथे झाला. ते काही दिवस 'वासुकी' ह्या टोपण नावाने लघुकथा लिहीत असत. त्यांनी आपल्या कारकीर्दीची सुरुवात एक सामान्य शिक्षक म्हणून केली आणि शेवटी त्यांनी भारताच्या शैक्षणिक व साहित्यिक क्षेत्रात अत्युच्च पद प्राप्त केले. गुजराती साहित्यिकाला जो जो पुरस्कार (अवॉर्ड) किंवा मानाची पदवी मिळणे शक्य असते ती ती तर सर्व त्यांनी मिळवलीच; पण त्याशिवाय त्यांना १९६८ सालचे भारतीय ज्ञानपीठ पारितोषिकही मिळाले. भारतीय सर्जनशील साहित्यिकाला मिळणारा हा सर्वोच्च बहुमान होय.

उमाशंकर ह्यांचे साहित्य– काव्य : 'विश्वामित्री', 'गंगोत्री', 'निशीथ', 'प्राचीना', 'आतिथ्य', 'वसन्त वर्षा', 'महाप्रस्थान' आणि 'अभिज्ञा'; एकांकिका– 'सापना भारा' आणि 'शहीद'; लघुकथा– 'श्रावणी मेळो' आणि 'विसामो'; कादंबरी–'पारकां जण्यां'; निबंध– 'गोष्ठी', 'उघाडी बारी'; संशोधन– 'पुराणोमां गुजरात', 'अखाना छप्पा'; टीका साहित्य– 'अखो–एक अध्ययन', 'समसंवेदन' 'अभिरुचि', 'शैली अने स्वरूप', 'निरीक्षा', 'कविनी साधना', 'श्री अने सौरभ' 'प्रतिशब्द.'

उमाशंकरनी संस्कृतमधील भवभूतीच्या 'उत्तररामचरित'चे आणि कालीदासाच्या 'अभिज्ञान शाकुंतल'चे गुजरातीत भाषान्तर केले आहे. तसेच इंग्लिशमधून 'गुले पोलंड' हे (क्रीमीयम सॉनेटस्) ह्या पोलिश कवी मिकेविक्झ (Mickie' witz) ह्याच्या सॉनेटस्च्या मालेचे भाषान्तर केले आहे. तसेच त्यांनी बळवंतराय ठाकोर ह्यांच्या 'मारा सॉनेट'चे, बालाशंकर ह्यांच्या 'क्लान्त कवी'चे आणि हरिश्चंद्र भट्ट ह्यांच्या 'स्वप्नप्रयाण'चे संपादन केले आहे. तसेच रामनारायण पाठक ह्यांच्या सहयोगाने –'काव्यतत्त्वविचार', 'दिग्दर्शन', 'साहित्य विचार' आणि 'विचारमाधुरी' (दोन भाग) ह्या आनंदशंकर ध्रुव ह्यांच्या पुस्तकांचेही संपादन केले आहे. १९४७ पासून ते 'संस्कृति' ह्या मासिकाचे संपादक व प्रकाशक

म्हणून काम करीत आहेत. १९७५–७६ च्या काळात ज्यावेळी पंतप्रधान इंदिरा गांधी यांनी आणीबाणी जारी केली तेव्हा काही महिने ह्या मासिकाचे प्रकाशन त्यांनी आपण होऊन बंद केले होते. ह्या मासिकाची तुलना 'वसंत' आणि 'कौमुदी' यांसारख्या मासिकांशी होऊ शकेल.

**विश्वशांति (१९३१)–**

पूर्वी सांगितल्याप्रमाणे काव्याचे नवे वळण, नवा प्रवाह प्रकट करणारे हे पहिलेच पुस्तक आहे. ह्यालाच गुजरातीतील गांधीयुगाचे काव्य म्हणता येईल. ह्याच्या पूर्वीच्या युगातील कवितेपेक्षा हे काव्य शब्दयोजना व आतील सूर ह्या बाबतीत निराळेच वाटते. ह्या काव्याच्या नावावरूनच स्पष्ट होते की ह्या काव्यात साऱ्या विश्वाच्या शांतीचे गीत सांगितलेले आहे. कवीचा असा विश्वास आहे, ह्या जगात फुले व वनस्पती ह्यांना शांततेने आणि स्वतंत्रतेने जगण्याचा मनुष्याइतकाच हक्क असून जगाच्या एखाद्या कानाकोपऱ्यातसुद्धा जोपर्यंत सत्य, प्रेम व सौंदर्य ह्यांच्यावर जुलूम-जबरदस्ती होत राहील तोपर्यंत विश्वशांती ही केवळ छाया किंवा स्वप्नच राहील आणि म्हणून पुढे अहिंसा, सत्य व प्रेम ह्यांचे दूत असून पूर्व किंवा पश्चिम यांपैकी कोणाही एकट्याचे न राहता साऱ्या जगाचे आणि प्रकृतीचे जे पुत्र आहेत अशा महात्मा गांधींना हा विश्वशांतीचा हुतात्मा कवी पूर्व व पश्चिम ह्यांमध्ये प्रेमाचा सेतू बांधण्याची विनंती करतात.

**गंगोत्री (१९३४)–**

हा उमाशंकर ह्यांची भावकाव्ये, सुनीते, दीर्घ वर्णनात्मक व चिन्तनात्मक कवितांचा पहिलाच संग्रह आहे. ह्यात कवी परदेशीयांच्या जोखडापासून मुक्त होण्यासाठी भारतात चाललेल्या चळवळीकडे विश्वशांतीच्या व विश्वबंधुत्वाच्या व्यापक संदर्भात पाहतात आणि त्यांना अशी स्पष्ट जाणीव होते की, मानवजातीच्या कल्याणासाठी आपल्या सर्वस्वाचा त्याग करणे हेच आपले खरे कर्तव्य आहे; पण असा निश्चय करणे फार कठीण काम आहे. एकीकडे आपल्या अगदी निकटच्या जिवलग आप्तमित्र व्यक्तीविषयींचे आपले कर्तव्य व दुसरीकडे युगेच्या युगे दुःखात पिचत पडलेल्या मानवतेने मारलेली आर्त हाक, या दोहोंबाबत आपले कर्तव्य काय ? याविषयी द्विधा झालेल्या कवीच्या मनःस्थितीचे चित्र ' ओ युग-तरस्या जग कंठ ' आणि ' बळतां पाणी ' (पेटलेले पाणी) ह्या कवितात अत्यंत सुंदर व वेधक रीतीने व्यक्त केले गेले आहे. मनात चाललेली प्रेमाची अस्पष्ट अशी खळबळ व एका जोडीदाराची लागलेली ओढ ह्या भावना तितक्याच प्रभावीपणे ' भोमिया विना ' ह्या कवितेत प्रगट झाल्या आहेत.

' गंगोत्री ' हा आदर्शवादी तसाच वास्तववादी कवितांचा संग्रह आहे. काही

कविता अभिजात भावनेने स्फुरलेल्या आहेत, तर काहीत बुद्धिवादाची चमक दिसून येते. ह्या कविता अतिशय गंभीर स्वरूपाच्या व आर्ततेने भरलेल्या असल्या तरी कवीची विनोदबुद्धी जागृत आहे, हे 'समरकंद बुखारा', 'नवो नाटककार', आणि 'मोची' ह्या कवितांवरून सिद्ध होते.

**निशीथ (१९३९)–**

ह्या संग्रहातही कवितेची स्वरूपे व अभिव्यक्तीची पद्धती निरनिराळ्या प्रकारची आहेत. येथे हे खास लक्षात ठेवण्यासारखे आहे की, १९३५ मध्ये म्हणजे 'गंगोत्री' प्रकाशित झाल्यानंतर अवघ्या एका वर्षाच्या अवधीत कवी पूर्णपणे परिणत-प्रज्ञ बनलेला दिसतो व मानवी स्वभावाच्या हट्टीपणाचे त्याला पूर्ण ज्ञान झालेले असते. गांधीयुगातील अनेकदा चर्चाविषय झालेल्या भावनांविषयीचा त्याचा उत्साह ओसरलासा वाटला तरी गांधीजींबद्दलची अत्यंत गौरवाची व आदराची भावना मात्र त्यांच्या मनात सतत तशीच टिकून आहे. हे लक्षात ठेवले पाहिजे की, १९३५ पासूनच्या 'निशीथ'मधली उमाशंकर ह्यांच्या कवितेचे मूळ त्यावेळच्या कोणत्याही राष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय, राजकीय, अथवा सामाजिक व आर्थिक परिस्थितीत सापडणार नाही. आता त्यांची कविता जीवनाभिमुख झाली आहे. एवढेच नव्हे, तर ती जीवनाच्या अगदी आतील कप्प्यापर्यन्त पोहोचण्याचा प्रयत्न करीत आहे, असे दिसते.

'निशीथ' हा काव्यसंग्रह त्यातील अतिसुंदर प्रणयकविता, इतर भावगीते व 'विराट प्रणय' ह्या त्यातल्या अत्युत्तम दीर्घ चिन्तनात्मक कवितेसाठी विशेष उल्लेखनीय आहे. 'विराटप्रणय' काव्यात असे दिसून येते की, जरी केव्हा केव्हा मनुष्याची वृत्ती सर्वनाशाकडे झुकत असली तरी कवीचे मानवजातीबद्दलचे प्रेम व सहानुभूती अकुंठित आहे. निशीथ ह्या काव्यसंग्रहातील निशीथ ही कविता महान व भव्य आहे. फक्त त्या कवितेचा शेवट करताना मध्यरात्रीचा स्वामी जो निशीथ त्याला कवी एक सामाजिक-राजकीय ध्येय सिद्ध करण्यासाठी आवाहन करतो, ते अनुचित वाटते. 'आत्माना खंडेर' ह्या सुनीतांच्या मालेत एका महत्त्वाकांक्षी व तरुण द्रष्ट्याचा हळूहळू कसा भ्रमनिरास होतो आणि अत्यंत अवघड असा जीवनाचा पाठ तो कसा शिकतो, ह्याचे वर्णन केले आहे. ही कविता गुजराती काव्यात अतुलनीय आहे.

**आतिथ्य (१९४६)–**

ह्यात प्रेमविषयक, निसर्गविषयक व चिन्तनात्मक कविता तर आहेत; पण त्याशिवाय ह्यात असलेल्या काही आदरणीय कविबंधूना अर्पण केलेली स्तुतिसुमने ह्या कविता व सुखी कौटुंबिक जीवनावरील कवितांमुळे हे पुस्तक उल्लेखनीय आहे.

**वसंतवर्षा (१९५४)–**

हा स्वातंत्र्योत्तर काळात लिहिलेल्या कवितांचा संग्रह आहे. मनुष्याच्या बाबतीतील आपला आशावाद व विश्वास ह्यांची ज्योत अखंडपणे तेवत ठेवण्याचा कवीने आपल्या परीने केलेला श्रेष्ठ प्रयत्न दिसून येतो; पण चारी बाजूला दिसून येणारा क्षुद्रपणा, नामर्दपणा, नीचता आणि ढोंगीपणा पाहून स्वातंत्र्योत्तर काळातील भारताची सामाजिक व राजकीय परिस्थिती पाहून थोडा वेळ का होईना कवीचा आत्मविश्वास डळमळतो आणि करुणार्द्रतेने ते ईश्वराला प्रार्थना करतात.

" हे ईश्वरा – मला आशेचा एक स्फुल्लिंग दे. माझं हृदय दु:खाने तुटण्याच्या मार्गावर आहे. कृपा करून मला थोडा तरी आत्मविश्वास दे. तू दुसरे काहीच देऊ शकत नसलास तरी तेवढे तरी दे.''[३७]

कवीच्या वृत्तीत झालेला बदल जसा ह्यात दिसून येतो तसाच कवीच्या काव्यशैलीतही बदल झालेला दिसून येतो. 'वसंतवर्षा' ह्यात काही सुंदर ऋतुवर्णनपर कविताही आहे आणि 'गयां वर्षो' (गेलेली वर्षे) व 'रह्यां वर्षो तेमां' (राहिलेल्या वर्षात) ही दोन सुंदर सुनीते आहेत.

**अभिज्ञा (१९६७)–**

ह्यातील काही कवितांचा आशय, स्वरूप व शैली ह्यांवरून असे दिसून येते की, उमाशंकर हे सतत नवे नवे प्रयोग करण्यात आणि काळाच्या प्रवाहाबरोबर आपली पावले उचलण्यात मग्न होते. तसेच ह्यात गुजरात, भारत व युरोप यांमधील श्रेष्ठ साहित्यिकांना त्यांनी दिलेल्या आदरांजलिपूर्ण सुंदर कविता आहेत.

**प्राचीना (१९४४) आणि महाप्रस्थान (१९६५)–**

ह्यात एका वास्तवदर्शी व कलाकुशल कवीचे आपणास दर्शन घडते. ह्यातील प्रत्येकात सात-सात कविता आहेत. दोहोंमधील कविता 'महाभारत', 'रामायण', 'भागवत' आणि बुद्धाच्या जीवनातील प्रसंगांवर आधारित आहेत आणि तरीही दोन्ही कृतीतील काव्य अगदी नवीन आहे. ह्या दोन्हीतील कवितांवरून उमाशंकर ह्यांची स्वत:च्या जीवनाकडे पाहण्याची वृत्ती दिसून येते.

ह्या दोन्ही संग्रहात बराच सारखेपणा असला तरी काही मुद्द्यांच्या बाबतीत ते एकमेकांपासून निराळे आहेत. 'प्राचीना' मधील काही कविता विविध छंदात लिहिलेल्या आहेत. ते छंद काव्यरसाला अनुरूप असे आहेत. 'महाप्रस्थान'-मधील बऱ्याचशा कविता प्रत्येकी एकेका छंदातच लिहिलेल्या आहेत. 'प्राचीना'ची भाषा संस्कृतप्रचुर आहे. त्या तुलनेने 'महाप्रस्थान'ची भाषा साधी व उचित वाक्यप्रयोगयुक्त आहे. 'प्राचीना'तील रतिमदन, बालराहुल आणि आशंका ह्या कवितात बुद्धिनिष्ठता जास्त प्रमाणात दिसून येते. 'महाप्रस्थान'मधील एकही

कविता केवळ बुद्धिवादावर उभी केलेली नाही. बालराहुल, रतिमदन आणि कुब्जा ह्या कवितातील प्रसंगांचा उमाशंकरनी लावलेला अर्थ त्यांच्या चातुर्याची साक्ष देत असला तरी तो विवादास्पद आहे.

उमाशंकर ह्यांचे भावविश्व व अभिव्यक्तीचे प्रयोग ह्यांचे क्षेत्र फार विस्तृत आहे. त्यांच्या कवितांचे स्फूर्तिस्थान भावना, बुद्धिमत्ता व आत्मचिंतन हे आहे. उमाशंकर ह्यांनी यशस्वी रीतीने हाताळलेल्या कवितेच्या रूपांची व छंदांची संख्या पाहून असे वाटते की, गुजराती साहित्यात त्यांची बरोबरी करू शकेल असा एखादाच कवी सापडेल. ते एक सच्चे पहिल्या प्रतीचे कवी असल्याने त्यांना वरवर दिसणाऱ्या विसंवादात संवादितेचा एक सूक्ष्म धागा गोवलेला दिसून येतो व क्षणिक सौंदर्याच्या दर्शनाने उत्पन्न झालेल्या अतिआनंदाच्या क्षणांना ते चिरंतन स्वरूप देतात.

उमाशंकर हे सौंदर्योपासक कवी आहेत. नाजूक व कोमल वस्तूतूनच सौंदर्याचे दर्शन होते असे नाही तर अत्यंत उदात्त, भव्य व दरारा उत्पन्न करणाऱ्या वस्तूत सुद्धा त्यांना सौंदर्याची प्रतीती होते. ते प्रेमाचे एक श्रेष्ठ कवी आहेत; पण त्यांच्या प्रेमाचा विषय केवळ एखादी व्यक्ती, जनसमूह, देश अथवा समग्र मानव-जात नसून पशु-पक्षी, वृक्ष व फुले यांनी युक्त असे समग्र विश्व आहे.

उमाशंकर जीवनाचे–ह्या पृथ्वीवरील जीवनाचे–उपासक आहेत. त्यांचा असा विश्वास आहे की, पृथ्वीवरसुद्धा स्वर्गाप्रमाणेच तिचे असे एक अमृत आहे. ह्या अमृतात मृत्यूचा प्रतिकार करण्याची आणि मृतांना सजीव करण्याची शक्ती आहे. उमाशंकरांना आपल्या जीवनात ह्या अमृताची प्राप्ती झालेली आहे. हे अमृत म्हणजे ह्या विश्वातील प्रत्येक अणुरेणूत राहिलेले चैतन्यमय सौंदर्य हे होय व त्यांना हे नमूद करताना आनंद होतो आहे की आपण आपल्या स्वामीकडे दोन रिकाम्या हातांनी कधीही जाणार नाही.

गुजराती काव्याच्या प्रत्येक बाबतीत उमाशंकर आणि सुंदरम् ह्यांची नावे अतूटपणे, जोडीने घ्यावीच लागतील. सुंदरम् प्रमाणेच उमाशंकर ह्यांच्या सहानु-भूतीची व्याप्ती फार मोठी आहे. सुंदरम् प्रमाणेच भाव, मनोवृत्ती, विचार व चिन्तनाच्या क्षेत्रात उमाशंकर सहज संचार करतात. सुंदरम् प्रमाणेच ते मानवी हृदयातील प्रत्येक भावनेला कलात्मक रूप देतात. सुंदरम् ह्यांची स्वतंत्र दृष्टी उच्च कोटीची आहे, तर उमाशंकर ह्यांची शब्दयोजना व रचनातंत्र अलौकिक आहे. प्रतिभेच्या दुर्बलतेच्या क्षणी सुंदरम्ची कविता जरा नीरस गद्यात्मक वाटते. तशाच वेळी उमाशंकरांची कविता ही एक शब्दचमत्कृती वाटते.

**सापना भारा (१९३६)–**

हा अकरा वास्तवदर्शी एकांकिकांचा संग्रह आहे. त्यातील मुख्य विषय ग्रामीण भागातील स्त्रियांचे दुःखपूर्ण जीवन हे आहे. ह्यातील बऱ्याच नाटिका

तेथील लोकांच्या लोकभाषेत लिहिलेल्या आहेत. ह्यातील काही एकांकिका साहित्याचे उत्कृष्ट नमुने आहेत.

शहीद (१९५१)–

हासुद्धा अकरा एकांकींचा संग्रह आहे. ह्यात देशातील घटनांमुळे झालेला भ्रमनिरास व केवळ स्त्रियांच्याच जीवनात नव्हे तर सर्व मानवजातीच्या जीवनात भरून राहिलेले दुःख पाहून उमाशंकरांच्या मनात झालेली वेदनांची तीव्रता दिसून येते. उमाशंकर हे प्रबळ आशावादी आहेत; पण ह्या एकांकिकांवरून त्यांची मानवतेबद्दलची सर्व आशा नष्ट झालेली दिसून येते. फक्त वर्तमानकाळातील भारताच्या मानवतेबद्दलच नव्हे ('माणेकचौक' प्रमाणे) तर भविष्यातील सर्व मानवजातीबद्दल ते अगदी हताश झालेले दिसून येतात ('शहीद'प्रमाणे).

उमाशंकर ह्यांच्या लघुकथात पात्रे, घटना, भावना व अभिव्यक्ती ह्या बाबतीत खूप विविधता दिसून येते. मनुष्याच्या उक्ती व कृतीत कळत अथवा नकळत दिसून येणाऱ्या अनेक मानसिक वृत्ती व विशेषकरून परस्पर विरोधी मानसिक वृत्तींचे ह्यात दर्शन घडविले आहे. 'पगलीनो पाडणार', 'दिल्ली', 'छेल्लुं–छतुं', 'मारी चंपानो वर', 'श्रावणी-मेळो' ह्या गुजराती साहित्यातील काही उत्कृष्ट लघुकथा आहेत.

एक विद्वान व उत्तम समीक्षक म्हणून उमाशंकर ह्यांचे स्थान निर्विवादपणे फार वरचे आहे. जागतिक साहित्यातील प्राचीन व अर्वाचीन श्रेष्ठ कृतींचा रसग्राही वृत्तीने केलेला सखोल अभ्यास, तीव्र बुद्धिमत्ता, तीक्ष्ण व सूक्ष्म दृष्टी, अभिजात रुची, विशाल सहानुभूती, गाढ विद्वत्ता व साहित्याच्या सिद्धान्ताचा मजबूत पाया ह्या गुणांमुळे उमाशंकरांच्या टीकात्मक साहित्यात फार उच्च प्रतीची विशालता व सखोलता दिसून येते. उमाशंकर ह्यांना टीका करताना वेळ पडली तर स्पष्टवक्तेपणा किंवा कटुता दाखविता येत नाही असे नाही; पण शक्य तोवर ते नम्रता व मृदुभाषिता ह्यांचाच अंगीकार करतात.

एका दृष्टीने पाहता प्रतिष्ठा पावलेले साहित्यिक व त्यांच्या कृती, ह्यांच्याबद्दल उमाशंकर ह्यांची मते परंपरेने रूढ झालेल्या मतांशीच बहुतांशी मिळतीजुळती आहेत; पण दुसऱ्या दृष्टीने पाहता असे दिसून येते की, त्यांच्या साहित्यविषयक कल्पनात वेळोवेळी प्रकट होणाऱ्या ताज्या व नव्या दृष्टिकोणांचा ते स्वीकार करतात आणि त्यात भर घालतात. उमाशंकरांच्या आवडीच्या विषयांचे क्षेत्र फार विशाल आहे अनेक विविध प्रकारच्या शाश्वत आणि तत्कालीन मूल्यांचा त्यात संग्रह केलेला आपल्याला दिसून येतो. ज्याच्या प्रिय विषयांचे क्षेत्र इतके विशाल आहे व ज्यांची प्रत्यक्ष सिद्धीही त्या विशालतेला अनुरूप आहे असा उमाशंकरांसारखा दुसरा कोणी विद्वान व समीक्षक सापडणे कठीण आहे.

## कृष्णलाल श्रीधराणी [ १९११–१९६० ]

कृष्णलाल जेठालाल श्रीधराणी ह्यांचा जन्म भावनगर येथे झाला. श्रीधराणी ह्यांनी आपल्या साहित्यिक कारकीर्दीची सुरुवात एक कवी म्हणून केली. त्यांनी कविता व नाटके लिहिली आहेत. त्यांच्या कवितांचे दोन खंड आहेत– 'कोडिया' आणि 'पुनरपि'. त्यांच्या अनेक नाटकांपैकी 'मोरनां इंडां', 'वडलो', 'सोना परी', 'पियो गोरी' व 'पद्मिनी' ही काही नाटके आहेत.

ह्यापैकी 'पद्मिनी' हे तीन अंकी नाटक ऐतिहासिक कथानकावर आधारलेले आहे. 'मोरनां इंडां' हेही तीन अंकी नाटक आहे. त्याचे संविधानक असे काही नाहीच; पण त्यात काही सुंदर ऊर्मिकाव्ये आहेत. 'वडलो' आणि 'सोना परी' हा चार नाटकांचा संग्रह आहे. त्यातील पात्रे ही लहान मुले आहेत. 'पियो गोरी' हा दहा एकांकिकांचा संग्रह आहे.

श्रीधराणींच्या 'कोडियुं'मधील कविता (१९३४) त्यांच्या समकालीन कवींच्या काव्यांपेक्षा त्यातले विषय, शैली व शब्दयोजना ह्या गुणांनी फार निराळ्या उठून दिसतात. श्रीधराणींच्या उपमा अगदी नव्या व ताज्या असत. त्यांच्या कवितांची मांडणी नाट्यमय होती आणि त्यांचा उत्साह अदम्य होता. त्यांनी नित्य व्यवहारातील शब्दांचा व म्हणींचा बराच उपयोग केला असल्याने त्यांच्या भाषेमध्ये त्या त्या मातीचा सुगंध भरून राहिलेला दिसतो. गांधीयुगातील सर्व कवींमध्ये दिसून येणाऱ्या स्वातंत्र्याची तळमळ, गरीब व दलितांबद्दलची सहानुभूती, खोटेपणा आणि अंधश्रद्धेबद्दलची चीड ह्या भावना श्रीधराणींच्या काव्यात आहेतच; पण त्याशिवाय श्रीधराणी ह्या रोमॅण्टीक कवीवर टागोरांच्या गूढवादाचा व ऊर्मिशीलतेचा प्रभाव पडल्यामुळे त्यांनी अतिसुंदर, अतिभव्य व अतिदूर असणाऱ्या चिरंतनाची कवनेही गायिली आहेत.

श्रीधराणींच्यात कलाकाराला आवश्यक असलेल्या संयमाचा अभाव दिसून येतो. ते अनेक वेळा संस्कृत शब्दांची तोडमोड करतात अथवा त्यांचा चुकीच्या संदर्भात उपयोग करतात.

शब्द हे कवीचे एकमेव हत्यार अथवा साधन आहे. त्या शब्दांचाच असा निष्काळजीपणामुळे उपयोग केल्यामुळे श्रीधराणींची कविता बऱ्याच वेळा क्लिष्ट वाटते व त्यामुळे त्यातून हवा तेवढा आनंद प्राप्त होत नाही.

अमेरिकेत १२ वर्षे राहून व तेथील वास्तव्यात ७ इंग्लिश पुस्तके लिहून ते भारतात परत आले आणि नंतर त्यांनी काही कविता लिहिल्या त्या 'पुनरपि' ह्या संग्रहात एकत्र केलेल्या आहेत; पण ह्या कवितांची शैली पहिल्या कवितांपेक्षा निराळी आहे. ह्यात भावोत्कटतेच्या जागी एक प्रकारची उपहासाची वा उपरोधाची भावना आणि ताजेपणा व उमाळा यांच्या ऐवजी एक प्रकारची

तुच्छतेची वृत्ती आली. श्रीधराणींच्या रावंच्या सर्व कविता १९५७ साली 'कोडिया'च्या सुधारून वाढविलेल्या नव्या आवृत्तीत प्रकाशित करण्यात आल्या आहेत.

## अनंतराय रावळ [ १९१२ ]

अनंतराय मणिशंकर रावळ ह्यांचा जन्म अमरेली येथे झाला. त्यांनी जीवन-भर गुजराती भाषा व साहित्याचे प्रोफेसर म्हणून काम केले. फक्त काही वर्षे ते गुजरात सरकारच्या ' डिरेक्टोरेट ऑफ लँगवेजिस ' मध्ये डायरेक्टर म्हणून काम करीत होते. रावळ ह्यांनी इतर काही समीक्षकांप्रमाणेच अतिशय मोठ्या संख्येने समकालीन साहित्यावरील बऱ्याच पुस्तकांची समीक्षा केली आहे व ही समीक्षा अथवा टीका चांगल्या रीतीने आणि पूर्ण सहानुभूतीने केली आहे. त्यांनी गुजरात साहित्यसभेसाठी केलेल्या अनेक पुस्तकांच्या परीक्षणाशिवाय त्यांचे अनेक टीकात्मक लेख नऊ खंडात संग्रहित केलेले आहेत. त्यांपैकी ' साहित्यविचार,' ' गंधाक्षता,' ' साहित्यविवेक ', ' साहित्यनिकष ' व ' तारतम्य ' हे काही भाग आहेत.

कोणतेही पुस्तक आत्मसात करणे, हे रावळ ह्यांचे वैशिष्टय आहे.

त्यांनी आपल्या साहित्यिक कारकीर्दीच्या सुरुवातीस लिहिलेल्या लेखात नंतरच्या लेखांइतकी विचारांची व शैलीची परिपक्वता स्वाभाविकच दिसून येत नसली तरी त्यांच्या सर्वच लेखात दिसून येणारी बुद्धीची स्थिरता व समजशक्ती ह्या गुणांमुळे साध्या कॉलेजच्या टिपणांपेक्षा त्यांचे लेख निश्चितच फार उच्च पातळी गाठतात. त्यांच्या सर्व लेखात प्रामाणिकतेचा व निष्पक्षपातीपणाचा एक सूर स्पष्ट उमटलेला दिसून येतो आणि त्यामुळे त्या विषयाचे एक स्पष्ट व व्यवस्थित विवरण, तसेच त्यांचे सुबक व व्यवस्थित सार आपणाला त्यांच्या लेखांत पाहावयास मिळते.

रावळ केव्हांही विद्वत्तेचे आडंबर माजवीत नाहीत. लेखनातील महत्त्वाच्या गोष्टी व गौण गोष्टी ह्यांच्यात ते कधीही गल्लत करीत नाहीत. ते कधीही विषयाला सोडून जात नाहीत. तसेच ते बारीकसारीक सौंदर्यस्थळे अथवा दोषांचे प्रस्थ माजवीत नाहीत. त्यांचे निर्णय घाईने केलेले नसतात. ते कधीही भरमसाट विधाने अथवा बेफाम अतिशयोक्ती करीत नाहीत. आपले लेखन अगदी मौलिक—स्वतंत्र व बुद्धिमत्तेने भरलेले आहे असा दावा ते कधीही करीत नाहीत. ते सत्य गोष्टी सांगतात; पण ह्या सत्याने लेखकाचे मन दुखवणार नाही अशा हळुवार रीतीने ते समीक्षा करतात. ते सौंदर्य पाहू शकतात; पण त्यांच्या सौंदर्यदृष्टीत यथार्थता आहे आणि त्यांच्या लेखनात त्यांचे अचूकपणा, परिपूर्णता व समतोलपणा हे गुण दिसून येतात.

अनंतराय रावळ यांनी अनेक ग्रंथांचे संपादन केले आहे. त्यात पुढील मुख्य ग्रंथ आहेत– 'नानालाल मधुकोष', 'कलापीनो काव्यकलाप', 'बोटादकरनी काव्य-सरिता', प्रेमानंदाचे 'नलाख्यान' आणि शामळ ह्यांची 'मदन मोहना' ही पुस्तके सर्वग्राही अभ्यास व प्रामाणिक परिश्रम करण्याची त्यांची वृत्ती ह्यांची द्योतक आहेत.

## पन्नालाल पटेल [ १९१२ ]

पन्नालाल नानालाल पटेल ह्यांचा जन्म राजस्थान व गुजरात ह्यांच्या सीमेवर असलेल्या मेघराज नावाच्या लहानशा खेडेगावी झाला.

पन्नालाल ह्यांची साहित्यसंपदा पुढीलप्रमाणे आहे – कादंबऱ्या– 'वळामणां', 'मळेला जीव', 'मानवीनी भवाई', 'भीरु साथी', 'भांग्याना भेरु', 'न छूटके', 'यौवन', 'सुरभि', 'पाछले बारणे' वगैरे. लघुकथा– 'सुखदु:खना साथी', 'पानेतरना रंग', 'वात्रकने कांठे, 'लखचोरासी' वगैरे. नाटके– 'जमाईराज', 'वैतरणीने कांठे', 'ढोलिया सागसिमनां'.

पन्नालालनी कादंबरी व लघुकथा हे दोन्ही साहित्यप्रकार जन्मजात कलाकाराच्या कौशल्याने हाताळले आहेत. खेडेगावातील जीवनाचे चित्रण करणे हे पन्नालाल ह्यांचे खास वैशिष्टच आहे. त्यांनी आपल्या कादंबऱ्यात व लघुकथात ग्रामीण जनतेतही असणारा नीचपणा, क्षुद्रपणा, भित्रेपणा, अकल्पनीय गरिबी, अज्ञान व अंधश्रद्धा इत्यादींचे चित्र तर रंगवले आहेच; पण त्याचबरोबर त्यांच्या-मधील प्रेम, भक्ती, स्वाभिमान, मानवता व उदारहृदयीपणा ह्या गुणांचेही वर्णन केले आहे.

पन्नालाल ह्यांची 'मळेला जीव' आणि 'मानवीनी भवाई' ही पुस्तके गुजराती साहित्याला ललामभूत होऊन राहिलेली आहेत. साहित्य अकादमीच्या कार्यक्रमात 'मळेला जीव' ह्याची भारताच्या सर्व भाषात भाषान्तर करण्यासाठी शिफारस करण्यात आलेली आहे व काही भाषात त्यांची भाषान्तरे झालीही आहेत. ह्या कादंबरीत कानजी व जीवी ह्यांच्या प्रेमाची कथा आहे. त्या दोघांची जात निरनिराळी असते. ते लग्न करू शकत नाहीत कारण कानजी हा पुरुष असूनसुद्धा सुरुवातीलाच तो दुर्बळ मनाचा दिसून येतो. जीवी एक गरीब व अनाथ मुलगी असते; पण तिचे मन पक्के असते. कानजी ऐन वेळी कच खातो व त्यामुळे सर्वांचा नाश होतो; पण आपले सर्व धैर्य एकवटून तो जेव्हा आपली चूक सुधारायला तयार होतो त्या वेळी फार उशीर झालेला असतो. विशिष्ट शैली व वर्णनाची रीत, अतिशय सुंदर रीतीने गुंफलेले कथानक, जिवंत वाटणारी पात्रे, मानवी हृदयात खोलवर रुजलेल्या परस्पर विरोधी भावनांच्या संघर्षाचे चित्रण, हुबेहूब वर्णने

आणि निरनिराळ्या नैतिक पातळीवरील खेडवळ पात्रांचे चित्रण ह्यामुळे ही कादंबरी खास उल्लेखनीय झाली आहे.

'मानवीनी भवाई' ही काळू व राजू यांमधील प्रेमाची कथा आहे; पण त्यातील मुख्य हेतू भारतातील खेडेगावात राहणाऱ्या शेतकऱ्यांचे कष्टमय व दुःखमय जीवनाचे चित्रण करणे हा होय. 'मळेला जीव' सारखे ह्या नाटकाचे कथानक चांगल्या रीतीने गुंफलेले नाही व ह्या नाटकाचा शेवट क्षोभ उत्पन्न करणारा आहे. (Melodramatic) पण जेथे काहीही सुखसोयी मिळत नाही अशा ठिकाणी जीवनासाठी करावी लागणारी धडपड व त्यातही 'छप्पनियो काळ' (भारतात १९००-१९०१ मध्ये पडलेला भयंकर दुष्काळ त्यामुळे बऱ्याच माणसांपुढे कसेही करून – कोणत्याही मार्गाचा अवलंब करून जीवन जगवणे-हा एकच हेतू होता) आल्यामुळे सर्व खेडी रिकामी होऊन पावसाळा सुरू होण्यापूर्वी पोटापाण्यासाठी काही धंदा करावा लागेल, ह्या आशेने खेडेगावातील लोकांनी शहराकडे घेतलेली धाव, ह्याचे फार सुंदर वर्णन ह्यात आहे. तसेच लोकांच्या भुकेने झालेल्या असह्य वेदना व सर्वांत अधोगती म्हणजे दुसऱ्यापुढे दयेची भीक मागून जीवन जगविण्याची आलेली वेळ ह्या सर्वांचे ह्यात यथातथ्य वर्णन केलेले आहे. ह्या कादंबरीत गुजरातच्या खेडेगावाचे कलात्मकतेने केलेले जिवंत चित्रण दुसरीकडे क्वचितच पहायला सापडेल. खेडेगावातील वास्तव जीवनावर आधारित अशा लघुकथा लिहिण्यातही पन्नालाल ह्यांचा हातखंडा आहे. केव्हा केव्हा विनोदाच्या पांघरुणाखाली त्यांनी ग्रामीण लोकांच्या अज्ञानावर व दारुण दारिद्र्यावर प्रकाश टाकलेला आहे.

पन्नालाल ह्यांच्या 'नॅशनल सेव्हिंग्ज', 'वात्रकने कांठे', 'लखचोरासी', 'बापूनो कुतरो', 'रंगवातो' ह्या लघुकथा गुजरातच्या उत्तम प्रतीच्या लघुकथांपैकी आहेत.

## ईश्वर पेटलीकर [ १९१६ ] आणि पीतांबर पटेल [ १९१८-१९७७ ]

ह्या दोघांनीही बहुतांशी ग्रामीण जीवनावर आधारित कादंबऱ्या व लघुकथा लिहिल्या आहेत. पन्नालाल ह्यांनी राजस्थान व गुजरातच्या सीमेवर असलेल्या प्रदेशातील जीवनाचे व वातावरणाचे चित्रण केले आहे. पेटलीकर मही़कांठा व चरोतर ह्या प्रदेशांचे चित्रण करतात तर पीतांबर पटेल महेसाणा जिल्ह्यातील जीवनाचे चित्रण करतात; ह्या तिघांनाही गुजरातच्या आपापल्या ग्रामीण प्रदेशाचे संपूर्ण ज्ञान आहे व तिघेही कथाकथनात वाकबगार आहेत; पण शैली व कलात्मक दृष्टी ह्याकडे पाहता पन्नालाल हे सर्वांत श्रेष्ठ आहेत.

## दर्शक [ १९१४ ]

मनुभाई राजाराम पंचोळी. हे 'दर्शक' ह्या टोपण नावाने लेखन करतात. हे एक गांधीवादी विचारक, इतिहासाचे अभ्यासक व शिक्षणशास्त्रज्ञ आहेत. त्यांचे शिक्षण विशेष झालेले नाही.

दर्शक ह्यांच्या कादंबऱ्या– 'बंधन अने मुक्ति' 'दीपनिर्वाण' 'बंदीघर', 'प्रेम अने पूजा', 'झेर तो पीधां जाणी जाणी' (२ भाग), 'सॉक्रेटिस'.

गंभीर विषयांवरील निबंध– 'आपणो वारसो अने वैभव', 'त्रिवेणी तीर्थ'. नाटके– '१८५७', 'जालियानवाला', 'परित्राण'.

दर्शक ह्यांचे 'जालियनवाला' हे नाटक १९३५ मध्ये प्रकाशित झाले व त्यांच्या कादंबऱ्या 'बंदीघर', 'बंधन अने मुक्ति' आणि 'कल्याण यात्रा' १९४४ मध्ये प्रकाशित झाले व त्याची दुसरी आवृत्ती १९४६ मध्ये प्रकाशित झाली; पण १९५३ मध्ये उमाशंकर जोशी ह्यांच्या प्रस्तावनेसह हे पुस्तक प्रकाशित झाले तेव्हाच ह्या पुस्तकाचा मोठेपणा व त्यातील सूक्ष्म सौंदर्यस्थळे ह्यांची गुजरातच्या साहित्य जगताला जाणीव झाली व दर्शक हे एक सिद्धहस्त लेखक म्हणून प्रशंसा पावले.

गोवर्धनराम ह्यांच्यानंतर गंभीर आशय हा हेतू मनात ठेवून कादंबऱ्या लिहिणारे 'दर्शक' हे पहिलेच कादंबरीकार आहेत. आपल्या प्रतिभेला गाढ अभ्यासाची जोड देणारे हे एकमेव प्रख्यात कादंबरीकार आहेत. दर्शक ह्यांना विशेष महत्त्वाचे–उपयोगी असे आपल्या लेखनातून सांगावयाचे असते व ते कशा रीतीने सांगावे ही कला त्यांना उत्तम रीतीने साध्य झालेली आहे.

दर्शक ह्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या– 'दीपनिर्वाण', 'झेर तो पीधां जाणी जाणी' आणि विशेषत: 'सॉक्रेटिस'– ज्या काळाचे वर्णन दर्शक ह्याना करावयाचे त्या ऐतिहासिक काळात ते वाचकाला घेऊन जातात. दर्शक त्या ऐतिहासिक काळात आपल्या वेळच्या सामाजिक आणि राजकीय समस्यांचे चित्रण करण्याऐवजी ऐतिहासिक सत्याच्या पार्श्वभूमीवर ते मानवी भावनांच्या एकमेकावर होण्याऱ्या परिणामाचे चित्रण करतात. ते असा ऐतिहासिक काळ निवडतात की, ज्याचे वर्तमान-काळातील परिस्थितीशी जवळचे नाते आहे.

तरी हे मात्र येथे नमूद केले पाहिजे की, 'दर्शक' ह्यांनी चर्चिलेल्या काही एतिहासिक उपपत्तींच्या अचूकपणाबद्दल विद्वानांच्या मनात जबरदस्त शंका आहे. सभ्यता, सुबकता, प्रतिष्ठा व उदात्त आदर्शवाद ही दर्शकांच्या कादंबऱ्यांची मुख्य गुरुकिल्ली आहे. कादंबऱ्यांचे कथानक फार सुंदर रीतीने गुंफलेले असते. पात्र-लेखन फार उत्कृष्ट दर्जाचे असते व पात्रांच्या वर्तनावरूनच आणि कथानकाच्या

अंतिम घडणीवरून आपल्याला लेखकाच्या आशयाचे—हेतूचे आकलन होते. ते हलक्या अभिरुचीच्या लोकांना खूष करण्याचा प्रयत्न करीत नाहीत व त्यांच्या कादंबऱ्यांत हलक्या प्रतीचे व अशिष्ट असे काहीही नसते.

परंतु दर्शक ह्यांच्या कादंबऱ्यांत वाचकांची मने व कल्पनाशक्ती ह्यात आकर्षित करून त्यांच्यात परिवर्तन घडवून आणण्याची शक्ती दिसून येत नाही, एवढे मात्र मान्य करावेच लागेल.

## शिवकुमार जोशी [ १९१६ ]

शिवकुमार गिरिजाशंकर जोशी ह्यांचा जन्म अहमदाबादला झाला. शिवकुमार ह्यांनी विपुल लेखन केले आहे. त्यांच्या कादंबऱ्या— 'कंचुकी बंध', 'अनंगराग,' 'श्रावणी,' 'आभ रुए एनी नवलख धारे', 'चिराग' वगैरे. लघुकथा— 'रजनीगंधा', 'त्रिशूल', 'कनक कटोरो', 'कोमल गांधार', 'नवपाद' वगैरे. नाटके— 'सुमंगला', 'अंधारा उलेचो', 'दुर्वांकुर', 'सुवर्णरेखा', 'कृत्तिवास', 'कहत कबीरा', 'त्रिपर्ण'. एकांकिका— 'पांखविनानां पारेवां', 'अनंत साधना', 'नीलांचल', 'गंगा वहे छे आपणी' वगैरे. प्रवास-वृत्तान्त— 'जोवीती कोटरो', 'जोवीती कंधरा', 'जाई में कोटरो' आणि 'जाई में कंधरा'.

शिवकुमारनी टागोरांच्या 'जोगाजोग' याचे आणि विभूतिभूषण ह्यांच्या 'आदर्श हिंदू हॉटेल'चे भाषान्तरही केले आहे. तसेच त्यांनी शरच्चंद्र चतर्जींच्या 'विराज वहू' व 'देवदास' यांचेही रूपान्तर केले आहे.

शिवकुमारांच्या कादंबऱ्या व लघुकथा यातील पात्रे व स्थळे ह्यांचा विस्तार फार मोठा आहे. त्यात आदर्शवादी वातावरण आहे. शिवकुमार ह्यांची वर्णनशक्ती व कथनशैली उल्लेखनीय आहे; पण त्यांच्या पुस्तकातील पात्रांनी केलेल्या प्रवासाची शिवकुमार ह्यांनी केलेली वर्णने ही कथानकाचा एक अंगभूत भाग वाटत नाही व त्यांच्या लघुकथा अनेकदा भावनांच्या प्रवाहात बुडून-दबून गेल्यासारख्या वाटतात. तसेच त्यात अनेकदा अंतर्गत विसंवादिता दिसून येते.

शिवकुमारांची साहित्याला दिलेली मोठी देणगी म्हणजे त्यांची नाटके ही आहे. ते स्वतः एक अभिनेता व नाटकाचे दिग्दर्शक असल्यामुळे रंगमंचावर नाटक यशस्वी रीतीने सादर करण्यात ते कुशल आहेत आणि त्यामुळे त्यांची काही नाटके रंगभूमीवर फारच गाजली. शिवकुमारांचा युरोप व अमेरिकेच्या प्रवासाचा वृत्तान्त माहितीपूर्ण आणि रसप्रद आहे. त्यात एका कादंबरीकाराची कलाकारागिरी दिसून येते.

## भोगीलाल सांडेसरा [ १९१७ ]

भोगीलाल जयचंदभाई सांडेसरांचा जन्म पाटण येथे झाला. त्यांनी संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश आणि जुनी व मध्ययुगीन गुजराती भाषा ह्यांचा गाढ सखोल अभ्यास केलेला होता. त्यांची संशोधनपर पुस्तके– 'वाघेलाओनुं गुजरात', 'वस्तुपालनुं विद्यामंडळ', 'प्राचीन गुजराती साहित्यमां वृत्त रचना' वगैरे आहेत. त्यांनी पुढील ग्रंथ संपादित केले आहेत. 'सत्तरमा शतकनां प्राचीन गुर्जर काव्य', संघविजयचे 'सिंहासनबत्रीशी', वीरसिंहाचे 'उषाहरण' वगैरे. त्यांनी केलेली भाषान्तरे संघदास गणीकृत 'वसुदेव हिंडी' आणि 'पंचतंत्र' वगैरेंची आहेत. बडोद्याच्या ओरिएण्टल इन्स्टिटयूटचे डायरेक्टर असताना सांडेसरा ह्यांनी आणखी अनेक ग्रंथांचे संशोधन व संपादन केले. त्यांनी 'प्रदक्षिणा' नावाचे पुस्तक लिहिले आहे. ह्यात त्यांनी पूर्व व पश्चिम येथील देशांमध्ये अभ्यास व संशोधनासाठी केलेल्या प्रवासाचा वृत्तान्त आहे.

सांडेसरा ह्यांचे संशोधनकार्य व संपादनकार्य फार उच्च प्रतीचे आहे.

## चुनीलाल मडिया [ १९२२–१९६८ ]

चुनीलाल कालिदास मडिया ह्यांचा जन्म धोराजी येथे झाला. या लेखकाने बरीच वर्षे पत्रकार म्हणून कार्य केले. त्यांच्या आयुष्यातील शेवटची काही वर्षे ते 'रुचि' ह्या नावाचे आपले स्वतःचे मासिक चालवीत होते. मडिया ह्यांचे साहित्य विपुल आहे. त्यांच्या कादंबऱ्या– 'व्याजनो वारस', 'पावक ज्वाला', 'इंधण ओछा पडयां', 'वेळा वेळानी छांयडी', 'लिलुडी धरती' वगैरे. लघुकथा– 'घूघवातां पूर', 'पद्मिनी', 'रूप अरूप', 'अंतस्रोत', 'काळजां कोराणां', वगैरे. एकांकिका– 'रंगदा', 'रक्ततिलक', 'विष विमोचन'. नाटके– 'हुं ने मारी वहु', 'रामलो-रॉबिनहुड', 'शून्यशेष'. काव्ये– 'सॉनेट्स'. त्याशिवाय मडियानी निबंध, समीक्षा (टीका)' जीवनचरित्रे व प्रवासवृत्तान्तही लिहिले आहेत. त्यांनी अनेक पुस्तकांची भाषान्तरे व संपादनही केले आहे.

मडियांचे पहिले पुस्तक 'घूघवातां पूर' हा लघुकथांचा संग्रह आहे. ते १९४५ मध्ये प्रकाशित झाले. तेव्हापासून जीवनाच्या अंतापर्यंत त्यांनी आपले लेखनकार्य सतत चालू ठेवले व त्याशिवाय ते वर्तमानपत्रात साहित्यस्तंभही (Literary Columns) लिहीत असत.

मडियांच्या नाटकांत, लघुकथांत व कादंबऱ्यांत समय, स्थळे व पात्रे ह्या बाबत अनेक प्रकारची विविधता मुख्यत्वे दिसून येते. त्यांचे भाषेवर मोठे प्रभुत्व आहे. त्यांची पात्रे असंस्कृत, अशिक्षित, ग्रामीण लोकांपासून ते थेट राजवंशातील व्यक्ती व आध्यात्मिक मार्गावरील व्यक्तींपर्यंतची आहेत; आणि ते आपली भाषा

त्या त्या व्यक्तीच्या सांस्कृतिक पातळीला पूर्णपणे शोभेल अशा रीतीने फार कुशलतेने योजीत असत. त्यांची वर्णने प्रभावी आहेत; पण अनेकदा त्यांच्यात शब्दावडंबर आणि पुनरुक्ती हे दोष दिसून येतात. त्यांची पात्रे केव्हा केव्हा अतिरंजित वाटतात आणि त्यांच्या लघुकथांचा व नाटकांचा मध्यवर्ती विचार केव्हा केव्हा फार दुर्बळ वाटतो. कलाकाराला आवश्यक असलेल्या संयमाचा त्यांच्यात केव्हा केव्हा अभाव दिसून येतो.

## पुरुषोत्तम विश्राम मावजी [ १८७९–१९२९ ]

ह्या काळातील लेखकांमध्ये मावजी ह्यांचे नाव प्रामुख्याने घेतले पाहिजे. ते इतिहास, राज्यनीतिशास्त्र, साहित्य, कला, प्राचीन काळातील अवशेष, शिल्पकला व स्थापत्यकला ह्या विषयांचे प्रगाढ अभ्यासक होते. ते 'सुवर्णमाला' ह्या नावाचे ललितकलेला वाहिलेले लेखांनी भरलेले असे मासिक प्रकाशित व संपादित करीत होते. पुरुषोत्तम ह्यांनी काही कादंबऱ्याही लिहिल्या आहेत. त्यात 'सूर सागरनी सुंदरी' व 'शिवाजीनो वाघनख' ह्यांचा समावेश होतो. त्यांनी मराठीत 'वतनपत्रे' व 'निवडपत्रे' ही पुस्तकेही लिहिली आहेत.

## चिमनलाल डाह्याभाई दलाल [ १८८१–१९१८ ]

पाटण व जेसलमीर येथे जुन्या हस्तलिखितांची व जुन्या पुस्तकांची–जुन्या वस्तूंची भांडारे होती. त्यांचे दलालांनी कसून परीक्षण केले होते. हे काम करणारे ते पहिलेच विद्वान होते. ह्यापूर्वी ह्या क्षेत्रात मणिलाल द्विवेदी ह्यांनी थोडे काम केले होते. दलालांनी कित्येक जुने व मौल्यवान ग्रंथ उजेडात आणले. ह्यात उद्योतनसूरींच्या 'कुवलयमाला' ह्या ग्रंथाचा समावेश होतो. गायकवाडांच्या ओरिएण्टल सीरीज[३७-A] साठी राजशेखराची 'काव्यमीमांसा', वस्तुपालाचे 'नरनारायणानंदकाव्य' व याशिवाय 'पार्थपराक्रम' या ग्रंथांचे त्यांनी संपादन केले आहे. दलाल हे व्याकरणशास्त्राचे व व्युत्पत्तिशास्त्राचे अभ्यासक, विद्वान होते; पण त्यांनी वैज्ञानिक पातळीवर कित्येक जुन्या कथांचा ऐतिहासिक व तुलनात्मक अभ्यास सुरू केला आहे; त्यात 'चंद्रहास', 'सदेवंत सावलिंगा' आणि 'माधव काम कुंडला' ह्या कथांचा समावेश होतो.

## पंडित सुखलालजी [ १८८०–१९७८ ]

पंडितजींनी कित्येक जुन्या ग्रंथांची–विशेषकरून जैन साहित्यातील पुस्तकांची भाषान्तरे व संपादन केले आहे. पंडितजी हे मूलगामी विचारक व तत्त्वज्ञानी होते. त्यांचा भारतीय तत्त्वज्ञानाच्या सर्व शाखांचा तुलनात्मक अभ्यास व संश्लेषण ही

अतुलनीय आहेत. ज्या भारतीय तत्त्वज्ञान्यांचे एकमेव ध्येय, दुसऱ्या कशाचाही विचार न करता सत्य शोधून काढणे, हेच आहे अशा तत्त्वज्ञान्यांच्या मालिकेत पंडितजींचे स्थान आहे.

## गिरिजाशंकर वल्लभजी आचार्य [ १८८१–१९६४ ]

हे मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमच्या पुरातत्व विभागाचे क्यूरेटर होते. ते मुद्राशास्त्र व प्राचीन लिपिविद्या ह्यांचे अभ्यासक होते. त्यांचा 'गुजरातना ऐतिहासिक शिलालेख'–३ भाग, हा ग्रंथ उल्लेखनीय आहे.

## दुर्गाशंकर केवळराम शास्त्री [ १८८२–१९५२ ]

ते बरीच वर्षे 'आयुर्वेद विज्ञान' नावाचे आयुर्वेद ह्या विषयाला वाहिलेल्या मासिकाचे संपादक होते. तसेच ते भारताच्या प्राचीन व मध्ययुगीन इतिहास व संस्कृतीचे आणि संस्कृत साहित्याचे प्रगाढ पंडित होते. त्यांचे लेखन अचूक, सर्वांगपूर्ण व वस्तुदर्शी होते.

## जगन्नाथ दामोदर त्रिपाठी [ १८८३–१९३६ ]

जगन्नाथ दामोदर त्रिपाठी हे 'सागर' ह्या नावाने प्रसिद्ध होते. ते आपल्या 'गुजराती गझलीस्तान' (१९१३) ह्या ग्रंथामुळे प्रख्यात आहेत. ह्या ग्रंथात गुजराती गझलांचा संग्रह आहे. तसेच त्यांनी २ भागात लिहिलेल्या 'दिवान–इ–सागर' (१९१६ आणि १९३६) ह्या ग्रंथांबद्दलही त्यांची ख्याती आहे. ह्यात त्यांच्या स्वत: 'सूफी' मताच्या प्रभावाखाली लिहिलेल्या गझलांचा व इतर काही कवितांचा संग्रह आहे.

## गिजुभाई बधेका [ १८८५–१९४५ ]

गिजुभाई हे बालसाहित्याचे प्रख्यात लेखक आहेत. ते गुजरातमधील लहान मुलांना मॉंटेसरी पद्धतीने शिक्षण देण्यात अग्रेसर होते.

## नृसिंह भगवानदास विभाकर [ १८८८–१९२५ ]

विभाकरांची प्रबळ महत्त्वाकांक्षा गुजराती रंगभूमीचा दर्जा व उच्च सांस्कृतिक पातळीवर पोहोचविणे ही होती. त्यानी पुढील सहा नाटके लिहिली आहेत– 'सिद्धार्थ बुद्ध', 'स्नेह सरिता', 'सुधाचंद्र', 'मधुबन्सरी', 'मेघमालिनी', 'अञ्जोनां बंधन'. ही सर्व गुजराती नाटके नाटयव्यवसायी मंडळीकडून रंगमंचावर

आणली गली. ह्या नाटकांत त्या काळच्या सामाजिक व राजकीय चळवळींच्या पुनरुज्जीवनाचे दर्शन होते. विभाकरनी 'रंगभूमि' ह्या त्रैमासिकाचे प्रकाशनही केले; पण ते एक वर्षापेक्षा जास्त काळ टिकले नाही.

## रामलाल चुनीलाल मोदी [ १८९०–१९४९ ]

मोदी हे प्राचीन व मध्ययुगीन साहित्याचे आणि ऐतिहासिक संशोधनाचे अभ्यासक होते. त्यांचे 'भालण' विषयीचे संशोधन कार्य उल्लेखनीय आहे.

## शयदा [ १८९२–१९६२ ] व इतर गझलकार

हरजी लवजी दामाणी म्हणजेच 'शयदा' हे आपल्या गझलांबद्दल प्रख्यात आहेत. त्यांनी गुजरातमध्ये गझलला एक स्थिर स्थान मिळवून दिले. दुसरे नमूद करण्यासारखे गझलकार पुढीलप्रमाणे आहेत– बरकत वीराणी ऊर्फ बेफाम, मरीज, सैफ, शून्य, घायल, नसीम आणि गनी.

## रत्नमणिराव भीमराव जोटे [ १८९५–१९५५ ]

रत्नमणिराव हे संस्कृत आणि प्राचीन भारतीय इतिहासाचे अभ्यासक होते. त्यांनी 'गुजरातनो सांस्कृतिक इतिहास' हा ग्रंथ आणि अहमदाबाद, खंभायत व सोमनाथ या स्थळांचा प्रमाणित इतिहास लिहिला आहे.

## बापालाल गरबडदास शाह (वैद्य) [ १८९६ ]

बापालाल हे आयुर्वेद, वनस्पतिशास्त्र आणि संस्कृत साहित्याचे व विशेषकरून कालिदासाचे गाढे अभ्यासक होते. त्यांच्या पुस्तकात संग्रहित केलेल्या त्यांच्या अनेक लेखांवरून त्यांचे आयुर्वेद, ॲलोपाथी व दुसऱ्या वैद्यकीय शाखांविषयीचे ज्ञान दिसून येते, तसेच त्यांचा शुद्ध वैज्ञानिक दृष्टिकोण व आपल्या व्यवसायाबद्दलच्या प्रामाणिकपणाबद्दलची जाणीव त्यांच्या लेखांवरून स्पष्ट होते.

## मंजुलाल रणछोडलाल मजमुदार [ १८९७ ]

हे आपल्या ऐतिहासिक अति तुलनात्मक संशोधनासाठी व मध्ययुगीन साहित्याच्या काही पुस्तकांच्या संपादनासाठी प्रसिद्ध आहेत. त्यात 'सुदामाचरित्र', 'अभिमन्यु आख्यान', 'रणयज्ञ' आणि 'पंचदण्ड' ह्या प्रेमानंदांच्या पुस्तकांचा समावेश होतो.

## रसिकलाल छोटालाल परीख

परीख हे एक कवी आहेत. ते 'मुसीकार' ह्या उपनावाने लिहितात. त्यांनी मम्मटाच्या 'काव्यप्रकाशा'च्या उल्लास १–६ चे, रामनारायण पाठक ह्यांच्या सहयोगाने भाषान्तर केले आहे. त्यांनी जे 'शर्विलक' नावाचे नाटक लिहिले आहे ते शूद्रकाच्या 'मृच्छकटिक' ह्या संस्कृत नाटकावर आधारित असले तरी त्यात सूचक फेरफारही केलेला आहे. रसिकलाल हे इतिहास, काव्यशास्त्र आणि नाट्यशास्त्र ह्यांचे प्रख्यात पंडित आहेत.

## पूजालाल रणछोडलाल दलवाडी [ १९०१ ]

पूजालाल हे आध्यात्मिक विषयाचे कवी असून आपल्या शुद्ध, स्पष्ट शब्दयोजनेबद्दल प्रख्यात आहेत. हे सर्वांत अधिक सुनीते लिहिणारे कवी आहेत. त्यांनी केलेले श्री अरविंदाच्या 'सावित्री'चे भाषान्तर ही एक महान सिद्धी आहे.

## हरिश्चंद्र भगवतीशंकर भट्ट [ १९०६–१९५० ]

हरिश्चंद्र हे सूक्ष्म संवेदनांचे चित्रण करणारे कवी होते. उमाशंकर जोशी ह्यांनी संपादित केलेल्या त्यांच्या कविता 'स्वप्नप्रयाण' ह्यात एकत्रित केलेल्या आहेत. हा ग्रंथ त्यांच्या मृत्यूनंतर प्रकाशित झाला. हरिश्चंद्र हे पाश्चात्त्य साहित्याचे निःसीम चाहते होते आणि त्यांनी आंतरराष्ट्रीय संवेदनांचे हृद्गत गुजराती काव्यात आणले व चौथ्या दशकाच्या सुरुवातीस त्यांनी रिल्के व मालार्मे ह्यांची गुजराती साहित्याला ओळख करून दिली.

## 'पतील'–मगनलाल भूछरभाई पटेल [ १९०६–१९७० ]

'पतील' हे गांधीयुगातील एकच एक असे कवी होते की, ज्यांनी आपल्या काव्याला गांधीयुगातील हृद्गताचा जरासुद्धा स्पर्श होऊ दिला नाही. त्यांच्या काव्यात प्रखर आत्मलक्षिता व अद्भुत रंग दिसून येतात. ते शब्दप्रयोग, शैली व छंद ह्यांचे निरनिराळे प्रयोग करीत असत. त्यांचे काही गझल अत्युत्कृष्ट आहेत.

## रामप्रसाद मोहनलाल शुक्ल [ १९०८ ]

हे एक सॉनेट रचणारे समर्थ कवी आहेत. त्यांच्या 'विनाश अने विकास' ह्या सुनीतांच्या मालेबद्दल ते प्रख्यात आहेत.

## यशोधर महेता [ १९०९ ]

यशोधर महेता ह्यांनी लिहिलेला 'रणछोडलाल अने बीजां नाटको' ह्या नावाचा पाच चरित्रात्मक नाटकांचा संग्रह आहे. त्यांनी 'सरी जती रेती' ही एक

सुंदर कादंबरी लिहिली आहे; पण त्यातील शृंगारिक भावनांच्या अनिर्बंध चित्रामुळे ती फारच विवादास्पद झाली आहे. त्यांनी दुसऱ्याही काही कादंबऱ्या लिहिल्या आहेत.

## दुर्गेश शुक्ल

दुर्गेश शुक्ल ह्यांनी १९३४ मध्ये 'उर्वशी' नावाची एक दीर्घ नाट्यात्मक कविता लिहिली आहे. त्यात जवळ जवळ ५०० पंक्ती आहेत व त्यात एकच पृथ्वी छंद उपयोगात आणला आहे. तसेच दुर्गेशनी 'पृथ्वीनां आंसू' नावाचा वास्तवदर्शी व प्रतीकात्मक नाटकांचा एक संग्रहही लिहिला आहे. त्यांनी इब्सेनच्या 'पीअर जिन्ट' (Peer Gynt) ह्या नाटकाचा अनुवाद केला आहे व इंग्लिशमधील काही सामाजिक सुखान्त नाटकांचे रूपान्तर केले आहे. त्यांनी लघुकथाही लिहिल्या आहेत. त्या 'पूजानां फूल' ह्यात एकत्रित केल्या आहेत.

## स्वप्नस्थ [ १९१३–१९७० ]

भानुभाई रणछोडलाल व्यास हे साम्यवादी विचारसरणीचे बुद्धिमान कवी होते. त्यांनी 'अजंपानी माधुरी', 'विनाशना अंशो अने माया' आणि 'अचला' वगैरे पुस्तके लिहिली आहेत.

## प्रजाराम रावळ [ १९११ ]

प्रजाराम ह्या कवीला दिव्यत्वाच्या शक्तीची तीव्र तळमळ लागलेली होती. त्यांनी ऋतुवर्णनपर काही उत्कृष्ट काव्ये रचिली आहेत. त्यातील शब्दयोजना निर्दोष व उदात्त आहे.

## तनसुख भट्ट [ १९११ ]

हे 'दांडीयात्रा' लेखक आहेत. ती एक दीर्घ कविता आहे. त्यात १९३० साली महात्मा गांधींनी केलेल्या प्रसिद्ध ऐतिहासिक दांडीयात्रेचा गौरव केलेला आहे. त्याशिवाय त्यांनी 'महात्मायन' नावाचे महाकाव्य लिहिले आहे. त्यात गांधीजींचे जीवन व कार्य ह्यांचे गौरवपूर्ण वर्णन केलेले आहे.

## इतर गांधीचरित्रविषयक-लेखन

महात्मा गांधींच्या ,जीवनातील महत्त्वाच्या प्रसंगावर 'गांधी गौरव' (१९७०) ह्या नावाचा आणखी एक कवितासंग्रह श्री. योगेश्वर ह्यांनी प्रकाशित

केला आहे. त्यांनी काही कविता व कादंबऱ्याही लिहिल्या आहेत. तसेच डाह्याभाई पटेल ह्यांनी 'मोहन गांधी' ह्या महाकाव्याचे ४ अध्याय १९७१ साली प्रकाशित केले. ह्या महाकाव्याचे ऐंशी अध्याय लिहिण्याचा त्यांचा संकल्प होता; पण फक्त चारच लिहून प्रकाशित झाले.

## हरिवल्लभ भायाणी [ १९१७ ]

भायाणी हे प्राकृत अपभ्रंश आणि प्राचीन गुजराती साहित्याचे प्रख्यात संशोधक पंडित आहेत व भाषाशास्त्र, व्याकरण आणि पश्चिमात्य सौंदर्यशास्त्राचा त्यांचा दांडगा अभ्यास आहे.

## पुष्कर चंदरवाकर [ १९२१ ]

पुष्कर चंदरवाकर हे कादंबरीकार, लघुकथालेखक व एकांकिकाकार आहेतच. तदुपरान्त त्यांनी लोकसाहित्याचे विद्वत्तापूर्ण संशोधन केले आहे. त्यांनी भिल्ल, पढार, धाराळा, काळी परज व आणखी काही आदिवासी जमातींच्या लोकगीतांचे दोन संग्रह प्रकाशित केले आहेत. त्यांची नावे अशी : 'नवो हालको' आणि 'चंदर उग्ये चालवुं'.

## प्रबोध पंडित [ १९२३-१९७५ ]

प्रबोध पंडित हे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्रख्यात भाषाशास्त्री होते. त्यांनी 'गुजराती भाषानुं ध्वनिस्वरूप अने ध्वनिपरिवर्तन' हा प्रसिद्ध ग्रंथ लिहिला आहे. ह्यात पूर्णपणे वैज्ञानिक पायावर स्वतंत्रपणे लिहिलेला व प्रमाणित असा गुजराती भाषेचा अभ्यास दिसून येतो. असे फारच थोडे ग्रंथ गुजराती भाषेत लिहिलेले आहेत; पण पंडितांचे बरेचसे लेखनकार्य इंग्लिशमधून झालेले आहे.

## तळटीपा [ भाग १ ]

विसावे शतक

गांधीयुग (१९१५–१९४५)

१. सत्यना प्रयोगो अथवा आत्मकथा.

२. पण राजकारण हा गांधीजींचा पहिल्यापासून मुख्य आवडीचा विषय नव्हता. आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या काही वर्षांत त्यांना राजकारणाची आवड

किंवा नेतागिरीच्या हव्यारा असलेला दिसत नाही. इंग्लंडमध्ये कायद्याचा अभ्यास करीत असताना ते आपल्या फुरसतीचा समय शाकाहाराच्या पुरस्कारात व धार्मिक चर्चेत व्यतीत करीत असत. दक्षिण आफ्रिकेत त्यांचा राजकारणात झालेला प्रवेश ही सुद्धा एक अकस्मात घटना म्हणावी लागेल. पहा—'गांधीजींची आत्मकथा' (पॉप्युलर एडिशन) महादेव देसाईंनी भाषान्तर केलेली व नवजीवन पब्लिशिंग हाऊस, अहमदाबाद यांनी प्रकाशित केलेली, १९२७ भाग १, प्रकरण (१६) पृष्ठे १००–१०१.

३. धमाल न करो जराय नहि नेन भीनां थशो,
घडी ब घडी जे मळी, नयनवारि ! थंभो जरा,
कृतार्थ थई लो; फरी नहि मळे ज सौंदर्य आ.
सदा जगत जे वडे हलुं हसतुं मांगल्य को.

४. ना बोलावुं तुज सह फरी म्हालवा स्हेलगाहो,
ना लेवाने विकट मुज मुश्केलीओमां सलाहो;
ना के तारा दरसथी तृषा चक्षुनी कैंक छीपे,
किन्तु गावा तुज विरहनां गीत तारी समीपे.

५. सखि तेम छतां ना आवो,
सखि तेम छतां ना आवो,
तो आम्रतनो सहभागी करवा कोई रीते बोलावो.

६. ह्या पुस्तकाच्या १० व्या आवृत्तीत दलपतरामनी केशवलाल ध्रुव ह्यांच्या सल्ल्यावरून बरेच फेरबदल केले होते.

७. अंग्रेजी राज्य तो आव्युं, आवीने फाव्युं रतनबा.

८. धन्य हो धन्य सौराष्ट्र धरणी.

९. बाकीचे तीन पुरुषार्थ– धर्म : (धार्मिक अथवा नैतिक पुण्य, सद्गुण, सदाचार, सत्कार्य). अर्थ : (धनप्राप्ती व ऐहिक उन्नती) आणि काम : (प्रेम अथवा इन्द्रिय-सुख).

१०. छेवटे ते ज समाज ते ज कुटुंबो पेढी दर पेढी उत्कर्ष अने सुख पामे छे, जे निरलस अने कंचन–कामिनीनी बाबतमां संयमनियताचारने सेवे छे अने आहार तथा शौचना नियमो पाळे छे. ('समूळी क्रान्ति', फेब्रुआरी १९५५ मधली आवृत्ती, पृष्ठे ८–९).

११. स्व. कृ. मो. झवेरी म्हणतात–ह्या कथांची शैली व भाषा फारच साधी आहे व ती इतकी की एखाद्या प्रत्यक्ष गुजराती हिंदूने लिहिलेल्या भाषेसारखी आहे. एखाद्या हिंदू लेखकाने लिहावी तशी तंतोतंत भाषा एका पारशी लेखकाने लिहावी यातल्या त्यांच्या कौशल्याची तर वाचकांनी फारच वाखाणणी

केली आणि नवलरामनी तर असे म्हटले आहे की, एखाद्या पारशी गृहस्थाने लिहिलेली इतकी शुद्ध गुजराती भाषा आपण कधीही पाहिलेली नाही. ह्या पुस्तकाची प्रस्तावनाही तितक्याच निर्दोष शुद्ध भाषेत लिहिलेली आहे. आता ह्यावर असा आक्षेप घेतला जात आहे की, फ्रामजी फक्त कथेचा आराखडा पुढीलप्रमाणे लिहित असत–

"एक राजा–दोन राण्या, एक आवडती, दुसरी नावडती, राजपुत्र नाही–दुःखी–राजपुत्राचा जन्म–राजाला माहीत नाही. राजपुत्र शिकारीला जातो. अनपेक्षित भेट" अशा कथा ते कथनकारांकडून ऐकून वरीलप्रमाणे त्याची लहान–संक्षिप्त टिपणे तयार करीत. ह्या लहान लहान कथांत ऑफिसातील हिंदू कारकून व मदतनीस भर घालीत व तिचा खूप विस्तार करीत आणि म्हणूनच ह्या कथांची भाषा हिंदू गुजराती भाषा आहे. 'साठिनुं साहित्य' हे पुस्तक लिहिणाऱ्या लेखकाने हे विधान सत्य असल्याबद्दल साक्ष दिलेली आहे. (१७५ पान पाहा. तो म्हणतो की, आपण स्वतः अशी एक कथा पुरवली होती व त्यांचा मित्र केशवलाल परीख ह्याने तर अशा कित्येक कथा पुरवल्या होत्या.)

पण पुस्तकाची प्रस्तावना व त्यांनी लिहिलेले दुसरे 'कुमारदर्पण' नावाचे गुजराती पुस्तक पाहता हे शक्य वाटत नाही. जो मनुष्य सुन्दर गुजराती लिहू शकतो तो वर सांगितलेल्या युक्तीचा अवलंब करील हे शक्य वाटत नाही. ह्यात सत्याचा भाग किती आहे हे जरी माहीत नसले तरी त्यामुळे ह्या पुस्तकाच्या गुणवत्तेत काही कमतरता येत नाही अथवा त्यांचे साहित्यिक मूल्यही कमी होत नाही.

(फर्दर माइलस्टोन्स इन गुजराती लिटरेचर' (२ री आवृत्ती १९५६) पृष्ठे २५४–२५५)

१२. मुनशींच्या 'गुजरातनो नाथ' मधील मुंजाल व धूमकेतूंच्या 'राजसंन्यासी' मधील दामोदर.

१३. बारडोली–गुजरातमधील एक लहान गाव. सरकारी कर भरण्याविरुद्ध झालेल्या चळवळीमुळे प्रसिद्ध. त्यामुळेच वल्लभभाई पटेल हे सरदार–नेता–म्हणून प्रसिद्धी पावले.

१४. गुजरातमधील सागरकिनाऱ्यावरील एक खेडे–येथे गांधीजींनी मिठाचा कायदा तोडला.

१५. एक समुद्रकिनाऱ्यावरील खेडेगाव. मिठाचा कायदा तोडणाऱ्या सत्याग्रहींवर ह्या ठिकाणी ब्रिटिश सत्तेने अमानुष जुलूम केला.

१६. जवाहरलाल नेहरूंचे पिताजी. एक प्रख्यात देशभक्त.

१७. एक राजकीय कैदी. ह्याने अन्यायाविरुद्ध तुरुंगात अन्नसत्याग्रह केला व तो ६४ व्या दिवशी मृत्यू पावला.

१८. एक प्रख्यात समाजसुधारक व गुजराती साहित्यिक पृष्ठे ११४–११७ पाहा. जव्हेरी मनसुखलाल कृत *History of Gujarati Literature PP 114-117*

१९. पुराता पायाना चणतरमहीं पथ्थर थवुं, अमर इतिहासे भळी जवुं.

२०. मेघाणींनी बारवाला येथे राजद्रोहाचे भाषण केले असा त्यांच्यावर आरोप करण्यात आला. स्वत: मेघाणींनी असे खात्रीपूर्वक सांगितले आहे की, ज्या तारखेला व ज्या वेळी हे भाषण केले असा त्यांच्यावर आरोप करण्यात आला त्या दिवशी व त्या वेळी ते राणपूर येथील आपल्या घरात झोपलेले होते. असे सांगण्यात येते की, त्या भाषणासाठी ज्या व्यक्तीला अटक करावयाची होती ते एक श्री. जोधाणी नावाचे गृहस्थ होते अशी माहिती बाहेर आली. अर्धवट शिकलेल्या एका कारकुनाने गुजराती लिपीत लिहिलेले 'जोधाणी' हे नाव 'मेघाणी' असे वाचले आणि अशा रीतीने समजुतीचा घोटाळा झाला.

२१. मारी माझमरातनां सोणलां चमकी चमकी चाल्यां जाय ('झंखना')

२२. घण रे बोले ने एरण सांभळे हो जी ( घण रे बोलेने )

२३. पंजाब

२४. वीरा मारा पंच रे सिंधुने स्मशान, रोपाणा त्रण रुखडां हो जी, ('फूलमाळ') भगतसिंह, सुखदेव आणि राजगुरु यांना १९३१ मध्ये फाशी देण्यात आले त्या वेळी ही कविता लिहिलेली आहे.

२५. ब्रह्मा, विष्णु (कृष्ण हा याचाच अवतार मानला जातो) आणि महेश अथवा शिव ही हिंदूंनी मानलेली त्रिमूर्ति आहे.

२६. मंगलाष्टके— काही हिंदू जमातीत लग्नाच्या वेळी ही म्हटली जातात. ह्यात शार्दूलविक्रीडित वृत्तात रचलेले आठ श्लोक असतात. ह्यात काही देव व अमानवीय तत्त्वे याना असे आवाहन केलेले असते की वधूवरांना त्यांनी शुभाशीर्वाद द्यावा.

२७. आ भूमि अमारी, मैया अमारी, कोण अवर कहेशे निजनी ?

२८. जय मंगल प्रिय जन्मभूमिनुं गजाविये.

२९. ह्या कविता नंतर 'अर्घ्य' (पृष्ठ १७३ ते १८३) मध्ये संग्रहित केलेल्या आहेत.

३०. 'कोयो' म्हणजे सारखी टकटक करणारा आणि 'भगत' म्हणजे मध्ययुगीन भक्त कवीचे अनुकरण करणारा.

३१. कोया भगत एना आंखना डोळा फाडी फाडी तने पूछे;
जुगना जुग तने राखी जोयो हवे काम तारुं अहीं शुं छे ?

३२. सत्ये स्थायी, उछेरीने शिव थकी, सौंदर्यधारे रसे,
वंदुं ए गुणे लसंत विभुने सत्यं शिवं सुन्दरम्.

३३. पृथ्वी उछगे उछरेल मानवी,
हुं मानवी मानव थाऊं तो घणुं.

३४. हे अंग मारा !
तारा दशे अग्रथकी शरीरनी
चैतन्यधारा दशजिव्ह वहनिशी
स्फुरे वहे, ए बिखराइ जाती
ज्वालावली संपुटमां तुं बांधी ले.
बंधायली ए दृढ ज्योत बाळशे.
तारा अहंनां वन, ने अगम्यमां
आरोहवा क्षेपनटोच ए थशे.

३५. १९३१ मध्ये उमाशंकर जोशी ह्यांचे 'विश्वशांती' प्रकाशित झाले. त्याला 'गांधीयुगातील काव्य' असे म्हटले गेले. काव्यातील नवीन विचारधारा 'विश्वशांती'पासून सुरू झाली. 'विश्वशांती' ही खंडकाव्याच्या धर्तीवर लिहिली गेलेली एकच दीर्घ कविता आहे. गांधीयुगातील कवींच्या कवितांचा पहिला संग्रह जरी १९३३–३४ मध्ये प्रकाशित झाला तरी नव्या प्रकारच्य कविता साहित्यिक नियतकालिकामध्ये सुंदरम्‌नी म्हटल्याप्रमाणे १९२२ पासूनच प्रकाशित होण्यास सुरुवात झाली होती.

३६. ही कथा १९३६ मध्ये प्रकाशित झाली.

३७. प्रभो, कजळतां उरे तणख एक आशानी दे !
भले न कंइ दैं शके, जरीक आत्मश्रद्धा तुं दे !

३७-ए. 'गायकवाडस् ओरिएण्टल सीरीज'– 'जी. ओ. एस.' ही ग्रंथमाला सर सयाजीराव गायकवाड यांनी श्री. चिमनलाल दलाल ह्यांनी लिहिलेला तत्संबंधीचा रिपोर्ट वाचल्यानंतर सुरू केली.

## [ २ ]

## गांधीजींच्या नंतरचा काळ [ १९४५–१९५५ ]

१९४७ साली ब्रिटिश निघून गेल्यानंतर भारत स्वतंत्र झाला आणि त्यानंतर पाचच महिन्यांनी जानेवारी १९४८ मध्ये गांधीजींचा वध झाला. राजकीय

स्वातंत्र्य मिळाले; पण त्याचबरोबर त्यानंतर थोड्याच अवधीत प्रजेचा दारुण अपेक्षाभंग झाला आणि दुय्यम प्रतीच्या लेखकांच्या गांधीजींच्या विचाराविषयींच्या पोकळ कल्पना पाहून गुजराती लेखकाला देशाच्या सामाजिक व आर्थिक उन्नतीच्या दिशेने चाललेल्या प्रयत्नात काही अर्थ वाटेनासा झाला.

त्यामुळे गुजराती लेखकवर्ग निसर्ग, प्रेम व मधून मधून ईश्वर ह्या विषयाकडे वळला व त्यांना मनुष्याविषयी एक मनुष्य म्हणूनच आपलेपणा वाटू लागला. एक सामाजिक अथवा राजकीय व्यक्ती म्हणून ते त्याच्याकडे न पाहता एक मनुष्य म्हणून पाहू लागले.

ह्या सर्वांचा अर्थ असा नव्हे की, नुकत्याच गेलेल्या भूतकाळातून लेखक बाजूला झाले अथवा त्यांनी त्यात काही सुधारणा केल्या. कारण गांधीयुगातील लेखकसुद्धा मनुष्याकडे एक मनुष्य म्हणूनच पाहू लागले होते व ते त्याची एक मनुष्य म्हणूनच किंमत करीत होते; पण ते त्याचबरोबर त्याच्याकडे सामाजिक व राजकीय दृष्टिकोणातूनही पाहात होते. त्या वेळचे लेखकही निसर्ग, प्रेम व ईश्वर ह्यांच्याबद्दलच्या प्रेमाची गाणी गात होते आणि तसे करताना त्यांचा दृष्टिकोण अगदी स्वतंत्र होता. त्याचबरोबर त्यावेळचे लेखक आपल्या काळाबरोबर अगदी समरस होऊन गेले होते व ते आपापल्या बुद्धिप्रमाणे जीवनाच्या प्रत्येक पैलूचा विचार करत होते. त्यांचे काव्याचे स्वरूप व छंद ह्या क्षेत्रातील प्रयोग स्वतंत्र बाण्याने केलेले व नवे होते. लेखनाच्या विचारात त्याचप्रमाणे तंत्र आणि शैलीत त्यांनी उठवलेला आवाज हा खरा आवाज होता. नुसता आवाजाचा प्रतिध्वनी नव्हता. आपल्या पूर्वगामी लेखकांपेक्षा गांधीयुगातील लेखकांचे व्यक्तिमत्त्व निराळेपणाने उठून दिसत होते.

पण हे सर्व गुण गांधीयुगातील श्रेष्ठ लेखकातच दिसून येत होते व दरेक युगात असतात त्याप्रमाणे ह्या युगातही मध्यम प्रतीचे, दुसऱ्याची नक्कल करणारे व इतरांच्या लेखनावर जगणारे असे लेखकही बरेच होते; पण कोणत्याही युगाची किंमत त्या युगाने श्रेष्ठ असे काय निर्माण केले त्यावरच अवलंबून असते. त्या दृष्टीने पाहता असे निःसंशय म्हणता येईल की, गांधीयुगातील गुजराती साहित्य त्यापूर्वीच्या युगातील साहित्यापेक्षा कल्पकतेच्या व सर्जनशक्तीच्या दृष्टीने अधिक प्रतिभासंपन्न आहे.

हे खरे आहे की, देशाची व राज्याची सामाजिक व सांस्कृतिक परिस्थिती ह्यात आमूलाग्र फरक घडून आला तरी गांधीयुगातील लेखक आपल्या पूर्वीच्या युगातील लेखकांपेक्षा आपल्या निराळ्या प्रकारच्या व्यक्तित्वाने जितके उठून दिसत होते तितके गांधीयुगानंतरच्या काळातील लेखक पहिल्या दशकात तरी गांधीयुगातील लेखकांपेक्षा निराळे वाटत नाहीत. म्हणून ह्या काळाला गांधीयुगाला

अनुसरणारा काळच म्हणता येईल. फक्त त्यात काही महत्त्वाचे फेरफार झालेले दिसून येतात.

गांधीयुगानंतरच्या पहिल्या दशकाच्या काळात काव्याचे स्वरूप थोडे बदलले. कवी लहान लहान मधुर ऊर्मिशील काव्ये रचू लागले. दीर्घ वर्णनात्मक, कथनात्मक व चिंतनात्मक कविता आणि सॉनेटस् ह्याबद्दलची कवींची आवड हळूहळू कमी होऊ लागली व ते पुन्हा आपल्या गांधीयुगाच्या आधीच्या काळातील अनुगामी कवींप्रमाणे आपल्या अभिव्यक्तीसाठी लहान गीते व ऊर्मिकाव्ये लिहू लागले.

असे असूनसुद्धा पहिल्या दशकाच्या उत्तरार्धात नव्या लेखकांची — अगदी गर्भावस्थेतील का असेना भूतकाळाशी फटकून वागण्याची व आपले व्यक्तित्व प्रस्थापित करण्याची वृत्ती स्पष्टपणे दिसून येऊ लागली. सर्जनशील लेखन व साहित्यिक टीका ह्या क्षेत्रात पाश्चिमात्य आधुनिक साहित्याच्या नावाखाली जे काही प्रवाह चालले होते त्यांचा लेखकांवर फार प्रभाव पडला.

म्हणून हे लेखक लैंगिक विषयावर निःसंकोचपणे लिहू लागले व मनोविश्लेषणाच्या अज्ञात प्रदेशात ते जराही न अडखळता संचार करू लागले. ते ह्या पृथ्वीवरील सामान्य गोष्टींकडे असामान्य–असाधारण दृष्टीने पाहू लागले व त्यांचे वर्णन करू लागले आणि खऱ्या वस्तूंना ते अद्‌भूत रंगाने रंगवू लागले आणि साहित्याच्या बाह्य स्वरूपाच्या बाबतीतही त्यांना आधुनिक पाश्चात्त्य संस्कृतीतून स्फूर्ती मिळू लागली व ते गद्य व पद्य ह्यात बाह्य स्वरूपाला पूर्णत्व प्राप्त करून देण्याचा आटोकाट प्रयत्न करू लागले.

## प्रल्हाद पारेख [ १९१२–१९६२ ]

प्रल्हाद जेठालाल पारेख आणि कृष्णलाल श्रीधराणी ह्या दोघांवर टागोरांच्या रहस्यवाद व बंगाली काव्यातील ऊर्मिशीलता ह्यांचा फार प्रभाव होता; पण श्रीधराणी हे त्याचबरोबर गांधीजींच्या विचारसरणीनेही प्रभावित झाले होते; पण प्रल्हाद ह्यांच्यावर त्यांच्याप्रमाणे गांधीयुगाच्या विचारसरणीचा जरासुद्धा प्रभाव पडलेला नव्हता. फक्त 'बीजुं एके खमीना' (घालायला दुसरा एक सुद्धा सदरा, खमीस नाही) ह्या सारख्या एखाद्या कवितेत गांधीयुगाचा थोडा प्रभाव दिसून येतो; पण पतील उत्कट आत्मलक्षी आविष्कार व तदनुकूल प्रयोग करण्याकडे वळले व प्रल्हाद हे सोडून–उमाशंकर जोशींनी म्हटल्याप्रमाणे सरळ–सौंदर्यमार्गाकडे विशेषतः अधिक वळले.

'अधिक' ह्या विशेषणाला फार महत्त्व आहे. गांधीयुगातील अग्रणी कवी— त्यांच्या योग्यतेच्या सर्व कवींप्रमाणे सौंदर्याकडे आकर्षित झालेले होते; पण तिसऱ्या दशकाच्या पूर्वार्धात ते अंशतः स्वातंत्र्याच्या कल्पनेने भारले गेले होते; पण ते

स्वातंत्र्य फक्त राजकीय स्वातंत्र्यच नव्हते तर युगानुयुगे चालत आलेल्या सामाजिक आणि आर्थिक पूर्वग्रह व अंधश्रद्धा ह्यांपासून त्यांना मुक्तीची अपेक्षा होती. कारण ह्या जुन्या सामाजिक आर्थिक रूढीमुळे मनुष्यच मनुष्याचे शोषण करीत होता; पण तिसऱ्या दशकाच्या उत्तरार्धात कवींना त्यांच्या वेळच्या राजकीय सामाजिक आणि आर्थिक बाबतीतल्या कल्पनात आणि आदर्शात रस वाटेनासा झाला व ते दीर्घ आणि वर्णनात्मक कथनात्मक कवितांकडे वळले. ह्या कवितांतून कवीचा सत्य, सौंदर्य, शौर्य, विश्वबंधुत्व व शांती ह्या जीवनातील शाश्वत मूल्यांबद्दलचा विश्वास भरपूर भरून राहिलेला दिसून येतो. ह्या झालेल्या बदलाची प्रत्यक्ष उदाहरणे म्हणजे १९३९ मध्ये प्रकाशित झालेले सुंदरम्‌चे 'वसुधा' व उमाशंकरांचे 'निशीथ' ही काव्ये होत.

प्रल्हाद संवेदनशील कवी असल्याने त्यांच्या कवितेवर ह्या वृत्तीचा मुळीच परिणाम झाला नाही व त्यांनी फक्त भावप्रधान कविताच लिहिल्या.

प्रल्हाद हे भावनाशील कवी असल्यामुळे त्यांच्या कवितात रंग, ध्वनी व सुगंध भरपूर भरलेला दिसून येतो. रूपक, उत्प्रेक्षा वगैरेंचा कुशलतेने उपयोग करून अरूपाला रूप देऊन ते त्याला इंद्रियगम्य करण्यात फार कुशल आहेत. त्यांना अंधकार सुगंधाने भरलेला, तारे सुगंधित व वायु–वर्षाऋतूतील मेघांचा शंख फुंकीत असलेला भासतो. त्यांना सागराचे आकर्षक संगीत मनुष्याच्या मनाला सांसारिक मोहापासून मुक्त करणारे व त्याला नैसर्गिक शांती देणारे असे भासमान होते.

प्रल्हादांच्या काव्यात दुःखाचा सूर खोल खोल दडून राहिलेला दिसून येतो. आकाशात असंख्य तारे चमकत असताना कवीच्या हृदयाला मात्र काहीतरी अनामिक हुरहूर लागून राहते आणि त्याला एकलेपणाची जाणीव होत असते. आपल्या अंतर्गत आनंदात व दुःखात, आशानिराशांत भाग घेणाऱ्या व आपल्याला पूर्णपणे समजून घेणाऱ्या कोणाची तरी कवी आतुरतेने वाट पाहात असतो. निसर्ग कितीही सजीव व सुंदर असला तरी मनुष्याच्या भावनांची त्याला कदर नाही असे प्रल्हादांना वाटते. त्यामुळे ते शेवटी मनुष्याकडेच आशेने पाहतात कारण 'कदाचित तोच आपल्याला समजून घेईल'[२] अशी त्यांना आशा वाटते.

प्रल्हाद ह्यांची काही ऊर्मिगीते गुजरातीमधील उत्तम ऊर्मिगीतांपैकी आहेत.

## राजेंद्र शाह [ १९१३ ]

राजेंद्र केशवलाल शाह ह्यांचा जन्म कपडवंज येथे झाला. प्रल्हादप्रमाणेच राजेंद्रानींही १९३०–३१ साली आपल्या तरुण वयात स्वदेशी चळवळीत भाग घेतला

असला तरी प्रल्हादांप्रमाणेच त्यांच्या कवितेवरही गांधीयुगाच्या वातावरणाचा जराही प्रभाव पडलेला दिसून येत नाही; पण हे जरूर नमूद केले पाहिजे की, आचार्य विनोबा भावे ह्यांची भूदान चळवळ व १९६२ साली चीनने भारतावर केलेली स्वारी ह्यांना मात्र कवीच्या हृदयाने प्रतिसाद दिला. त्यांनी 'भव्य भिकारी' ह्या काव्याने विनोबाजींचा गौरव केला आहे आणि 'शांत कोलाहल'मध्ये 'जाग जाग' ही कविता त्यांनी लिहिली. ह्या कवितेत चीनने केलेल्या हल्ल्यामुळे कवीच्या मनात उत्पन्न झालेला क्षोभ प्रगट झाला आहे व 'भूलिये जुदाई भाई' (हे बंधो, आपण आपले भेदभाव विसरून जाऊ या) आणि 'हे अभिनव पथ यात्रिक' हे (नव्या पंथाच्या मुसाफिरा) ह्या 'शांत कोलाहल' मधील कविता राष्ट्रिय एकतेवर रचलेल्या आहेत.

तरी पण एकंदरीत राजेंद्र हे प्रेम, प्रकृती व रहस्यमधुर भावांचे कवी आहेत. कवी राजेंद्रांचे मनोगत असे आहे– "मी ह्या जगात आलो ते दुसऱ्या कोणत्याही हेतूने नसून स्वेच्छेने फिरण्यासाठी आलो आहे व फिरता फिरता मला जगाशी पूर्ण तादात्म्य साधावयाचे आहे." जगातील सौंदर्याच्या प्रदेशात कवीने केलेला हा स्वच्छंद विहार–त्यातील फुले, पक्षी व दुसरीही प्रत्येक वस्तू ह्यांनाही महत्त्व आहेच; पण कवीचे त्याकडे फारसे लक्ष नाही. ह्या विहारातून त्यांना उच्च प्रतीचा असीम आनंद प्राप्त होतो. ह्या आनंदामुळे ते सर्व बंधनातून मुक्त होतात आणि त्यामुळे ते जगातील प्रत्येक सजीव व निर्जीव वस्तूशी एकरूप होऊन जातात. विश्वातील प्रत्येक सजीव निर्जीव वस्तू त्यांच्याशी एकरूप होते आणि अशा रीतीने त्याना सर्व विश्वाच्या चिरंतन एकात्मतेचा प्रत्यय येतो.

कवीची अशी खात्री आहे, "ह्या विश्वात सगळीकडे एकतेचा एक अदृश्य धागा प्रत्येक अणुरेणूत ओवलेला आहे".[३]

त्यांची 'आयुष्यना अवशेषे' (आयुष्याच्या उरलेल्या भागात) ही उत्कृष्ट ५ सुनीतांची माला आहे. ह्यात असे वर्णन आहे.–एक मनुष्य सक्रिय जीवनातून निवृत्त होतो आणि शहरातील भरभराटीचे व सुव्यस्थित असे आपणच बनविलेले जग सोडून एका दूरच्या लहानशा खेड्यात आपल्या वडिलोपार्जित घरात राहावयास येतो. ह्या काव्याचा शेवटही वरील विचारानेच झालेला आहे.

राजेंद्र हे वर्णन करण्यात फार कुशल आहेत. योग्य जागी, योग्य शब्दांचा, योग्य प्रमाणात वापर करून ते वाचकांच्या मनापुढे अवर्णनीय सौंदर्याची चित्रे उभी करतात. 'विजनअरण्ये' (निर्जन अरण्यात) ह्यात त्यांनी एका निर्जन अरण्याच्या भव्यतेचे वर्णन केले आहे. उदाहरणार्थ– 'In motion linear how slips the serpent's beauty" 'रेखाळी गतिमा केवुं सरे सौंदर्य सर्पनु.'[४]

'श्रावणी मध्यान्हे'[५] ह्या कवितेत राजेंद्रांची उत्तम निवेदन शक्ती दिसून

यते. "एका खेड्यातील दुपारच्या वेळचे आळसावलेले सुस्त वातावरण, वर्षाऋतूत फार वाढलेल्या झाडाझुडपांनी मंदिराकडे जाणारा अरुंद रस्ता, दोन्ही बाजूंनी झाकला–अडवला गेला आहे. हा रस्ता शेतातून जात आहे. रस्त्याच्या एका बाजूला असलेल्या चिखलाच्या डबक्यात आळशी म्हशींचा एक कळप बसलेला आहे. त्यांच्या पाठीवरून बेडूक शांतपणे उड्या मारून खेळत आहेत.[६] अंगणाच्या एका कोपऱ्यात कण्हेरीची झाडे आहेत. जुन्या मंदिराच्या पांढऱ्या घुमटावरील कळस आकाशाकडे दृष्टी लावून उभा आहे व मंदिरात नंदीजवळ[८] जाऊन बसलेल्या यात्रिकाला त्या कळसाकडे पाहून आपण कैलासा[७]वरच आहोत अशी भावना होते. वर्षाऋतूतील थंड वाऱ्याची लहर त्याच्या भुवया व केसांशी खेळत आहे." हे सर्व वर्णन फार उत्कृष्ट रीतीने केले आहे.

राजेंद्रांची गीते फार सुंदर आहेत. विशेषतः तरुण मनाची उत्कट प्रेमाची गीते त्यांनी अत्युत्कृष्ट गायिली आहेत. 'वनवासीनां गीतो'[५] ह्या काव्यात त्यांनी वनवासी तरुणींच्या हृदयात पहिल्याने उत्पन्न होणाऱ्या प्रेमाच्या भावनांचा नवेपणा व उत्साह, रोमान्स व प्रणयात आत्मविलोपनाची भावना व त्या उत्कट भावनांचा बदलत्या ऋतूंशी झालेला सुसंवाद ह्यांचे फारच उत्तम रीतीने वर्णन केले आहे. असंस्कृत–साधेसीधे, निसर्गाच्या सान्निध्यात नित्य राहणारे आदिवासीसुद्धा इतक्या उत्तम रीतीने आपल्या प्रेमाच्या भावना प्रकट करू शकतील की नाही हे सांगणे जरी अवघड आहे तरी ही गीते–त्यांच्यावर प्रेमकाव्याचा शिक्का नसला तरी अतिशय रसप्रद आहेत.

राजेंद्रांच्या भाषेत बंगाली, हिंदी, राजस्थानी आणि मराठी शब्द पाहावयास मिळतात. तसेच अगदी बरोबर नसलेले संस्कृत शब्दही त्यांच्या भाषेत मिश्रित झालेले आहेत. राजेंद्र कधी कधी संस्कृत शब्दांची इतकी मोडतोड करतात की, ते शब्द संस्कृत आहेत असे ओळखूसुद्धा येत नाही व कधी कधी संस्कृत शब्दांचा उपयोग अगदी अयोग्य अर्थाने ते करतात. त्यांची शब्दयोजना कधी कधी दुर्बोध असते व त्यांच्या काही कवितांचा अर्थ समजणे फार अवघड असते.

## उशनस् [ १९२० ] आणि जयन्त पाठक [ १९२० ]

नटवरलाल कुबेरजी पंड्या हे 'उशनस्' ह्या नावाने प्रसिद्ध आहेत. गांधी-युगानंतरच्या काळात 'उशनस्' ह्यांनी गुजराती भाषेत सर्वांत विपुल प्रमाणात काव्ये रचली आहेत. त्यांनी गीते, ऊर्मिकाव्ये, सुनीते, सुनीतमाला, भजने, काव्य-संवाद, हायकू, मुक्तके व निर्यमक कविता लिहिल्या आहेत. त्यांनी प्रेम, निसर्ग, मृत्यू व दैवीशक्ती ह्या विषयांवर कविता लिहिल्या आहेत. त्यांनी वर्णनात्मक, निवेदनात्मक व चिंतनात्मक कविता लिहिल्या आहेत. त्यांची लेखनशैली परंपरा-

वादी शिष्ट कवींसारखी व गांधीयुगातील कवींच्या शैलीसारखी आहे. तसेच अर्वाचीन प्रतीकात्मक व रूपकात्मक कविता रचणाऱ्या कवींच्या शैलीसारखी ही आहे. गुजराती काव्यात अशी एकही मनोवृत्ती, स्वरूप, शैली व चालू विचार नसेल की ज्याला उशनस् ह्यांनी उत्साहाने दाद दिली नसेल. हे सर्व त्यांनी भावनोत्कट हृदयाने व खऱ्या कवीच्या कल्पनाशक्तीने लिहिले आहे.

उशनस् ह्यांच्या कविता 'प्रसून' (१९५५), 'नेपथ्ये', 'आर्द्रा', 'मनोमुद्रा', 'तृणनो ग्रह', 'स्पंद अने छंद', 'किंकिणी' आणि 'अश्वत्थ' (१९७५). ह्या संग्रहात एकत्रित केलेल्या आहेत. ह्यापैकी 'नेपथ्ये' ह्या संग्रहात उमाशंकर ह्यांच्या 'प्राचीना'च्या शैलीप्रमाणे लिहिलेल्या कविता आहेत. अशा रीतीने त्यांनी गुजरातीत पद्यनाट्य आणण्याचा प्रयत्न केलेला आहे.

दुसरे काही त्यांच्या स्फुट कवितांचे संग्रह आहेत. त्यावरून गुजराती कविता वेळोवेळी कशी बदलत गेली व तिचे स्वरूप पहिले कसे होते त्याचा आलेख आपल्याला स्पष्टपणे समजतो.

उशनस् हे मुख्यत: 'विस्मय' हा स्थायिभाव चितारणारे कवी आहेत. त्यांच्या दृष्टीने ह्या विश्वातील प्रत्येक वस्तू विस्मयजनक आहे. त्यात बालकाचे निर्व्याज हास्य, अनामिक झुडपावर उमललेल्या अनामिक फुलांचा सुगंध ह्यापासून ते निरनिराळ्या ऋतूंचे व गवताचे रंग आणि तारांकित आकाशाच्या घुमटापर्यंत सर्व गोष्टींचा समावेश होतो. ह्या कवीने प्रकट केलेला 'विस्मय' हा विश्वाचे गूढ उकलणाऱ्या एका बालकासारखा आहे.

उशनस् हे करुण रसाचे चित्रण करण्यातही तितकेच कुशल आहेत. त्यांची 'वळावी बा आवी' (मुले गावाला निघून गेल्यावर माता त्यांना पोचवून घरी परत येते) ही कविता व त्यांच्या माता-पित्याच्या मृत्यूवर लिहिलेली त्यांची सुनीते ही हृदय हेलावून सोडणाऱ्या कवितांचे उत्कृष्ट नमुने आहेत. उशनस् ह्यांनी वर्णन केलेला करुणरस हृदयापर्यंत जाऊन पोहोचणारा व अतिशय तीव्र आहे. त्यांच्यात भावनांचा कल्लोळ किंवा शोकाचे प्रदर्शन केलेले नाही.

उशनस् ह्यांना उपमा व उत्प्रेक्षा सहज स्फुरतात. त्यांची शैली स्पष्ट व शब्दयोजना फार सुगम आणि सरळ आहे; पण केव्हा केव्हा एकदा कर्णकर्कश व विचित्र शब्द किंवा वाक्यप्रयोग अचानक आत घुसडल्यामुळे त्याची सुंदरता नाहीशी झालेली आहे.

आपल्या काव्यातील आशयापेक्षा आपली शैली व शब्दयोजना ह्यांमुळे उशनस् हे आपल्या समकालीन कवींपेक्षा फारच उठून दिसतात व आपल्या आजूबाजूच्या प्रत्येक गोष्टीला उत्साहाने दाद देणे ह्यात उशनस् ह्यांचे सामर्थ्य तशीच दुर्बलताही दिसून येते.

उशनस् ह्यांच्या बरोबर जयंत पाठक ह्यांचे नाव नेहमी घेतले जाते. त्यांचे 'मर्मर', 'संकेत', 'विस्मय', 'सर्ग' आणि 'अंतरिक्ष', हे कवितासंग्रह आहेत. 'आधुनिक कविताप्रवाह', हा प्रबंध व 'वनांचल' हा स्मरणांचा संग्रह आहे.

पाठक ह्यांच्या सुरुवातीच्या कवितांत 'विस्मयाची' भावना भरून राहिलेली दिसते; पण नंतरच्या कवितांत दु:खाची भावना दिसून येते. हे दु:ख उत्पन्न होण्याचे कारण म्हणजे कालचे जग आणि कवीचे आजचे जग ह्यात दिसून येणारा विसंवाद हे होय. पाठक ह्यांच्या कवितात संवेदनशीलता, बुद्धीच्या योगाने संयमित भावना व स्पष्ट सरळ शैली हे मुख्य गुण आहेत. पाठक ह्यांच्या 'आधुनिक कविता प्रवाह' ह्या ग्रंथात १९२० ते १९५५ ह्या काळातील गुजराती काव्यातील निरनिराळ्या प्रवाहांचा केलेला सखोल अभ्यास आहे. सुंदरम्च्या 'अर्वाचीन कविता' ह्या पुस्तकातील विषयच 'आधुनिक कविता प्रवाह' ह्यात पुढे चालविला आहे. तसेच रामनारायण पाठक ह्यांच्या 'अर्वाचीन काव्यसाहित्यनां वहेणो' ह्या पुस्तकाचा 'आधुनिक कविताप्रवाहो' हा सहोदरच आहे. 'वनांचल' ह्यातील गद्यशैली फारच सुंदर आहे. जयंत पाठक बालपणी एका अरण्याच्या सीमेवर असलेल्या लहानशा खेड्यात राहात असत. वनांचलमध्ये केलेल्या वर्णनाने त्यांच्या बालपणीचा काळ व ते स्थळ आपल्या डोळ्यापुढे हुबेहूब उभे राहतात. त्यातील वर्णने फार चित्रात्मक आहेत व पात्रे अविस्मरणीय आहेत.

## निरंजन भगत [ १९२६ ]

निरंजन हे गांधीयुगानंतरच्या युगातील दुसरे प्रसिद्ध कवी होत. त्यांची कविता आधी चार खंडात प्रसिद्ध झाली होती. त्यांची नावे– 'छंदोलय', 'किन्नरी', 'अल्पविराम' आणि 'तेहतीस काव्यो' हे चार भाग व आणखी काही कविता 'छंदोलय बृहत्' (१९७४) मध्ये संग्रहित केल्या आहेत.

निरंजन ह्यांच्या काव्याचे मुख्य सौंदर्य, लय व तालबद्धता हे आहे. त्यांनी प्राचीन संस्कृत छंदांतही कविता लिहिली आहे; पण त्यांच्या काव्यातील लयबद्धता व त्यांची ऊर्मिकाव्ये ही त्यांची स्वत:चीच आहेत. निरंजनने काही अति सुंदर सुनीतेही लिहिली आहेत व त्यांच्या रचनेत त्यांनी प्रास–यमक ह्यांच्या अवघड रीतीचे तंतोतंत पालन केले आहे. त्यांनी रचलेली मुक्तकेसुद्धा अतिशय सुंदर आहेत.

राजेंद्र शाह ह्यांच्याप्रमाणेच निरंजन हे असे कवी आहेत की, त्यांचे ह्या जगात विहार करण्यात मुख्य ध्येय प्रेम हे आहे. ते म्हणतात, "मी ह्या जगात फक्त फिरण्यासाठी आलो आहे. मी तुमचे किंवा माझे एकही काम करण्यासाठी कुठे आलो आहे ?"[१०] त्यांना बाहेरची नवजीवन देणारी ताजी वाऱ्याची झुळूक ही आकर्षित करते; पण आणखी एक गोष्ट–ज्यात राजेंद्रांना आनंद वाटत नाही तीही

त्यांना फार प्रिय आहे. ती म्हणजे पावलोपावली त्यांना भेटणारे माणसांचे नवे चेहरे–तेही त्यांना तितकेच आकर्षित करतात. जगाशी शुद्ध मैत्रीचे अतूट नाते बांधण्याची त्यांना तीव्र इच्छा आहे व शक्य असेल तर–हो–फक्त शक्य असेल तरच (हा मुख्य हेतू नाही किंवा जगामध्ये फिरण्यात सुद्धा हा हेतू नाहीच) ह्या मैत्रीच्या आनंदाची उत्कटता काव्याच्या दोन-चार ओळीत प्रकट करणे हा त्यांचा हेतू आहे.

निरंजन हे उत्कट प्रेमाचे कवी आहेत. त्यांची अशिक्षित, साधीसुधी आणि सुधारणा व शहरी संस्कृतीशी अनभिज्ञ अशी गोपीचे हृदय असलेली तरुणी उत्कट आनंदाने उद्गारते– " हरिवराने (कृष्ण) माझ्या हृदयाचे हरण केले आहे. " ती त्याच्या प्रेमाची याचना करायला गेली नव्हती तरी कृष्णाने सर्व गोपी सोडून आपल्यालाच आपली प्रियतमा म्हणून पसंत केले. ह्या विचाराने ती पहिल्याने गोंधळून गेलेली असते; पण आता तिला स्वत:बद्दल फार अभिमान वाटू लागतो. एकाच वेळी अग्नीची प्रखरता व अतिशय आनंद देण्याऱ्या चुंबनाचे गीत त्यांनी गायिले आहे आणि प्रियेच्या रूपाने मृत्यू सामोरा आला तरी त्याला गाढ आलिंगन द्यावयास कवीची तयारी आहे.

पण कवीला प्रेमभंगाचाही कटू अनुभव आलेला आहे व त्याचे प्रतीक म्हणून भर्तृहरीच्या कथेतील फळाचा[१२] निर्देश ते करतात. मनुष्याच्या बाबतीतही (त्याच्या चांगुलपणाविषयी) कवीचा भ्रमनिरास झालेला आहे. मित्रत्वाने व सद्-हेतूने पुढे केलेला हात प्रेमाने धरण्यास मनात शंका असल्यामुळे लोक मागे पुढे पाहतात हे पाहून व आपल्या मनातील अतिशय विरोधी भाव लपविण्यासाठी मनुष्यानी धारण केलेला चांगुलपणाचा, प्रामाणिकतेचा आणि भेट झाल्यामुळे फार आनंद झाला आहे अशा भावनेचा मुखवटा पाहून कवी निराश होतो व माणसाच्या एवढ्या मोठ्या समुदायातसुद्धा त्याला एकटेपणाची तीव्र जाणीव होते. तरी कवीचे ह्या जगाविषयीचे व जीवनाविषयीचे प्रेम एका क्षणात हसू व दुसऱ्या क्षणात आसू अशा स्थितीतसुद्धा कायम आहे.

निरंजन ह्यांची साहित्याला दिलेली मोठी देणगी म्हणजे त्यांचे 'प्रवालद्वीप' हे आहे. ह्या कवितांच्या समुदायात शहरातील संस्कृतीचे वर्णन केले आहे. मुंबईच्या भौगोलिक आकाराची उंटाच्या मानेशी तुलना केली आहे. निरंजन भगतांना मुंबई शेपटीशिवायच्या सुसरीसारखी दिसते. मुंबईतील यंत्राची सर्वभक्षी भूक आणि कारखाने, गिरण्या वगैरेत काम करणारी बिननावाची, बिनचेहऱ्याची, दु:खी, हृदय नसलेली, निस्तेज, मरगळलेली लाखो यंत्रवत् माणसे, रोजचे कंटाळवाणे, निसर्गाच्या साध्या, स्फूर्तिदायक आनंदापसून वंचित असे जीवन मृत्युवत् स्तब्धतेने व दु:खाच्या वेदनेने कसे कंठीत आहेत ह्याचे हुबेहूब चित्रण निरंजन भगतनी केले आहे. ते म्हणतात, " शहरी जीवनात वर सांगितल्याप्रमाणे सर्व वस्तुस्थिती असते. ह्या

विषयावरच्या निरंजन ह्यांच्या कवितात ते भावनांच्या आहारी जात नाहीत किंवा ह्या कवितांत त्यांचे निसर्गविषयक अद्‌भुतरंगी प्रेमही दिसून येत नाही किंवा दुसऱ्याही काही विचारांचे प्राबल्य दिसून येत नाही आणि त्याचमुळे ही वर्णने तीव्र व भेदक झालेली दिसून येतात.

त्यांच्या इतर कवितांप्रमाणेच ह्या कवितांतही निरंजन ह्यांची जागृत कलाप्रीती दिसून येते. त्यांची शब्दयोजना चोटीच, निर्दोष व सुबद्ध आहे.

## प्रियकांत मणियार [ १९२७–१९७६ ]

प्रियकांत मणियार हे गुजराती कवितेचे स्वरूप व अभिव्यक्तीची शैली ह्यांच्या नव्या प्रवाहाला अनुसरून पावले टाकणारे कवी आहेत. त्यांनी गीते, ऊर्मिकाव्ये, सुनीते व मुक्त कविता लिहिल्या आहेत.

प्रतीकरागी Symbolist कवीप्रमाणे प्रियकांत ह्यांनीही प्रतीके वापरून मनुष्याच्या व्यक्तित्वहीन शून्य जीवनाचे, एकाकीपणाचे व छिन्न भिन्न मानसिक अवस्थेचे वर्णन आपल्या कवितांत केले आहे. ते कित्येकदा साहसिक—रूढीविरुद्ध अशी नवी रूपके योजतात. ती रूपके कित्येकदा न रुचणारी असली तरी परिणामकारक असतात. प्रियकांतनी अमेरिकेतील कित्येक मोठ्या शहरांवरही कविता लिहिलेल्या आहेत.

पण ऊर्मिशीलता हा प्रियकांत ह्यांचा गुण आहे. काव्याचे स्वरूप व काव्याचा आशय ह्यांचा सुंदर संगम ज्यात झाला आहे अशी कित्येक, अत्यंत सुंदर ऊर्मिगीते, नवीनतेची गीते त्यांनी उत्साहाने व तन्मयतेने गायिली आहेत. ह्यासाठी त्यांनी कधीकधी राधा व कृष्ण ह्यांचा प्रतीक म्हणून उपयोग केला आहे. राधा व कृष्ण ह्यांच्या प्रेमाच्या दैवी स्वरूपाचे वर्णन न करता त्यांनी मानवी प्रेमाचे वर्णन करताना राधा-कृष्ण ह्यांचे प्रेम प्रतीक म्हणून उपयोगात आणले आहे.

कल्पनेचे स्फुलिंग, लयबद्धता, उत्स्फूर्तता व उत्कृष्ट अभिव्यक्ती ह्या गुणांत प्रियकांत ह्यांनी उत्तम सिद्धी प्राप्त केली आहे.

## बालमुकुंद दवे [ १९१६ ]

बालमुकुंदांनी तरुण-तरुणींच्या हृदयातील नव्या प्रेमाच्या उद्रेकाचे फार सुंदर वर्णन लोकगीतांच्या सुरात व तालबद्धतेत केले आहे आणि आध्यात्मिक भावनांचे चित्रण भक्तिगीतांच्या द्वारा केले आहे. त्यांची 'हरिनो हंसलो'[13] (देवाचा सुंदर हंस) ही कविता गांधीजींच्या मृत्यूवर भजनाच्या धर्तीवर लिहिलेली आहे. ह्या विषयावरच्या सर्व गुजराती कवितांत ही कविता सर्वश्रेष्ठ आहे.

बालमुकुंदांचे बारीक सारीक तपशीलांसह केलेले प्रकृतिवर्णन फार आनंदप्रद आहे. उदाहरणार्थ–"ह्या चांदण्यात पानावर बसलेली एक लहानशी मुंगीसुद्धा कशी अत्यंत सौंदर्याचा वेश करून नटलेली दिसते.[१४]"

त्यांची 'जूनुं घर खाली करता'–(जुने घर रिकामे करून सोडून जाताना[१५]) हे एक अत्युत्कृष्ट सुगीत आहे. 'प्रदक्षिणा करणारे यात्रिक'[१६] (परकम्मावासी) हे प्रेमाचे व जीवनाबद्दलच्या आदराचे एक धर्मवचनच आहे.

## वेणीलाल पुरोहित [ १९१७ ]

भजनाच्या धर्तीवर कविता रचण्यात वेणीभाई अत्यंत कुशल आहेत. ह्या कवितांतर्फे वेदान्तातील तत्त्वज्ञानाचे त्यांनी घरगुती म्हणी व वाक्प्रचार वापरून साध्या, स्पष्ट, प्रासादिक शैलीत विवरण केले आहे. त्यांची कित्येक उत्साहाने व तारुण्यसुलभ खट्याळपणाने भरलेली प्रेमगीते नृत्याला आणि संगीताला जोड देण्याला योग्य अशी आहेत. उर्दू गझलात उर्दू कवींची–आनंद विभोर-प्रेमविभोर होऊन स्वतःला हरवून जाण्याची वृत्ती त्यांच्या गझलात फार सुंदर रीतीने व्यक्त झालेली आहे व त्यामुळे अनेक मुशाहिऱ्यात [१७] त्या गझलांना मानाचे स्थान प्राप्त झालेले आहे आणि त्यांची वाहवा झालेली आहे. बालकांसाठी त्यांनी रचलेल्या कविता त्यांतील कल्पनाविलास, खेळकरपणा व शब्दांचे संगीत ह्यामुळे फार प्रसिद्धी पावल्या आहेत आणि मुंबईहून प्रकाशित होणाऱ्या 'जन्मभूमि' ह्या प्रसिद्ध दैनिकात दर आठवड्याला प्रसिद्ध होणाऱ्या 'अखा भगत ना छप्पा' ह्या कवितांद्वारे त्या काळच्या घटनांवर विनोदी व उपहासपूर्ण टीका केलेली आहे. वेणीभाईंची भाषा समृद्ध आहे आणि त्यांच्या काव्यात प्रास व यमके अगदी सहजतेने प्रवेश करतात.

## मकरंद दवे [ १९२२ ]

गांधी युगानंतरच्या काव्यातील मकरंद दवे हे एक प्रसिद्ध रहस्यवादी कवी (Mystic) आहेत. रविन्द्रनाथांची ऊर्मिशीलता, श्री. अरविंदांचा रहस्यवाद आणि महात्मा गांधींची मानवता ह्या तिहींचा मकरन्दांवर फार खोल परिणाम झाला होता व त्यामुळे त्यांनी आपल्या अंतर्मनातील काही गूढ अनुभव हृदयाला जाऊन भिडणाऱ्या भाषेत विशद करून दाखविले आहेत. त्याचप्रमाणे त्यांनी काही रहस्य-वादी परदेशी लेखकांच्या काही सुंदर कवितांचे उत्कृष्ट गुजराती भाषेत पद्यमय रूपान्तर केले आहे.

उशनस्नी म्हटल्याप्रमाणे– " 'मिताई गीते' हा मकरन्दांच्या सर्जक प्रतिभा-शक्तीचा एक उत्कृष्ट नमुना आहे". सुंदरम्च्या 'यात्रा' ह्या काव्याच्या खालो-खाल 'मिताईगीते' ही गुजराती भाषेतील एक उत्कृष्ट कृती आहे. एवढेच नव्हे,

तर मानवी आत्म्याची दिव्य अनुभूती येथे प्रतीत झालेली आहे व ह्या कवितेमुळे श्रीकृष्णाची सतत आतुरतेने वाट पाहणाऱ्या गुजराती भाषेतील वैष्णव[१८] कवींमध्ये त्यांना अढळ स्थान प्राप्त झाले आहे.

## तळटीपा [ भाग २ ]

गांधीयुगानंतरचा काळ (१९४५–१९५५)

१. 'बारी बहार' १९६० ची आवृत्ती, प्रस्तावना–पृष्ठ ११

२. कदी वळी समजशे ए ज मारी वातमां.

३. न्यारा छे पात्र तोये विनिमय लहुं शो आत्मनी चेतनानो ।
विश्वे सर्वत्र सोमां अदीठ वही रह्यो तंतुशो एकतानो । –('ध्वनि')

४. रेखाळी गतिमां केवुं सरे सौंदर्य सर्पनुं । –(ध्वनि)

५. 'श्रावण'–हिंदूंचा वर्षाऋतूतील एक पवित्र महिना.

६. दादूर जेनी पीठपे रमतां निरांते.

७. 'कैलास'–हिमालयाचे एक शिखर, ज्यावर भगवान शंकर निवास करतात, असे मानले जाते.

८. 'नंदी' (बैल)– हे भगवान शंकराचे वाहन आहे, असे मानले जाते.

९. 'शांत कोलाहल.'

१०. हुं तो बस फरवा आव्यो छुं ।
हुं क्या एवे काम तमारुं के मारुं करवा आव्यो छुं ?

११. हरिवर मुजने हरी गयो.

१२. भर्तृहरीने दिलेले अमृतफळ जो खातो तो अमर होतो. भर्तृहरीने हे फळ प्रेमाने आपल्या राणीला दिले. राणीने त्याच प्रकारच्या प्रेमाने ते फळ आपल्या प्रियकराला दिले. त्याने त्याच क्रमाने ते आपल्या प्रिय अशा एका गणिकेला वश करून घेण्यासाठी दिले आणि तिने भर्तृहरीवरच्या प्रेमाने वेडी होऊन ते त्याला दिले. असे ते अमृतफळ भर्तृहरीकडे परत आले !

१३. परंपरेप्रमाणे हिंदू संत आणि गूढवादी कवींनी मनुष्याच्या आत्म्याला 'हंस' अशी संज्ञा दिलेली आहे.

१४. परण परली कीडीये पी धरे कमनीयता ।

१५. जुनुँ घर खाली करतां.
१६. परकम्मावासी.
१७. 'मुशायरा'– कवींचे सम्मेलन. जेथे कवी श्रोत्यांपुढे आपल्या कविता म्हणून दाखवतात. ह्यात फक्त उर्दू कविताच असतात असे नाही.
१८. 'ज्ञान गंगोत्री ग्रंथ श्रेणी' : खंड–१०, गुजरात दर्शन' (साहित्य–१) पृष्ठ ६४.

[ ३ ]

## आजकालचे साहित्यप्रवाह

गांधीयुगानंतरच्या काळातील दुसऱ्या दशकात साहित्यप्रवाहात एक नवे वळण दिसून येऊ लागले. भूतकाळातून पूर्णपणे बाहेर निघण्याची प्रवृत्ती बळावत चालली. लेखक व समीक्षक ह्यांच्यावर भविष्याबद्दलच्या कल्पनांनी फार प्रभाव पाडला व त्यामुळे त्यांच्या दृष्टिकोणात आमूलाग्र फेरफार झाला. हे लेखक अशी मागणी करू लागले की, गुजराती भाषेचा संपूर्ण कायापालट केला पाहिजे. जुन्या शब्दांचा उपयोग नव्या अर्थाने केला पाहिजे. शब्दांच्या अर्थापेक्षा त्यांच्या ध्वनीला अधिक महत्त्व दिले पाहिजे व सर्व जुन्या सांस्कृतिक परंपरांचा संपूर्ण त्याग केला पाहिजे. ह्या लेखकांनी गांधीयुगाचाच त्याग किंवा अव्हेर केला असे नव्हे तर सर्व जुन्या गुजराती साहित्याचाच ते अव्हेर करू लागले.

### वर्धित मजकूर पुरवणी ३

### सुरेश जोशी [ १९२१ ]

ह्या समूहातील सर्वात प्रमुख नेते आहेत. पतील, प्रल्हाद आणि राजेंद्र शाह हे गांधीयुगातील तीन कवी ह्या वेळच्या सामाजिक व राजकीय मतप्रणालीपासून अगदी अलिप्त राहिले व त्यांनी आपली सर्व बुद्धी पणाला लावून सौंदर्यपूर्ण रचना केली. निरंजन भगत, हसमुख पाठक ( १९३० ) यांनी तर म्हटले की, गांधी इतक्या फुलांच्या भाराखाली, इतका दीर्घकाळ कधीही झोपले नाहीत– प्रियकांत मणियार आणि नलिन रावळ (१९३३) ह्यांचे त्यांच्या नंतरच्या कवींशी जास्त साम्य आहे. बकुलेश यांनी १९४४ ह्या वर्षीच 'लघुकथेतून घटना व कथानकाचे उच्चाटन झाले पाहिजे' असे प्रतिपादन सुरू केले.[२] उमाशंकर जोशीनी आपल्या लघुकथेवरच्या लेखात ह्याच मताचा पुरस्कार केला; पण सर्वात सुरेश जोशी हे असे

लेखक आहेत की ज्यांनी एखाद्या मिशनऱ्याच्या वृत्तीने काम करून आपल्या सर्जक आणि टीकात्मक लेखनाद्वारे भूतकाळाशी असलेला संबंध संपूर्णपणे तोडून टाकला. गांधीयुगानंतरच्या दुसऱ्या दशकातील तरुण गुजराती लेखकांच्या एका सबंध पिढीच्या विचारांवर त्यांचा अतिशय प्रभाव पडला. त्यांचा 'प्रत्यंचा' (१९६१) हा कवितासंग्रह व 'अथवा' (१९७४). ह्या 'अथवा' संग्रहात पुढे एकत्रित केलेल्या गुलाम महंमद शेख ह्यांच्या कविता, ह्या दोन पुस्तकानी गुजराती कवितेचे एक नवे परिमाण प्रस्थापित केले. तसेच सुरेश जोशींच्या 'गृहप्रवेश' (१९५६) ह्या लघुकथा–संग्रहाने लघुकथेचे एक नवे परिमाण नक्की केले. 'बीजी थोडीक' ह्या संग्रहात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या 'विदुला' ह्या दीर्घकथेने कादंबरीचे व कल्पित कथेचे नवे परिमाण आले. त्यांचे 'जनान्तिके' १९६५ हे पुस्तक नवे गद्य ह्यांचा प्रतिनिधी बनले; पण त्यांच्या सर्जक साहित्यापेक्षा त्यांच्या समीक्षात्मक साहित्याने गुजरातच्या तरुण साहित्यिकांच्या मनावर फार मोठा प्रभाव पाडलेला आहे.

ह्याचा परिणाम असा झाला की, १९५५ नंतरच्या काळातील लेखकांना साहित्यासहित सर्व कलांत बाह्यस्वरूप आकार हाच सर्वांत महत्त्वाचा गुण वाटू लागला. लेखक आपल्या स्वतःच्या आनंदासाठीच काव्याला आकार देतो. त्याला दुसऱ्यांची पर्वा करण्याची जरूर नाही. कला ही समाजाशी सामंजस्य साधण्याचे साधन नसून ते आपल्या स्वतःच्या आनंदासाठी आहे. लेखकाला आपल्या वाचकांचा किंवा श्रोत्यांचाही विचार करण्याची जरूर नाही. कलाकार आपल्या कृतीला स्वतःच्या आनंदासाठीच आकार देत असल्यामुळे व दुसऱ्याला आनंद देणे हा हेतूच नसल्यामुळे त्याच्यावर आपल्या स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाचीही जबाबदारी पडत नाही. कलाकाराने फक्त ह्या एकाच प्रश्नाचा विचार केला पाहिजे. "मी माझ्या कलेशी प्रामाणिक आहे ना ?" जर ह्या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी आले व जर त्याची अशी खात्री असेल, "माझ्या कलाकृतीवर दूरान्वयाने अथवा अप्रत्यक्षरीत्यासुद्धा कलेच्या क्षेत्राबाहेरील कोणत्याही गोष्टीचा प्रभाव पडलेला नाही. माझ्या मनात माझ्या कलेने वाचकांना अकल्पित असा आनंद द्यावा अशी कल्पनाही आलेली नाही तर कलाकाराने दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचा विचार करण्याची जरूर नाही. लेखन दुर्बोध, अनीतिमय किंवा अश्लील आहे की काय ह्याचाही विचार करण्याची जरूर नाही."

कला व साहित्य ह्या बाबतीतील अशा विचारप्रवाहामुळे साहित्याच्या बाह्य व आन्तर अशा सर्व पैलूंवर फार परिणाम झाला.

साहित्याच्या बाह्य स्वरूपात पुढील फेरफार घडून आले. ह्या परिवर्तनाच्या काळात छंद-वृत्त ह्या बाबतीत निरनिराळे प्रयोग सुरू झाले. आपल्या अभि-

व्यक्तिसाठी छंद, वृत्त ह्यांचे बंधन कवींना नकोसे झाले. कवींची चिरंतन शोध करण्याकडे वृत्ती वळावली व हा शोध म्हणजे शब्द—लयदार तालबद्ध शब्द, ह्याला अधिक महत्त्व प्राप्त झाले. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने विचार केल्यास परिवर्तन हे प्रत्येक क्षणी चालूच असते. कारण प्रत्येक क्षणी भूतकाळ पूर्ण होत असतो व त्याच वेळी भविष्यकाळाची सुरुवात होते; पण मनुष्याच्या अथवा राष्ट्राच्या जीवनात असा एक विशिष्ट काळ येत असतो की, जेव्हा एखादी अगदी निरुपद्रवी घटना घडून आल्यामुळे एखाद्या व्यक्तीच्या आगमनाने अथवा त्याचा अस्त होण्याने इतिहासाचा प्रवाह एकदम बदलून जातो. अशा काळाला आपण परिवर्तनाचा काळ म्हणून संबोधू शकतो. अशा काळात सुरुवातीला जरी थोडीशी अंदाधुंदी माजलेली दिसली तरी भूतकाळातील सर्व गोष्टींचा आढावा घेतला जातो व वर्तमानकाळाच्या संदर्भात त्यांचे मूल्यमापन होत असते. साहित्याच्या दृष्टीने पाहता अशा वेळी भूतकाळातून उचललेले अथवा जुन्या परंपरेने चालत आलेले शब्द, त्यांची रूपे, लय, ताल हे नव्या युगाच्या जागृतीने उत्पन्न झालेल्या भावना, अनुभव, विचार व ताण व्यक्त करण्याच्या कामी अपुरे आणि अयोग्य वाटू लागतात. अशा वेळी कवी आपल्या अभिव्यक्तीसाठी नवे प्रयोग करण्यास उद्युक्त होतो.

इ. स. १८५० साली असेच घडून आले. मध्ययुगीन गुजराती साहित्यातील रूढ झालेले जुने छंद व वृत्ते कवीच्या मनांतील नव्या विचारोन्मेषाला व्यक्त करण्याचे साधन म्हणून असमर्थ आहेत असे आढळून आले. म्हणून जुन्या शिष्ट संस्कृत साहित्यातील छंद व वृत्ते पुनरुज्जीवित करून उपयोगात आणण्याकडे कवी वळले व नवलराम पंड्यांना जरी ह्या वृत्तांच्या उपयोगाबद्दल जबरदस्त शंका होती तरी गुजरातच्या भूमीत संस्कृतमधील छंद व वृत्ते मूळ धरू लागली आणि त्यामुळे मध्ययुगीन काळातील गुजराती साहित्यातील छंद व वृत्ते संपूर्णपणे लयास गेली.

पुन्हा १८९५ साली आपल्या प्रतिभेला संस्कृत छंदःशास्त्राचे नियम म्हणजे एक बंधन आहे असे कविवर्य नानालाल यांना वाटू लागले व म्हणून त्यांनी स्वतःच एक नवा लय किंवा ताल (Rhythm) आपल्या कवितेसाठी शोधून उपयोगात आणला. तो म्हणजे त्यांची 'डोलन शैली'. आपली काही अत्युत्तम व अत्युदात्त काव्ये रचण्याचे साधन म्हणून त्यांनी 'डोलन शैली'चा उपयोग केला. ह्या 'डोलन शैली'त एका पंक्तीत अमुक अक्षरे हवीत, त्यांची जागा, यति, यमके वगैरेंचे नियम झुगारून देण्यात आले. फक्त अर्थानुयायी लयदार शब्द योजना (Rhythm) हे काव्याचे किंवा पद्याचे मुख्य लक्षण ठरले.

गांधीयुगात राष्ट्राची प्रजा एका मोठ्या उत्थानाच्या लाटेवरून जात होती म्हणून त्या युगातील कवींनी पुन्हा त्या काळच्या गरजेप्रमाणे आपल्या काव्याचे

स्वरूप बदलून टाकले. निरनिराळ्या वृत्तांची सरमिसळ केली. यतिस्थानांचे (Caesura) कडक नियम ढिले केले. सरळ धावत्या पंक्तींचा काव्यात उपयोग केला. कवितेच्या अर्थाला अनुरूप असे छंद उपयोगात आणले आणि अशा रीतीने जुन्या व नव्या छंदात साहसिक प्रयोग करून महाकाव्याला योग्य अशी एक प्रकारची निर्यमक कविता अस्तित्वात आली.

१९५५ नंतरच्या कवींनी आणखी एक पाऊल पुढे टाकले. त्यांनी 'अछांदस' शैलीचा प्रयोग करून छंदःशास्त्राचे नियम पूर्णपणे झुगारून दिले. तोपर्यंतच्या कवींनी छंद व वृत्तांचे कडक नियम बाजूला सारून निर्यमक (मुक्तछंद) काव्याचा प्रयोग केला होता; पण ती मुक्तछंद कविता असली तरी ती कविता होती व ती कविता असणे—पद्य असणे हे त्यांना आवश्यक वाटत होते; पण १९५५ नंतरच्या काही कवींनी तर छंदांचे तत्त्व पारच झुगारून दिले.

दुसरी एक गोष्ट घडून आली. ती म्हणजे कवितेच्या बाह्यांगात बरेच फरक घडून आले. ग्रंथात कविता छापण्यासाठी तिच्या रूपात त्या दृष्टीने योग्य ते फेर-फार करण्यात आले. कविता ही केवळ श्रवणभोग्य न राहता दृष्टिगम्य होण्यासाठी अशा आकारात छापण्यात येऊ लागली की, कवितेला अर्थाचा बोध होणारा असा आकार प्राप्त व्हावा. उदाहरणार्थ 'अंध काळाच्या डोळ्यातून मोत्यासारखे अश्रू ओघळू लागले' असे लिहिण्यासाठी खाली दिल्याप्रमाणे छापण्याची रीत अमलात आणली.

अंध समयनी (काळाच्या) आंखीमांथी (डोळ्यामधनी)—

| | |
|---|---|
| ट | ट |
| प | प |
| ट | प |
| प | प |
| मोती | टपके (टपकती) |

दोन समांतर उभ्या पंक्ती डोळ्यातून ओघळणाऱ्या दोन अश्रुबिंदूंचे सूचन करतात.

कंसांत विधाने लिहिणे किंवा वर्तुळात अक्षरे रचणे किंवा अक्षरे चौकोनात किंवा उभ्या समांतर रेषांत लिहिणे किंवा शब्दकोड्यांप्रमाणे लिहिणे हा अर्वाचीन काव्य लिहिण्याचा एक विचित्र प्रकार गांधीयुगानंतरच्या दुसऱ्या,, दशकात काही काळ सुरू झाला.

त्या काळचे काही नावीन्याचे पाईक (Avant grade) कवी अधिकाधिक आत्मलक्षी होऊ लागले. त्यांच्यावर स्वतःविषयीच्या हताशेची व खिन्नतेची एक दाट छाया पसरली. त्यांना आता परंपरेने चालत आलेल्या कवितांच्या स्वरूपांत

म्हणजे सुनीते, खंडकाव्ये, ऊर्मिगीते व गीते वगैरेत रस वाटेनासा झाला. महाकाव्याच्या धर्तीवर काव्ये रचण्यात त्यांना रुची राहिली नाही. वर्णनात्मक, निवेदनात्मक व वास्तववादी परंपरेने चालत आलेल्या कवितांचे त्यांना आकर्षण वाटेनासे झाले. अशा रीतीने जुन्या परंपरेचा कवितेशी असलेला संबंध संपूर्णपणे तुटून गेला.

त्या काळचा नवा कवी गर्वाने असा म्हणू लागला की, माझ्याजवळ कोणाला काही सांगण्यासारखे, संदेश देण्यासारखे किंवा सूचना देण्यासारखे काहीही नाही. तो शब्दांच्या साहाय्याने अशी कविता रचू लागला की जी केवळ कविता म्हणूनच आनंद देईल. दुसऱ्यांना आपली कविता समजली पाहिजे अशा प्रकारची कोणतीही जबाबदारी त्याच्यावर राहिली नाही. कधी कधी त्याला फक्त कवितेच्या लयबद्धतेत—तालबद्धतेत अतिशय गोडी वाटू लागली व कधी कधी फक्त शब्दांच्या ध्वनींनी तो आपली कविता प्रभावशाली करण्याचा प्रयत्न करू लागला.

अर्वाचीनता नेहमीच आपले पृथक् आत्मप्रकटन घडवून आणते, त्याप्रमाणे ह्या काळाच्या अर्वाचीनतेनेही नव्या कल्पना, नवे आकार, नवी प्रतीके व नवे अलंकार यांच्याद्वारे ते घडवून आणले. कवी अधिक आत्मलक्षी बनून स्वतःच्या हताशेने व निराशेने दडपला गेला. तो सतत आपल्या जीवनाच्या छिन्नभिन्नतेविषयी बोलू लागला. जीवनातील विसंवाद, अहंकार, जुलूम, दगडधोंडे, रक्तपिपासू, जीवनातील पोकळी, मृत्यू आणि सर्वनाश अशाबद्दल बोलण्यातच त्याला आनंद वाटू लागला. रोगिष्टपणा, कुरूपता, कुजलेले व तिरस्कार—किळस येणारे जे जे काही आहे त्याचे वर्णन करून कवी कोणावरतरी सूड घेण्याच्या भावनेने पछाडलेला दिसतो.

त्या समूहातील एका कवीला पिवळाधमक सूर्य पुवाने भरलेल्या गळवासारखा दिसतो तर दुसऱ्याला संध्याकाळचा लालिमा क्षयाने ग्रासलेल्या, मरणव्यथा अनुभवणाऱ्या रोग्याच्या रक्ताची गुळणी आहे असे वाटते. आणखी एकाला अस्त पावणाऱ्या सूर्याचा शेवटचा किरण पुरुषाच्या अपत्योत्पादक जननेंद्रियासारखा वाटतो.

सुरेश जोशी यांच्या तरुण अनुयायी कवींमध्ये मुख्य असलेला लाभशंकर ठाकर हा खरा बुद्धिमान कवी होता आणि त्यांच्या बरोबरीचे 'रे मठ'चे (Rey Math पीठाचे) दुसरे कवी थोड्याच दिवसात आपल्या गुरूवरही ताण करू लागले व त्यांच्या कवितात उघडी वक्षस्थळे, मांड्या, अपत्योत्पादक जननेंद्रिये (स्त्री-व-पुरुषांची), वंध्यत्व आणि नपुंसकत्व, कुत्र्याने चघळून टाकलेले हाड, किडे, आळ्या इत्यादी विषयांची वाचकांना जशी काही भव्य अशी मेजवानीच मिळू लागली. त्यांच्या दृष्टीने 'संयोगशृंगार' म्हणजे फक्त सुरतसंभोग व 'विप्रलंभ शृंगार' म्हणजे संभोगासाठी लागलेली तीव्र तळमळ. त्यांच्यापैकी बऱ्याचजणांना मनुष्य म्हणजे

शारीरिक वासनांचे एक गाठोडेच आहे व त्याच्या मनोभावनांचे वर्णन करण्याची जरूर नसून त्याच्या विकारांचे–वासनांचे वर्णन करण्याचीच फक्त जरूर आहे असे वाटू लागले. 'रे मठ' ह्या संप्रदायात नसलेल्या कवींवरही वरील विचारांचा परिणाम झाला. राथळने संध्याकाळ झाल्यावर सिंह गोडगोड मांसाचा घास घेण्यासाठी कसा उतावीळ होतो त्याचे वर्णन केले आहे आणि प्रियकांत मणियार ह्यांनी आपल्या एका कवितेत संभोगाच्या तयारीचे व दुसऱ्या एका कवितेत प्रत्यक्ष संभोगाचे वर्णन केले आहे. जे जे काही जुने आहे– भूतकाळातील आहे त्यांचा तिरस्कार करण्यामध्ये हे कवी इतके गढून गेले की, एका कवीची महाभारतात दु:शासनाचे[२] हात कापून टाकण्याऐवजी श्रीकृष्णाचे हात कापून टाकायला हवे होते, असे म्हणण्यापर्यन्त मजल गेली तरीपण ह्या कवींनी वाचकांना काहीतरी सांगण्याचा प्रयत्न केला. अर्थात त्यांनी जे काही सांगितले ते जरी परंपरेने चालत आलेल्या विचारानी आणि पौर्वात्य व पाश्चिमात्य शिष्ट साहित्याच्या वाचनाने ज्या लोकांची अभिरुची व निर्णायक शक्ती संपन्न झाली होती अशा लोकांना धक्का देणारे आणि तिरस्करणीय असे वाटत होते तरी त्यात काहीतरी सांगण्यासारखे होते; पण त्याच समूहातील काही त्यांच्यानंतर लगेच उदयाला आलेल्या कवींनी शब्दाच्या अनुषंगाने आलेला अर्थ अथवा कोठल्याही प्रकारच्या अर्थाची छटा शब्दावर राहू न देता शब्दाना अगदी अर्थहीन बनविले व ते *Nonsense* अर्थहीन लेखन करू लागले. त्यांच्यापैकी आणखी काही कवी मनुष्याच्या अंतर्मनात शिरून त्याच्या सुप्त मनाला व्यक्त करण्याचा दावा करू लागले. येथे श्रीकांत शाहच्या गद्य शैलीत लिहिलेल्या एका कवितेचा मराठी अनुवाद पुढे देत आहे–

"एका पिवळया आकाशाच्या कुऱ्हाडीचा घाव सोसून मर्मर आवाज करीत वृक्ष घोड्याच्या उघड्या तोंडात तुटून पडले. त्याच्या धुळीने माखलेल्या पाठीवर टांगलेल्या कंदिलाचे एक मुलायम पीस बनले व तलावाच्या बोलक्या काठापाशी उडत चालले आणि शुभ्र रंगाच्या शेपटीला चिकटून बसलेल्या आळशी पक्ष्याने पंख फडफडावले आणि अंडी घातली."

तरीसुद्धा हे नमूद करणे आवश्यक आहे की, आजकाल लिहिल्या जाणाऱ्या सर्वच कवितांवर ह्या प्रकारच्या अर्वाचीनतेचा ठसा उमटलेला आहे असे नाही. वरवर पाहिले तरी असे दिसून येते की, 'कुमार', 'संस्कृति', 'कविलोक', 'कविता', 'समर्पण', 'नवनीत' वगैरे मुख्य-मुख्य उच्च स्तरावरील नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या कवितांत जुन्या परंपरेच्या कल्पनांना काही अंशी धरून असणाऱ्या कवितांची संख्या वीस वर्षांपूर्वी लिहिलेल्या अगदी संपूर्ण अर्वाचीन प्रकारच्या कवितांपेक्षा कितीतरी पटीने अधिक आहे.

त्याचबरोबर हेही लक्षात ठेवले पाहिजे की, केवळ पूर्ण अद्यतनवादी प्रकारच्या कविता लिहिणाऱ्या कवींची संख्या, अद्यतन व अनद्यतन अशा दोन्ही प्रकारच्या कविता लिहिणाऱ्या कवींच्या संख्येच्या मानाने अगदी अल्प आहे आणि त्यांपैकीही कितीतरी कवी अनद्यतन कविता लिहिणारे म्हणून प्रसिद्ध झाले आहेत; पण कुरूप व गर्हणीय वस्तूंविषयी कवींना वाटणारे हे आकर्षण फार-फार तर एक दशकापर्यंत टिकून राहिले. ते आता लोप पावत चालले आहे आणि त्याची जागा विचित्र व विसंवादी कल्पनांनी भरलेल्या अनैसर्गिक रूपके, विसंवादी शब्दयोजना व छंदांची भेसळ व अर्थहीन शब्दप्रयोग योजून लिहिलेल्या कवितांनी आणि त्यापेक्षाही अधिक प्रमाणात गझल व भावगीतांनी घेतली आहे. ह्या प्रकारच्या उल्लेखनीय कविता म्हणजे प्रसिद्ध कवी सितांशु यशच्चंद्रासारख्या मनातील सुप्त भावना प्रकट करणाऱ्या (Sumealist) कवीच्या कविता होत आणि त्या वेळी रचल्या गेलेल्या गझल व भावगीतांत कवींनी समुद्र, मासे, गवत, पिसे, स्वाभाविक प्रकृती, सूर्याचे सोने, सूर्यप्रकाशाच्या फांद्या, पक्ष्यांच्या किलबिलाटांचा ओलेपणा, सुवासाचे कूजन व टवटवीत हिरवी प्रभात, विखुरलेली पिसे, विखुरलेला अंधकार व विखुरलेली अरण्ये ह्यांची वर्णने केली आहेत आणि डोळ्यांनी ऐकणे, कानांनी पाहणे वगैरे विचित्र कल्पनाही त्यात केलेल्या आहेत.

## रावजी पटेल आणि मणिलाल देसाई

(ह्या दोन कवींची ऐनभरात आलेली साहित्यिक कारकीर्द अवेळी आलेल्या मृत्यूने संपुष्टात आणली) ह्यांच्या काही कविता शिवाय रमेश पारेख, अनिल जोशी हरींद्र दवे, यशवंत त्रिवेदी, सुरेश दलाल, माधव रामानुज आणि भानुप्रसाद पंड्या यांसारख्या कवींची ऊर्मिगीते व आदिल मनसुरी, मरीझ, गनी, बेफाम, हरींद्र दवे, मनोज खंडेरिया, चिनु मोदी, मनहर मोदी आणि भगवतीकुमार शर्मा इत्यादी कवींचे गझल आता लोकप्रिय होऊ लागले. ह्या कवींनी बऱ्याच नव्या चमकदार कल्पनांची व परंपरेने चालत आलल्या श्रेष्ठ वैशिष्ट्यांची सांगड घालून कविता रचल्या. तसेच हरींद्र दवे, सुरेश दलाल, जगदीश जोशी, रघुवीर चौधरी, चंद्रकांत शेठ, हेमंत देसाई, राजेंद्र शुक्ल, धीरू परीख व असेच इतर कवी यांच्या काव्या-वरून असे दिसून येते की, छंदोबद्ध कविता व मुक्तछंद कविता ह्यांचेही युग अजून संपलेले नाही.

अशा रीतीने १९५० च्या सुमारास गांधीयुगातील कवितेविरुद्ध प्रतिक्रिया सुरू झाली आणि कवींच्या मनात, कवींच्या हृदयात काहीतरी नवीन, काहीतरी अगदी निराळे, काहीतरी अपूर्व असे निर्माण करण्याची प्रेरणा उत्पन्न झाली. त्यांच्या कानावर समकालीन पाश्चात्त्य कवींच्या काव्याचे पडसाद पडू लागले आणि काव्या-

पेक्षाही जास्त पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांचे विचार, साहित्यशास्त्र व सौंदर्यशास्त्र ह्या विषयींच्या सिद्धांचे प्रतिध्वनी त्यांच्या कानावर आदळू लागले. आता फक्त इंग्लंड हे गुजराती कवींचा आदर्श राहिले नाही, तर युरोपातील इतर देशातील लेखकांकडे त्यांचे लक्ष वेधले गेले आणि ते त्यांच्याकडे मार्गदर्शनासाठी व प्रेरणा मिळविण्यासाठी पाहू लागले. इंग्लिशकवी व टीकाकार टी. एस्. इलियट ह्याशिवाय रिल्के, बॉडलेअर, व्हॅलरी, सार्त्र, मालार्मे अथवा काफ्का, कामू मोरविया अथवा सुसान लँगर अथवा व्हिजिनस्टाइन त्यांना साहित्याच्या व साहित्यविषयक विचारांच्या क्षेत्रात अत्यंत महत्त्वाचे वाटू लागले. फ्यूच्युरिजम, इमेजिझम (कल्पनावाद), सिंबॉलिझम (प्रतीकवाद), एक्झिस्टेनशियालिझम (एक्झिस्टन अस्तित्ववाद), दादाइझम, सररिअॅलिझम ( अतिवास्तववाद ) आणि अॅबसरडिझम वगैरे वादांचा पगडा काही काळ गुजराती लेखकांवर पडला व एकंदरीत गुजराती लेखक चाकोरीबद्ध लेखनाच्या प्रणालीतून मुक्त झाले.

## गद्य

स्वातंत्र्योत्तर काळात म्हणजे विशेषतः १९५५ च्या नंतरच्या काळात साहित्यिक कादंबरी, लघुकथा व एकांकिकेच्या क्षेत्रात नवे नवे प्रयोग सुरू झाले.

व्यावसायिक गल्लाभरू कादंबऱ्यांचा एक विशिष्ट प्रकारचा मसाला तयार असतो; पण त्याहून निराळ्या साहित्यिक मूल्य असलेल्या कादंबऱ्या मनोविज्ञानाची कास धरून मनुष्याच्या मनातील अगदी आतल्या कप्प्यापर्यंत जाऊन पोहोचल्या. १९५५ नंतरच्या काही गुजराती कादंबरीकारांवर डॉ. सुरेश जोशींचा फारच प्रभाव पडला होता. सुरेश जोशींच्या मते कादंबरीत कथानक किंवा घटना ह्याचे महत्त्व इतके कमी असले पाहिजे की, त्यात कथानक असे काहीच न राहता ते केवळ एक प्रतीक असले पाहिजे. ह्या विचारसरणीचा अंमल त्यांनी आपल्या 'छिन्नपत्र' ह्या कादंबरीत केला. त्या कादंबरीचा उल्लेख ते 'लिहावयास घेतलेल्या कादंबरीचा आलेख' असा करतात. त्यांनी ह्या कादंबरीतून कथानकाचे किंवा संविधानकाचे समूळ उच्चाटनच केले आहे; पण हा प्रयोग फारसा यशस्वी झाला नाही.

ह्या वर्गातील दुसऱ्या दोन लघुकादंबऱ्या म्हणजे श्रीकांत शाह ह्यांची 'अस्ती' व राधेश्याम शर्मा ह्यांची 'फेरो' ही कादंबरी होय.

सुरेश जोशींनी पुरस्कारलेली नव्या कादंबरीची कल्पना ज्यांना पूर्णपणे मान्य नाही अशा कादंबरीकारांत चंद्रकात बक्षी ( १९३२ ) ह्या अस्तित्ववादी लेखकाचे नाव प्रामुख्याने घेतले पाहिजे. त्यांची कादंबरी 'आकार' ही गुजराती कादंबरीच्या विकासाचे एक सीमाचिन्ह म्हणता येईल.

ह्या काळातील रघुवीर चौधरी (१९३८) ह्या आणखी एका कादंबरीकाराचा खास उल्लेख केला पाहिजे. त्यांनी अनेक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यात 'पूर्वरंग', 'अमृता', 'आवरण', 'एकलव्य', 'उपरवास' ह्यांचा समावेश होतो. तसेच आणखीही काही लेखक व त्यांच्या कादंबऱ्या ह्यांचा ह्या बाबतीत खास उल्लेख करण्यासारखा आहे. ते येणे प्रमाणे—

मधुराय ह्यांची 'चेहरा', धीरुबेन पटेल ह्यांची 'वडवानल', मृणालिनी देसाईंची 'पृथ्वीनो पहेलो पुत्र', कुन्दनिका कापडियांची 'परोढ थतां पहेलां' हरीन्द्र दवेंची 'पलना प्रतिबिंब', पिनाकिन दवेंची 'विश्वजित्', दिलीप राणपुरांची 'सूकी धरती—सूका होठ' व जयंत गाठित ह्यांची 'आवृता' ह्या त्या कादंबऱ्या होत.

लघुकथांतूनही सुरेश जोशींनी कथानक अथवा संविधानक काढून टाकण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे लघुकथेत फक्त एका विशिष्ट मनःस्थितीचे, कधीकधी मनातील विविधस्तरातील जाणीवांचे चित्रणच फक्त आपणास पाहावयास सापडते. हे काम १९५५ नंतरचे लेखक फार कौशल्याने करू लागले. सुरेश जोशींनी आपल्या काही कथा 'गृहप्रवेश' आणि 'न तत्र सूर्यो भाति' ह्यात आणि मधुरायनी आपली कथा 'बांशी नामनी एक छोकरी' हीत रूपकथेतील काही समरूपिकांमध्ये व 'कालसर्प'सारख्या 'हारिया' नामक श्रेणीतील काही कृतीत ह्या तंत्राचा फार कुशलतेने उपयोग केला आहे. किशोर जाधयांच्या प्रागैतिहासिक अने शोकसभा' व 'सूर्यारोहण' ह्या कथा अतिवास्तववादाच्या (Surrealistic Com Positith) प्रयोगांचे उत्तम नमुने आहेत. राधेश्याम शर्मा हेही आपल्या काही प्रतीकात्मक कथांबद्दल प्रसिद्ध आहेत.

लघुकथातून कथानक अथवा घटना काढून टाकणे हे ज्याना मान्य नाही अशा लेखकात,इतर लेखकांबरोबरच पुढील लेखकांचा उल्लेख अवश्य करावा लागेल. चंद्रकांत बक्षी हे असे काही विवादास्पद लिहिण्यात आनंद मानतात तर सरोज पाठक ह्या स्त्रीच्या निरनिराळ्या विविध लहरींचे व वर्तनांचे वर्णन करतात; धीरुबेन पटेल ह्या व्यसनी माणसाच्या मनात व अस्वाभाविक वर्तनात कुशाग्र बुद्धीने डोकावतात तर कुंदनिका कापडिया ह्या भावभावनांचे वर्णन व चित्रण फार कुशलतेने करण्यात निष्णात आहेत.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे नाट्यक्षेत्रात गुजरातमधील हौशी नाटकमंडळे मोठ्या प्रमाणात दुसऱ्या भाषांतून केलेल्या भाषान्तरित व रूपान्तरित नाटकांवरच अवलंबून होती. मधुराय हा असा एकच बुद्धिशाली नाटककार आहे की, ज्याने दोन स्वतंत्र नाटके लिहिली आहेत. 'कोई एक फूलनुं नाम बोलो तो' आणि 'कुमारनी आगाशी'. श्रीकांत शाह ह्यांचे 'तिराड' आणि लाभशंकर ठाकर व सुभाष

शाह ह्यांचे अॅब्सर्ड पद्धतीचे 'एक उदर ने जदुनाथ' ही नाटकेही उल्लेखनीय आहेत. शिवकुमार जोशींनी लिहिलेली अनेक नाटकेसुद्धा १९५५ नंतरच्या काळाला योग्य अशीच आहेत. 'अंडेरी गंडेरी टिपरी टेन' हे धीरुबेन पटेल ह्यांचे अद्भुत नाटकही नोंद घेण्यासारखे आहे. ह्या काळात एकांकी नाटकाचा भर ओसरायला लागला होता. साहित्यिक मूल्यांच्या एकांकिकांची कमतरता फक्त थोड्याफार प्रमाणात 'अॅबसर्ड' एकांकिकांच्या प्रयोगानी भरून काढली. 'रे मठ' या प्रकाशनाने प्रकाशित केलेला 'गिक बिलीव्ह' हा पाच एकांकिकांचा संग्रह, आदिल मनसुरींचा 'हाथ पग बंधायेला छे' हा अॅबसर्ड नाटिकांचा संग्रह, 'डाळीना पंखी' ही चिनु मोदींची पद्यात लिहिलेली नाटिका आणि मधु रायांची 'झेरवुं' ही नाटिका ह्या काही अशा तऱ्हेच्या उल्लेखनीय एकांकिका आहेत.

ह्या काळातील निबंधांचे, विशेषत: व्यक्तिगत निबंधांचे, स्वरूपही नाटक व एकांकिकांप्रमाणेच कमी दर्जाचे आहे. ह्याला अपवाद फक्त गुजराती गद्यशैलीचे स्वामी सुरेश जोशी ह्यांचे निबंध. हे निबंध फार सुंदर गद्यकाव्याचे नमुनेच आहेत. तसेच दिगीश मह्रेता ह्यांचे निबंध हे आत्मलक्षी निबंधांचे उत्तम नमुने आहेत. ह्याशिवाय १९५५ नंतरच्या काळात उल्लेख करण्यासारखे अधिक लेखक दिसत नाहीत तरी गद्यशैलीच्या इतर गुजराती लेखांचा मात्र चांगला विकास झालेला दिसतो. कुन्दनिका कापडिया, मृणालिनी देसाई, वाडीलाल डगली आणि भगवत् भट्ट ह्यांचे गद्यलेखन वाचताना फार आनंद वाटतो. रसिक झवेरी ह्यांचे प्रवास-वर्णन 'अलगारी रखडपट्टी' हा उत्तम गुजराती गद्याचा उल्लेखनीय असा नमुना आहे. तसेच यशवंत शुक्ल ह्यांचे शुद्ध निर्दोष, चिंतनात्मक गद्य लेखन उल्लेखनीय आहे.

सुदैवाने साहित्यिक टीका व विद्वत्ता क्षेत्रांत मात्र गुजराती साहित्य खूप समृद्ध वाटते. मात्र गुजरातला अद्यापि समीक्षाशास्त्रावर प्रमाणभूत असा, ज्यात ह्या विषयातील सर्व पैलूंचा विचार केलेला सापडेल असा चांगल्या तज्ज्ञ लेखकाने लिहिलेला एकही ग्रंथ लाभलेला नाही. तसेच गुजराती भाषेचा केलेला वापर, भाषण व वाक्प्रचार ह्यांवर संपूर्णपणे आधारित असा व्याकरणशास्त्रावरचा संपूर्ण ग्रंथही गुजराती भाषेत झालेला नाही. तसेच प्राचीन व अर्वाचीन गुजराती भाषेचा, तसेच गुजराती साहित्यातील वैशिष्ट्यपूर्ण प्रकारांचा ज्यात विचार केलेला आहे असा एकही अत्युत्तम शब्दकोश उपलब्ध नाही. असे असले तरी साहित्याच्या अभ्यासक्षेत्रात आधुनिक काळात अनेक लेखकांनी बरीच महत्त्वाची कामगिरी केली आहे. त्यात पुढील लेखकांची नावे घ्यावी लागतील— सुरेश जोशी, निरंजन भगत, सी. एन. पटेल, जयंत कोठारी, उशनस्, जयंत पाठक, प्रमोदकुमार पटेल, अनिरुद्ध ब्रह्मभट्ट आणि रमणलाल जोशी. एस. आर. भट्ट ह्यांचे 'शेक्सपिअर' (१९७०) हे पुस्तक म्हणजे शेक्सपिअर ह्या जगप्रसिद्ध साहित्यिकाच्या चतुर्थ

शताब्दीनिमित्त लिहिलेला समीक्षात्मक प्रबंध आहे. हे पुस्तक जगातील कोणत्याही भाषेला अथवा साहित्याला भूषणभूत होईल असे आहे. मधुसूदन बक्षी ह्यांचे साहित्याच्या सिद्धान्ताची तात्त्विक चर्चा करणारे लेखही उल्लेखनीय आहेत.

पण भाषाशास्त्र व व्युत्पत्तिशास्त्र ह्या क्षेत्रात टी. एन. दवे, प्रबोध पंडित, हरिवल्लभ भायाणी आणि शांतिलाल आचार्य ह्यांच्या तोडीचे साहित्यिक त्याच-प्रमाणे ऐतिहासिक संशोधनाच्या क्षेत्रात केशवराम शास्त्री ह्यांच्या तोडीचे आणि पुरातत्त्व विभागात उत्कृष्ट कामगिरी करणारे एच. डी. सांकळिया, ए. व्ही.पंड्या, मधुसूदन ढाके व हरिलाल गोडाणी ह्यांच्या तोडीचे दुसरे विद्वान सापडणे कठीण आहे.

येथे गुजराती साहित्याचा थोडक्यात घेतलेला आढावा पूर्ण होत आहे. गुजराती साहित्यलेखनाची सुरुवात १२ व्या शतकापासून झाली; पण त्याचा विकास होत होत उच्च कक्षा गाठण्यास १९ व्या शतकाचा उत्तरार्ध व २० व्या शतकाचा पूर्वार्ध उजाडावा लागला. गुजराती साहित्याचा बहुतांश भाग हा मानवी जीवना-तील मूलभूत समस्यांचा विचार करण्यात आणि त्याचबरोबर मानवाचा ईश्वराशी, समाजाशी अन् स्वतःशी असलेला संबंध विशद करण्यात निमग्न झालेला आहे.

१८५० पर्यंतच्या गुजराती साहित्यात मुख्यत्वे मनुष्याचे ईश्वराशी जडलेले नाते विशद केलेले आहे. १८५०–१९५० पर्यंतच्या गुजराती साहित्यात मनुष्याचा समाजाशी असलेला संबंध मुख्यत्वे वर्णिलेला आहे आणि स्वातंत्र्योत्तर काळातील साहित्यात मनुष्याचा स्वतःशीच अथवा ज्याला आपण 'अहम्' म्हणतो त्याच्या खऱ्या स्वरूपाशी असलेल्या संबंधाचे विवरण आपणाला दिसून येते.

१६ व्या शतकाच्या अखेरीपर्यंतचे गुजराती साहित्य हे बहुतांशी धार्मिक व बोधपर स्वरूपाचे आहे. १७ व्या शतकात निधर्मी साहित्याचा उदय झाला त्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात नैतिक उपदेश आणि नैतिक अधःपाताचा व दुष्ट सामाजिक रीतिरिवाजांचा निषेध केलेला आढळतो.

पाश्चिमात्य संस्कृतीच्या प्रभावाने सामाजिक सुधारणांवर अधिकाधिक भर देण्यात येऊ लागला. त्यामुळे पहिल्याने जीवनात आदर्शवादाची वृत्ती बळावत चालली आणि १९२० नंतर (पहिल्या जागतिक युद्धानंतर) वास्तवतेकडे व सामा-जिक आणि राजकीय अशांततेकडे लेखकांची वृत्ती झुकू लागली.

ह्याचमुळे काही लेखक कलेसाठी कला ह्या तत्त्वाचा पुरस्कार करू लागले आणि काही लेखक सामाजिक व राजकीय जागृतीचे साधन म्हणून कला आणि साहित्याकडे पाहू लागले. १९२० सालच्या पूर्वीच्या काळात बहुतांशी संस्कृत पुस्तकांची भाषान्तरे लिहिली गेली व १९२० सालच्या नंतरच्या काळात इंग्लिश, बंगाली आणि मराठी पुस्तकांची भाषान्तरे मोठ्या प्रमाणात होऊ लागली.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर शासनाने मानवी प्रतिष्ठा व सामाजिक न्याय ह्यांचे

रक्षण व्हावे म्हणून कायदे बनविले. ह्या कायद्यांची संपूर्णपणे अमंलबजावणी करणे हे राजकारणी पुरुषांचे व सामाजिक कार्यकर्त्यांचे मुख्य कर्तव्य झाले. लेखकांवर समकालीन युरोपियन साहित्याचा ( दुसऱ्या जागतिक युद्धानंतर ) खोल परिणाम झाला आणि स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या भारतातील आर्थिक, सामाजिक व राजकीय परिस्थिती पाहून तर त्यांचा भ्रमनिरास झाल्यामुळे लेखकांच्या मनात एकलेपणाची भावना उत्पन्न झाली. ते अस्वस्थ झाले व त्यामुळे वैफल्याच्या भावनेने त्यांना ग्रासून टाकले; पण लेखक त्या निराशेच्या वातावरणातून हळू हळू बाहेर पडू लागले आणि उज्ज्वल भविष्य घडविण्यासाठी व मन:स्वास्थ्य संपादण्यासाठी हे लेखक उत्साहाने पावले टाकू लागले आहेत, असे आता दिसत आहे.

## तळटीपा [ भाग ३ ]

### समान्तर प्रवाह

१. मध्ययुगातील काही कवी केव्हा केव्हा गुजरातीतही क्वचित संस्कृत छंदांचा उपयोग करीत.

२. दु:शासन—कौरवांपैकी एक. कौरवांचा राजा दुर्योधन ह्याच्या भर दरबारात त्याने द्रौपदीचे वस्त्र फेडण्याचा प्रयत्न सूडाच्या भावनेने केला. कृष्ण द्रौपदीच्या मदतीला धावला व तिला अगणित लुगडी पुरवून त्याने तिची लाज राखली. अशी मूळ महाभारतातील हकीकत आहे.

३. चंद्रकांत टोपीवाला 'ज्ञान गंगोत्री ग्रंथश्रेणी' पुस्तक १०, 'गुजरात दर्शन' (साहित्य—१) पृष्ठ ७१.

४. अश्वना खुल्ला मोमां मर्मर करता वृक्षो एक पीळा आकाशनी कुहाडीनो आघात खमी तूटी पड्या. तेनी रजोटायेली पीठ पर लटकतुं फानस एक सुंवाळुं पीळुं बनी तळावना वाचाळ किनारा पासे उडी नीकळयुं अने सफेद पुच्छने चोंटी बेठेला एदी पक्षीए पांखो फफडावी ईडां मूक्या.

### पुरवणी ३ तळटीपा

१. आटलां फूलोनींचे ने
आटलो लांबो समय,
गांधी कदी सूतो न, तो.

२. ज्ञान-गंगोत्री ग्रंथश्रेणी खंड १० गुजरात दर्शन (साहित्य—१) पृष्ठ ११०.

३. वरील पुस्तकाचे पृष्ठ ११५.

४. हे पुस्तक प्रकाशित झाल्यावर लेखकाने आपला पुर्वीचा संग्रह 'उपजाति' (१९५८) रद्द केला.

वर्धित मजकूर

# पुरवणी १

## संस्था आणि वृत्तपत्रे

ब्रिटिश भारतात आल्यामुळे भारतात नवे युग सुरू झाले. तेव्हा लोकांच्या हितासाठी बऱ्याच लोकांनी एकत्र येऊन काम करणे किती महत्त्वाचे आहे ह्याची जाणीव आपणाला झाली. त्यासाठी काही संस्था गुजरातमध्ये सुरू झाल्या. त्यांच्या मार्फत चाललेल्या कार्यप्रवृत्ती व प्रकाशने ह्यामुळे गुजरातच्या साहित्याच्या वाढीत भर पडली.

### अशा काही संस्था

**दि गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी–**

(आता ती गुजरात विद्या सभा ह्या नावानं ओळखली जाते.) ही संस्था १८४८ मध्ये अहमदाबादला सुरू झाली. आपल्या हेतूला पूरक अशी मौलिक पुस्तके व भाषान्तरे प्रसिद्ध करणारी ही संस्था विद्वत्ता व ज्ञानाच्या क्षेत्रात सतत काम करीत आहे.

ही संस्था 'भोळाभाई जेसिंगभाई लर्निंग अ‍ॅण्ड रिसर्च इन्स्टिटयूट' नावाची एक संशोधन शाखा चालविते. ही शाखा मुख्यत: साहित्याच्या क्षेत्रात संशोधन करण्याचे काम निष्ठेने करते. त्याचप्रमाणे ही संस्था भारतीय विद्याशाखेच्या (Indology च्या) क्षेत्रातही काम करते.

ह्या संस्थेतर्फे एक समृद्ध अशी लायब्ररीही चालविली जाते. आता बंद पडलेली नियतकालिके आणि दुर्मिळ अशी हस्तलिखिते ह्यांचा त्यात संग्रह आहे. शिवाय ही संस्था 'बुद्धिप्रकाश' हे नियतकालिक (आता ते त्रैमासिक आहे) प्रसिद्ध करते.

**फॉर्बस गुजराती सभा–**

ही संस्था मुंबईला १८६५ मध्ये सुरू झाली. ह्या संस्थेने बरेच साहित्य संशोधनासंबंधीचे ग्रंथ प्रकाशित केले. त्यातील कांही फार उच्च गुणवत्तेचे आहेत.

ह्या सभेतर्फेही एक लायब्ररी (वाचनालय) चालविली जाते. तीत काही जुनी व दुर्मिळ पुस्तके तर आहेतच; पण त्याशिवाय आता चालू नसलेल्या सामायिकांच्या संचिका (फाइली) व बरीच हस्तलिखितेही आहेत. तसेच ह्या संस्थेच्या मूळ दात्याने सूचना दिल्याप्रमाणे विशिष्ट विषयावरील निबंधस्पर्धाही ही संस्था आयोजित करते आणि १९३५ पासून 'फॉबर्स सभा त्रैमासिक' ह्या नावाचे त्रैमासिकही चालविते. हे मासिक मुख्यत्वे संशोधन व समीक्षा ह्या विषयांना वाहिलेले आहे. ('फॉबर्स' या मूळ इंग्रजी नावाचा गुजरातीतला रूढ उच्चार फॉबर्स असा आहे.)

## गुजराती साहित्य परिषद–

ह्या संस्थेचे पहिले अधिवेशन अहमदाबाद येथे १९०५ साली भरले होते. ह्या संस्थेचा मुख्य हेतू शिक्षित लोकांमध्ये गुजराती साहित्याचा प्रसार करणे व ते लोकप्रिय करणे हा होता. ७० वर्षांत ह्या संस्थेची २८ अधिवेशने भरविली गेली व काही चढउताराचा काळ आला तरी ह्या परिषदेने गुजरातीची संस्मरणीय अशी सेवा केली आहे. विविध अध्यक्षीय भाषणांतून तसेच काही विभागीय प्रमुखांनी व काही इतर विद्वानांनी वाचलेल्या निबंधातून इतर अनेक प्रश्नांबरोबर व्याकरण, शुद्धलेखनाचे नियम, व्युत्पत्तिशास्त्र, भाषा शास्त्र, छन्दोरचनाशास्त्र, लिपि, बोल-भाषा व त्यांच्यातील भेद, लोककथा आणि साहित्यिक व सांस्कृतिक इतिहास ह्या विषयांवरही चर्चा केली गेली. तसेच त्यामध्ये साहित्याची व साहित्यसमीक्षेची आधारभूत तत्त्वे ह्यावर सखोल चर्चाही झालेली आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे ह्या निबंधातून गुजरातमधील टीकात्मक विचार व विद्वत्ता ह्यांचा एक खूप मोठा साठाच उपलब्ध झालेला आहे.

## गुजरात विद्यापीठ–

महात्मा गांधींनी अहमदाबादला १९२२ साली गुजरात विद्यापीठाची स्थापना केली. ही संस्था मुख्यत्वे शैक्षणिक संस्था आहे. त्याची लायब्ररी खूप समृद्ध आहे. त्यात एक कॉपीराइट विभाग आहे. त्यात गुजराती भाषेतील सर्व उपलब्ध झालेली प्रकाशने आहेत. उच्च साहित्यिक गुणवत्तेची बरीच पुस्तके गुजरात विद्यापीठाने प्रकाशित केली आहेत. ह्या संस्थेनेच काका कालेलकर, किशोरलाल मशरूवाला, महादेव देसाई, नरहरि परीख, मगनलाल देसाई ह्यांच्यासारखे महान लेखक, पंडित सुखलालजी, मुनि जिनविजयजी, पंडित धर्मानंद कोसांबी आणि पंडित बेचरदाससारखे विद्वान, रामनारायण पाठक, रसिकलाल छोटालाल परीख आणि नगीनदास पारेख ह्यांच्यासारखे साहित्यटीकाकार आपल्याला दिले आहेत. तसेच ह्या संस्थेने सुंदरम्, उमाशंकर जोशी, कृष्णलाल श्रीधराणी, करसनदास माणेक व

भोगीलाल गांधी 'उपवासी' ह्यासारख्या कवींच्या बुद्धिमत्तेला व प्रतिभेला प्रगती करण्यास वाव दिला. गुजरात विद्यापीठाने प्रसिद्ध केलेल्या 'जोडणी कोशात' काही त्रुटी असल्या तरी त्यांच्यामुळे गुजराती शुद्ध लेखनपद्धतीत 'जोडणी'मध्ये व्यवस्थित-पणा व एकसूत्रता आली.

**दि लालभाई दलपतभाई भारतीय संस्कृती मंदिर, अहमदाबाद–**

ही संस्था मुख्यत्वे जैन साहित्याच्या संशोधनाचे कार्य करते. त्यात मुख्यत्वे 'अपभ्रंश' साहित्याच्या नंतरचा व आरंभीच्या गुजराती साहित्याचा समावेश होतो.

**'दि ओरिएण्टल इन्स्टिटयूट' आणि 'महाराजा सयाजीराव युनिव्हर्सिटी' बडोदा–**

ह्या बडोद्याच्या दोन संस्था बऱ्याच वर्षांपासून सामाजिक, सांस्कृतिक, भाषाविषयक व साहित्यविषयक अशी जुन्या आणि मध्ययुगीन गुजराती साहित्यातील पुस्तके प्रकाशित करण्याचे काम करीत आहेत. त्यांच्या संपादनाचा व संशोधनाचा दर्जा फार उच्च प्रतीचा आहे. 'इन्स्टिटयूट' ही संस्था संशोधन आणि समीक्षा ह्या विषयांना वाहिलेले 'स्वाध्याय' नावाचे त्रैमासिक प्रकाशित करते.

**दि सरदार वल्लभभाई पटेल युनिव्हर्सिटी–वल्लभनगर (खेडा जिल्हा)–**

ही संस्था 'ज्ञान गंगोत्री' ह्या नावाची ३० गुजराती ग्रंथांची माला प्रकाशित करीत आहे. ह्यांपैकी २० खंड हे मानव्यशास्त्र व समाजशास्त्र ह्या विषयावरील ज्ञानकोश म्हणून उपयोगी आहेत व १० खंड इतर भौतिक शास्त्रांवरील विषयांच्या ज्ञानासाठी उपयोगाचे आहेत.

**'दि साऊथ गुजरात युनिव्हर्सिटी' आणि 'दि सौराष्ट्र युनिव्हर्सिटी'–**

उच्च शैक्षणिक अभ्यासविषयक विद्वानांना पसंत पडतील अशी पुस्तके प्रकाशित करतात.

**मुंबई युनिव्हर्सिटी–**

मुंबई युनिव्हर्सिटीद्वारा दिली गेलेली बरीचशी ठक्कर वसनजी माधवजी लेक्चर्स (व्याख्याने) विद्वत्ता व टीकात्मक कुशाग्रबुद्धीच्या कृती बनल्या आहेत.

**सयाजी साहित्यमाला–**

बडोद्याच्या 'सयाजी साहित्यमाले'तर्फे जुन्या व मध्ययुगीन बऱ्याच प्रसिद्ध लेखकांच्या जीवनावर व कृतींवर वाचनीय असे लघुनिबंध प्रकाशित झालेले आहेत.

**गुजरात साहित्यसभा, अहमदाबाद–**

ह्या संस्थेतर्फे काही महत्त्वाची पुस्तके तर प्रसिद्ध झाली आहेतच. त्याशिवाय

१९२९ पासून ही सभा त्या त्या वर्षात प्रकाशित झालेल्या पुस्तकांची वार्षिक परीक्षणेही प्रसिद्ध करण्याचे काम करीत आहे. जरी ही पुस्तक-परीक्षणे एकाच सारख्या दर्जाची नसली (कारण वेळोवेळी निरनिराळ्या व्यक्तींकडून पुस्तक-परीक्षणाचे काम केले जाते) तरी गुजराती साहित्याच्या घडामोडींच्या परिस्थितीचा एक बराच विश्वसनीय असा आलेख ती आपल्याला पुरवतात

**भारतीय विद्याभवन**—

मुंबईच्या 'दि भारतीय विद्या भवन' व विशेषकरून त्याची Singhi सिंघी ग्रंथमाला व 'दि गुजरात रिसर्च सोसायटी' आणि सुरतेची 'दि चुनीलाल गांधी विद्याभवन' ह्या संस्थासुद्धा संशोधन व विद्वत्ता ह्या क्षेत्रात महत्त्वाची कामगिरी करीत आहेत.

**'दि नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद'**—

ह्या संस्थेने निकोप राष्ट्रिय दृष्टिबिंदू ठेवून लिहिलेली निरनिराळ्या विषयांवरील पुस्तके व 'दि दक्षिणामूर्ति प्रकाशन मंदिर, भावनगर' (आता हे बंद झाले आहे) ह्यानी प्रकाशित केलेली 'मानसशास्त्र' व 'शिक्षणशास्त्र' ह्या विषयांवरील व लहान मुले आणि युवकांसाठी लिहिलेली साहित्यविषयक पुस्तकेसुद्धा उल्लेखनीय आहेत.

**सस्तु साहित्यवर्धक कार्यालय**—

भिक्षु अखंडानंद ह्यांनी सुरू केलेले 'दि सस्तु साहित्यवर्धक कार्यालय' धार्मिक व नैतिक विषयांवरील स्वस्त किमतीची पुस्तके व पुस्तकांची भाषान्तरे प्रकाशित करते. तसेच ह्या संस्थेतर्फे 'अखंड आनंद' ह्या नावाचे एक लोकप्रिय मासिक गल्या ३० वर्षापासून प्रसिद्ध होत आहे.

ह्या संस्थांव्यतिरिक्त प्रसिद्ध विद्वान पंडितांनी चालविलेल्या सामयिकांनी सुद्धा गुजराती साहित्याला बरेच समृद्ध केले आहे. ह्या सामयिकातून प्रसिद्ध झालेले बरेच लेख संग्रहित व प्रसिद्ध झालेले आहेत. तरी बरेचसे लेख नियतकालिकांच्या अंकातून प्रसिद्ध झालेले आहेत व ते अंक हरवले असले आणि नष्ट झाले नसले तर ते गुजरात विद्या सभा, गुजरात विद्यापीठ, एम. एस. युनिव्हर्सिटी, फॉर्बस गुजरात सभा अथवा भारतीय विद्याभवन ह्या संस्थांच्या वाचनालयातील फाइलसमध्ये दडून पडून राहिलेले असतील.

ह्या नियतकालिकांपैकी नवलराम पंड्या व त्यानंतर इतरांनी चालविलेले 'गुजरात शालापत्र', मणिलाल द्विवेदींनी प्रकाशित केलेली 'प्रियवंदा' व नंतर 'सुदर्शन', रमणभाईंनी प्रकाशित केलेले 'ज्ञानसुधा', आनंदशंकर ध्रुव ह्यांनी संपादित

केलेले 'सुदर्शन', व नंतरचे 'वसंत', श्रेय साधक अधिकारी वर्ग ह्या संस्थेने प्रकाशित केलेले 'महाकाल', हरिलाल ध्रुव ह्यांनी संपादित केलेले 'चंद्र', मटुभाई कांटावालाचे 'साहित्य', रामनारायण त्रिपाठींचे 'समालोचक', हाजी महंमद अलारखिया 'शिवजी' चे 'वीसमी सदी' पुरुषोत्तम विश्राम मावजींनी चालविलेले 'सुवर्णमाला', नृसिंह विभाकरांचे 'रंगभूमि', मुनि जिनविजयजीनी संपादित केलेले 'पुरातत्त्व', इंदुलाल कनैयालाल याज्ञिक यांचे 'युगधर्म', रामनारायण पाठक ह्यांचे 'प्रस्थान', नानाभाई भट्ट ह्यांचे 'दक्षिणामूर्ति', गिजुभाई व ताराबाई मोडक ह्यांनी चालविलेले 'शिक्षण पत्रिका', विजयराज वैद्य ह्यांनी संपादित केलेली 'कौमुदी' व नंतर 'मानसी' ही मासिके, मगनभाई देसाईचे 'शिक्षण अने साहित्य', जयंती दलालांचे 'रेखा', सुंदरम् ह्यांचे 'दक्षिणा' आणि सुरेश जोशींची 'मनीषा' व 'क्षितिज'. ह्यांपैकी प्रत्येक नियतकालिकाने आपापल्या परीने वाचकांवर फार प्रभाव पाडलेला आहे.

अलीकडे प्रसिद्ध होणाऱ्या नियतकालिकांपैकी पुढील मासिकांचा निर्देश अवश्य केला पाहिजे.

१) कुमार–

हे मासिक १९२३ पासून प्रकाशित होत आहे आणि रविशंकर रावल व बचुभाई रावत त्याचे संपादक आहेत. ह्या मासिकाने एखाद्या युनिव्हर्सिटीप्रमाणे वाचकांच्या एका सबंध पिढीचे साहित्यातील आवडीचे क्षेत्र विस्तृत केले आहे आणि वाचकांच्यात वाचनाबद्दल अभिरुचि उत्पन्न करून ती विकसित केली आहे व त्यांची सारासार विवेकशक्ती जागृत केली आहे. गुजराती काव्यात नंतर श्रेष्ठ पदवीस पोहोचलेल्या अनेक कवींची वाचकांना ओळख करून देण्याचे काम 'कुमार' मासिकानेच केलेले आहे.

२) संस्कृति–

१९४७ पासून सदहू मासिक श्री. उमाशंकर जोशी हे संपादित व प्रकाशित करीत आहेत. विचार-विवेक, परिपक्वता व सर्वग्राही उदार दृष्टिकोण ह्या गुणांमुळे हे मासिक फार मान्यता पावले आहे. ते पूर्वीच्या 'वसंत' ह्या मासिकाच्या तोडीचे झाले आहे.

३) ग्रंथ–

यशवंत दोशी हे १९६२ ते १९७६ पर्यंत ह्या मासिकाचे संपादक होते व १९७७ पासून निरंजन भगत हे मासिक चालवीत आहेत. हे मासिक पुस्तकांची परीक्षणे व समीक्षा ह्यांना वाहिलेले आहे. ही परीक्षणे मोकळ्या मनाने व निर्भीडपणे केलेली असतात. यामध्ये परीक्षकाच्या कक्षेप्रमाणे परीक्षणाचा दर्जाही कमी अधिक श्रेष्ठतेचा दिसून येतो. काही परीक्षकांचा दर्जा फार उच्च आहे.

४) कविलोक–

हे द्वैमासिक १९५६ पासून प्रकाशित होत आहे. हे पूर्णपणे काव्यविषयाला वाहिलेले आहे. पहिली सहा वर्षे राजेंद्र शाह व सुरेश दलाल ह्याचे संपादक होते. त्यानंतर १९७६ सालच्या अखेरीपर्यंत राजेंद्र शाह, बच्चुभाई रावत, निरंजन भगत, आणि धीरुभाई परीख ह्या मासिकाचे संपादक होते. १९७७ च्या जानेवारी-फेब्रुवारी-पासून फक्त धीरुभाई परीख ह्याचे संपादक आहेत. ह्यामध्ये कविता, काव्या-वरील आणि कवींवरील निरनिराळे पैलू दाखविणारे व त्यावर विवेचन करणारे लेख येतात. ह्यांची कक्षाही फार उच्च दर्जाची असते आणि त्या द्वैमासिकाचे 'रिल्के' व 'प्रियकांत मणियार' ह्यांच्या संबंधी काढलेल्या खास अंकासारखे काही विशेषांक विचारपूर्वक योजलेले, काळजीपूर्वक आखलेले व सुंदर रीतीने प्रकाशित केलेले आहेत.

५) कविता–

हे द्वैमासिकसुद्धा संपूर्णपणे 'काव्य' ह्या विषयाला वाहिलेले आहे. सुरेश दलाल त्याचे संपादक आहेत. ते १९६६ पासून प्रकाशित होत आहे. ह्या मासिकात पद्यात्मक रचना, गाणी, गझल, सुनीते, मुक्तके (स्फुट लघु काव्ये) व अछांदस मुक्तशैलीमधील काव्य-प्रकार प्रकाशित होतात. तसेच ह्यात इतर भाषांतील कवितांची गुजराती भाषान्तरे प्रसिद्ध होतात. ह्या मासिकाने काही नवोदित कवी उजेडात आणले आहेत. 'कविता' हे द्वैमासिक कवींना तसेच कविताप्रेमी लोकांना फार प्रिय आहे.

वरील मासिकाप्रमाणेच काव्य विषयाला वाहिलेले 'कविता' या नावाचेच दुसरे एक मासिक विसाव्या शतकातील तिसऱ्या दशकाच्या उत्तरार्धात प्रसिद्ध होत होते. त्याचे संपादक इन्दुलाल गांधी, मगनलाल लालभाई देसाई (कोलक) आणि रतुभाई देसाई हे होते.

तसेच वर्षातून एकदाच प्रकाशित होणाऱ्या काही नियतकालिकांचा निर्देश करणे फार आवश्यक आहे. ह्यांपैकी यशवंत पंड्या ह्यांनी संपादित केलेले 'वीणा' व त्यानंतरचे 'शारद', दिलीप कोठारींनी संपादित केलेले 'श्रीरंग' आणि कलकत्त्याहून प्रकाशित होणाऱ्या 'केसुदान' ह्या मासिकाचे काही अंक खास उल्लेखनीय आहेत. 'केसुदान' सोडून ह्यातली बाकीची सर्व वार्षिक कालिके आता बंद पडली आहेत.

वर्धित मजकूर

# पुरवणी २

## गुजरातेतील बालसाहित्य

इ. स. १८२६ साली बालकांसाठी काही पाठ्यपुस्तके गुजराती भाषेत प्रकाशित करण्यात आली आणि १८३१ साली 'बालमित्रा'चा पहिला भाग प्रकाशित झाला. बहुतकरून मॉशियर बेरेक्विन या फ्रेंच शिक्षणशास्त्रज्ञाने फ्रेंच भाषेत लिहिलेल्या पुस्तकाच्या इंग्लिश भाषेतील *Children's Friend* ह्या अनुवादाच्या मराठीत केलेल्या रूपान्तरावर हे गुजराती रूपान्तर आधारित आहे.

दलपतरामनी लिहिलेली 'बापानीं पीपर' हीच बहुधा बालकांसाठी लिहिलेली गुजराती भाषेतील पहिली मौलिक लिखित कविता आहे. याला अपवाद म्हणजे फक्त पिढ्या-पिढ्यांत चालत आलेल्या अगणित मौखिक 'निरर्थक' कविता, पाच ओळींच्या अर्थहीन हास्योत्पादक कविता आणि एका पिढीपासून दुसऱ्या पिढीपर्यंत परंपरेने चालत आलेल्या लोककथा ह्या आहेत. दलपतरामनी आणखी अशा बऱ्याच कविता लिहिल्या व त्या आबालवृद्धांना सारख्याच आवडल्या. त्यातील बुद्धीची चमक असलेले श्लेष, चटकदार विनोदी व साधी सरळ शैली ह्यामुळे त्या सर्वांना फार प्रिय झाल्या.

गोष्टींच्या रूपाने मनोरंजक प्रसंग रंगविणारी 'शिशु सद्बोधमाला' आणि 'इसापनीति' ही पुस्तके १८७५ च्या सुमारास प्रकाशित झाली.

पण फक्त बालकांसाठी लिहिलेले आणि बालकांच्या दृष्टिकोणातून लिहिलेले पहिले पुस्तक म्हणजे इच्छाराम देसाईंनी लिहिलेले 'बालकनो आनंद' हे होय. ते Evening's at Home (घरातील संध्याकाळ) ह्या पुस्तकाचे भाषान्तर आहे. ते १८९५ मध्ये प्रकाशित झाले.

१९१५ मध्ये गांधीजी गुजरातेत आले तेव्हा गुजरातमध्ये नव्या जीवनाचा संचार झाला आणि सर्व पातळीवरील शिक्षणाच्या रूढ कल्पना पूर्णपणे सुधारून बदलल्या गेल्या होत्या आणि पूर्वीच्या जीर्ण कल्पना टाकून देण्याचा प्रयत्न लोक करीत होते.

त्या वेळपासून प्रथमच बालक म्हणजे एक स्वतंत्र व्यक्ती म्हणून मानले जाऊ लागले आणि ते मोठ्या माणसाच्या हातातील एक खेळणे आहे, असे मानण्याची वृत्ती नाहीशी झाली. बालकालाही आपले असे एक व्यक्तिमत्त्व आहे व त्याचा विकास होण्यासाठी त्याला वाव मिळाला पाहिजे, ही गोष्ट स्वीकारण्यात आली.

त्या वेळी जुन्या मताच्या लोकांना ज्या कल्पना धक्का देणाऱ्या व रूढ पद्धतीहून अगदी निराळ्या वाटत होत्या त्यांचे आदर्शवादी तरुणांना फारच आकर्षक वाटले आणि म्हणून भावनगरच्या 'दक्षिणामूर्ति' ह्या संस्थेने चालू केलेली शिक्षणाची मॉंटेसरी-पद्धत सर्व गुजरातभर बालकांसाठी नव्या शिक्षणाचे प्रतीक म्हणून मान्य झाली.

'दक्षिणामूर्ति'ने स्वीकारलेल्या शिक्षणपद्धतीचे घडवय्ये म्हणजे गिजुभाई बधेका, ताराबाई मोडक, नानाभाई भट्ट आणि हरभाई त्रिवेदी हे लोकांना खरे शिक्षण कसे असले पाहिजे हे समजावून देऊ लागले आणि लोकांचे मन आपल्याकडे वळवू लागले व बालकाच्या उगवत बुद्धीला संपूर्ण वाव मिळाला पाहिजे ह्या उद्देशासाठी अनुकूल असे वातावरण तयार करण्याचे कार्य त्यांनी अंगावर घेतले.

ह्याचा प्रचार त्यांनी आपल्या पुस्तकातून व नियतकालिकातून केला. तसेच त्यांनी बालवाड्यांचे (नर्सरीचे) शिक्षक व प्राथमिक शिक्षक ह्यांच्यासाठी शिक्षण-वर्ग सुरू केले.

त्याचप्रमाणे त्यांनी आपला हेतू साध्य करण्यासाठी आपल्या शिक्षणविषयक कल्पनांना अनुसरून स्वतःच्या बालवाड्या (नर्सरीज) व प्राथमिक शिक्षणाचे वर्ग सुरू केले आणि बालकांसाठी योग्य असे साहित्य लिहून प्रकाशित केले.

हे काम त्यांनी एखाद्या मिशनरीच्या उत्साहाने केले व सुरुवातीपासूनच त्यांना ह्या बाबतीत लोकांकडून अतिशय उत्तेजन मिळाले.

बालकाकडे आपण एक महत्त्वाचा घटक म्हणून पाहू लागलो. दैनिकातून व साप्ताहिकातून बालकांसाठी खास विभाग राखून ठेवण्यात आले व खास मुलांसाठी लिहिलेली कित्येक नियतकालिके नव्याने सुरू करण्यात आली. निरनिराळ्या वयो-गटांतील बालकांसाठी योग्य अशा निरनिराळ्या प्रकारच्या कविता, गोष्टी, नाटके, विनोदी लेख, चुटके, प्रवासवृत्तान्त, चरित्रे व सर्वसामान्य माहिती तसेच ज्ञान-विषयक साहित्य लिहून प्रकाशित होऊ लागले.

परंतु हे अगदी उघडच आहे की, ह्यांतील कित्येक साहित्य अगदी निरुपयोगी होते. पोरकटपणाचे व अर्थहीन असे कोणतेही लेखन बालसाहित्याच्या नावाखाली खपवले जाऊ लागले. अद्भुत कल्पनांनी भरलेल्या परीकथा, कपटीपणाच्या व कारस्थानाच्या कथा, भयप्रद व अद्भुताने भरलेल्या कथा ह्या गुजरातच्या बालकाच्या साहित्याच्या भुकेला खाद्य म्हणून पुरवल्या जाऊ लागल्या.

उलट पक्षी काही लोक असे म्हणू लागले की, बालकांना असेच साहित्य दिले पाहिजे की जे त्यांना जीवनाला धैर्याने सामोरे जाण्यास उपयोगी पडेल. जे साहित्य त्यांना जीवनापासून दूर नेईल आणि त्यांना जीवनातील अडीअडचणींचा स्पर्शही होऊ देणार नाही असे साहित्य त्यांच्यापुढे ठेवू नये. बाल साहित्यात कल्पनाविलास व अद्‌भुतताही ठेचून भरलेली असते आणि तशा साहित्याचा तोच महत्त्वाचा भाग होता. त्याला आळा घातला पाहिजे. त्यांना नेहमी असंभाव्य अशा घटना न सांगता सत्यस्थितीची जाणीव करून देणारे साहित्य दिले पाहिजे. जे साहित्य बालकाचा एक निकोप, विचारी व समतोल असा मनुष्य म्हणून विकास करील तेच साहित्य त्याला दिले पाहिजे. त्याच्या आड येईल असे त्याला काही देता कामा नये. तसेच प्रौढांचे सोप्या भाषेत लिहिलेले साहित्य म्हणजे बालकांचे साहित्य नव्हे. त्याचे निकष सर्वस्वी निराळेच असले पाहिजेत प्रौढांसाठी लिहि-लेल्या साहित्याचा हेतू फक्त मनोरंजन असा असला तरी चालेल; पण बालकांसाठी लिहिलेल्या साहित्यात मात्र मनोरंजन व शिक्षण ह्यांची फारकत होता कामा नये. बालकांच्या साहित्यात शिक्षणासाठी मनोरंजन हा हेतू असला पाहिजे. ज्या-मुळे त्याच्या कल्पनाशक्तीला आवर घातला जाईल. त्याचे विचार सुसंस्कृत होतील व त्याच्या बुद्धीला चालना मिळेल, असे साहित्य बालकापुढे ठेवले पाहिजे आणि अशा प्रकारे मनुष्य म्हणून कसे जगावे हे त्याला शिकविले पाहिजे. बालकांच्या साहित्यात कला व शिक्षण ह्यांचा संगम अवश्य असलाच पाहिजे. मनोरंजन हा त्याचा उद्देश असला तरी त्यात शिक्षण हा हेतूही असलाच पाहिजे.

आतापर्यंतच्या बालसाहित्याच्या दृष्टीने १९२० ते १९४० ह्या काळात गुजरातीत सर्वात श्रेष्ठ प्रकारचे बालसाहित्य लिहिले गेले. कारण ह्याच काळात बालसाहित्याचा हेतू स्पष्ट झाला व त्याविषयी मनात कोणत्याही प्रकारची शंका राहिली नाही. ह्याच काळात हेही स्पष्ट झाले की, बालकांनी लिहिलेले साहित्य म्हणजे बालसाहित्य नव्हे किंवा प्रौढांनी बालसुलभभाषेत लिहिलेले साहित्य हेही बालसाहित्य नव्हे. गुजराती भाषेतील अतिशय मौल्यवान बालसाहित्य ह्याच काळात प्रकाशित झाले.

१९४० नंतर गुजराती बालसाहित्य हे लेखकांच्या दृष्टीने अगदी झटून करावयाचे कार्य असे राहिले नाही. बालसाहित्याच्या साहित्यिक मूल्यापेक्षा त्यात फक्त व्यापारी दृष्टी आली व त्याच दृष्टीने त्याचा खप होऊ लागला. बालकांसाठी प्रकाशित होणारी साप्ताहिके व मासिके यांच्या संपादकांनेही मुख्य ध्येय त्यांचा खप कसा वाढेल हेच राहिले आणि बालसाहित्याच्या मागे राहिलेला गिजुभाईंच्या वेळचा मुख्य हेतू भूतकाळात जमा झाला.

गुजराती भाषेत बालकांसाठी लिहिलेली पुस्तके व पुस्तिका बऱ्याच आहेत.

१९३२ ते १९५७ ह्या २५ वर्षांत २५०० पेक्षाही जास्त बालवाङमयाची पुस्तके प्रकाशित झाली व त्याच वेगाने ती आजपर्यंत तशीच प्रकाशित होत राहिलेली आहेत.

गुजराती भाषेत लिहिलेले काही बालसाहित्य जरी अगदी टाकाऊ व वाईट असले तरी आपल्याला असे दिसून येते की, बऱ्याचशा गुजराती बालसाहित्याचा हेतू बालकांना जीवनात, साहित्यात, इतिहासात आणि संस्कृतीत जे जे काही महान, चांगले, उदात्त, भव्य आणि सुंदर आहे त्याची साध्या, स्पष्ट व मनोरंजक भाषा-शैली आणि रचनापद्धती यांनी ओळख करून देणे हा आहे.

मुलांसाठी महाकाव्ये संक्षिप्त करून सोप्या भाषेत लिहिली गेली आहेत. 'रामायण', 'महाभारत' व 'भागवत' ही महाकाव्ये सोप्या गद्यात आणि पद्यात लिहिली गेली आहेत. ग्रीक शोकांतिका, संस्कृत नाटके व काव्ये ह्यातील कथा, शेक्स्पिअरची नाटके, प्रेमानंदाची आख्याने आणि शामळच्या वृत्तान्तकथा ही पुन्हा सोप्या भाषेत लिहिली गेली आहेत व ती चांगली यशस्वी झाली आहेत. 'पंचतंत्र' 'हितोपदेश' 'कथा सरित्सागर' आणि 'अरेबियन नाईट्स' ह्या पुस्तकांची सोप्या गुजराती भाषेत भाषान्तरे झाली आहेत. गुजरात, बंगाल, पंजाब, राजस्थान आणि काही परदेशातील लोककथा व पूर्वीचे आणि आताचे विशेषत: गुजरातमधील व भारतामधील आणि सामान्यत: सर्व जगातील प्रख्यात स्त्रिया व पुरुष, वीरपुरुष, संत, राजे व धर्मसंस्थापक, धर्मसुधारक, समाजसुधारक, शिक्षक, विद्वान लेखक, कलाकार, संगीतकार, कसरतबाज, खेळाडू ह्यांच्या चरित्रांनी गुजराती बाल-साहित्याचा बराचसा भाग व्यापलेला आहे.

तसेच वैज्ञानिक सिद्धी आणि पक्षी, पशु, जीवजंतु, झाडे व मुळे, वनस्पती, वृक्ष, फळे-फुले ह्यांच्या संबंधीची माहिती पुरविणारी पुस्तके गुजराती भाषेत लिहिली गेली आहेत. खगोलशास्त्र, जमीन आणि समुद्र ह्या विषयांवरील पुस्तकेही लिहिली गेली आहेत. जगातील मोठी शहरे, यात्रेची स्थळे, ऐतिहासिक व सांस्कृतिक महत्त्वाची स्थळे, ह्यांचे वृत्तान्त लिहिलेले आहेत. 'टारझनच्या' कथांचे गुजरातीत भाषान्तर झाले आहे आणि जंगले, समुद्र ह्यांवरील आवेशपूर्ण साहसकथा ह्यांनीही गुजराती बालसाहित्यात बरीच भर घातली आहे.

गुजराती बालसाहित्य हे गोष्टी, दंतकथा आणि नाटके ह्यांनी समृद्ध झाले आहे. बालकांसाठीच खास अशी साप्ताहिके, मासिके व नियतकालिके तर प्रकाशित होतच होती; पण त्याशिवाय बऱ्याच गुजराती दैनिकात आणि साप्ताहिकात मुलां-साठी म्हणून खास एक विभाग सतत नियमितपणे प्रसिद्ध होत असे. ह्या सर्व प्रकाशित साहित्याचा दर्जा बराच उच्च प्रतीचा होता.

वर दाखविल्याप्रमाणे गुजराती बालसाहित्यात भरपूर वैविध्य आहे तरी त्याला स्वतःच्या अशा काही मर्यादा आहेतच.

प्रत्येक वयोगटाच्या बालकांच्या योग्य असे पुरेसे सर्व विषयावरील बाल-साहित्य लिहिले गेलेले नाही व जे लिहिले गेले आहे त्याचा बराच मोठा भाग टाकाऊ व हीन दर्जाचा आहे.

हल्ली बालसाहित्य लिहिणाऱ्या लेखकांचे व प्रकाशकांचे लक्ष बालकांच्या विषयीची जबाबदारी व कर्तव्य यांपेक्षाही स्वतःच्या पुस्तकाच्या हक्काचे मिळणारे पैसे व पुस्तकापासून होणारा फायदा ह्याकडे जास्त असलेले दिसून येते. बालकांच्या कोमल मनावर ह्या लेखकांचा व प्रकाशकांचा जबरदस्त प्रभाव पडलेला असतो; पण प्रकाशकाना व लेखकाना त्या दृष्टीने आपल्या कर्तव्याची जाणीव नसते. वरील साहित्याचा बराचसा भाग मुलांना आंजारून-गोंजारून, आपल्याकडे वळवून लिहिलेल्या भाषेच्या खेळकर शाब्दिक कसरतीने व विविधरंगी चित्रानी भरलेला असतो. बालकांना पुरवलेला हा मालमसाला बराचसा उथळ, अर्धाकच्चा व काही वेळा तर अद्‌भुत असतो. ह्या प्रकाशक व लेखकांची बालकाकडे पाहण्याची दृष्टी, फारशी सखोल नसते व त्यांनी प्रकाशित केलेल्या अगणित पुस्तकांत निष्णाताची बुद्धिमत्ता व अनुभवाचा अंश जरासासुद्धा सापडत नाही.

एके काळी बालकांसाठी लिहिलेल्या कविता म्हणजे मधुर आवाजाच्या शब्दांची तालबद्ध रुमझुम (किणकिण) असे मानण्यात येत होते. बालकांकरिता लिहिलेल्या कवितांत काव्यतत्त्व ही अगदी शेवटची व कमी महत्त्वाची बाब समजली जात होती व अजूनही तशीच समजली जाते.

म्हणून जरी गुजराती बालकविता लिहिणाऱ्या त्रिभुवन व्यास, सुंदरम्, सुरेश दलाल आणि वेणीभाई पुरोहित ह्यांच्यासारख्या प्रख्यात कवींनी बालकांसाठी कविता लिहिण्याचा प्रयत्न केला व त्यात त्यांना बरेच यश प्राप्त झाले तरी गुजरातेत अजून आपल्या संगीताने आणि तालबद्धतेने बालकांच्या मनाला आकर्षित करून त्यांची हृदये जिंकून घेणारा आणि ज्यांच्या काव्यावर प्रेम आहे अशा सर्व मनुष्यांच्या कल्पनाशक्तीवर प्रभाव गाजविणारा असा टागोर अथवा डी ला-मेअर यांच्यासारखा एखादा खरा 'बालकांचा कवि' जन्माला आलेला नाही.

साहित्याच्या इतर क्षेत्रात ह्या बाबतीत गुणवत्तेच्या दृष्टीने फारसा फरक नसला तरी बालसाहित्याच्या क्षेत्राइतकी निराशा झालेली त्यात दिसून येत नाही.

ज्यात अधिक आर्थिक लाभ होईल अशाच प्रकारचे साहित्य प्रकट करण्या-कडेच प्रकाशकांचा ओढा असल्यामुळे काही समस्या निर्माण झाल्या आहेत. मुलांनी निर्माण केलेले निरुपयोगी साहित्य व त्यांच्या क्षणजीवी संस्था आणि मंडळे ह्यांनी चालविलेल्या निरुपयोगी साहित्यप्रवृत्ती ह्यांना फार प्रसिद्धी दिली जाते. ही गोष्ट

बालकांच्या बुद्धिमत्तेला उत्तेजन देण्यासाठी केली जाते अथवा बालकांना आंजारून-गोंजारून आणि त्यांना खूष करून सवंग लोकप्रियता मिळविण्यासाठी केली जाते हे सांगता येत नाही. ह्यात बालकांच्या बुद्धिमत्तेला उत्तेजन देणे हा हेतू असेल तर तो अगदी फुकट गेल्यासारखा आहे, कारण अजूनपर्यंत अशी बुद्धिमत्तेची नवी चमक कोणातही दिसून आलेली नाही. सवंग लोकप्रियता मिळविणे हा दुसरा हेतू असेल तर ती गोष्ट मुलांच्या हिताची नसून निःसंशय अहिताची आहे. कारण अशा तऱ्हेने केलेल्या अपरिपक्वतेच्या वाखाणणीमुळे संतुलित आणि चांगल्या वर्तनाची मुले आत्मसंतुष्ट व घमेंडखोर बनतात. अशा मुलाला एकमेव प्रसिद्धीची हाव सुटते त्यामुळे शेवटी साहित्यनिर्मितीपासून होणारा खरा आनंद व साहित्यापासून होणाऱ्या निर्मळ मनोरंजनाला तो मुकतो.

अशा प्रवृत्तीमुळे बालसाहित्याचा खरा हेतू काय ह्याबद्दल शंका उत्पन्न होते व त्यामुळे काही लोकांची अशी भ्रामक समजूत होते की, ह्या प्रवृत्तीमुळे बाल-साहित्य लिहिणारे लेखक निर्माण होतात आणि तोच बालसाहित्यामागचा खरा हेतू आहे. ह्यामुळे खरा हेतू एकीकडेच राहतो व ह्या प्रवृत्तीमुळे फायद्यापेक्षा नुकसानच अधिक होते.

मला असे वाटते की, भारतातील इतर भाषांतील बालसाहित्याच्या क्षेत्रातही थोड्या फार फरकाने हीच परिस्थिती आहे. ज्यांची दृष्टी उद्याकडे लागली आहे व भविष्यकाळ उज्ज्वल करण्याची ज्यांना अंतःकरणापासून इच्छा आहे अशा लोकांच्या दृष्टीने ही परिस्थिती फार विचार करण्यासारखी आहे.

# परिशिष्ट – अ

## 'रास' अथवा 'रासो'

हेमचंद्रापासून ते नरसिंह महेतापर्यंतच्या काळात रास अथवा रासो ह्या साहित्यप्रकाराचा फार विकास झाला. हे रास मुख्यत्वे जैन साधूंनी लिहिलेले होते. अपभ्रंश भाषेत रचलेल्या काही उपदेशपर छंदोबद्ध रचना 'रास' ह्या नावाने ओळखल्या जाऊ लागल्या. हेमचंद्रांच्या काळात 'रास' अथवा 'रासक' ह्यांचे स्वरूप 'संगीतमय रूपके' (रंगमंचावरील नाट्य) असे होते. वाग्भट्टाने रासकाचे वर्णन 'ताल व लय ह्यांच्या वैविध्याने नटलेले मृदु आणि गतिशील संगीतमय रूपक' असे केले आहे. त्यात अनेक नर्तिका भाग घेत असत. त्यात भाग घेणाऱ्या जोडयांची संख्या ६४ पर्यंतही असे.

जैन मंदिरात काही विशेष प्रसंगी हे 'रास' गायिले जात असत व त्यांचे प्रयोगही केले जात असत. 'रास' दोन प्रकारचे होते. १) ताल रास–त्यात टाळया वाजवून ताल धरला जात असे आणि २) लकुट रास–यात भाग घेणारे नटनटी हातात घेतलेल्या टिपऱ्यांनी ताल धरीत असत. 'रास' ह्या साहित्यप्रकाराचे स्वरूप हे असे आहे. ह्यात स्त्रिया जोडी-जोडीने गात गात व लालित्यपूर्ण रीतीने नृत्य करीत एका वर्तुळात गोल गोल फिरतात.

अशा रीतीने 'रास' हा अनेक जोडया-जोडयांनी खेळला जात असल्यामुळे स्वाभाविकच हा फार वेळ चालणारा अथवा लांब असणे शक्यच नव्हते; पण काही काळ गेल्यानंतर ह्या 'रासा'त कथातत्त्व समाविष्ट झाले आणि 'रासा'चे स्वरूप कथनात्मक व फार दीर्घ असे झाले. त्यामुळे 'रासा'ना अगदी आवश्यक असे जे लालित्यपूर्ण नृत्य त्यावर इतका विपरीत परिणाम झाला की, १७ व्या व १८ व्या शतकात लिहिलेल्या 'रासां'चे प्रत्यक्ष प्रयोग कधी झाले की नाही ह्याचीच शंका वाटते.

हे रास 'दुहा', 'चौपाई' अथवा 'देशी' अशा निरनिराळया छंदात लिहिलेले होते व त्यांचे 'भाषा' अथवा कडवा 'ठवणि' असे भाग पाडलेले होते.

'रास' हे मूळ बोधपर काव्य म्हणून रचले जात होते. त्यामुळे 'बुद्धिरास' ह्यासारख्या जुन्या 'रासा'त आपल्याला फक्त उपदेश आणि सांप्रदायिक विधि-

निषेध ह्या गोष्टी, इतक्या घुसडल्या गेल्या की, १६ व्या, १७ व्या, शतकात व १८ व्या शतकात रचलेले रास बोजड व कृत्रिम वाटू लागले.

## परिशिष्ट – ब

### फागु

'फागु' ह्या काव्यप्रकारात वसंत ऋतूतील निसर्गसौंदर्याचे वर्णन केलेले असते. फागु' हे नाव 'फल्गु' 'वसंतऋतु' ह्यावरून आलेले आहे. 'फागु'मध्ये वसंत ऋतूचे वर्णन केलेले असल्यामुळे त्यात युवक-युवतींच्या आनंद, मौजमजा ह्यांचे, तसेच त्यांच्या आशा-आशंका, विरहवेदना व पुर्नमीलनाच्या आनंदोर्मी ह्यांचेही वर्णन आलेले आहे; पण जैन साधूनी लिहिलेल्या 'फागु'त मात्र–त्यांनी संसाराचा कायम त्याग केलेला असल्यामुळे सांसारिक सुखोपभोगांचे वैभवशाली वर्णन केलेले दिसून येत नाही. म्हणून जैन साधु आपल्या फागुत कधी कधी उत्तान शृंगाराचे वर्णन करीत असले तरी त्याचा शेवट मात्र संयम, त्याग व शांती ह्यातच झालेला दिसून येतो.

## परिशिष्ट – क

### बारमासी

मध्ययुगीन साहित्यातील महाकाव्याखेरीज सर्व काव्यप्रकारात 'बारमासी' हा एकच काव्यप्रकार असा आहे की, ज्यात आपल्याला अभिजात संस्कृत काव्यातील बीजे आढळून येतात. गुजरातीत लिहिलेली महाकाव्ये ही संस्कृत महाकाव्याच्या धर्तीवर संपूर्णपणे लिहिलेली नाहीत. ह्या बाबतीत पुढे तर इंग्रजी महाकाव्याचेही थोडेसे अनुकरण केले गेले आहे. 'आख्यान', 'पद्यावर्त' आणि 'खंडकाव्य' ही नावे संस्कृत असली तरी ह्या धर्तीचे काव्यप्रकार मात्र त्यातील कल्पनाविलास, रूपके व ठराविक साच्याच्या अभिव्यक्ती यावरून संस्कृत साहित्यातील ऋतुसंहार वगैरे ऋतुवर्णनपर काव्यावरूनच घेतलेला असावा, असे दिसून येते.

१८ व्या शतकापर्यंत गुजरातीत 'बारमासी' हा काव्यप्रकार चालू होता. ह्या प्रकारात वर्षाच्या १२ महिन्यांपैकी प्रत्येक महिन्यातील निसर्गाचे वर्णन व आपल्या प्रियकरापासून ताटातूट झाल्यामुळे विरहिणीच्या हृदयावर त्या त्या महिन्याच्या त्या निसर्गसौंदर्याचा झालेला परिणाम ह्याचे वर्णन केलेले असते. मात्र अधिकमासाच्या आगमनाबरोबरच ह्या प्रेमिकांचा विरह संपुष्टात येतो व त्यामुळे ह्या काव्यात

कितीही करुणरस असला तरी त्याचा शेवट सुखान्त असतो. 'बारमासी' ह्या काव्यप्रकाराचे दुसरे नाव 'महिना' असे आहे.

## परिशिष्ट – ड

### प्रबंध

प्रबंध हा साहित्यप्रकार गुजरात व माळवा येथे खास रूढ आहे. ह्याचा खरा अर्थ 'रचना' असा आहे. ही एक दीर्घ ऐतिहासिक अथवा चरित्रात्मक आख्यानवजा कविता असते. बहुधा जैन लेखकांनीच ह्या साहित्यप्रकाराचा उपयोग केलेला आहे.

१५ व्या शतकापूर्वी रचलेल्या अशा कवितांना 'प्रबंध' अशी संज्ञा होती व त्यात मुख्यत्वे ऐतिहासिक प्रसंगांचे वर्णन केलेले असे. त्यांचा गद्य भाग संस्कृत-मध्ये व पद्यभाग 'अपभ्रंश'मध्ये लिहिलेला असे. मेरुतुंगाचार्यलिखित 'प्रबंध-चिंतामणि', ( १३०५ ) राजशेखर सूरी-रचित 'चतुर्विंशतिप्रबंध' हे ग्रंथ अशा प्रकारच्या प्रबंधांचे उत्तम नमुने आहेत. त्या वेळी 'रास' ही संज्ञा कोणा प्रख्यात धार्मिक मनुष्याची महत्ता वर्णन करणाऱ्या अथवा प्रख्यात तीर्थक्षेत्राची श्रेष्ठता दर्शविणाऱ्या रचनेस लावण्यात येत असे.

१५ व्या शतकानंतर लिहिल्या गेलेल्या रचनाना 'रास' व 'प्रबंध' ह्या संज्ञा एकाच अर्थाने जोडल्या गेल्या. 'विमलप्रबंध' लिहिणारा लावण्यसमय व रूपचंद-कुंवर, 'रास' लिहिणारा नयसुंदर ह्यांसारखे लेखक आपल्या रचनाना कधी कधी 'प्रबंध' तर केव्हा केव्हा 'रास' असे म्हणतात. त्यावरून वरील विधान यथार्थच आहे असे दिसते. दंतकथेवर आधारित काव्ये, रूपककाव्ये व जैनेतर लेखकांनी लिहिलेली 'कान्हडदे प्रबंधा'सारखी काव्ये, ह्या सर्व प्रकारच्या काव्यांना 'प्रबंध' असेच संबोधिले जाते.

## परिशिष्ट – इ

### भवाई

'भवाई' हा लोकनाटयाचा एक जुना रूढ प्रकार आहे. एका विशिष्ट जमातीची नटमंडळी ह्याचा प्रयोग करत. हे नट एका गावातून दुसऱ्या गावात फिरत असत आणि आपल्या नाटकांनी लोकांचे मनोरंजन करून त्यांवर आपली उपजिविका करीत. ते आपल्या नाटकात रोजच्या जीवनातील प्रसंगांचे विचित्र तऱ्हेने व हास्योत्पादक रीतीने चित्रण करून दाखवीत असत.

श्री. कृ. मो. झवेरींनी ह्या बाबतीत डाह्याभाई देरासरी काय म्हणतात ते पुढीलप्रमाणे अनुवादून दिले आहे.

"प्रत्येक मंडळीला एका ठराविक जागी खेळ करून दाखविण्याचा व एका ठराविक जातीच्या लोकांकडून खेळाबद्दल पैसे मागण्याचा वंशपरंपरेने हक्क मिळालेला असे. भवाईचा प्रयोग करण्यासाठी रंगमंचाची जरूर नसे. हा खेळ करून दाखविण्यासाठी एखादी गल्ली, रस्ता, धर्मशाळा अथवा मंदिर पुरेसे होई. एखादे जीर्ण वस्त्र अथवा जुनी सतरंजी पडदा म्हणून उपयोगात आणली जात असे. ज्या नटांची कामे पूर्ण होत ते ह्या पडद्यामागे जात व त्यांच्या जागी नवी पात्रे येत. त्यांना ज्या प्रकारचा पोशाख अथवा लहान मोठे दागिने मिळत ते ते वापरीत असत. गोरे दाखविण्यासाठी ते आपल्या तोंडाला खडू अथवा राळ चोपडीत. मशाली त्यांना प्रकाश देण्याचे काम करीत. राळ पेटविण्यात येई आणि त्यातून निघणाऱ्या ज्वाळांमुळे नटांच्या आगमनाला एकप्रकारे चमत्काराचा स्पर्श होत असे. ग्राम्य भाषा आणि बीभत्स हावभाव हे खेळाचे मुख्य अंग असे. त्यांचे विशिष्ट नाच इजिप्शियन लोकांच्या नाचासारखे अश्लीलता सूचित करणारे असत. त्यांच्या खेळाच्या सुरुवातीला ते मांगल्याचा देव जो गणपती त्याचे दर्शन घडवीत असत. त्याची सोंड कापडाची अथवा कागदाच्या जाड अशा गुंडाळीची करीत असत व ती पाहून लोकांना अतिशय हसू येई. ह्या देखाव्यानंतर बाकीचे देखावे अथवा दृश्ये ओळीने एका मागोमाग एक अशी दाखविली जात. प्रत्येक प्रवेशात मुख्य पात्राबरोबर 'रंगलो' (विदूषक) हजर असेच. त्याचे मुख्य काम म्हणजे ग्राम्य उल्लेख, निर्लज्जपणाचा विनोद व अश्लील हावभाव करून लोकांना हसविणे हे होते. ह्या भवायांची लेखित पुस्तके नसत व नट आपापली कामे भाषणे तोंडपाठ करूनच धरीत असत. क्वचित एखादाच नट आपले भाषण कागदावर लिहून काढीत असे व ते अशा रीतीने लिहिलेले असे की फक्त तोच ते भाषण वाचू शकेल.

## परिशिष्ट – फ

### आख्यान

मध्ययुगीन गुजराती साहित्याचा 'आख्यान' हा एक महत्त्वाचा व प्रमाणभूत कसा भाग आहे. त्या वेळच्या सर्जनात्मक साहित्यात जे सर्वात उत्तम व उच्च प्रकारचे साहित्य आहे ते ह्या आख्यानातच पाहावयास सापडते.

भक्तिधर्माचा जसजसा प्रसार होऊ लागला तसतशी सामान्य लोकात धार्मिक व पौराणिक कथांची आवड पुन्हा उत्पन्न झाली आणि 'माणभट्ट' अथवा 'गागरिया भट्ट' ही प्रथा भरभराटीस आली. अर्थातच हा 'माणभट्ट' ब्राह्मण असे कारण

ब्राह्मण हेच लोकांची आध्यात्मिक गरज पुरी करू शकतात असे सर्वांस वाटत असे; पण हा 'माणभट्ट' जरी ब्राह्मण असला तरी सामान्य जनसमूहात मिसळणारा व त्यांच्यापैकीच एक असे.

हा 'माणभट्ट' खेडेगावात एखाद्या चौकात अथवा खुल्या जागेत बसून संध्याकाळी उशीरा लोकांपुढे आपले काव्य एका मोठ्या, गोल, अरुंद तोंडाच्या तांब्याच्या 'माणा'वर अथवा घागरीवर आपल्या बोटातील आंगठ्यानी ताल धरून गाऊन दाखवीत असे. तो गुजराती भाषेत पुराणातील कथा सांगत असे. त्याचे आख्यान ऐकण्यासाठी निरनिराळ्या प्रकारच्या स्त्रिया व पुरुष एकत्र जमत असत.

माणभट्टाचे व्यक्तिमत्त्व, त्याचा आवाज व साध्या, अशिक्षित, लहानांपासून थोरापर्यंतच्या स्त्री-पुरुष श्रोत्यांना श्लेष, विनोद व व्यंग्य ह्यांचा उपयोग करून मंत्रमुग्ध करण्याची शक्ती, तसेच त्यांच्या भावनाना स्पर्श करण्याचे त्याचे सामर्थ्य व त्यांच्या कल्पनाशक्तीला उत्तेजित करून त्यांना पऱ्यांच्या राज्यात घेऊन जाण्याची त्याची प्रतिभा, ह्यावर त्याच्या कथनशैलीचे यश व लोकप्रियता अवलंबून असे. आख्यानाचे कथानक बहुधा खूपच 'ख्यात' म्हणजे श्रोत्यांना माहीत असलेले असे; पण माणभट्ट आपल्या विशिष्ट कथन शैलीने ते आख्यान कलात्मकरीत्या कर्णमधुर करीत असे. तो आपल्या आख्यानाचा आरंभ 'नमस्क्रिया' म्हणजे विघ्नहर्त्या व प्रयत्नाना यश देणाऱ्या अशा गणेशाला आणि विद्येची देवी सरस्वती हिला वंदन करून करीत असे. अशा प्रकारे आपल्या श्रोत्यांसाठी योग्य अशी पार्श्वभूमी तयार करून नंतर तो आपल्या कथेची सुरुवात करीत असे. तो कथेच्या योग्य निरूपणानुसार अथवा कथेतील भावनांच्या चित्रणाला अनुरूप होतील असे आपल्या आख्यानाचे भाग पाडीत असे.

आख्यानाच्या प्रत्येक भागासाठी एकच प्रकारचे वृत्त वापरले जाई व त्या भागाला 'कडवुं' (कडवे) असे म्हणत. कडव्याच्या शेवटच्या दोन ओळी निराळ्या छंदात लिहिल्या जात असत व त्याला 'वलण' असे म्हणत. 'वलण' मध्ये त्या कडव्याचा सारांश थोडक्यात दिलेला असे व त्यामुळे श्रोत्यांची स्मरणशक्ती जागृत होई अथवा पुढच्या कडव्यात काय यईल त्याची थोडक्यात सूचना दिली जाई. आख्यानाच्या शेवटी आख्यानाचे नाव, कर्त्याचे नाव, त्याचा समय इत्यादी आणि कधी कधी स्वतःच्या जीवनातील तपशील, आख्यान-रचनेचा समय व स्थळ दिलेले असे. शिवाय त्यात आपल्या आश्रयदात्यांना आशीर्वादही दिलेला असे.

कथानकातील गुंतागुंत, कथाकथनाची कला व श्रोत्यांकडून मिळालेला प्रतिसाद ह्यांवर आख्यानाची लांबी अवलंबून असे आणि प्रत्येक रात्री ३ ते ४ तास एवढ्या परिमाणाचे एक एक आख्यान कित्येक दिवसपर्यंत चालू असे. कधी कधी एखादे आख्यान महिनाभर अथवा त्याहूनही जास्त दिवस चालत असे.

जरी प्रेमानंदांसारखे आख्यान सांगणारे कित्येक आख्यानकार आपले स्वतःचे रचलेले आख्यान सांगत असत तरी 'माणभट्ट' हा स्वतः आख्यानकार असला पाहिजे असे बंधन नव्हते. दुसऱ्या कवींनी रचलेली आख्यानेही तो श्रोत्यांपुढे कथन करीत असे. 'नाकर' नामक कवीसारखे काही ब्राह्मणेतर कवी आपली आख्याने लोकांपुढे सांगण्यासाठी ब्राह्मण माणभट्टांना बोलावीत असत.

आख्यानात कथानक फक्त आधारापुरते असे. आख्यानात निरनिराळे प्रसंग कलात्मक रीतीने गुंफलेले असत व आख्यानाला एकंदर सुंदर रूप देणे हा मुख्य हेतू असे. एखादा प्रतिभाशाली माणभट्ट तर आपली गोष्ट रंगवून सांगण्याची उत्तम हातोटी व श्रोत्यांची नाडी पारखण्याची कुशलता ह्या गुणामुळे लिहिलेल्या आख्यानाला चिकटून राहात नसे आणि विनोदी गोष्टी व स्थळकाळाला अनुरूप असे घडलेले प्रत्यक्ष प्रसंग यावर सुंदर रूपके करून आख्यानाला सुंदर आकार देत असे. ह्यामुळे श्रोत्यांना जरी त्या आख्यानाचा शेवट माहीत असे तरीही त्यांचे कुतूहल शेवटपर्यंत जागृत ठेवण्यात माणभट्ट सफल होत असे.

# परिशिष्ट – ग

## पद

पद हे वर्णनात्मक व कथनात्मक असे भावकाव्य आहे. ह्यात भावनांना भरपूर वाव असतो. ते गायले जावे असा खास हेतू असतो व ज्या रागात अथवा चालीवर ते गायचे असेल त्याचा उल्लेख त्यावर कधी कधी केलेला असतो. पदात बहुतकरून ८ ते १४ ओळी असतात; पण काही पदात ह्याहून कमी जास्त ओळी असतात. पहिल्या दोन ओळींना 'टेक' अथवा ध्रुवपद असे म्हणतात व त्यानंतरच्या प्रत्येक कडव्याच्या शेवटी हे ध्रुवपद म्हणण्यात येते. शेवटच्या कडव्याच्या शेवटच्या ओळीत बहुतेक कवीचे नाव असते.

'पद' ही एक फार विस्तृत व लवचिक संज्ञा आहे. त्यात बऱ्याच वेळा 'गरबो', 'गरबी', ह्याशिवाय 'थाळ', 'आरती', 'अंगाई गीते', 'होरी' ह्यांचा समावेश होतो. एवढेच नाही, तर कोणत्याही लहान भावगीतालाही 'पद' असे म्हटले जाते.

# परिशिष्ट – ह

## पद्यावर्त

मध्ययुगात आख्यान ह्या साहित्यप्रकाराबरोबरच 'पद्यावर्त' ह्या साहित्य-प्रकाराचाही विकास होत गेला. 'पद्यावर्त' म्हणजे पद्यात कथन केलेली कथा. आख्यानाप्रमाणेच पद्यावर्तकारालाही श्रोत्यांपुढे आपली कथा प्रत्यक्ष गाऊन

दाखवावी लागे; पण आख्याने पुराणातील व इतर धार्मिक पुस्तकातील प्रसंग व कथांवर आधारित असत; पण 'पद्यावर्ता'तील प्रसंग व कथानके निधर्मी स्वरूपाची असत व एका पिढीपासून पुढच्या पिढीपर्यंत परंपरेने चालत आलेली असत. ह्या पद्यावर्तामुळे श्रोत्यांना मानवस्वभावाचे व जगातील व्यवहाराचे सूक्ष्म निरीक्षण करण्याचे ज्ञान प्राप्त होई आणि त्यामुळे श्रोत्यांना कधी कधी शौर्य व धैर्याची कृत्ये करण्याची तसेच नीतिमय आणि पवित्र जीवन जगण्याची प्रेरणा मिळे.

आपल्या कथेत लोकांचे कुतूहल व आवड टिकून रहावी म्हणून पद्यावर्तकार आपल्या कथेला दंतकथांचा आधार देत असे. त्यात स्त्री-दाक्षिण्याने भरलेले प्रेम व साहसपूर्ण प्रसंगांचे वर्णन असे आणि कधी कधी त्यात अद्‌भुत व दैवी चमत्कार' मंत्र, चेटूक–जारणमारण, आत्म्याचा दुसऱ्या देहात झालेला क्षणिक प्रवेश, पूर्वजन्म व पुनर्जन्म, मृत व्यक्तीला पुन्हा जिवंत करणे, चेटकिणी, देव व देवी, राक्षस व पाताळातील व्यक्ती आणि गोष्टी ह्यांचा समावेश करी आणि अमानवी व अद्‌भुत वातावरण उभे करून आपल्या कथेच्या कथानकाला अगदी वेगळे आणि अकल्पित असे वळण देई. ह्या कथेतील पात्रे, विशेष म्हणजे स्त्रीपात्रे हुशार, साहसी, प्रसंगावधानी व सर्व गोष्टीत तरबेज असत आणि आपली कथा दीर्घकाळपर्यंत चालू रहावी म्हणून तिला फुगवण्यासाठी पद्यावर्तकार त्यात उपकथानके, अवांतर गोष्टी, कूटप्रश्न, सूत्रे व शहाणपणाने–चातुर्याने भरलेल्या उक्ती ह्यांची भर घालीत असे.

आख्यानाप्रमाणेच पद्यावर्तातही कथा पद्यांत सांगितलेली असे आणि ह्या दोहोंची रचना मुख्यत्वे श्रोत्यांचे मनोरंजन करण्याला योग्य अशी केलेली असल्यामुळे श्रोत्यांची बुद्धिमत्ता व भावनात्मक परिपक्वता ह्यांच्या पातळीवरील आख्यानकारांच्या व पद्यावर्तकारांच्या रचनाकौशल्यावर फार परिणाम होई.

पण आख्यानातील पात्रे बहुतांशी देव, देवी, राक्षस व दैवी शक्तीची माणसे असत, तर पद्यावर्तातील पात्रे बहुधा ह्या जगातीलच स्त्री-पुरुष असत. आख्याने श्रोत्यांच्या धार्मिक व आध्यात्मिक प्रवृत्तींना उत्तेजन देत तर पद्यावर्ताची रचना करण्यात असा कोणत्याही प्रकारचा हेतू नसे. आख्याने रचणारे कवी आपल्या परीने श्रोत्यांच्या भावनाना व अंतःप्रवृत्तीना स्पर्श करण्याचा प्रयत्न करीत; पण पद्यावर्ते रचणारे कवी श्रोत्यांचे बौद्धिक कुतूहल जागृत करून त्याची पूर्ती करण्याचे प्रयत्न करीत.

## परिशिष्ट – ळ

### गरबो

'गरबो' हा साहित्यप्रकार परंपरेप्रमाणे 'माते'च्या म्हणजे 'अंबामाते'च्या भक्तीशी संबंधित आहे. कारण 'माता' ही आद्यशक्ती मानली असून तिच्यापासून

सर्व जग उत्पन्न झाले अशी कल्पना त्यात असते. आश्विन महिन्यातील शुक्ल पक्षाचे पहिले नऊ दिवस म्हणजे 'नवरात्र'. हे केवळ देवीच्या भक्तीसाठीच राखून ठेवलेले आहेत. गुजरातच्या बऱ्याच भागात रात्रीच्या वेळी स्त्रिया 'गरबो' खेळतात. 'गरबो' म्हणजे सगळीकडून बारीक छिद्रे असलेला लहानसा मातीचा घट किंवा त्या घटाचा गाभारा. त्याच्या आत एक पणती असते व त्यात एक पेटवलेली वात असते. घटाच्या छिद्रातून प्रकाश बाहेर येत असतो. असा तो प्रकाशित गाभाऱ्याचा घट (गरबो) डोक्यावर ठेवून स्त्रिया तालावर डोलतात गोल-गोल फिरतात व फिरताना टाळ्या वाजवून गाण्याला ताल देतात, नि 'माते'च्या स्तुतीची गाणी गातात. ह्या 'गरब्या'मुळे ह्या सबंध नाचालाच 'गरबो' असे नाव पडले.

पहिल्याने गरबा हा गोल-गोल फिरून केलेला अगदी साधा असा नाच असे त्यात पायानी केलेल्या अनेक प्रकारच्या गुंतागुंतीच्या हालचाली नसत. जसजसा गाण्याचा ताल वाढत जाई तसतशी पायाची गती वाढत जाई. मग शेवटी तालावर टाळ्या वाजवून गती खूप जलद होई व त्याबरोबरच तालबद्ध पावले उचलली जात व एक सुंदर नृत्याचा आविष्कार होई.

## गरबी

मध्ययुगीन काळात उदयास आलेला 'गरबी' हा भावमय काव्याचा एक प्रकार आहे. बहुतकरून ह्यात एकच प्रकारची भावना अथवा विचार असतो. हा भावकाव्याचा एक प्रकार असल्याने तो फार लांब नसतो आणि त्यात भावनांचे वर्णन व चित्रण फार उत्कटतेने केलेले असते. ही 'गरबी' समूहाने गायली जावी अशी मान्यता होती म्हणून ह्यात संगीतमयता असणे फार आवश्यक होते.

'गरबी'ची पहिली पंक्ती अथवा ध्रुवपद हा 'गरबी'चा एक अतिशय महत्त्वाचा भाग आहे. 'गरबी'चे सौंदर्य व यश हे बहुतांशी ह्या ध्रुवपदावरच अवलंबून असते. प्रत्येक कडव्याच्या शेवटी हे ध्रुवपद पुन्हा-पुन्हा म्हटले जाते. बऱ्याचवेळा ह्या ध्रुव-पदात गरबीचे सार साठविलेले असते व गरबीमधील विचार विशद करण्यासाठी अथवा पुष्टी देण्यासाठी त्या आद्य पंक्ती लिहिलेल्या असतात.

## गरबी आणि गरबो

'गरबी' व 'गरबो' समूहानेच गायली जातात. बऱ्याचवेळा गरबी व गरबो ही नावे निष्काळजीपणाने एकमेकासाठी वापरली जातात; पण 'गरबो' हा मुख्यत्वे स्त्रिया गातात व त्याच्या बरोबर नाच करतात; पण 'गरबी' ही मात्र पुरुषानी म्हणण्याचा व नाचण्याचा प्रकार आहे. गरबा करताना स्त्रिया कधी कधी आपल्या डोक्यावर 'गरबो' ठेवतात व 'गरबी' करताना 'गरबो' किंवा 'दीपमाला' चौकाच्या

मध्यभागी ठेवून त्याच्या भोवती फेर धरून नाचणारे फिरतात व गातात.

'गरब्याची लांबी 'गरबी'पेक्षा जास्त असते. 'गरब्या'च्या छंदाचे वृत्त 'गरबी'च्या वृत्तापेक्षा निराळे असते.

'गरबी'मध्ये एकाच प्रकारच्या भावाचे चित्रण केलेले असते; पण 'गरब्या'त एखाद्या व्यक्तीचे, प्रसंगाचे अथवा वस्तूंचे वर्णन असते. म्हणून 'गरबा' हा अधिक लांब व वर्णनात्मक असतो आणि परिणामी प्रभावीपणा व नाजूकपणा बऱ्याच वेळा कमी होतो.

मध्ययुगातील बऱ्याचशा 'गरब्या'त अंबामातेची महत्ता भक्तिपूर्ण वर्णिलेली असते; पण त्या वेळच्या बऱ्याचशा 'गरबी'त मात्र कृष्ण व राधा अथवा गोपी यांच्या प्रेमाचे वर्णन केलेले असते.

## परिशिष्ट तळटीपा

१. काही विद्वान हा शब्द फरगु ह्या शब्दावरून आला असे मानतात. 'फागु' हा देश्य शब्द आहे व त्याचा अर्थ वसन्तोत्सव असा होतो. ह्यासाठी संस्कृत-मध्ये फलगु असा शब्द आहे व त्यापासून फाल्गुनी व फाल्गुन हे शब्द आले.

२. 'फर्दर माइलस्टोनस् इन गुजराती लिटरेचर.' सुधारलेली दुसरी आवृत्ती १९५६. पृष्ठे २००–२०१ फ.

३. धर्मशाळा.

४. ह्या कारणास्तव त्यांना माणभट्ट अथवा गागरियाभट्ट असे म्हणत व म्हणून ते इतर भट्ट अथवा भट्टजीपेक्षा निराळे असत. भट्टजी हे संस्कृत पुराणातील गोष्टी वाचून त्या गुजरातीत समजावीत असत. त्यांचे श्रोते म्हणजे पुरुष व स्त्रिया ह्यांचा लहानसा समुदाय असे. ते श्रोते एखाद्या मंदिरात अथवा कोणा एखाद्या गृहस्थाच्या घरी जमत असत.

# संदर्भ ग्रंथांची सूची

## इंग्लिश


शेफर गुलाबदास– 'ड्रामा इन मॉडर्न इंडिया–आर्टिकल ऑन गुजराती', पी. ई एन. ऑल इंडिया सेन्टर १९६१.

दवे टी. एन.– 'ए स्टडी ऑफ दि गुजराती लँग्वेज इन दि 16th सेंचरी' (व्ही. एस.) दि रॉयल एशियाटिक सोसायटी, लंडन १९३५.

दिवेटिया नरसिंहराव– 'गुजराती लँग्वेज अँड लिटरेचर', फॉर्बस गुजराती सभा, १९२४.

'दि प्रेझेंट स्टेट ऑफ लिटरेचर', बॉम्बे युनिव्हर्सिटी, १९३४.

झवेरी मनसुखलाल– १) 'कॉन्टेम्पोररी इंडियन लिटरेचर–आर्टिकल ऑन गुजराती', साहित्य अकादमी, रिवाइज्ड अँड एनलार्जड् सेकंड एडिशन, १९५९.

२) 'इंडियन रायटर्स अँड चिदंबरम्',–आर्टिकल ऑन गुजराती शॉर्ट स्टोरी', पी. ई. एन. ऑल इंडिया सेंटर, १९५७.

३) 'लिटररी क्रिटीसिझम इन इंडिया' (डॉ. नागेंद्र संपादित) यामधील – 'आर्टिकल ऑन गुजराती लिटरेचर' सरिता प्रकाशन, मीरत, १९७६.

४) 'मॉडर्निटी इन कॉन्टेम्पोररी लिटरेचर' – 'आर्टिकल ऑन गुजराती इंडियन इन्स्टिटयूट ॲडव्हान्स्ड स्टडीज', सिमला, १९६८.

मुनशी के. एम.– 'गुजरात अँड इटस् लिटरेचर', भारतीय विद्याभवन, १९५४.

संजाना जे. ई.– 'स्टडीज इन गुजराती लिटरेचर', बॉम्बे युनिव्हर्सिटी, १९५०.

त्रिपाठी गोवर्धनदास– 'क्लासिकल पोएटस् ऑफ गुजरात', फॉर्बस गुजराती सभा, १९५८.


## गुजराती


अंजारिया एच. जी.– 'साहित्य प्रवेशिका', सस्तुं साहित्यवर्धक कार्यालय, १९५२.

भायाणी हरिवल्लभसी– 'अनुशीलनो' पॉप्युलर पब्लिशिंग हाऊस, १९६५.
देरासरी डाह्याभाई– साठीना साहित्यनुं दिग्दर्शन.
गुजरात विद्यासभा– 'ग्रंथ अने ग्रंथकार' (खंड १–२)
गुजरात साहित्य सभा– 'अॅन्युअल रिव्ह्यूज ऑफ बुक्स - स्टार्टिंग फ्रॉम दि इयर १९२९'.
गुजरात साहित्य संसद्– 'मध्यकाळनो साहित्य-प्रवाह', १९२९
गुजराती साहित्य परिषद– 'गुजराती साहित्यनो इतिहास' खंड १ ला (१९७३) खंड २ रा (१९७६)
झवेरी मनसुखलाल–, शाह रमणलाल सी– 'गुजराती साहित्यनुं रेखादर्शन', वोरा, १९५३
झवेरी मनसुखलाल– 'अभिगम' चंद्र प्रकाशन, १९६६.
जोशी उमाशंकर– 'निरीक्षा', वोरा, १९६० 'शैली अने स्वरूप' वोरा, १९६०
पंडित प्रबोध– 'गुजराती भाषानुं ध्वनिस्वरूप अने ध्वनि परिवर्तन' गुजरात युनिव्हर्सिटी, १९६६.
पाठक जयंत– 'आधुनिक कविताप्रवाह' चुनीलाल गांधी, विद्याभवन, १९६३
पाठक हिराबेन– 'आपणुं विवेचन साहित्य' १९३८.
पाठक रामनारायण वी– 'अर्वाचीन काव्य साहित्यनां वहेणो'
रावळ अनंतराय– 'गुजराती साहित्य' (मध्यकालीन) मॅक्मिलन, १९५४
रिसेप्शन कमिटी– (६६ वे भारतीय काँग्रेस अधिवेशन) 'स्मृतिग्रंथ– गुजरात एक परिचय', भारतीय राष्ट्रिय काँग्रेस ६६ वे सेशन, भावनगर, जानेवारी १९६१
सरदार वल्लभभाई पटेल युनिव्हर्सिटी– 'ज्ञानगंगोत्री ग्रंथश्रेणी' १० आणि ११ 'साहित्य दर्शन' १ आणि २
शाह चुनीलाल वर्धमान– 'गुजरातीमां ऐतिहासिक नवलकथा'.
शास्त्री के. के. – १) 'गुजराती साहित्यनुं रेखादर्शन' भाग १ आणि २, १९५१.
२) 'कविचरित' भाग १ आणि २, १९५२.
३) 'आपणा कवीओ' भाग–१
सुंदरम्– 'अर्वाचीन कविता', गुजरात व्हर्नाक्युलर सोसायटी १९४६.
तंत्री मणिभाई नारणजी– 'गुजराती नवलकथानुं साहित्य'.
ठाकर धीरुभाई पी.–'गुजराती साहित्यनी विकासरेखा' भाग १ (१९५४) २ (१९५६)
ठाकोर बळवंतराय के.– 'नवीन कविता विशे व्याख्यानो' (१९४३)
वैद्य विजयराय– 'गुजराती साहित्यनी रूपरेखा' सयाजी साहित्य माला १९४३.

# सूची

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | ओळ लाईन | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १४ | अपरांन्स | अपरान्त |
| ४ | ४ | त्यांस | त्यांत |
| २८८ | ११ | (Sumealist) | (Surrealist) |
| २८९ | ६ | मालार्कं | मालार्मे |
| " | " | क्रापका | काफ्का |
| " | ९ | (एल्फिन्स्टन) | —हा शब्द अधिक तो गाळावा. |
| १२८ | ५ | दिवेटिंचा | दिवेटियांचा |
| २८९ | ७ | व्हिजिनस्टाईन | विट्गन्स्टाइन |
| | | **Omissions** न छापलेले | |
| २९२ | ६ | केशवराम शास्त्री ह्या शब्दापुढे | व हरिप्रसाद शास्त्री |
| २९१ | पृष्ठाच्या शेवटून वर ३ री | जयंत पाठक ह्या शब्दापुढे | भोळाभाई पटेल रघुवीर चौधरी व हिराबेन पाठक |